# माक्सिम गोर्की

# साहित्य आणि कला



रादुगा प्रकाशन
मॉस्को




लोकवाङ्मय गृह प्रा. लि.
मुंबई

अनुवाद – अनिल हवालदार
सजावट – ता .इवाश्चेन्को

МАКСИМ ГОРЬКИЙ
О литературе и искусстве
Составитель А. Ермаков
*на языке маратхи*

M. GORKY
On Literature and Art
*in Marathi*



$Г \frac{4603000000—396}{031(01)—84}$ 342—84

# अनुक्रमणिका

# प्रस्तावना

## १

मॅक्सिम गोर्की (हे टोपण नांव. मूळ नांव – अलेक्सेई मॅक्सिमोविच पेश्कोव, १८६८-१९३६) यांचा कलात्मक वारसा प्रचंड आहे. इतर थोर साहित्यश्रेष्ठींप्रमाणेच, त्यांनी केवळ स्वतःच्या महान रशियन साहित्याच्या विकासावर लक्षणीय ठसा उमटविला एवढेच नव्हे, तर जागतिक साहित्या-वरही बराच प्रभाव पाडला. समाजाच्या अगदी खालच्या स्तरातून आलेल्या, इतर कुणालाही नसेल तेवढे जीवनाच्या सत्याचे आकलन झालेल्या व स्वतः-च्या कलात्मक साधनांद्वारे ते सत्य लोकांना सांगण्याची तळमळ लागलेल्या ह्या लेखकाने सबंध रशियन समाजाला व नंतर सबंध जगाला चकित केले. गोर्कींची साहित्यिक कारकीर्द दिपवून टाकणारी होती. १८९५ मध्ये त्यांच्या आरंभीच्या कथा मध्यवर्ती नियतकालिकांमधून प्रसिद्ध झाल्या आणि एव्हाना १८९८ मध्येच 'निबंध आणि कथा' यांचा दोन खंडांमधील संग्रह प्रसिद्ध झाला. १९०१ साली त्यांच्या पुस्तकांचे प्रमुख युरोपीय भाषांमधून अनुवाद झाले. केवळ १९०३ मध्ये त्यांच्या सहा खंडांच्या संग्रहाचे पाच वेळा पुनर्मुद्रण झाले.

गोर्की यांच्या साहित्यिक कार्याची उंची, त्यांच्या विचारांचा गहिरेपणा, त्यांचे कलात्मक कसब, भिन्न भिन्न साहित्यप्रकारांवरचे आणि शैलींवरचे त्यांचे पूर्ण प्रभुत्व – हे सर्व विस्मयकारक होते. त्यांची विद्वत्ता आणि ज्ञानाची अदम्य तहान पाहून त्यांचे समकालीनसुद्धा थक्क झाले होते. पद्धतशीर शिक्षण घेणे सलग दोन वर्षांहून जास्त काळ त्यांना शक्य झाले नव्हते, हे प्रत्येकाला ठाऊक नाही. पण स्वतःच्या विशाल व्यासंगांमार्फत आणि बहुविध ज्ञानामार्फत ते २० व्या शतकामधील एक सर्वांत जास्त सुशिक्षित व्यक्ती बनले.

लेखक, साहित्यिक आणि सामाजिक व्यक्ती ह्या नात्याने तीव्र आत्मिक जीवनाच्या वातावरणात परिपक्व व विकसित होण्याचे सुदैव गोर्कींना

लाभले. अत्यंत बुद्धिमान, प्रगाढ सुसंस्कृतता, धीट विचार व गहिऱ्या भावना असलेल्या लोकांबरोबर त्यांची सतत परस्पर क्रिया आणि संबंध घडत राहिले. व्ला. लेनिन, ल्ये. तल्स्तोय, आ. चेखोव, इ. बूनिन, ले. आंद्रेयेव, फ्यो. शल्यापिन, इ. रेपिन, कॉ. स्तानिस्लावस्की, रो. रोल्लाँ व इतर अनेकांबरोबर त्यांचे निकटचे संबंध होते.

क्रांतिकारक युगाशी घडलेल्या संयोगामुळे मा. गोर्कींचे रशियन व जागतिक साहित्यामधील अगदी नेमके आणि विशिष्ट स्थान निर्णित झाले. इतर रशियन आणि युरोपीय लेखकांपेक्षा असलेला गोर्कींचा वेगळेपणा म्हणजे जागतिक साहित्यात प्रथमच (त्यांची कादंबरी 'आई' आणि नाटक 'वैरी') त्यांनी स्वतःचे खास वैशिष्टच असलेल्या सर्व कलात्मक सामर्थ्यानिशी, नव्या सामाजिक पायावर जगाची फेरउभारणी करण्याची ऐतिहासिक जबाबदारी अंगावर पडलेल्या कामगारवर्गाच्या मन:स्थितींचे, भावनांचे आणि विचारांचे चित्रण केले. त्यांचे स्नेही आणि नवजात सोविएत रशियाचे पहिले शिक्षणमंत्री अनातोली लूनाचार्स्की यांनी लिहिले होते: "गोर्कींचे सर्वश्रेष्ठ, अपवादात्मक महत्त्व म्हणजे कामगारवर्गाचे ते पहिले महान लेखक आहेत... मार्क्स, एंगल्स आणि लेनिन यांच्यात हा वर्ग जसा तत्त्वज्ञानदृष्टया व राजकीयदृष्टया आकाराला आला, तसा गोर्कींमध्ये तो कलात्मकदृष्टया आकारला."* एक लढवय्या, क्रांतिकारक, जीवनाचा स्थित्यंतरकार म्हणून माणसाचे वर्णन करताना गोर्की यांनी ऑक्टोबर क्रांतीपूर्वीच्या संपूर्ण रशियन समाजाचे कलात्मक चित्रण घडविले. सर्व सामाजिक वर्ग, स्तर व गट, वर्गलढे आणि विसंगती; भिन्न राजकीय, तात्त्विक, धार्मिक, नैतिक व सौंदर्यवादी शोध — असे सर्वांगीण चित्रण केले. उपरीनिर्दिष्ट लूनाचार्स्की यांनी गोर्कींच्या सर्वोत्तम कादंबरीचे, 'क्लिम सामगिनचे जीवन,' वर्णन करताना 'दशकांचा चलच्चित्रपट' असे म्हटले होते. लेखकाच्या संपूर्ण सृजनशील कार्याला हे विधान लागू करण्याचा आपल्याला हक्क आहे, कारण रशियातील जीवनाचा खराखुरा चलत् चित्रपट त्यांच्या पुस्तकांच्या पानांवरून पहायला मिळतो: ('बालपण', 'दाही दिशा' आणि 'माझी विद्यापीठे' ही त्रयी; 'आर्तामोनोवांचा खटला', 'फोमा गोर्देयेव' ह्या कादंबऱ्या; 'तळागाळातील माणसं',

---

* लूनाचार्स्की अ., ८ खंडातील संकलित संग्रह, खंड २, पान १४१.

'गंजलेले घर', 'दाचावाले', 'येगोर बुलीच्योव व इतर', 'वास्सा झेलेझनोवा' आणि इतर खूप नाटके.) म्हणून, गोर्की यांचे सृजनशील कार्य म्हणजे १९ व्या शतकातील अखेरच्या काळातील व २० व्या शतकातील आरंभीच्या दशकातील रशियन जीवनाचा ज्ञानकोश म्हटले तर अतिशयोक्ती ठरणार नाही.

लेखक म्हणून गोर्की यांचे आणखी एक वैशिष्टय म्हणजे लहानपणापासून क्रांतिकारक चळवळीशी आलेला त्यांचा निकट संबंध. झारशाही-विरोधी लढ्यातील त्यांच्या सहभागाचे प्रमुख टप्पे आठवून पाहू: १९ व्या शतकाच्या नवव्या दशकाच्या अखेरीस मार्क्सवादी वर्तुळातील कार्याबद्दल पहिली अटक; तेव्हापासून झारच्या पोलीसांची गोर्कीवर सतत पाळत होती. विद्यार्थ्यांचे निदर्शन दडपल्याच्या निषेधाबद्दल आणि झारची एकतंत्री राजवट उलथून टाकण्याचे आवाहन केल्याबद्दल १९०१ मध्ये दुसरी अटक (नीझ्नी-नवगोरद – आताचे गोर्की शहर – येथे त्यांना हद्दपार करण्यात आले); १९०२ मध्ये विज्ञान प्रबोधिनीचे मानद अकादमीशिअन म्हणून गोर्कींची निवड झाली, पण झार दुसरा निकोलस याने हुकूम काढून ह्या निवडणुका अवैध ठरविल्या. ९ जानेवारी १९०५ रोजी पीटरबुर्गमध्ये शांततावादी निदर्शकांवर गोळीबार झाल्यानंतर गोर्कींनी एक क्रांतिकारक पत्रक लिहिले व एकतंत्री राजवट उलथून टाकण्याचे नवे आवाहन केले. ह्याबद्दल त्यांना परत अटक झाली व पीटर आणि पॉल किल्ल्यात त्यांना बंदिवासात ठेवण्यात आले. पण प्रचंड जनमताच्या दबावाखाली व रशियन आणि पश्चिम युरोपीय बुद्धिमंतांच्या निषेधांपायी, गोर्कींची मुक्तता करणे सरकारला भाग पडले. १९०५ मधील मॉस्कोच्या उठावात त्यांनी भाग घेतल्यानंतर परत एकदा त्यांच्या पाठी कायदेशीर चौकशीचा धोका निर्माण झाला. म्हणून १९०६ च्या आरंभी ह्या क्रांतिकारक लेखकाला पश्चिमेत प्रयाण करावे लागले. सार्वत्रिक माफी जाहीर झाल्यानंतरच केवळ १९१३ मध्ये ते मायदेशी परतू शकले. अशा चरित्राचा लेखक सबंध जगात झाला नाही व अद्यापही नाही, असे आम्ही सार्थपणे म्हणू शकतो.

ह्या शतकाच्या आरंभापासून साहित्यिक शक्तींचे एक जोमदार संघटक म्हणून गोर्की पुढे सरसावले. ह्या बाबतीत एक नव्या प्रकारचा कलाकार-संघटक म्हणून त्यांनी स्वत:चे दर्शन घडविले. जनकलेसाठी, जीवनाच्या सत्यासाठी कला राबविण्यासाठी त्यांच्यासह लढायला सिद्ध असलेल्या

लेखकांना त्यांनी एकवटले. त्यांची ही कार्ये सैद्धांतिकदृष्टया, सौंदयदृष्टया आणि शैक्षणिकदृष्टया फार महत्त्वाची होती. १९१७ च्या ऑक्टोबर क्रांतीनंतर त्यांच्या सर्व वैभवानिशी ती पुढे चालू राहिली.

सोविएत साहित्यातील समाजसत्तावादी वास्तववादाचे जनक असे गोर्कींना सार्थपणे म्हटले जाते. त्यांचे व्यक्तिमत्त्व, सृजनशील कार्य, संघटनात्मक आणि साहित्यिक उद्योग – ह्या सर्व गोष्टींनी बव्हंशी (व आवश्यकरीत्या!) सोविएत साहित्याच्या विकासाच्या दिशांना, त्याच्या वैशिष्टयांना व कलात्मक तत्त्वांना निर्णित केले.

२० व्या शतकाच्या आरंभी समाजसत्तावादी वास्तववाद साहित्याची व कलेची एक रीत म्हणून प्रस्थापित झाला आणि जगाच्या समाजसत्तावादी स्थित्यंतराच्या आरंभीच्या काळामध्ये त्याने पक्के मूळ धरले. सोविएत संघात तो प्रमुख साहित्यप्रकार बनला. "समाजसत्तावादी वास्तववाद" हा शब्दप्रयोग सर्वप्रथम १९३२ साली सोविएत वृत्तसृष्टीत अवतरला. सोविएत साहित्याच्या क्रांतिपूर्व साहित्यिक अनुभवाचा (सर्वप्रथम गोर्की यांच्या) आणि वैशिष्टयांचा आढावा घेणाऱ्या लेखात हा शब्दप्रयोग वापरण्यात आला होता. रशियन अभिजात साहित्याच्या सर्वोत्तम परंपरांचा वारसा तर समाजसत्तावादी वास्तववादाने घेतलेला आहेच, शिवाय साहित्यिक विकासाचे गुणात्मकदृष्टया एक पुढचे पाऊल त्याने टाकले आहे. त्याचे नाविन्य आणि बळ अवाढव्य ऐतिहासिक व्यवहारात सामावले आहेत. कामगारवर्गीय क्रांतीसाठी आणि शास्त्रशुद्ध समाजसत्तावादाच्या आधारावर स्थित्यंतरासाठी लढण्याचा तो व्यवहार आहे. त्याने नव्या प्रकारच्या लेखकाचे जीवनविषयक तत्त्वज्ञान निर्णित केले आणि त्याच्या नायकांच्या व्यक्तिरेखांमार्फत व त्याच्या कलात्मक साधनांमार्फत ते सांगितले. समाजसत्तावादी वास्तववादी साहित्यामधील कलात्मक नाविन्य त्याच्या विकासाच्या पहिल्याच टप्प्यांमध्ये प्रकट झाले होते. 'आई', 'वैरी' अशा गोर्कींच्या पहिल्या पुस्तकांपासून व नंतर 'आर्तामोनोवांचा खटला', 'क्लिम सामगिनचे जीवन' इत्यादींमधून साहित्यात केवळ नवे विषय आणि नवे नायकच आले होते असे नव्हे, तर नवा सौंदर्यवादी आदर्श, ऐतिहासिक आशावादही आला होता. सामाजिक आणि क्रांतिकारक विकासाच्या पार्श्वभूमीवर आजचे संघर्ष तो उघड करीत होता.

सोविएत साहित्याच्या पहिल्या पावलांपासून जुन्या आणि नव्या जगां-

मधील संघर्ष, "जगव्यापी क्रांतीची आग" मुख्य विषय बनला. म्हणजे कलेला समृद्ध करणाऱ्या नव्या ऐतिहासिक आशयाने जीवनाच्या कलात्मक वर्णनाला विशिष्ट स्वरूप दिले.

समाजसत्तावादी वास्तववादाच्या रीतीच्या पायात तीन वास्तवांना – वर्तमान, भूत आणि भविष्य – एकत्र आणण्याची गोर्कींची कल्पना सामावलेली आहे. प्रत्यक्ष घडामोडीतील, लढ्यातील वास्तवाचे चित्रण आणि भविष्याच्या शिखरावरून भूतकाळ पाहण्याची समर्थता त्या कल्पनेत अभिप्रेत आहे. त्यांनी अनेकदा ठासून म्हटले होते: "आपल्या वास्तवाच्या सर्व विविधते-मधून त्याच्या मुख्य प्रवृत्ती उघड केल्या पाहिजेत." सोविएत कलेतील ह्या नव्या कला-रीतीला "जगाचे स्थित्यंतर घडविणारा लोकांचा वास्तववाद" असे गोर्कींनी म्हटले होते. सोविएत कलेच्या रोमांचवादी तत्त्वांचे त्यांनी सतत समर्थन केले होते. लढ्याच्या शौर्यशाली उत्साहाची व विधायक व्यक्तिरेखा निर्माण करण्याच्या कार्याची त्या तत्त्वांशी सांगड घातली होती. सोविएत लेखकांच्या पहिल्या कॉंग्रेसमध्ये प्रतिनिधींसमोर भाषण करताना ते म्हणाले होते: "आपल्या पुस्तकांचा मुख्य नायक श्रम बनला पाहिजे, म्हणजे श्रमप्रक्रियेने संघटित केलेला माणूस..."

प्रचारक, तत्त्वप्रणालीकार आणि साहित्यिक टीकाकार ह्या नात्याने गोर्की यांनी वि. बेलीन्स्की, नि. चेर्नीशेवस्की, नि. दब्रोल्यूबोव यांच्या रशियन क्रांतिकारक लोकशाहीवादी टीकेच्या परंपरा पुढे चालू ठेवल्या व त्यांचा विकास केला. त्यांच्या साहित्यावरील असंख्य सैद्धांतिक आणि टीकात्मक लेखांमधून, त्यांच्या टिपणांमधून व पत्रांमधून, कलात्मक आवडीशी व भाषेच्या उत्कृष्ट जाणेशी संगम घडलेल्या त्यांच्या प्रचंड बुद्धिमत्तेचे दर्शन घडते. रशियन आणि जागतिक अभिजात साहित्य, सोविएत साहित्य, त्याची कार्ये, शैली आणि रीती, नव्या समाजाच्या उभारणीमधील सोविएत लेखकाचे स्थान, अशा अनेक विषयांवरील गोर्कींचे चिंतन त्या लेखांमधून वाचायला मिळते. संस्कृतीविषयक गोर्की यांची विधाने आणि विचार केवळ साहित्य व कलाक्षेत्रातील लोकांनाच कमालीची स्वारस्यपूर्ण वाटतात असे नव्हे, तर मार्क्सवादी-लेनिनवादी सौंदर्यशास्त्रात बहुमोल भर घालणाऱ्या मान्यवर साहित्यश्रेष्ठाचे सखोल आणि प्रगाढ विचार म्हणून सर्वसामान्य लोकांनाही स्वारस्याचे वाटतात.

लोककलेमध्ये – लोकसाहित्य आणि दंतकथांमध्ये – गोर्कींना लोकांच्या विचारांचा व भावनांचा सुसंवादी एकोपा आढळला. त्यात त्यांना "अत्यंत प्रगाढ व तेजस्वी, कलात्मकरीत्या परिपूर्ण प्रकारचे नायक"* दिसले. वाचकाला आढळेल की, गोर्कींनी सबंध आयुष्यभर उराशी बाळगलेल्या विचारांपैकी हा एक विचार होता. हा विचार त्यांच्या सौंदर्यशास्त्रविषयक आणखी एका प्रमुख तत्त्वाशी निकटतेने निगडित होता – सौंदर्यवादी भावनेच्या आणि एकूण सृजनकार्याच्या विकासात श्रमाच्या सर्वांत मोठ्या महत्त्वाला मान्यता. 'व्यक्तिमत्त्वाचा नाश' ह्या लेखामध्ये त्यांनी हा विचार पुढील रीतीने मांडला होता: "माणसे केवळ सर्व भौतिक मूल्ये निर्माण करणारी शक्ती नव्हेत, तर आत्मिक मूल्यांचा एकमेव आणि अक्षय उगम आहेत. जगातील सौंदर्य, सर्व महान कविता, शोकांतिका, जागतिक महत्त्वाचा सांस्कृतिक इतिहास – हे सर्व लोकांकडूनच निर्माण झाले आहे."** ह्या तत्त्वाधिष्ठित भूमिकेचा आधार घेऊन गोर्कींनी लेखकांना, संगीतकारांना आणि कलाकारांना आवाहन केले की, त्यांनी आपल्या सृजनकार्यात लोकसाहित्याचा, लोकांच्या भावनांच्या, विचारांच्या आणि भाषेच्या ह्या कारंजाचा वापर करावा. गोर्की यांच्या दृष्टीने आणखी एक अत्यंत महत्त्वाचा विचार म्हणजे लोकांच्या सृजनकार्यात, लोकभाषेमध्ये, या ना त्या संस्कृती-च्या **राष्ट्रीय वैशिष्ट्यांना** खतपाणी घालणारे, साहित्य व कला यांची विशिष्ट राष्ट्रीय वैशिष्ट्ये निर्माण करणारे उगम त्यांना आढळले.

गोर्कींनी तरुण लेखकांना केलेल्या शिफारसी, नव्या लेखकांनी त्यांच्याकडे पाठविलेल्या साहित्याचे त्यांनी केलेले विश्लेषण, त्यांची पत्र व त्यांचे लेख – ह्या सर्वांमधून गोर्कींना भाषेच्या विशुद्धतेविषयी वाटणारा कळवळा प्रकट होतो. लोकांचा अभ्यास करा, साहित्यश्रेष्ठांपासून लेखनाचे धडे घ्या, असा त्यांचा उपदेश आढळतो. ह्या शतकाच्या चौथ्या दशकाच्या आरंभी भाषेतील स्वाभाविकतावादाविरुद्ध, "उत्स्फूर्त भाषे"च्या घोषणेविरुद्ध, व्यावसायिकवाद, स्थानिक शब्द आणि बोलीभाषांनी साहित्याला दूषित

---

* गोर्की मा., ३० खंडांमधील संकलित साहित्य, खंड २७, पान ३०५.

** कित्ता, खंड २४, पान २६.

करण्याविरुद्ध त्यांनी ठामपणे लेख लिहिले, फलदायी चर्चा घडवून आणल्या व सोविएत साहित्याच्या भावी विकासावर त्यांचा हितकारक परिणाम झाला.

भाषेशी वरपांगी प्रयोग करण्याविरुद्ध, लोकांच्या जीवनापासून आणि भाषेपासून फारकत असलेली "शब्दनिर्मिती" करण्याविरुद्ध गोर्कीनी त्याच चिकाटीने व सातत्याने लढा दिला. गोर्की नेहमी म्हणत की, जिवंत भाषा लोकांनी निर्माण केली आहे आणि श्रेष्ठ साहित्यिकांनी तिच्यात सुधारणा घडवून, तिला समृद्ध आणि सफाईदार करून तिचे साहित्यिक भाषेत रूपांतर घडविले आहे. गोर्कीनी लेखकांना असेही आवाहन केले की, भाषासमृद्धी फक्त लोकसाहित्याकडूनच करू नका, तर पूष्कीन, गोगोल, तल्स्तोय, तुर्गेनेव, चेखोव यांच्यापासून कायम शिका...

गोर्कीवर लोककलेचा प्रभाव प्रचंड होता. त्यांच्याच शब्दांमध्ये सांगायचे तर, "आमच्या भाषेचं मोहक सौंदर्य आणि तिची समृद्धी समजून घ्यायला तिनं मला फार मोठी मदत केली."

रशियन साहित्य जगामधील सर्वात अधिक लोकशाहीवादी आणि स्वातंत्र्यप्रेमी होते, अशी गोर्कीची ठाम धारणा होती. रशियन साहित्याच्या सामर्थ्यात आणि वैशिष्टयात गोर्कींना त्याचे राष्ट्रीय स्वरूप दिसले हा काही योगायोग नव्हे. त्यांच्या भाषेत सांगायचे तर रशियन लेखक "नेक लढवय्या होता, सत्यासाठी हौतात्म्य पत्करणारा होता," "त्याने अंतःकरणपूर्वक मानवतावादाचा पुरस्कार केला, स्वतःच्या माणसांचे लक्ष वेधवून घेतले."* रशियन साहित्याच्या आणि रशियन लेखकाच्या वैशिष्टयतेसंबंधीचे गोर्की यांचे विचार, मायदेशातील साहित्याच्या इतिहासाचे त्यांनी केलेले सखोल अवगाहन, ह्यांनी रशियन अभिजात साहित्याबद्दलच्या खऱ्याखुऱ्या स्तोत्राचे रूप घेतले आहे: "पश्चिमेतील एकही साहित्य अशा ताकदीने आणि वेगाने, गुणांच्या अशा प्रभावी आणि चमकदार तेजाने सजग बनले नाही, असे मी म्हटले तर ते अतिशयोक्त ठरणार नाही. सबंध जगाने मान्य केलेली अशी थोर पुस्तके युरोपात कुणीही निर्माण केली नाहीत, अशा अतर्क्य कठीण परिस्थितींमध्ये अशा अद्भुत सौंदर्यांची निर्मिती कुणीही केलेली नाही...

---

*गोर्की मा., संकलित साहित्य, खंड २४, पान ६६.

"आमचे साहित्य आमचा अभिमान आहे, एक राष्ट्र म्हणून निर्माण केलेली ती सर्वोत्तम गोष्ट आहे. त्यात आमचे सारे तत्त्वज्ञान सामावले आहे, त्यात थोर मन:प्रवृत्ती उमटल्या आहेत. कमालीच्या जलदपणे बांधलेल्या ह्या अद्भुत मंदिरात आजतागायत थोर सौंदर्याची आणि सामर्थ्याची मने झळाळत आहेत, पवित्र विशुद्धतेची हृदये तेजाळत आहेत. ही अस्सल कलावंतांची मने आणि हृदये आहेत. आणि ती सर्व त्यांना जे काही आकलन झाले व जे काही त्यांनी अनुभवले, त्याचे खरेपणाने आणि नेकपणाने दर्शन घडवीत आहेत. ती म्हणत आहेत: रशियन कलेचे मंदिर लोकांच्या मूक मदतीने आम्ही उभारले, लोकांनीच आम्हाला स्फूर्ती दिली, म्हणून लोकांवर प्रेम करा!

"इतर कोणत्याही मंदिरापेक्षा आमच्या मंदिरात मानवतेचे अधिक वारंवार आणि जोरदारपणे गुणगान घडते. रशियन साहित्याच्या सौंदर्याने आणि सामर्थ्याने चकित झालेल्या जगाने रशियन साहित्याचे महत्त्व मान्य केले आहे."*

रशियन लेखकांबरोबर गोर्कींच्या झालेल्या गाठीभेटींच्या आठवणी, त्यांची स्मृतिचित्रे, हा गोर्की यांच्या सृजनकार्याचा एक स्वतंत्र प्रकार आहे. "साहित्यिकांच्या व्यक्तिचित्रां"मध्ये वास्तव व्यक्तींच्या प्रतिमा त्यांच्या स्वभावविशेषांनुसार, त्यांच्या वैयक्तिक लकबींनुसार रेखाटण्याचा गोर्कींनी प्रयत्न केला आहे. पण त्याचबरोबर प्रत्येक व्यक्ती ठळक आद्याक्षरांमध्ये रेखाटण्याचा त्यांनी प्रयत्न केला आहे. साहित्यिकांच्या आठवणींमध्ये वि. कोरोलेन्को यांचे दर्शन एक लेखक-नागरिक, "नेक लढवय्या", "रशियन लेखकाची एक प्रतिमा" म्हणून घडते. ल्येव तल्स्तोय यांचे व्यक्ति-चित्रण गोर्कींच्या लेखनाचा एक अत्युत्कृष्ट नमुना आहे. हे लेखन अगदी वेगळ्या धाटणीत घडले आहे. तल्स्तोय यांच्याबद्दलचा संपूर्ण निबंध वादविवादात्मक सुरात आहे. गोर्की वाचकाला पुढील मुख्य निष्कर्षाला आणतात: तल्स्तोय यांच्या आशावादाची ताकद त्यांच्या संन्यासी आत्मत्यागी आदर्शांबरोबरच्या, प्रतिकारहीन नम्र तत्त्वज्ञानाच्या दुराराध्य विसंगतीमध्ये सामावली आहे. अशा रीतीने तल्स्तोय यांच्या "ख्रिश्चन धर्मा"ची कृत्रिमता उजेडात येते. पण ह्या सर्व आंतरिक वादविवादांसह, तल्स्तोय "आत्यंतिक

---

* कित्ता, पाने ६४-६५.

आणि तीव्ररीत्या सुंदर पुरुष होते, अखिल मानवजातीचे होते",* रशियन साहित्याची कीर्ती आणि अभिमान होते, असे गोर्कीना वाटते. जागेच्या अभावी, गोर्कीनी रेखाटलेल्या रशियन लेखकांबद्दलच्या व्यक्तिचित्रणांमधून, प्रस्तुत पुस्तकात आम्ही फक्त तल्स्तोय, चेखोव, लेस्कोव, प्रीश्विन यांच्याविषयीचे निबंध प्रकाशित करीत आहोत. आम्हाला खात्री आहे, ह्या निबंधांमधून वाचकाला समजून येईल की, लेखकाच्या व्यक्तिमत्वाचे चारही अंगांनी वर्णन करण्यात गोर्की कुशल आहेतच, शिवाय त्या त्या लेखकाच्या सृजनकार्याचा आशय उघड करून दाखविण्यात गोर्की चतुर आहेत.

"...जागतिक संस्कृतीची वर्षे क्रांतीशी चपखलतेने जुळविण्यात गोर्की यांच्याविना दुसऱ्या कुणालाही आणि कधीही जमलेले नाही," हे शब्द रोल्लाँ यांचे आहेत. २० व्या शतकातील ह्या महान फ्रेंच लेखकाच्या शब्दांमधून गोर्कीच्या कार्याबद्दलचे प्रगाढ, खरे मूल्यमापन आढळते. विशाल कामकरी समुदायांना जागतिक साहित्याच्या अधिक निकट आणण्याची, त्याची ओळख घडवून देण्याची, गोर्की यांनी शब्द व कार्य यांच्या साह्याने धडपड केली. जागतिक साहित्यामधील श्रेष्ठ पुस्तके लोकांना उपलब्ध करून देण्यासाठी गोर्कीनी प्रयत्न केले. कामगारवर्गाच्या आणि त्याच्यामार्फत निर्माण होणाऱ्या समाजाच्या कलात्मक संस्कृतीच्या घडणीतील प्रक्रियेत जागतिक साहित्यातील श्रेष्ठ पुस्तकांचे फार महत्त्व असल्याची त्यांना जाणीव होती. १९१९ मध्ये, गोर्की यांच्या पुढाकाराने "जागतिक साहित्य प्रकाशन संस्था" स्थापन करण्यात आली. त्याकाळी अशी दूरगामी योजना जगात अजोड होती. सोविएत संघातील लोकांच्या भाषांमधून जागतिक साहित्याच्या अनुवादांचे प्रचंड व नियमित काम सुरू झाले. जागतिक अभिजात साहित्यकृतींच्या व आधुनिक पुरोगामी पुस्तकांच्या अफाट संख्येने आवृत्ती प्रकाशित होऊ लागल्या. १९२० साली सोविएत रशियाला भेट देण्यास आलेल्या एच्. जी. वेल्स यांनी गोर्कीच्या ह्या निर्मितीबद्दल लिहिले होते: "ह्या अनाकलनीय रशियात, युद्धग्रस्त, अतिथंड, भुकेल्या, आत्यंतिक हालअपेष्टा भोगणाऱ्या, एक अशी साहित्यिक योजना हाती घेण्यात आली आहे जी आजच्या श्रीमंत इंग्लंडमध्ये आणि श्रीमंत अमेरिकेतसुद्धा अशक्यप्राय आहे... रशियामध्ये उपासमारीने मरणारे शेकडो लोक अनुवादांचे काम करीत

---

*गोर्की मा., संकलित साहित्य, खंड १४, पान २८३.

आहेत. त्यांनी भाषांतर केलेली पुस्तके प्रसिद्ध होत आहेत आणि ती पुस्तके नव्या रशियाला जागतिक साहित्याची अशी ओळख करून देतील, जी कुणाही दुसऱ्या राष्ट्रातील लोकांच्या प्राप्तीपलिकडील आहे."* गोर्की यांनी वर्णन केलेला माणूस इतिहासाचा एक भाग आहे: लोक ऐतिहासिक विकासा-मधील एक निर्णायक घटक असतात, पण खुद्द इतिहास नेहमी माणसावर प्रभाव पाडत असतो.

गोर्कींच्या लेखांमधून आणि पत्रांमधून लोक हा विषय नेहमी आढळतो. त्यांच्या अखेरच्या लेखांपैकी एका लेखात त्यांनी उपदेश केला होता: "संस्कृतीचा इतिहास लिहिताना व्यक्तीच्या भ्रष्टाचाराची, तिच्या मृत्युकडील वाटचालीची कथा म्हणून लिहावे आणि नव्या जगाच्या उभारणीकारांच्या "एकवटलेल्या शक्ती"च्या ज्वालेत संघटित झालेल्या नव्या व्यक्तीच्या उदयाची कथा म्हणून लिहावे."**

## ३

महान ऑक्टोबर समाजसत्तावादी क्रांतीनंतर मा. गोर्की यांनी केलेले अथक कार्य व त्यांची मोठी प्रतिष्ठा यांच्या जोडीने अ. लूनाचार्स्की यांचा जोमदारपणा व संघटनाकार्य, यामुळे कलात्मक बुद्धिमंतांची विस्तृत वर्तुळे सांस्कृतिक उभारणीच्या कार्यात ओढली गेली. महान कामगारवर्गीय लेखकाच्या ह्या कामगिरीबद्दल रशियन कवी अ. ब्लोक यांनी लिहिले होते: "आपल्या काळातील सर्वांत मोठा कलावंत म्हणून माक्सिम गोर्की यांच्यावर दैवाने फार मोठे ओझे लादले आहे. लोक आणि बुद्धिमंत यांच्या दरम्यान, एकमेकांना अथवा स्वत:ला अद्याप न जाणणाऱ्या दोन छावण्यांदरम्यान त्याने त्यांना मध्यस्थ बनविले आहे."***

सर्वोत्तम साहित्यिक शक्तींना लिहिण्यातील गोर्कींचा कलात्मक अनुभव आणि त्यांची कार्ये नवजात सोविएत साहित्याच्या दृष्टीने फार महत्त्वाची होती. गोर्कींनी तरुण लेखकांसाठी खूप वेळ खर्च केला व त्यांच्याकडे खूप

---

* वेल्स एच्. जी. 'अंधारातील रशिया' मॉस्को, १९५९, पान २९.

** गोर्की मा., संकलित साहित्य, खंड २५, पान २८३.

*** ब्लोक अ., संकलित संग्रह ८ खंडातील, खंड ६, पान ९२.

लक्ष दिले. १९३० पासून 'साहित्यिक शिक्षण' नियतकालिकाचे ते प्रमुख आहेत, 'नव्या लेखकांना पत्रे' ते प्रसिद्ध करीत आहेत, अनेकदा त्यांच्याशी भेटीगाठी घेऊन वार्तालाप करीत आहेत, असंख्य हस्तलिखिते वाचत आहेत, नवशिक्यांच्या पुस्तकांना प्रस्तावना लिहीत आहेत... आत्मसुधारणेचा कार्यक्रम ते नव्या लेखकांसमोर ठेवत आहेत – 'तंत्राच्या कारागिरीं' पासून ते स्थानिक व जागतिक संस्कृतीच्या वारशावर आणि मार्क्सवादी-लेनिनवादी जागतिक दृष्टिकोनावर प्रगाढ प्रभुत्व मिळविण्यापर्यंत. 'पाडाव' आणि 'तरुण रक्षक' चे लेखक अ. फदेयेव यांनी म्हटले होते की, "माझ्या पिढीत साहित्यामध्ये पहिली पावले टाकणाऱ्यांपैकी एकही असा नाही ज्याला त्यांचा आशीर्वाद लाभला नव्हता."*

सोविएत साहित्यासमोर गोर्कींनी "एक अत्यंत अवघड कार्य ठेवले होते – वास्तववादी रीतींनी अशी महान कला निर्माण करायची, जिच्यात कामगारवर्गाच्या, नव्या समाजाच्या उभारणीकाराच्या, शौर्याचे पूर्णत्वाने व आत्यंतिक शाब्दिक प्रभावाने दर्शन घडेल..."**

गोर्की यांच्या साहित्यविषयक असंख्य विधानांमधून आणि भाषणांमधून समाजसत्तावादी कलेची सौंदर्यवादी सार्वत्रिक संकल्पना आकाराला आली. तिला सोविएत साहित्य आणि कला समीक्षकांनी स्वीकारले.

सोविएत साहित्याच्या अनुभवाचे सार काढताना गोर्कींनी सोविएत कलेच्या प्रभावी स्वरूपावर, तिच्या क्रियाशील मानवतावादावर, जीवन-स्थित्यंतराच्या उत्साहावर, भर दिला. विमुक्त श्रमाच्या विषयाला गोर्कींनी फार महत्त्व दिले होते. समाजसत्तावादी समाजात विमुक्त श्रमाला सृजनशील स्वरूप लाभते आणि तो संस्कृतीला फुलवतो. कलावंताने जगाकडे एकाच वेळी अनेक नजरांमधून पहावे असे गोर्कींचे मत होते: मरणोन्मुख भूतकाळात व वाढणाऱ्या आणि आकारणाऱ्या भविष्यकाळात वर्तमान परिस्थिती पाहणे. गोर्कींचे हे विचार तिसऱ्या दशकाच्या अखेरीस व चौथ्या दशकाच्या आरंभी चाललेल्या सोविएत सौंदर्यवादी विचाराच्या शोधक्रमात प्राबल्याने होते व त्याची परिणती समाजसत्तावादी वास्तववादाची विचार-प्रणाली निर्माण करण्यात झाली.

---

* फदेयेव अ., ७ खंडांमधील संकलित संग्रह, खंड ६, पान ६८.

** गोर्की मा., संकलित संग्रह, खंड २६, पान २४५.

2—2586

अनुवादांमार्फत आणि संग्रह प्रसिद्ध करून सोविएत संघातील लोकांच्या साहित्यांचा विकास घडविण्यात व त्यांचे ऐक्य निर्माण करण्यात गोर्की यांनी मोठी कामगिरी बजावली. ऑक्टोबर क्रांतीच्या आधीच त्यांनी रशियातील लोकांच्या साहित्याच्या संग्रह-मालिकांचे संयोजन व संपादन केले होते. सोविएत संघातील राष्ट्रीय संस्कृतींच्या फुलव्याचा आरंभ १९२८ मध्ये त्यांनी पुढील शब्दांमध्ये व्यक्त केला होता: "कधीही आणि कुठेही दिसले नव्हते असे काहीतरी रशियात आता घडत आहे... सोविएतांच्या संघा-मधील सर्व वंशांच्या लोकांना स्वतःच्या भाषेत बोलण्याचा हक्क लाभला आहे, स्वतःच्या कुवतींचा विकास घडवण्यासाठी मुक्तपणे काम करण्याचा हक्क लाभला आहे."* "सर्व वंशांच्या वैयक्तिक वैशिष्टचांना पुसून न टाकता, सबंध जगाचे सामायिक, प्रभावी, पुनरुज्जीवन घडविणाऱ्या, संयुक्त समाजसत्तावादी संस्कृतीच्या उभारणीची प्रक्रिया"** गोर्कींना ठळक-पणे दिसली. ही प्रक्रिया ऐतिहासिकदृष्टचा अभूतपूर्व आणि प्रभावी होती. सोविएत प्रजासत्ताकांचे बहुभाषिक साहित्य विषयामध्ये, सामाजिक आदर्शा-मध्ये, कम्युनिस्ट उद्दिष्टे आणि आकांक्षांमध्ये समान आहे, पण त्यांची सौंदर्यवादी वैशिष्टचे व त्यांच्या शक्यता भिन्न आहेत. राष्ट्रीय कार्यांची सामायिक उद्दिष्टांशी आणि विचारांशी सांगड, राष्ट्रीय कला-प्रकारांची भिन्नता व वास्तवावर प्रभुत्व मिळविण्याच्या रीती, परस्पर-प्रभाव आणि परस्पर-समृद्धी – ह्या मार्गाने सोविएत बहुभाषिक साहित्य जात होते आणि आता जात आहे. आणि गोर्की ह्या मार्गाच्या अगदी आरंभी उभे होते.

गोर्की यांच्या संपूर्ण विचारधारेत कार्याचा विचार बहुधा सर्वांत महत्त्वाची भूमिका बजावतो. जीवनाबद्दल क्रियाशील दृष्टिकोनाला उत्तेजन देणे हे आपले साहित्यामधील मुख्य कार्य आहे, अशा आशयाची गोर्कींनी वारंवार केलेली विधाने सर्वश्रुत आहेत. कृतिशीलतेची, ऐतिहासिक सृजनाची त्यांची आवेगपूर्ण आवाहने ऐतिहासिक सुस्ती, निष्क्रियता आणि सामाजिक दैववाद यांच्या कोणत्याही संकल्पनेविरुद्धच्या त्यांच्या आवेगी आवाहनांच्या जोडीची आहेत. माणसाला "नम्र वास्तवाच्या शृंखला"मधून मुक्त करणे,

---

* सोविएत बहुराष्ट्रिक साहित्याचा इतिहास, खंड १, मॉस्को, १९७०, पान २२.

** गोर्की मा., संकलित साहित्य, खंड ३०, पाने ३६५-३६६.

परिस्थितींचा गुलाम बनलेल्यासमोर जीवनाच्या मुक्त निर्मात्याला उभा करणे, गोर्कींच्या साहित्यिक कार्याचे, त्यांच्या मानवतावादाचे, सार होते, भूतकालीन कलेतील "दयेच्या मानवतावादा"शी लेखकाने लढा केला पाहिजे ह्या गोर्कींच्या संकल्पनेवर व "सर्व काही माणसात आहे, सर्व काही माणसासाठी आहे!" ह्या गोर्कींच्या विधानाच्या आशयावर त्यामुळे प्रकाश पडतो.

मा. गोर्की यांचे सार्वजनिक जीवन ह्या कार्याने पूर्णतया व्यापून गेलेले होते. त्यांच्या क्रांतिकारक कार्यांचा व क्रांतीनंतरच्या ताबडतोबीच्या काळातील देशामधील सांस्कृतिक जीवनातील त्यांच्या क्रियाशील सहभागाचा निर्देश आम्ही आधीच केला आहे. १९३० नंतरच्या काळात त्यांच्या पुढाकाराने आणि त्यांच्या संपादकत्वाखाली 'आमच्या यश:सिद्धी', 'उभारणी स्थळावरील सोविएत संघ', 'साहित्यिक अभ्यास', 'विदेशी' ही नियतकालिके आणि 'मोठ्या माणसांची चरित्रे' ही माला प्रसिद्ध झाली. गोर्की यांच्या पुढाकारामुळे 'यादवी युद्धाचा इतिहास'चे प्रकाशन सुरू झाले आणि 'कवीचे ग्रंथालय' शीर्षकाखाली रशियन कवितेच्या इतिहासावरील पुस्तकमाला प्रसिद्ध होऊ लागली.

सोविएत उभारणीचे विविध पैलू, शांततेचे, लोकशाहीचे आणि समाजसत्तावादाचे रक्षण ह्या विषयांवरील व नव्या युद्धाची पूर्वतयारी करीत असलेल्या साम्राज्यवाद्यांविरुद्धची गोर्की यांची असंख्य सामाजिक आणि राजकीय भाषणे फार महत्त्वाची होती. आंतरराष्ट्रीय युद्धविरोधी काँग्रेसांची अधिवेशने आयोजित करण्यात लेखकाने मदत केली. स्वत:च्या पत्रांमार्फत, भाषणांमार्फत आणि लेखांमार्फत त्यांनी फॅसिझमविरोधी व शांततेसाठी चाललेल्या लढ्यात पुरोगामी परदेशी लेखकांना, शास्त्रज्ञांना व सांस्कृतिक कार्यकर्त्यांना सहभागी करण्याची मोठी कामगिरी बजावली. सबंध जगातील बुद्धिमंतांना उद्देशून त्यांनी लिहिलेल्या लेखांमधून ('मानवतावाद्यांना', '"संस्कृतीच्या मालकांनो," तुम्ही कोणाबरोबर आहात?') ज्यांना लढ्यापासून अलग रहायचे होते अशांच्या दांभिक मानवतावादाला गोर्कींनी उघडकीस आणले; वाईट गोष्टी, शोषण आणि गुलामगिरीविरुद्ध सक्रिय लढ्याचे आवाहन देणाऱ्या कामगारवर्गीय समाजसत्तावादी मानवतावादाच्या विचारांचा त्यांनी पुरस्कार केला.

* * *

ह्या महान कामगारवर्गीय लेखकाने, सोविएत साहित्याच्या संस्थापकाने मांडलेल्या मुख्य सैद्धांतिक तत्त्वांना आणि विचारांना नुसते दाखवून देणे एका छोटया प्रास्ताविक लेखात अशक्य आहे, हे सांगण्याची जरूरी नाही.

पण आम्हाला खात्री आहे की, प्रस्तुत संग्रहातील लेखांमुळे मार्क्सवादी-लेनिनवादी सौंदर्यशास्त्रविषयक मुख्य समस्यांचे व सोविएत साहित्य आणि कला यांचा विकास ज्यांच्यावर आधारीत आहे अशा तत्त्वांचे अधिक चांगले आकलन होण्यास वाचकाला मदत होईल.

लेखकाच्या व्यक्तित्वाची आणि त्याच्या समकालीनांबरोबरील त्याच्या संबंधांच्या स्वरूपाची अधिक स्पष्ट कल्पना येण्यासही हे लेख वाचकाला साहाय्यभूत ठरतील.

**अ. येर्माकोव**

# आन्तोन चेखोव[1]

एकदा त्यांनी मला कुचूक-कोय* नांवाच्या खेड्यात भेटीला बोलाविले. तेथे त्यांच्या मालकीचा जमिनीचा एक छोटा तुकडा होता आणि पांढऱ्या रंगाचे एक दुमजली घर होते. त्यांनी फिरून मला आपली "इस्टेट" दाखविली. सारा वेळ ते खूप उत्साहाने बोलत होते :

"माझ्यापाशी जर खूप खूप पैसे असते तर खेड्यांमधल्या आजारी शिक्षकांसाठी इथं मी एक सॅनिटोरीयम बांधलं असतं. त्या इमारतीत भरपूर प्रकाश खेळविण्याची सोय केली असती, मोठमोठ्या खिडक्या ठेवल्या असत्या, उंच उंच छतं बांधली असती. मी एक सुरेख ग्रंथालय निर्माण केलं असतं, सगळ्या प्रकारची संगीत-वाद्यं ठेवली असती, एक मधुमक्षिकालय, एक भाजीपाल्याचा वाफा आणि एक फळबाग निर्माण केली असती. शेती-विषयक, हवामानशास्त्रविषयक व्याख्यानं ठेवली असती, अशा आणखी खूप गोष्टी केल्या असत्या. भल्या गृहस्था, शिक्षकांना सर्व काही माहीत असलं पाहिजे – सगळं सगळं!"

अचानक ते बोलायचे थांबले. त्यांना खोकल्याची उबळ आली. माझ्या-कडे त्यांनी एक तिरपा कटाक्ष टाकला आणि आपले नेहमीचे मधुर, मंद स्मित केले. त्यांच्या ह्या स्मितामध्ये असाधारण जादू होती. त्यामुळे त्यांचे शब्द श्रोत्याला पूर्ण अवधानाने ऐकावेसे वाटत.

"माझी स्वप्नं ऐकणं तुम्हाला कंटाळवाणं तर वाटत नाही ना? मला ह्या विषयावर बोलायला आवडतं. रशियन ग्रामीण भागाला चांगल्या, हुषार, सुशिक्षित शिक्षकांची फार फार गरज आहे. रशियामध्ये आपल्याला शिक्षकांसाठी खास सोयी-सवलती निर्माण करणं भागच आहे आणि त्या लौकरात लौकर निर्माण केल्या पाहिजेत. कारण लोकांना जर सर्वांगीण शिक्षण मिळालं नाही, तर अर्ध्या-कच्च्या भाजलेल्या विटांचं बांधलेलं घर जसं कोसळून पडतं तसं राज्य कोसळून पडेल, याची आपल्याला जाणीव

---

* क्रिमियामधील एक स्थळ – सं.

आक्रोश. शिक्षक अभिनेता असला पाहिजे, आपल्या कामावर विलक्षण प्रेम करणारा कलाकार असला पाहिजे. पण आपले शिक्षक रस्ता खणणाऱ्या मजुरांसारखे आहेत, अर्धशिक्षित आहेत. हद्दपारीवर जाण्याविषयी ते जेवढे उदासीन असतील, तेवढ्याच उदासीनपणं ते खेड्यांमध्ये मुलांना शिकवायला जातात. त्यांची उपासमार होते आहे, त्यांना तुडवलं जात आहे. आपल्या उदरनिर्वाहाचं साधन गमावलं जाईल अशा धास्तीनं त्यांना सतत ग्रासलेलं आहे. खरं म्हणजे शेतकऱ्यांनी विचारलेल्या सर्व प्रश्नांना समर्थपणं उत्तरं देणारा शिक्षक हा खेड्यातला सर्वप्रथम माणूस असला पाहिजे. शेतकऱ्यांनी त्याच्याबद्दल आदर बाळगावा, त्याचा मान राखावा अशी स्वतःची प्रतिमा त्यानं निर्माण केली पाहिजे. त्याच्यावर वस्सकन् ओरडण्याची कुणाची हिंमत होऊ नये... पण आपल्या देशात प्रत्येकजण शिक्षकाचा पाणउतारा करतो! गावचा पोलीस, श्रीमंत दुकानदार, पाद्री, शाळेचे अधिकारी, आणि शाळा-तपासनीस म्हणून ओळखण्यात येणारा तो अधिकारी! हा शाळा-तपासनीस शैक्षणिक सुधारणा घडविण्यासाठी झटत नाही, तर केवळ पत्रामार्फत फर्मानं काढण्यात गुंतलेला असतो. लोकांना शिकविण्यासाठी बोलावलेल्या माणसाला — लक्षात ठेवा, लोकांना शिकविण्यासाठी — असा दरिद्री पगार देणं अगदी विचित्र आहे! असा माणूस फाटक्या-तुटक्या कपड्यांमध्ये फिरावा, दमट ओलसर, मोडकळीला आलेल्या शाळेच्या इमारतीत त्यानं कुडकुडावं, वाईर चुलाण्यांच्या धुरांचा त्रास त्यानं सोसावा, नेहमी थंडीची बाधा त्याला व्हावी, आणि तिशीच्या दरम्यान घशाचे विकार, संधिवात, क्षय इत्यादी रोगांचं तो आगर बनावा — हे सारं सारं असह्य आहे. हे आपल्याला लांछन आहे! वर्षामधले आठ ते नऊ महिने आपले शिक्षक संन्याशांचं आयुष्य जगतात. एकाकीपणा, पुस्तकांचा आणि मनोरंजनांचा अभाव, ह्यांपायी वेडे बनतात. आणि आपल्या मित्रांना त्यांनी भेटीला बोलवायचं धाडस केलंच तर लोकांना वाटतं की, ते राजद्रोही आहेत. मूर्खांना घाबरवण्यासाठी धूर्त माणसं हा वेडगळ शब्द वापरतात!.. सारं सारं घृणास्पद आहे... अत्यंत महान आणि महत्त्वाचं काम करणाऱ्या लोकांची ही क्रूर चेष्टा आहे. मी तुम्हाला खरं सांगतो — जेव्हा एखाद्या शिक्षकाशी माझी भेट होते तेव्हा त्याच्यासमोर मला विलक्षण अवघडल्या-सारखं वाटतं. त्याचा भित्रेपणा, त्याचा ओंगळपणा पाहून मी अस्वस्थ होतो.

त्या शिक्षकाच्या केविलवाण्या अवस्थेला जणू मीच जबाबदार आहे अशी भावना होते! खरंच!"

क्षणभर ते बोलायचे थांबले. मग हात उडवीत हळूच उद्‌गारले:

"आपला रशिया किती विचित्र, गबाळा देश आहे!"

अतीव खेदाचे सावट त्यांच्या सुंदर डोळयांमध्ये उमटले. त्यांच्या डोळयांच्या कोपऱ्यांना सुरकुत्यांचे सुरेख जाळे तयार झाले व त्यांची नजर अधिक गहिरी बनली. त्यांनी सभोवार एक कटाक्ष टाकला आणि स्वतःचीच चेष्टा करायला आरंभ केला:

"पाहिलंत, एका उदारमतवादी वर्तमानपत्राचा अग्रलेख मी तुम्हाला वाचून दाखवला असं वाटलं की नाही? चला! तुमच्या सहनशीलतेचं बक्षीस म्हणून तुम्हाला आता चहा पाजतो..."

त्यांच्याबरोबर वारंवार असेच घडायचे. एका क्षणाला ते अत्यंत सहानुभूतीने, गंभीरपणे आणि कळकळीने बोलत असायचे; तर दुसऱ्याच क्षणी ते स्वतःची आणि स्वतःच्या बोलण्याची टवाळी करीत मनसोक्त हसायचे. पण ज्या माणसाला शब्दांचे, स्वप्नांचे मूल्य माहीत आहे अशा माणसाचा सूक्ष्म संशयवाद त्यांच्या त्या सौम्य, खिन्न हसण्यामागे जाणवायचा. त्यांच्या त्या हसण्यात आकर्षक नम्रतेची, त्यांच्या उपजत मर्यादशीलतेची छटाही होती.

आम्ही मुकाटपणे घराकडे परत चालत आलो. दिवस उबदार होता, चकचकीत ऊन पडले होते. सूर्यकिरणांमध्ये चमचमणाऱ्या लाटांचा ध्वनी ऐकू येत होता. दरीमध्ये एक कुत्रा कशापायी तरी त्याला झालेला आनंद कूं कूं आवाज करून व्यक्त करीत होता. चेखोवनी माझ्या दंडाला धरले आणि खोकत खोकत धीमेपणाने ते म्हणाले:

"ही अत्यंत लाजिरवाणी आणि दुःखाची बाब आहे, पण खरी आहे— कुत्र्यांचा हेवा करणारी खूप माणसं आहेत..."

आणि हसून ते पुढे म्हणाले:

"आज माझ्या तोंडून उमटणाऱ्या प्रत्येक गोष्टीत वार्धक्य जाणवतंय! बहुधा मी म्हातारा होत चाललोय!"

पुनःपुन्हा मी त्यांच्याकडून ऐकत असे:

"ऐकलंत का, एक शिक्षक नुकताच आलाय... तो आजारी आहे,

त्याला बायको आहे. तुम्ही त्याच्यासाठी काही करू शकाल का? तात्पुरती मी त्याची सोय केलीय..."

किंवा :

"ऐकलंत गोर्की! एका शिक्षकाला तुम्हाला भेटायची इच्छा आहे. तो अंथरुणाला खिळलाय, आजारी आहे. त्याला भेटायला जाल का?"

अथवा :

"पुस्तकं पाठवा असं एक शाळा मास्तरीण म्हणत होती..."

काहीवेळा हा "शिक्षक" मला चेखोव यांच्या घरात आढळायचा. बहुतेकवेळा हा शिक्षक स्वतःच्या गबाळेपणाच्या जाणीवेने लालबुंद झालेला असायचा, खुर्चीच्या अगदी कडेवर घामाघूम बसलेला असायचा. जास्तीत जास्त सौम्यपणे आणि "सुशिक्षितपणे" बोलण्याचा प्रयत्न करीत असायचा, मोजके शब्द उच्चारायचा. अथवा चेखोवसारख्या मोठ्या लेखकासमोर आपण बावळट ठरू नये ह्या एकाच तीव्र इच्छेपायी, आपले लाजरे व्यक्तिमत्व लपविण्यासाठी, त्या क्षणाला डोक्यात येतील तेवढ्या सर्व प्रश्नांचा चेखोववर मारा करीत असायचा.

त्या शिक्षकाचे वेडेवाकडे भाषण चेखोव लक्षपूर्वक ऐकून घेत. त्यांच्या खिन्न डोळ्यांमध्ये स्मित उजळे. त्यांच्या कपाळावरील सुरकुत्यांची हालचाल सुरू होई आणि खोल, सौम्य, दबत्या आवाजात ते बोलायला आरंभ करीत. अत्यंत साध्या, सोप्या, जीवनाशी संबंधित अशा शब्दांचा ते वापर करीत. त्या शब्दांमुळे त्यांचा पाहुणा एकदम स्थिरावायचा, आपली हुषारी दाखविण्याचे त्याचे प्रयत्न थांबायचे व त्या परिणामी तो अधिक हुषार बनायचा आणि रंजकही वाटायचा...

ह्या शिक्षकांपैकी एक शिक्षक मला आठवतो. उंच, सडपातळ, फिकट आणि क्षीण चेहरा, हनुवटीवर केविलवाणे झुकलेले बाकदार नाक – तो चेखोव यांच्या समोर बसला होता, आपल्या काळ्याभोर डोळ्यांनी त्यांच्या चेहऱ्याकडे टक लावून पहात होता आणि खिन्न खर्ज आवाजात बोलत होता :

"संपूर्ण अध्यापकीय मोसमाच्या काळातील जीवनापासून गोळा केलेल्या ह्या अनुभवांची एका मानसपिंडात साठवण होते आणि त्यामुळं भोवतालच्या जगाकडं वस्तुनिष्ठपणानं पाहण्याची मुळी शक्यताच उरत नाही. अर्थात

जग म्हणजे दुसरं तिसरं काही नाही, तर त्याबद्दलची आपली स्वतःची संकल्पना..."

आता तो तात्त्विक भूमीवर उतरला. एखाद्या झिंगलेल्या माणसाने बर्फावरून चालण्याचा प्रयत्न करताना त्याची जी अवस्था होते, तशी अवस्था ह्या शिक्षक महाशयांची झाली होती.

पण चेखोव यांनी शांतपणे आणि प्रेमळ आवाजात विचारले: "मला तुम्ही सांगा, तुमच्या विभागात मुलांना कोण मारतं?"

तो शिक्षक खुर्चीवरून एकदम उडाला आणि संतापाने हातवारे करीत बरळू लागला:

"काय? मी? कधीही नाही! मी त्यांना मारलं?"

अपमान झाल्यासारखे दाखवून त्याने नाकाने फुर्रर्र फुर्रर्र आवाज केला.

"एवढं अस्वस्थ होऊ नका," त्याला शांत करण्याचा प्रयत्न करीत चेखोव हसून म्हणाले. "तुमचं मी नांव घेतलं का? पण मी वर्तमानपत्रात वाचल्याचं आठवलं की, तुमच्या विभागात कुणी एक मास्तर मुलांना मारहाण करतात..."

शिक्षक पुन्हा खाली बसला. आपला घामेघूम चेहरा त्याने पुसला, सुटकेचा एक निःश्वास टाकला आणि आपल्या खोल खर्जात तो म्हणाला:

"अगदी बरोबर. तसं घडलं होतं. तो मकारोव! पण त्यात आश्चर्य नाही. हे विचित्र वाटेल, पण समजण्यासारखं आहे. तो विवाहित आहे, त्याला चार मुलं आहेत, त्याची बायको आजारी आहे आणि तो स्वतःही क्षयी आहे, त्याचा पगार अवघा वीस रूबल... शाळा म्हणजे जणू तळघर, मास्तरला रहायला एक खोली! अशा परिस्थितीत, चुकीशिवाय स्वर्गातल्या देवदूतालासुद्धा कुणी बदडून काढील आणि माझ्यावर विश्वास ठेवा, मुलं म्हणजे नक्कीच देवदूत नसतात!"

अवघ्या क्षणापूर्वी, आपल्याजवळील भारदस्त शब्दभांडाराने चेखोवना दिपवू पाहणारा हा माणूस अचानक आपले बाकदार नाक अभद्रपणे हलवू लागला, खडयांसारखे साधे आणि जड शब्द वापरू लागला; रशियन खेडयांमधील जीवनाच्या शापित, अमंगळ सत्यावर त्याचे शब्द झगझगीत प्रकाश टाकू लागले...

आपल्या यजमानाचा निरोप घेताना त्या शिक्षकाने चेखोव यांचा

निमुळत्या बोटांचा, छोटा, सुकलेल्या कातडीचा हात आपल्या दोन्ही हातां-मध्ये दाबीत म्हटले :

"एखाद्या वरिष्ठाला भेटायला जावं तसा लटपटत्या पायांनी मी तुमच्या भेटीला आलो होतो. मीसुद्धा कुणीतरी आहे असं तुम्हाला दाखवण्याचा निश्चय करून एखाद्या अक्कडबाज कोंबड्यासारखा तुरा हलवीत, छाती फुगवून आलो होतो. पण जाताना मात्र मनात भावना आहे ती एका छान, सर्व काही समजणाऱ्या जवळच्या मित्राला सोडून जाण्याची! सर्व काही समजून घेणं ही केवढी मोठी गोष्ट आहे! धन्यवाद! मी चलतो. माझ्या-बरोबर मी एक चांगला, मौल्यवान विचार घेऊन जातोय: मोठी माणसं जास्त साधी असतात, ती जास्त समजूतदार असतात, ज्या सामान्यांच्या मध्ये आम्ही राहतो, त्यांच्यापेक्षाही ती आम्हा गरीब मर्त्यांच्या जास्त जवळ असतात. अच्छा! मी तुम्हाला कधीही विसरणार नाही."

त्याचे नाक थरथरले, सुंदर स्मिताने त्याचे ओठ विलग झाले आणि अनपेक्षितपणे तो पुढे म्हणाला :

"वाईट माणसं दुर्दैवीही असतात—धिक्कार असो त्यांचा!"

तो निघून गेल्यानंतर त्याच्या पाठमोऱ्या आकृतीकडे पहात चेखोव हसले आणि म्हणाले: "छान माणूस. पण तो फार काळ शिकवत राहणार नाही."

"का?"

"ते त्याला हुसकून लावतील... त्याची ब्याद टाळतील."

मला असे भासते की, चेखोव यांच्या उपस्थितीत प्रत्येकाला नकळतपणे साधे, अधिक खरे वागण्याची, स्वत:शी प्रामाणिक राहण्याची इच्छा होते. आपल्या भारदस्त पुस्तकी भाषेची, डौलदार शब्दांची झूल चेखोव यांच्या समोर माणसे कशी झुगारून देत हे पाहण्याच्या अनेक संधी मला लाभल्या. जंगली लोक ज्याप्रमाणे आपल्याला शंख-शिंपल्यांनी आणि माशांच्या दातांनी सजवतात, त्याप्रमाणे आपले बोलणे भारदस्त, नखरेल भाषेने नटवून, इतर फालतू गोष्टींचे अवडंबर माजवून, युरोपीय लोकांप्रमाणे सजण्याचा आम्हा रशियनांना हव्यास आहे. चेखोवना ही माशांच्या दातांची आणि कोंबड्यांच्या पिसांची आवड नव्हती. "भव्यता" दाखविण्यासाठी लोक

जेव्हा काहीतरी बेगडी, विशोभित साज चढवितात तेव्हा चेखोव शरमतात. आणि माझ्या लक्षात आले आहे की, असा नखरा केलेली व्यक्ती जेव्हा जेव्हा त्यांना भेटे, तेव्हा तेव्हा तिला तिच्या बेगडचा चापांमधून मुक्त करण्याची त्यांना तीव्र इच्छा होई. आपल्या संभाषणकर्त्याच्या खऱ्या चेहऱ्याला आणि जिवंत आत्म्याला विद्रूप बनविणाऱ्या त्या दिखाऊपणाला नाहीसे करण्याचा चेखोव प्रयत्न करीत. चेखोव सारे आयुष्य आत्मिक जीवन जगले. स्वत:शी ते प्रामाणिक राहिले, अंतर्मनाने मुक्त राहिले. आन्तोन चेखोव यांच्यापासून काहींच्या काय अपेक्षा होत्या आणि इतर काहींच्या काय मागण्या होत्या, याकडे त्यांनी लक्ष दिले नाही. "उदात्त" विषयांवरील संभाषणे त्यांना आवडत नसत. सरळ अंत:करणाच्या रशियनांना अशी संभाषणे मोठी मनोरंजक वाटत. कारण, वर्तमानकाळात धडधाकट विजारींची जोडीसुद्धा जवळ नसताना भावी काळातील मखमाली पोषाखाबद्दल गप्पा मारणे खरेच मूर्खपणाचे आहे.

स्वत: चेखोव म्हणजे सुंदर साधेपणाचे मूर्तिमंत उदाहरण होते. साध्या, खऱ्या आणि प्रामाणिक अशा सर्व गोष्टी त्यांना आवडत. इतरांना साधे बनविण्याची किमया त्यांच्यापाशी होती.

एकदा अत्यंत झकपक पोषाखातील तीन महिला त्यांना भेटायला गेल्या. आपल्या रेशमी अंतर्वस्त्रांच्या सळसळीने आणि उग्र अत्तरांच्या वासांनी खोली भरून टाकीत त्या चेखोव यांच्या समोर मोठ्या डौलात बसल्या होत्या. राजकारणात आपल्याला खूप स्वारस्य असल्याचा आव आणून त्यांनी चेखोव यांना "प्रश्न टाकायला" आरंभ केला.

"युद्धाचा शेवट कसा होईल[2] असं वाटतं तुम्हाला?"

चेखोव किंचित खाकरले, विचार करण्यासाठी क्षणभर थांबले आणि मृदु, गंभीर, प्रेमळ आवाजात उत्तरले:

"बहुधा शांततेत होईल!"

"ते खरंच हो! पण जिंकील कोण? ग्रीक का तुर्क?"

"मला वाटतं की, जास्त बलिष्ठ बाजू जिंकील."

"कोणती बाजू जास्त बलिष्ठ आहे?" बायकांनी एकसुरात विचारले.

"जी चांगलं खाते-पिते आणि अधिक सुशिक्षित आहे."

"कित्ती चतुर आहेत नाही?" एक महिला उद्गारली.

"तुम्हाला कोण आवडतात – ग्रीक का तुर्क?" दुसरीने विचारले.

चेखोवनी तिच्याकडे प्रेमळपणे पाहिले आणि क्षीण, अदबशीर स्मित करीत उत्तर दिले :

"मला फळांच्या वड्या आवडतात – तुम्हाला ?"

"हो तर !" महिला उत्साहाने ओरडली.

"त्यांना इतकी मधुर चव असते," दुसरी गंभीरपणे दुजोरा देत म्हणाली.

आणि त्या तिघीही बायका फळांच्या रसाच्या वड्यांबद्दल उत्साहाने बोलू लागल्या. त्या विषयावरील आपले अचाट आणि अफाट ज्ञान प्रकट करू लागल्या. तुर्कांच्या आणि ग्रीकांच्या विषयाबाबत आपल्याला खूप आस्था वाटते असा देखावा करण्याचे टळल्याबद्दल त्या बायकांना उघड उघड आनंद झाला होता. कारण त्या क्षणापर्यंत असला विषय त्यांच्या मेंदूला कधीच शिवलेला नव्हता.

निरोप घेताना मोठ्या आनंदाने त्यांनी चेखोवना आश्वासन दिले :

"फळांच्या वड्यांची एक पेटी आम्ही तुम्हाला पाठवणार आहोत !"

त्या निघून गेल्यानंतर मी शेरा मारला : "वा :! मोठ्या छान गप्पा मारल्यात !"

चेखोव हळूच हसले.

"प्रत्येकानं स्वतःच्या भाषेत बोललं पाहिजे !" ते म्हणाले.

दुसऱ्या एका वेळी त्यांच्या खोलीत मला एक देखणा तरुण साहाय्यक वकील आढळला. चेखोव यांच्या समोर उभे राहून, कुरळ्या केसांचे आपले डोके मोठ्या दिमाखाने मागे झुकवीत, अत्यंत ठाम सुरात तो म्हणत होता :

"आन्तोन पावलोविच, तुमच्या 'दुरात्मा' मधून तुम्ही माझ्यासमोर एक अत्यंत अवघड समस्या उभी केली आहे. देनिस ग्रिगोऱ्येवमध्ये वाईट कृत्य मुद्दाम करण्याची इच्छा वसते आहे असं मला जर समजलं, तर समाजाचं हित लक्षात घेऊन त्याची तात्काळ तुरुंगात रवानगी करणं हे माझं कर्तव्य आहे. पण तो जंगली आहे, त्याच्या गुन्हेगारी कृत्याची त्याला जाणीव नाही आणि मला त्याची कीव वाटते. तो अविचारानं वागणारा माणूस आहे असं मी समजलो आणि त्याची कीव करीत बसलो, तर देनिस पुन्हा बोल्ट काढणार नाही आणि आगगाडी उलटवणार नाही याची हमी मी समाजाला कशी देणार? हा प्रश्न आहे. काय केलं पाहिजे ?"

तो बोलायचा थांबला, धप्पदिशी त्याने मागे खुर्चीत अंग टाकले आणि

चेखोव यांच्या चेहऱ्याकडे त्याने चौकस नजरेने टक लावली. त्याचा गणवेष नवा कोरा होता. त्याची दर्शनी बटणे एखाद्या अतिउत्साही वेड्याच्या नुकत्याच धुतलेल्या चेहऱ्यावरील डोळ्यांप्रमाणे विश्वासपूर्वक आणि मूर्खासारखी चमकत होती.

आन्तोन पावलोविच गंभीरपणे म्हणाले: "जर मी जज्ज असतो तर देनिसला सोडून दिलं असतं!"

"कोणत्या कारणावर?"

"मी त्याला सांगितलं असतं: 'देनिस, तू अजून अट्टल गुन्हेगार बनला नाहीस, तेव्हा जा आणि तसा हो!'"

वकील हसला, पण तात्काळ त्याने आपले गांभीर्य पुन्हा सावरले आणि तो पुढे म्हणाला:

"नाही! तुम्ही निर्माण केलेली समस्या फक्त समाजहिताच्या दृष्टि-कोनातूनच सोडवली पाहिजे. ह्या समाजाच्या जीवित-वित्ताचं रक्षण करणं हे माझं कर्तव्य आहे. देनिस हा जंगली आहे हे खरं असलं तरी तो गुन्हेगार आहे आणि त्यातच सत्य सामावलंय!"

"तुम्हाला ग्रामोफोन ऐकायला आवडतो?" आन्तोन पावलोविचनी अचानक विचारले.

"हो! खूप! हा फार अद्भुत शोध आहे," तो तरुण घाईने उत्तरला.

"पण मला ग्रामोफोनचा तिटकारा आहे," चेखोवनी खेदपूर्वक कबुली दिली.

"का बरं?"

"तो बोलतो, गातो... पण कोणत्याही भावनेविना! त्यातून येणारे सगळे आवाज एवढे पोकळ आणि निर्जीव असतात! आणि तुम्हाला फोटोग्राफीची आवड आहे?"

तो वकील फोटोग्राफीचा जबरदस्त छंदी असल्याचे आढळले. ग्रामोफोनचा विषय एकदम बाजूला सोडून तो उत्साहाने छायाचित्रकलेबद्दल बोलू लागला. त्या "अद्भुत शोधा" विषयीची स्वतःची आवड त्याने संभाषणातून वगळल्याचे चेखोवनी सूक्ष्मपणे आणि अचूकपणे हेरले. पुन्हा एकदा त्या गणवेषाखाली मला एका जिवंत आणि रंजक माणसाचे दर्शन घडले. कुत्र्याच्या पिलाला शिकारीवर नेल्यानंतर ते ज्या नवखेपणाने वावरते, तसाच तो तरुण जीवनात अद्याप वागत होता.

त्या तरुणाला निरोप देऊन आल्यानंतर चेखोव उदासपणे म्हणाले :

"न्यायाधीशाच्या पाठीवरच्या ह्या अशा पुटकुळया लोकांची भवितव्यं ठरवतात !"

थोडे थांबून ते पुढे म्हणाले : "वकीलांना मासे धरण्याचा बहुधा नाद असतो. खास करून पर्च नांवाचा गोडा मासा पकडण्याचा !"

सगळीकडील असभ्यता उघडकीला आणण्याची कला त्यांना अवगत होती. जो माणूस स्वतः आयुष्याकडून खूप उच्च अपेक्षा धरतो त्यालाच ह्या कलेत निपुणता मिळविता येते आणि माणसामध्ये साधेपणा, सौंदर्य व सुसंवाद पाहण्याच्या कळकळीच्या इच्छेमधून ती निर्माण झालेली असते. असभ्यपणाचा ते कठोरपणे आणि निष्ठुरपणे परामर्श घेत.

त्यांच्या उपस्थितीत कुणीतरी म्हणाले की, इतरांसाठी प्रेमाची आणि सहानुभूतीची गरज आहे असे सतत बोलणाऱ्या एका लोकप्रिय मासिकाच्या संपादकाने काहीही कारण नसताना एका रेल्वे गार्डाचा अपमान केला होता व स्वतःच्या कनिष्ठांना वाईट वागविण्याची त्याला सवय होती.

"स्वाभाविक आहे", गंभीरपणे गालातल्या गालात स्मित करीत चेखोव म्हणाले. "तो उच्चभ्रू आहे, सुसंस्कृत आहे... तो खास पाठशाळेत गेला होता. त्याचे वडील झाडाच्या सालींची पादत्राणं वापरत होते, पण हा खास कमावलेल्या कातडयाचे बूट वापरतो."

ज्या स्वरात हे शब्द उच्चारले गेले, त्या स्वरामुळे "उच्चभ्रू" म्हणजे सामान्य आणि हास्यास्पद व्यक्ती असा अर्थ तात्काळ प्रतीत झाला.

"फार गुणी माणूस," एका विशिष्ट पत्रकाराबद्दल ते म्हणाले. "त्याचं लेखन नेहमी खूप उदात्त असतं, अत्यंत परोपकारी असतं... मधुर. लोकांदेखत तो आपल्या बायकोला मूर्ख म्हणतो. त्याचे नोकर ओल आलेल्या खोलीत झोपतात आणि त्या सर्वांना संधिवाताचा विकार जडतो..."

"तुम्हाला तो अमूक अमूक आवडतो?"

"हो तर. फार छान," खोकत चेखोव उत्तरतात. "त्याला सर्व काही माहीत आहे. तो खूप वाचतो. त्यानं माझी तीन पुस्तकं घेतली आणि कधीही परत केली नाहीत. थोडा भ्रमिष्ट आहे. एके दिवशी तुम्हाला

सांगतो की, तुम्ही फार छान गृहस्थ आहात आणि दुसऱ्या दिवशी कुणाला तरी सांगतो की, तुमच्या प्रेमिकेच्या नवऱ्याचे निळया पट्ट्यांचे काळे रेशमी मोजे तुम्ही चोरलेत."

त्यांच्या उपस्थितीत कुणीतरी तक्रार केली की, "जड" मासिकांचे "गंभीर" विभाग नीरस व अवघड होते.

"ते लेख मुळीच वाचू नका," चेखोवनी अत्यंत ठामपणे सल्ला दिला. "ते लेख म्हणजे सहकारी साहित्य आहे... क्रास्नोव, चेर्नोव आणि बेलोव (लाल, काळा आणि पांढरा – अनु.) मंडळींनी लिहिलेलं. एकजण लेख लिहितो, दुसऱ्या त्याच्यावर टीका करतो आणि तिसरा पहिल्या दोघांच्या अतार्किक गोष्टींचा मेळ घालतो. बाहुल्याबरोबर पत्त्यांचा डाव खेळण्यासारखं हे आहे. पण वाचकाला ह्या सर्वांची काय गरज आहे, असा प्रश्न त्यांच्यापैकी एकहीजण स्वतःला विचारत नाही."

एकदा एक दणकट बांध्याची, निकोप, देखणी, उत्तम वेषभूषा केलेली महिला त्यांना भेटायला आली. "चेखोव धर्तीवर" तिने तात्काळ बोलायला आरंभ केला.

"आयुष्य फार नीरस आहे. प्रत्येक गोष्ट मलिन आहे – माणसं, आकाश, सागर; एवढंच नव्हे तर फुलंसुद्धा मला मळकट भासतात. कशाचीच इच्छा उरली नाही. माझं काळीज दुखतंय. हा एक प्रकारचा रोग..."

"हा रोगच आहे," आन्तोन पावलोविच दमदारपणे म्हणाले. "नेमकं तेच आहे. त्याचं लॅटिन नांव मोर्बस शॅम-इटिस." [ढोंगाची विकृती – अनु.]

सुदैवाने त्या महिलेला लॅटिन समजत नव्हते अथवा न समजल्याचा तिने निदान बहाणा केला.

"जमीन नांगरण्यास घोड्यांना अडथळा आणणाऱ्या घोडमाशांप्रमाणं टीकाकार असतात," गालातल्या गालातील आपले धूर्त स्मित करीत ते म्हणाले. "फिडलच्या तारांप्रमाणं घोड्याचे स्नायू ताणलेले असतात आणि अचानक एक घोडमाशी गूं गूं आवाज करत त्याच्या पार्श्वभागावर बसते आणि त्याला दंश करते. घोड्याची त्वचा थरथरते, तो आपली शेपटी उडवतो. माशी कशासाठी गुणगुण करतेय? कदाचित तिला स्वतःलाच कारण माहीत नाही. केवळ तिचा अस्वस्थ स्वभाव आहे आणि स्वतःच्या

अस्तित्वाची जाणीव करून देण्याची तिची इच्छा आहे – 'मीसुद्धा जिवंत आहे!' असं ती म्हणत असल्याचा भास होतो. 'पहा, गुणगुण कशी करायची ते मला माहीत आहे. सर्व गोष्टींभोवती मी गुणगुणू शकते!' माझ्या कथांबद्दलची परीक्षणं गेली पंचवीस वर्षं मी वाचतोय, पण त्यांपैकी एकाही परीक्षणात निदान एक तरी उपयुक्त मुद्दा सुचविल्याचं अथवा किंचित चांगला सल्ला देण्यात आल्याचं मला आठवत नाही. माझ्यावर फक्त एकाच परीक्षणकर्त्याचा प्रभाव पडला होता. कुंपणापाशी मी झिंगून मरीन अशी भविष्यवाणी त्यानं केली होती..."

त्यांच्या राखी, उदास डोळ्यांमध्ये सूक्ष्म उपहासाची छटा नेहमी सौम्य-पणे चमकत असे. पण कधीमधी हे डोळे थंड, तीव्र, कठोर बनत आणि अशा क्षणी त्यांच्या आवाजाच्या नरम, स्नेहाळ सुरांमध्ये कणखरपणा उमटायचा व मग मला जाणवायचे की, हा नम्र, प्रेमळ माणूस कोणत्याही विरोधी शक्तीशी सामना करायला उभा राहू शकेल, नख्या आत न वळविता ठामपणे उभा राहू शकेल.

इतरांबाबतच्या त्यांच्या दृष्टिकोनात थंड, स्तब्ध निराशेशी मिळती-जुळती अशी आत्यंतिक निराशेची छटा होती असे काहीवेळा मला भासायचे.

"रशियन फार चमत्कारिक वल्ली आहे," एकदा ते म्हणाले. "तो चाळणीसारखा आहे, फार काळपर्यंत काहीही धरून ठेवू शकत नाही. यौवनात तो अधीरपणं त्याला भेटेल त्या प्रत्येक गोष्टीला डोक्यात कोंबून घेतो आणि तिशीला पोहोचतो तेव्हा त्यांपैकी काहीही उरलेलं नसतं. फक्त रंगहीन कचऱ्याचा एक ढीग. जर कुणाला चांगलं आयुष्य जगायचं असेल, माणसासारखं जगायचं असेल, तर त्यानं काम केलंच पाहिजे. प्रेमानं आणि निष्ठेनं काम केलं पाहिजे पण ते कसं करायचं हे आपल्या देशात आम्हाला माहीत नाही. दोन-तीन छान घरं बांधून झाल्यानंतर एखादा वास्तुशिल्पी उरलेल्या सबंध आयुष्यात पत्ते खेळत बसतो अथवा रंगभूमीच्या पाठीमागं घोटाळत राहतो. एखाद्या डॉक्टरची प्रॅक्टिस चांगली चालू लागली म्हणजे विज्ञानाच्या वाटचालीची दखल घेण्याचं तो थांबवतो, 'नोवोस्ती तेरापीय' ('रोगशमनविद्यावार्ता') सोडून दुसरं काहीही वाचत नाही आणि सर्व रोग सर्दीपासून उद्‌भवतात अशा ठाम निष्कर्षाला वयाच्या चाळीशीतच येतो. स्वत:च्या कामाच्या महत्त्वाबद्दल थोडीतरी जाण असलेला एकही अंमलदार मला कधीही भेटलेला नाही. सर्वसाधारणपणे राजधानीत वा

एखाद्या प्रांतिक गावी आपला जम ते बसवतात आणि कागदपत्र शोधून इमीयेव व स्मोर्गोनकडे अंमलबजावणीसाठी धाडतात. आणि ह्या दस्तऐवजांमुळे इमीयेव अथवा स्मोर्गोनमध्ये कुणाच्या संचारस्वातंत्र्यावर गदा येते त्याची ह्या अंमलदाराला मुळीच क्षिती वाटत नाही. नरकातील छळांबाबत निरीश्वरवादी जेवढा बेफिकीर असतो, तेवढाच ह्याबाबत तो अंमलदार बेफिकीर असतो. यशस्वी बचाव करून कीर्ती प्राप्त झालेला बॅरीस्टर नंतर सत्याच्या बचावाबाबत उदासीन बनतो आणि मालमत्तेच्या हक्कांचा बचाव करण्याव्यतिरिक्त दुसरं काहीही करत नाही. घोड्यांवर पैसे लावतो, कालवं खातो आणि सर्व कलांचा ज्ञानी असल्याचा आव आणतो. दोन-तीन भूमिका यशस्वीपणं वठविल्यानंतर एखादा नट पुढं आपल्या भूमिकांचा अभ्यास करत नाही, तर उंच टोपी घालून स्वतःला प्रतिभावंत समजू लागतो. रशिया म्हणजे लोभी आळशांची भूमी. लोक प्रचंड प्रमाणात खातात-पितात; दिवसा झोपायला त्यांना आवडतं आणि झोपेत ते घोरतात; घरात व्यवस्था रहावी म्हणून केवळ ते लग्न करतात आणि सामाजिक प्रतिष्ठेसाठी रखेली ठेवतात. त्यांचं मानसशास्त्र कुत्र्याच्या मानसशास्त्राप्रमाणं आहे. त्यांना चोप द्या आणि ते केविलवाणं केकाटून मुकाट आपल्या घरांमध्ये जाऊन बसतील. त्यांना गोंजारा आणि ते पाठीवर उताणं पडून, पंजे वर करून शेपट्या हलवतील."

ह्या शब्दांमध्ये एक थंड, दुःखद तिटकारा सामावलेला आहे. पण तिरस्कार करीत असतानाही त्यांना करुणा वाटते. त्यांच्या उपस्थितीत कुणाची निंदा घडत असली तर चेखोव हमखास त्या माणसाचा कैवार घेत.

"जाऊं द्या! तो म्हातारा माणूस आहे, सत्तरीचा..." किंवा:

"अजून लहान आहे, हा केवळ त्याचा मूर्खपणा..."

आणि जेव्हा ते असे बोलत तेव्हा त्यांच्या मुद्रेवर तिरस्काराची कोणतीही खूण मला दिसत नसे...

तरुण असताना असभ्यता केवळ गंमतीची किंवा बिनमहत्त्वाची भासते. पण हळूहळू ती व्यक्तीला घेरते; विषाप्रमाणे किंवा कोळशाच्या धुराप्रमाणे माणसाच्या मेंदूत आणि रक्तात तिचे राखाडी धुके सरपटत घुसते; शेवटी

खाणावळीच्या जुन्या, गंजलेल्या पाटीप्रमाणे तो बनतो. म्हणजे त्या पाटीवर काहीतरी दाखविले आहे असे भासते, पण नक्की काय ते सांगणे अशक्य ठरते.

असभ्यतेच्या गढूळ सागरामधून तिचे करुण, खिन्न विनोद उघडकीला आणणे आन्तोन चेखोवना पहिल्याच पुस्तकांमध्ये जमले. फक्त त्यांच्या "विनोदी" कथा अवधानपूर्वक वाचा. म्हणजे जाणीव होते की, लेखकाने किती किती क्रौर्य पाहिले आहे आणि त्या विनोदी वर्णनामधून व प्रसंगांमधून शरमिंदेपणाने ते लपविले आहे.

त्यांच्या अंगी अगदी शुद्ध नम्रता होती. लोकांना मोठ्यांदा आणि उघडपणे आव्हान देणे त्यांना कधीच जमले नाही. "थोडं अधिक सभ्य नाही का वागता येणार?" अधिक सभ्य वागण्याची तातडीची आवश्यकता लोकांना आपोआपच जाणवेल असा त्यांना वृथा विश्वास वाटायचा. आयुष्यात कितीही असभ्यता आणि घाण असली तरी कवीच्या उदात्त भाषेत त्यांनी आयुष्याच्या काळया बाजूचे वर्णन केले. विनोदी लेखकाच्या सौम्य स्मिताने ती बाजू पाहिली. त्यांच्या कथांच्या चकचकीत पृष्ठभागाखालील कडवट अंतर्यामीचा राग क्वचितच दिसून येतो.

'आल्बियनची मुलगी' वाचणारा आदरणीय वाचकवर्ग हसतो आणि एका एकाकी व्यक्तीची, प्रत्येक गोष्टीला आणि प्रत्येकाला अनोळखी असलेल्या व्यक्तीची, एका पुष्ट उमरावाने केलेली घृणास्पद थट्टा कदाचित त्याला दिसत नाही. चेखोव यांच्या सर्व विनोदी कथांमधून मला एका विशुद्ध, खऱ्याखुऱ्या मानवी हृदयाचा सौम्य, गहिरा निःश्वास ऐकू येतो. हा निराशेने भरलेला कारुण्यपूर्ण निःश्वास असतो स्वतःचा मान राखू न शकणाऱ्या माणसांसाठी! ही माणसे कोणताही विरोध न करता पाशवी शक्तीला शरण जातात. गुलामांसारखी राहतात. रोज ती गिळत असलेल्या कोबीच्या सारासारखी पचपचीत असतात. त्यांना इतर कोणतीही भावना स्पर्शत नाही, फक्त बलिष्ठांकडून आणि मग्रूरांकडून मार मिळण्याच्या धास्तीने ग्रासलेले असते.

आयुष्यातील क्षुल्लक गोष्टींचे करुण स्वरूप चेखोव यांच्याएवढे स्पष्टपणे आणि अंतर्ज्ञानाने कुणीच जाणले नाही. मध्यमवर्गीय जीवनाच्या कळकट गोंधळातील लाजिरवाण्या आणि कीव आणण्याजोग्या सर्व गोष्टींचे एवढे

कठोर वास्तव चित्रण लोकांपुढे सादर करण्यास यापूर्वी एकही लेखक कधी समर्थ ठरला नाही.

असभ्यता हा चेखोव यांचा शत्रू होता. सारे आयुष्य त्याविरुद्ध ते लढले, त्याचा त्यांनी तिटकारा केला; नि:पक्षपाती लेखणीने असभ्यता वर्णिली. जेथे प्रथमदर्शनी सर्व काही उत्तम, अत्यंत आरामशीर आणि तेजस्वी भासत असे अशा ठिकाणीही असभ्यतेची बुरशी त्यांनी शोधून काढली... आणि त्यांच्या मृत देहावर असभ्यतेने उलटा सूड उगविला. ह्या कवीचा मृत देह मॉस्कोला कालवे भरलेल्या आगगाडीच्या डब्यातून पाठविण्यात आला.

हा घाणेरडा हिरवा डबा म्हणजे साक्षात असभ्यता आहे असे मला वाटते. आपल्या दमल्या शत्रूकडे दात विचकून विजयी हास्य करीत आहे असे भासते. आणि नीच, हलक्या वृतपत्रांनी सांगितलेल्या असंख्य "आठवणी" – केवळ दु:खाचे ढोंग! त्यामागेही मला त्या असभ्यतेचा थंडगार, दुर्गंधी श्वास जाणवतो. आपल्या शत्रूच्या मृत्यूचा आनंद ती साजरा करतेय असे वाटते.

चेखोव यांचे साहित्य वाचताना शरदाच्या उत्तरार्धामधील एखाद्या उदास दिवसाची आठवण होते: वातावरण तरल बनलेले आहे, आकाशाच्या पार्श्वभूमीवर भुंडी झाडे ठसठशीत उभी आहेत, घरांनी दाटीवाटीने एकमेकांना कुशीत घेतले आहे, माणसे अंधुक आणि भयाण दिसत आहेत. सारे काही विलक्षण परके, कमालीचे एकाकी, गतिहीन, सामर्थ्यहीन. अतिदूरची अंतरे निळसर आणि पोकळ भासताहेत. फिकट आकाशात ती मिसळून गेली आहेत. अर्धथिजल्या चिखलावर हे आकाश भयाण थंड श्वास सोडतेय. पण लेखकाचे मन मात्र शारदीय उन्हाप्रमाणे चाकोरी पडलेले रस्ते, वेडयावाकडया गल्ल्या आणि घाणेरडी, दाटलेली घरे उजळून काढतेय. ह्या घरांमधून केविलवाणी "छोटी" माणसे आपल्या कंटाळवाण्या आणि रिकामपणाच्या आयुष्याचे सुस्कारे सोडत आहेत. आपल्या घरांमध्ये अर्थहीन, पेंगळलेली गडबड करीत आहेत. ही चालली पहा "लाडकी"! छोटया उंदरासारखी घाबरलेली. अगदी नम्र बाई. सरसकट सर्वांवर आणि इमानी चाकराच्या निष्ठेने प्रेम करणारी. तिच्या गालावर एक चपराक

मारलीत तर ही गरीब बापडी किंचाळी फोडायचे धारिष्टचसुद्धा करणार नाही. तिच्या शेजारी उभी आहे 'तीन बहिणी' मधील उदास ओल्गा. तिच्यातसुद्धा प्रेम करण्याची शक्ती आहे आणि आपल्या आळशी भावाच्या बायकोच्या व्यसनी, असभ्य जीवनाच्या लहरींपुढे ती मुकाट मान तुकवून जगते. तिच्या बहिणींची आयुष्ये तिच्याभोवती उध्वस्त होऊन कोसळतात. पण ती फक्त रडते. त्याबद्दल काहीच करू शकत नाही. तिच्या अंतरात असभ्यतेविरुद्ध एक जिवंत, धगधगता निषेधाचा शब्द उमटू शकत नाही.

आणि ही पहा अश्रुभरल्या डोळ्यांची रानेवस्काया व 'चेरीच्या बागे'ची माजी मालक मंडळी. ही माणसे लहान मुलांप्रमाणे स्वार्थी आहेत आणि म्हाताऱ्या माणसांसारखी कमजोर, थुलथुलीत आहेत. त्यांनी केव्हाच मरून जायला पाहिजे होते. सारखी कूरबूर करतात, त्यांच्या भोवताली चाललेल्या घडामोडींकडे डोळेझाक करतात, त्यांना कशाचेही आकलन होत नाही. ह्या परपुष्टांना आपली चोखणी पुन्हा ओढायचीही ताकद नाही. कुचकामी विद्यार्थी त्रोफीमोव काम करण्याच्या आवश्यकतेवर मारे जोरदार व्याख्यान झोडतो, पण प्रत्यक्षात मात्र वार्याला फालतू टोमणे मारीत वेळ वाया घालवीत राहतो. बिचारी वार्या सगळ्या आळशांच्या कल्याणासाठी अखंड काम करीत राहते.

तीनशे वर्षांच्या काळात चांगले जीवन येणार असे स्वप्न वेर्शिनिन* पाहतोय. पण ह्या घडीला त्याच्या भोवतालच्या सर्व गोष्टींच्या ठिकऱ्या उडताहेत हे त्याच्या ध्यानात येत नाही. कंटाळ्यापायी आणि मूर्खपणापायी, सोल्योनी त्या केविलवाण्या बॅरन तूझेनबाखला ठार मारायला सज्ज झाला आहे, हे धडधडीत डोळ्यांना दिसत असूनही तो तिकडे दुर्लक्ष करतो.

प्रेम करणाऱ्या, मूर्ख वागणाऱ्या आणि आळशी राहणाऱ्या, ऐहिक सुखांची हाव धरणाऱ्या गुलामांची लांबच लांब मिरवणूक वाचकाच्या डोळ्यांसमोरून सरकत जाते. हे गुलाम जीवनाविषयीच्या अज्ञात भीतीने ग्रासलेले आहेत, अंधुक चिंता करीत फिरत आहेत, भावी काळाविषयीच्या अस्फुट बडबडींनी वातावरण भरून टाकीत आहेत. वर्तमानात त्यांना स्थान नाही अशी त्यांची भावना झाली आहे...

काहीवेळा त्या करड्या समूहामधून बंदुकीचा बार ऐकू येतो. हा

* 'तीन बहिणी'चा नायक. — अनु.

इवानोव ('इवानोव.'–सं.) किंवा त्रेप्लेव ('समुद्रपक्षी.'–सं.) ...त्यांना काय करावे ते सुचले आणि मरण पावले.

दोनशे वर्षांच्या काळात येणाऱ्या वैभवशाली जीवनाची सुंदर स्वप्ने पाहण्यात त्यांच्यापैकी बहुतेकजण गुंतले आहेत. पण कुणीही एक साधा प्रश्न विचारण्याची तसदी घेत नाही: आपण जर केवळ स्वप्ने पाहण्याव्य-तिरिक्त काहीही करीत नाही, तर हे आयुष्य वैभवशाली कोण करणार?

आणि ह्या नपुंसक प्राण्यांच्या नीरस, भयाण जमावाजवळून एक थोर, शहाणा माणूस आता चालला आहे. त्या सर्वांकडे तो बारकाईने कटाक्ष टाकतो. आपल्या मातृभूमीमधील ह्या भयाण लोकांकडे पाहून खेदाने स्मित करतो. त्याचा स्वर सौम्य आहे, पण त्यात खोल राग दडला आहे. त्याच्या मुद्रेवर आणि त्याच्या अंतःकरणात दाट निराशा जाणवते आहे. अत्यंत कळकळीच्या, दुःखी आवाजात तो म्हणाला:

"सभ्य गृहस्थहो, किती नीरस जीवन जगत आहात तुम्ही!"

पाच दिवस ताप फणफणलेला, पण विश्रांतीची इच्छा नाही. भुरकट रंगाचा फिन्लंडचा पाऊस ओली धूळ जमिनीवर शिंपडत आहे. ईनो किल्ल्या-मधील तोफा सतत गडगडाट करीत आहेत. रात्रीच्या वेळी सर्चलाईटची लांबडी जीभ ढगांना चाटते आहे. हे दृश्य मोठे तिरस्करणीय वाटतेय, कारण त्या सैतानी रोगाची–युद्धाची–[3] ते सतत आठवण करून देतेय.

मी चेखोव वाचतोय. जर दहा वर्षांपूर्वी ते वारले नसते तर कदाचित युद्धाने त्यांना मारले असते. लोकांच्या द्वेषाचे वीष त्यांना चारले असते. मला त्यांची अंत्ययात्रा आठवली.

मॉस्कोने "खूप प्रेम केलेल्या" ह्या लेखकाची शवपेटी आगगाडीच्या एका हिरव्या डब्यामधून आणण्यात आली. त्या डब्याच्या दारावर "कालवे" असे मोठ्या अक्षरांमध्ये लिहिलेले होते. लेखकाची वाट पाहणारा स्टेशनवरील छोटा जमाव चुकीने मांचुरियाहून नुकत्याच आलेल्या जनरल केलरच्या शवपेटीमागे[4] गेला. लष्करी बँडच्या संगीतावर चेखोव यांना थडग्याकडे का नेण्यात येत होते याविषयी ते लोक आश्चर्य व्यक्त करीत होते. जेव्हा ही चूक उमगली तेव्हा काही मनमिळाऊ स्वभावाच्या व्यक्ती गालातल्या गालात हसू लागल्या. चेखोव यांच्या शवपेटीमागे फार तर

शंभर लोक चालत होते. त्यातील दोन वकील माझ्या स्मरणात राहिले आहेत. दोघांनी नवरदेवांप्रमाणे नवे बूट चढविले होते आणि रंगीबेरंगी टाय बांधले होते. मी त्यांच्या मागूनच चालत होतो. त्यांपैकी एकजण कुत्र्यांच्या हुषारीबद्दल बोलत होता आणि दुसरा आपल्या दाचा* मधील सुखसोयींविषयी व त्याभोवतालच्या सुंदर परिसराविषयी बढाया मारीत होता. आणि जांभळ्या पोषाखामधील एका महिलेने विणलेल्या जाळीचा उन्हापासून आडोसा धरला होता व शिंगाच्या कडा बसविलेला चष्मा घातलेल्या एका म्हाताऱ्या सद्‌गृहस्थाला ती आवर्जून सांगत होती :

"ते इतके छान होते, एवढे विनोदी होते..."

म्हातारे सद्‌गृहस्थ अविश्वासाने किंचित खोकले. त्या दिवशी खूप गरम होत होते, धूळ उडत होती. त्या मिरवणुकीच्या अग्रभागी एक धिप्पाड पोलीस अधिकारी धिप्पाड पांढऱ्या घोड्यावर बसून जात होता. त्या थोर आणि हुशार कलाकाराच्या स्मृतीशी हे सर्व काही घृणास्पद असभ्य होते आणि अत्यंत अनुचित होते.

सूवोरीन[5] यांना लिहिलेल्या एका पत्रात चेखोवनी म्हटले होते :

"जगण्यासाठी रुक्ष संघर्ष करण्याइतके अधिक भयाण आणि अधिक काव्यहीन दुसरे काहीही नाही. ते जीवनाचा आनंद नष्ट करते आणि जीवनाविषयी उदासीनता आणते."

हे शब्द आत्यंतिक रशियन मनोवृत्ती व्यक्त करणारे आहेत आणि माझ्या मते चेखोव यांच्या वृत्तीशी मुळीच सुसंगत नाहीत. रशियात प्रत्येक गोष्टीची विपुलता असूनही लोकांना कामाची आवड नसल्यामुळे बहुतेक लोक अशा रीतीने विचार करतात. ताकदीचे रशियनांना कौतुक आहे, पण तिच्यावर त्यांचा खरा विश्वास मात्र नाही. क्रियाशील प्रवृत्तीचा पुरस्कार करणारा जॅक लंडनसारखा[6] लेखक रशियात होणे अशक्य. जॅक लंडनची पुस्तके रशियात खूप लोकप्रिय आहेत, पण रशियनांना त्या पुस्तकांनी क्रियाप्रवण बनविल्याचे माझ्या आढळात नाही. त्यांनी त्यांच्या कल्पनाशक्ती केवळ ढवळल्या. पण चेखोव ह्या अर्थाने फारसे रशियन नव्हते. त्यांच्या

---

* दाचा – खेड्यामधील रशियन धर्तीचे उन्हाळी विश्रामघर. – अनु.

आरंभीच्या यौवनकालापासूनच त्यांना "जगण्यासाठी संघर्ष" करावा लागला होता. पावाच्या तुकड्यासाठी — आणि त्यांच्या स्वत:साठी व इतरांसाठी फार मोठ्या तुकड्याची जरूरी होती — दैनंदिन किरकोळ चिंतांचे आनंदहीन, रंगहीन जीवन त्यांना कंठावे लागले होते. आनंदहीन अशा ह्या चिंता निस्तरण्यात त्यांनी आपल्या सर्व यौवनशक्ती खर्चिल्या. आपली विनोद-बुद्धी त्यांनी कशी शाबूत राखली हे एक आश्चर्यच आहे. त्यांचे जीवन म्हणजे केवळ अन्नासाठी आणि आधारासाठीची थकली धडपड होती. त्यातील महान नाट्ये आणि शोकांतिका सर्वसामान्यतेच्या एका दाट थराने त्यांच्यापासून लपविलेल्या होत्या. जेव्हा इतरांसाठी अन्न मिळविण्याची त्यांच्यामागील विवंचना संपली तेव्हा कुठे ह्या नाट्यांवर चौकस नजर टाकणे त्यांना शक्य झाले.

संस्कृतीचा पाया म्हणून काम खूप महत्त्वाचे आहे असे गहनपणे आणि विविधतेने चेखोवना जसे जाणवत असे, तसे जाणवणारा दुसरा कुणी अद्याप तरी मला भेटलेला नाही. त्यांच्या घरगुती जीवनामधील सर्व किरकोळ गोष्टींमधून ही भावना दिसून यायची. घरासाठी घेतलेल्या वस्तूंच्या निवडी-मधून, त्या वस्तूंविषयी वाटणाऱ्या ममत्वामधून, ही भावना जाणवायची. त्यांना वस्तू गोळा करण्याचा सोस मुळीच नव्हता. पण माणसाच्या सृजनशील भावनेची निर्मिती म्हणून त्या वस्तूंचे कौतुक करण्याचा त्यांना कधी कंटाळा आला नाही. त्यांना बांधकाम करणे, बागा लावणे, भूमीला नटविणे आवडायचे. कामामधील काव्य त्यांना जाणवायचे. स्वत: लावलेल्या फळझाडांची आणि झुडुपांची फार आस्थेने ते काळजी वाहात. त्यांच्या घराची बांधणी चालू असताना असंख्य काळज्यांना त्यांना तोंड द्यावे लागत होते. तरीही, त्या मन:स्थितीतही ते म्हणाले होते :

"जगात प्रत्येकानं आपल्या जमिनीच्या तुकड्यावर आपल्या सर्व शक्ती कारणी लावल्या, तर जग किती सुंदर होईल !"

त्याचवेळी मी माझे 'वासिली बूस्लायेव'[7] नाटक लिहिण्याच्या वेणा अनुभवीत होतो. वासिलीचे आढ्यताखोर स्वगत मी त्यांना वाचून दाखविले :

माझ्यात आणखी शक्ती असती तर !
गरम नि:श्वासानं भोवतालचं हिम वितळवून टाकीन,
जगभर संचारून जमिनी नांगरीन ;

भव्य शहर आणि नगरी मी स्थापीन,
प्रार्थनामंदिर उभारीन आणि फळबागा लावीन,
जग एखाद्या सुंदर मुलीप्रमाणं दिसेल!
नवरीला उचलावं तसं त्याला माझ्या हातांवर उचलीन,
धरतीला मी माझ्या उराशी कवटाळीन,
जगाला उचलून देवापाशी नेईन.
पहा, देवा, जगावर एक नजर टाका,
आता त्याला मी किती सुंदर बनवलंय पहा!
तुम्ही स्वर्गातल्या खड्याप्रमाणं त्याला फेकून दिलं होतं,
मी त्याचा मौल्यवान अलंकार बनवला!
पहा त्याच्याकडं आणि होऊं दे हर्ष तुमच्या काळजाला!
सूर्याखाली किती हिरवा तो चमकतो पहा!
आनंदानं मी तुम्हाला हा अलंकार दिला असता,
पण शक्य नाही – मला तो अत्यंत प्रिय आहे.

चेखोवना हे स्वगत आवडले. अस्वस्थपणे खोकत ते मला आणि डॉ आ. अलेक्सिन यांना उद्देशून म्हणाले:

"छान... खूप छान... अस्सल, मानवी. नेमका इथंच "सर्व तत्त्वज्ञानाचा अर्थ" सामावलाय. माणसानं जगात वस्ती केली, त्याचं तो जगण्यासाठी रम्य स्थळ बनवील." ठामपणे मान डोलावीत ते परत म्हणाले: "तसं तो नक्की करील."

वासिलीचे स्वगत त्यांनी मला परत वाचायला लावले आणि खिडकीबाहेर नजर लावून लक्षपूर्वक ऐकले.

"शेवटच्या दोन ओळी चालणार नाहीत. त्या उद्धट वाटतात, खोटच्या वाटतात."

स्वत:च्या साहित्यकार्याविषयी ते कमी आणि अनिच्छेने बोलत. ल्येव तल्स्तोय यांच्याबद्दलही अशाच कुमारिकेसमान संकोचाने ते बोलत. क्वचित प्रसंगी, उल्हसित मनोवृत्तीमध्ये असताना ते गालातल्या गालात हसत गोष्टीचे कथानक सांगत. नेहमी ती मजेदार गोष्ट असे.

"तर एका शाळामास्तरणीची गोष्ट मी लिहिणार आहे. ती नास्तिक आहे, डार्विनची[8] भक्त आहे, लोकांचे दूषित पूर्वग्रह आणि त्यांच्या

भाबड्या श्रद्धा यांच्याविरुद्ध लढा देण्याची गरज तिला पूर्ण पटली आहे. पण ती स्वत: मात्र पुरुषाला आकर्षित करून घेण्यासाठी आणि प्रेमात पाडण्यासाठी इच्छापूर्ती हाडूक प्राप्त करायला मध्यरात्रीच्या वेळी बान्या* मध्ये काळ्या मांजराला भाजायला जाते – तर असं एक हाडूक आहे..."

स्वत:च्या नाटकांना ते नेहमी "मनोरंजक" म्हणत आणि आपण "मनोरंजक नाटके" लिहितो अशी त्यांची खरोखरीच खात्री पटल्यासारखे भासे. "चेखोव यांची नाटकं भाव्यात्म विनोदी नाटकं म्हणून सादर केली पाहिजेत," असे साव्वा मोरोझोव[9] यांचे ठाम मत होते, तेव्हा चेखोव यांचेच शब्द ते परत उच्चारीत होते ह्यात काही संदेह नाही.

पण एकूण साहित्याकडे त्यांनी नेहमीच खूप लक्ष दिले. विशेषत: "नवशिक्यां"बाबत ते फार आस्था बाळगीत.

"आपल्याला अधिक लेखक हवेत," ते म्हणाले. "आपल्या दैनंदिन जीवनात साहित्य अद्याप नवी बाब आहे, अगदी "निवडक" मंडळींच्या दृष्टीनंही. नॉर्वेत दर दोनशेसव्वीस माणसांमागं एक लेखक आहे आणि इथं दर दहा लाखांना फक्त एक."

त्यांच्या आजारामुळे काही वेळा त्यांची मन:स्थिती विमनस्क बने अथवा माणूसघाणेपणाही त्यांच्या स्वभावात येई. अशा वेळांना ते कमालीचे चिकित्सक बनत व त्यांच्याशी जुळवून घेणे अवघड होई.

एक दिवस सोफ्यावर पडल्या पडल्या त्यांना कोरडा खोकला येत होता. थर्मामीटरशी खेळत ते म्हणाले :

"केवळ मरण्यासाठी जगायचं हे काही मनोरंजक नाही, पण तुम्ही अकाली मरणार आहात हे माहीत असून जगत राहणं अगदी वेडपटपणाचं ठरतं..."

दुसऱ्या एका वेळी खुल्या खिडकीशी बसून दूरच्या समुद्राकडे टक लावून पाहताना अचानक ते तिरसटपणे म्हणाले :

"चांगली हवा होईल, चांगलं पीक येईल, सुंदर प्रेमप्रकरण घडेल, अशा आशा करीत जगायची आपल्याला सवय लागलीय. श्रीमंत होण्याच्या

---

* बान्या – रशियन हमामखाना – अनु.

अथवा पोलीस-प्रमुख बनण्याच्या आशा आपण बाळगतो. पण कुणी अधिक शहाणे होण्याची आशा बाळगताना मला कधी आढळला नाही. आपण स्वतःला बजावीत राहतो : नव्या झारच्या राजवटीत अधिक चांगलं काही घडेल, आणखी दोनशे वर्षांनंतर परिस्थिती त्याहून चांगली असेल; पण हा सुवर्णकाळ उद्याच यावा ह्यासाठी मात्र कुणीही प्रयत्न करीत नाही. एकूण प्रतिदिनी आयुष्य अधिकाधिक गुंतागुंतीचं बनत चाललंय, आपल्या इच्छेनुसार ते पुढं जातंय आणि माणसं जास्त जास्त मूर्ख बनताहेत, वाढत्या संख्येनं जीवनापासून अलग होताहेत."

थोडेसे थांबून कपाळाला आठ्या घालीत ते पुढे म्हणाले :

"धार्मिक मिरवणुकीमधल्या लंगड्या भिकाऱ्यांप्रमाणं!"

ते स्वतः डॉक्टर होते आणि डॉक्टरचा आजार हा त्याच्या रुग्णांपेक्षा नेहमीच जास्त वाईट असतो. रुग्णांना फक्त आजार जाणवतो; पण डॉक्टरला तो जाणवतो, तसाच त्या आजाराचा त्याच्या शरीरावर कोणता अनिष्ट परिणाम घडतो आहे याचीही त्याला कल्पना असते. ह्या परिस्थितीत ज्ञानापायी मृत्यू अधिक जवळ येतो.

जेव्हा ते हसत तेव्हा त्यांचे डोळे खूप सुंदर दिसत. एक स्निग्ध, नाजुक असा बायकी सौम्यपणा अशा वेळी त्यांच्या डोळ्यांमध्ये उमटत असे. आणि जवळ जवळ ध्वनीविहीन अशा त्यांच्या हसण्यात एक विशेष आकर्षकता होती. जेव्हा ते हसत तेव्हा ते मनःपूर्वक आनंद लुटत. एवढे "निखळ"हसणारी दुसरी व्यक्ती मला माहीत नाही...

असभ्य गोष्टी त्यांना कधीही हसवू शकत नसत.

एकदा ते आपले मोहक, सहानुभूतीदर्शक हास्य करीत मला म्हणाले :

"तुमच्याशी तल्स्तोय एवढं अस्थिरपणानं का वागतात ठाऊक आहे? त्यांना मत्सर वाटतो, सूलेरझित्स्कींना[10] त्यांच्यापेक्षा तुम्ही जास्त आवडता अशी त्यांना भीती वाटते. खरंच! काल मला ते म्हणाले : 'का कुणास ठाऊक, पण गोर्कींबरोबर असताना मी नेहमीप्रमाणं वागूच शकत नाही. सूलेर त्यांच्याबरोबर राहतो हे मला आवडत नाही. सूलेरच्या दृष्टीनं ते वाईट आहे. गोर्की दुष्ट आहेत. संन्याशाच्या शपथा बळजबरीने घ्यायला लावलेल्या धर्मपीठाच्या विद्यार्थ्यासारखे ते आहेत आणि सबंध जगाविरुद्ध त्यांना राग आहे. त्यांचा आत्मा गुप्त हेराचा आहे. कुठूनतरी ते स्वप्न-भूमीला आले आहेत, ही भूमी त्यांना परकी आहे आणि ते सतत सभोवार

पाहताहेत, प्रत्येक गोष्टीची नोंद घेत आहेत, स्वतःच्या कुणा देवापाशी सगळा अहवाल देण्याचा त्यांचा मानस आहे. आणि त्यांचा देव एक राक्षस आहे; खेड्यातल्या बायका ज्याला भितात असं रानातलं किंवा पाण्यातलं भूत.'"

हे सांगत असताना डोळ्यांमधून पाणी येईपर्यंत चेखोव हसले आणि आसू पुसून पुढे म्हणाले :

"मी म्हणालो : 'गोर्की भला माणूस आहे.' पण ते म्हणाले : 'नाही, नाही, हे मला सांगू नका! त्यांचं नाक बदकाच्या चोचीसारखं आहे, फक्त कमनशिबी आणि वाईट स्वभावाच्या माणसांचीच अशी नाकं असतात. आणि बायकांना ते आवडत नाहीत आणि बायका ह्या कुत्र्यांप्रमाणं असतात; त्यांना चांगला माणूस नेहमी समजतो. सूलेरपाशी निःस्वार्थ प्रेमाची अमूल्य देणगी आहे. त्या दृष्टीनं तो प्रतिभावंत आहे. प्रेम करण्यास समर्थ असणं म्हणजे काहीही करण्यास समर्थ असणं...'"

थोडे थांबून चेखोव पुढे म्हणाले :

"खरंच, म्हातारा मत्सरी आहे... किती आश्चर्यकारक आहेत ना ते?.."

जेव्हा ते तल्स्तोयबद्दल बोलत तेव्हा त्यांच्या डोळ्यांमध्ये नेहमी अगदी पुसटसे स्मित उमटायचे. एकाचवेळी त्यात प्रेमळता आणि लज्जा दिसायची. आणि जणू काही एखाद्या अत्यंत नाजुक व गूढ गोष्टीबद्दल सांगावे, अगदी हळुवारपणे व प्रेमाने हाताळण्याच्या एखाद्या गोष्टीबद्दल सांगावे, अशा रीतीने खालच्या आवाजात बोलायचे.

तल्स्तोय यांच्या सांगाती राहून त्या ज्ञानवृद्धाची तीक्ष्ण, अनपेक्षित आणि वारंवार विसंगत भासणारी वचने नोंदविणारा कुणी माणूस नाही, ह्याबद्दल ते सतत खेद व्यक्त करीत.

"तुम्ही हे काम केलं पाहिजे," त्यांनी सूलेरझित्स्कींना खात्रीपूर्वक म्हटले. "तल्स्तोयना तुमचा खूप लळा आहे, तुमच्याशी ते खूप बोलतात आणि अद्भुत गोष्टी सांगतात."

खुद्द सूलेरबद्दल चेखोव मला म्हणाले होते :

"ते एक शहाणं बाळ आहे."

अगदी योग्य म्हटले होते.

एकदा चेखोव यांच्या एका कथेची, मला वाटते 'लाडकी', तल्स्तोय स्तुती करीत असलेले मी ऐकले.

तल्स्तोय म्हणाले: "एखाद्या सद्गुणी कुमारिकेनं लेस विणावी तशी ती आहे. पूर्वीच्या काळी लेस विणणाऱ्या अशा मुली असायच्या. सबंध आयुष्यभर त्या आपली सुखाची स्वप्नं वेगवेगळ्या आकृतींमधून विणायच्या. आपली अत्यंत आवडती स्वप्नं त्या विणायच्या आणि त्यांची लेस अंधुक, विशुद्ध प्रेमाच्या आकांक्षांनी ओथंबलेली असायची." तल्स्तोय खऱ्याखुऱ्या भावनावेगाने बोलत होते आणि त्यांच्या डोळ्यांमध्ये अश्रू तरारले होते.

पण त्या दिवशी चेखोव यांच्या अंगात ताप होता. डोके खाली झुकवून ते बसले होते. त्यांच्या गालांवर लाल डाग ठळकपणे दिसत होते. आपला चापाचा चष्मा ते काळजीपूर्वक पुसत होते. काही वेळपर्यंत ते काहीच बोलले नाही. सरतेशेवटी उसासा टाकीत हळूच, अवघडलेपणाने म्हणाले: "त्या कथेत मुद्रणदोष आहेत."

चेखोव यांच्याबद्दल खूप काही लिहिता येईल, पण त्यासाठी अचूक कथनाची आवश्यकता भासेल आणि त्या बाबतीत मी अगदी कच्चा आहे. 'स्तेप' ही सुगंधी, खुल्या वातावरणातील, विचारमग्न, सोत्सुक अशी अस्सल रशियन कथा त्यांनी स्वत: लिहिली त्याप्रमाणे त्यांच्याविषयी लिहिले पाहिजे. स्वत:साठी लिहिलेली कथा!

अशा माणसाची आठवण केल्याने चांगले वाटते. जणू आनंदीपणा अचानक भेटीला आला असे वाटते. त्यामुळे आयुष्याला पुन्हा स्पष्ट अर्थ लाभतो.

मानव हा विश्वाचा अक्ष आहे.

मग तुम्ही विचाराल, त्याचे दुर्गुण? त्याच्या उणीवा?

आपल्या बरोबरीच्या लोकांच्या प्रेमासाठी आपण सर्व भुकेले असतो; आणि माणूस जेव्हा भुकेला असतो तेव्हा अर्धा-कच्चा घासही गोड लागतो.

१९०४

# बाल्झाक[11]

भयाण, ओसाड मैदानाला तुडवीत चाललेला एखादा वाटसरू एकेकाळी तो रहात असलेल्या सुपीक, सुंदर आणि समृद्ध भूमीच्या आठवणीने जसा फुलून उठतो, त्याप्रमाणे बाल्झाकच्या कादंबऱ्यांची आठवण होताच मनाला प्रसन्नपणाची झुळूक लागते.

मी तेरा वर्षांचा होतो तेव्हा प्रथम मी फ्रेंच लेखकाचे पुस्तक वाचले. ते होते एदमोन गोन्कूर[12] यांचे «Les Freres Zemganno» [ 'झेमगानो बंधू' ]. नटांबद्दलची ती हृदयस्पर्शी कहाणी होती. वैरभावी कुतूहलाच्या संकुचित, आत्म्याला पांगळे बनविणाऱ्या जगात मानसिक एकाकीपणा नशीबाला आलेल्या माणसांची ती कहाणी होती.

त्या लाडक्या पुस्तकाने माझ्यातील उदात्त खिन्नतेला ढवळले आणि जगाला स्वतःमधील सर्वोत्तम अर्पण करणाऱ्या प्रत्येकाबद्दल विशेष समजूतदारपणाची, कळकळीची आणि सहानुभूतीपूर्ण आदराची भावना माझ्यामध्ये कायमची रुजविली.

त्याचवेळी, एदमोन गोन्कूर यांनी माझ्यामध्ये फ्रान्समधील साहित्याबद्दल कुतूहल जागे केले. त्यावेळी फ्रान्सच्या इतिहासाबद्दल माझे अगदी तोकडे ज्ञान होते. माझ्या कल्पनेत ती शिलेदारांची आणि वीरांची भूमी होती. माझ्या ओळखीच्या व्याकरण पाठशाळेतील मुलांपाशी मी फ्रेंच लेखकांविषयी माहिती विचारली व त्यांना उपलब्ध होऊ शकणारे फ्रेंच कादंबऱ्यांचे कोणतेही रशियन अनुवाद मला वाचायला द्यावेत अशी विनंती केली.

अलेक्सांदर द्यूमाँ,[13] पॉन्सन दू तेरैल, फॉटर्चन दू बोइगोबे, पियरी झाक्कोने, एमिल गाबोरिआँ,[14] क्साव्ये दे मॉन्तेपिन ह्यांचे अगणित खंड मी फस्त केल्यानंतर व आणखी सुमारे डझनभर लेखकांची पुस्तके वाचल्यानंतर, कुणीतरी मला बाल्झाकचे एक अगदी छोटे पुस्तक दिले. त्याचे नांव «La Pean de chargin» ('खडबडीत कातडे').

दुर्मिळ वस्तुभांडाराचे बाल्झाकने जेथे वर्णन केले आहे ती पाने वाचताना मला झालेला अवर्णनीय आनंद मला आठवतो. शाब्दिक

लवचिकपणाचे एक सर्वोत्तम उदाहरण म्हणून ते वर्णन माझ्या कायम ध्यानात राहिले आहे. ह्या पुस्तकातील लक्षणीय कौशल्याचा आणखी एक उतारा म्हणजे मेजवानीप्रसंगीचा संवाद. मेजाभोवतीच्या संभाषणाचे तुटक तुकडे केवळ वापरून लोकांच्या चेहऱ्यांचे व त्यांच्या स्वभावांचे आश्चर्यकारक स्पष्ट चित्र बाल्झाक रेखाटतो.

मी बाल्झाकची पुस्तके धुंडाळायला आरंभ केला आणि त्याचे पुढील पुस्तक मी वाचले «Père Goriot» ('फादर गोरीओ'). मी पूर्णतः भारावून गेलो आणि प्रदीर्घ काळपर्यंत मला जाणवत होते की, मी स्वतःच जणू रास्तीन्याक होतो आणि मानवाच्या प्रतिष्ठेला पायदळी तुडविल्याबद्दल, त्याला सोसाव्या लागणाऱ्या यातनांना कारणीभूत ठरल्याबद्दल, जगाला धमकावीत होतो. त्या काळात मी अगदी भिकार जिणे जगत होतो, पण माझी प्रकृती सणसणीत असल्यामुळे मी रोमांचवादी बनलो.

«La Comedie Humaine» ('मानवी उपहासिका') मी वाचले तेव्हा वयाची मी जवळजवळ विशी गाठली होती. त्या पुस्तकाने माझ्या अद्याप न आकारलेल्या रोमांचवादाला जबरदस्त हादरा दिला. ह्या कादंबरीत मला बाल्झाकची प्रतिभा जाणवली आणि शिक्षक व मित्र ह्यांच्याबद्दल वाटणारी कळकळीची निष्ठा मला त्याच्याबद्दल वाटू लागली.

दोन-तीन वर्षांनंतर त्याच्या सर्व पुस्तकांचा अनुवाद रशियात प्रसिद्ध झाला. मी सर्व पुस्तके दोनदा वाचली. ह्या लेखकाच्या संपूर्ण थोरपणाचे, त्याच्या आश्चर्यकारक मुग्ध बनविणाऱ्या गुणाच्या शौर्यशाली दर्जाचे मला मनोमन कौतुक वाटले. त्याच्या योजनांची व्याप्ती, त्याच्या विचारामधील धाडस, त्याच्या शब्दांमधील सत्य आणि भविष्यकाळाबद्दलचे त्याचे बुद्धिमान अंदाज – ज्यातील अनेक एव्हाना खरे ठरले आहेत – ह्यांच्यामुळे तो जगामधील एक सर्वांत मोठा शिक्षक बनला आहे.

शेक्सपीयर, बाल्झाक आणि तल्स्तोय – माझ्या दृष्टीने ही तीन स्मारके मानवजातीने स्वतःसाठी उभारलेली आहेत. बाल्झाकविना माझे फ्रान्सबद्दलचे ज्ञान तोकडे ठरले असते. ह्या देशाने मानवजातीच्या अग्रभागी नेहमी वाटचाल केली व आजही तो तसाच अग्रभागी आहे, ह्या ना त्या क्षेत्रात सृजनशीलतेचे आणि जीवनाचे नवनवे प्रकार तो सतत निर्माण करीत आहे... फ्रान्सला त्याच्या बँकरांनी लाज आणली आहे. पण स्वातंत्र्याच्या मार्गावर रशियन जनतेला अडथळा आणून पाडणाऱ्या फ्रेंच सट्टाबाजाराच्या

असांस्कृतिक, अमानुष कारवायांचे फ्रान्सच्या खऱ्या सुपुत्रांच्या नांवांवर – ह्यूगो,[15] बाल्झाक, फ्लॉबेर[16] ह्यासारख्या तेजस्वी नांवांवर – कधीही सावट पडणार नाही हे मला ठाऊक आहे. फ्रान्स ही थोर कृत्यांची आणि थोर नांवांची भूमी आहे.

बाल्झाकला मी व्यक्तीशः कशाबद्दल देणे लागतो हे मला माहीत नाही, मला त्याचा हिशेब करता येत नाही. पण ल्येव तल्स्तोयनी म्हटल्या-नुसार, एकूण रशियन साहित्यावर त्याचा लक्षणीय परिणाम घडला होता हे निर्विवाद होते. एकदा मला तल्स्तोयनी विचारले:

"तुम्ही बहुशः कुणाची पुस्तकं वाचता?"

मी त्यांना उत्तर दिले.

"छान, छान," ते म्हणाले. "पण फ्रेंच लेखक जास्त वाचा. ज्याच्या-पासून प्रत्येकानं लेखनाचे धडे घेतले तो बाल्झाक वाचा. स्तेन्दाल,[17] फ्लॉबेर आणि मोपासाँ[18] वाचा. कसं लिहावं हे त्यांना माहीत आहे. लेखनप्रकाराच्या तंत्राचं त्यांना आश्चर्यकारक ज्ञान आहे आणि स्वतःच्या साहित्यावर केंद्रीभूत होण्याची त्यांच्यापाशी विलक्षण क्षमता आहे. फक्त डिकन्सला[19] आणि कदाचित थॅकरेला[20] त्यांच्या पंगतीला बसविता येईल. स्तेन्दालचं «La Chartveuse de Parme» ('पार्मचा रहिवासी') जर मी वाचलं नसतं तर 'युद्ध आणि शांतता' मधले युद्ध-प्रसंग मी लिहू शकलो नसतो."

ह्यावर मी माझे पत्र संपवितो.

बाल्झाक हा एक न संपणारा विषय आहे. माझ्या दृष्टीने तो फार फार मोठा आहे. शिवाय, माझ्या जीवनातील अत्यंत खडतर दिवस त्याच्या-विषयीच्या माझ्या स्मृतींशी गुंफले गेले आहेत आणि ते भावनिकदृष्टचा अस्थिर आहे.

मला सांगायचे आहे की, साहित्याने माझ्या आयुष्यात मातेची भूमिका बजावली. बाल्झाकला लोकांविषयी वाटणाऱ्या प्रेमामुळे, त्याच्या कादंबऱ्यां-मध्ये मला नेहमी भक्कमपणे आणि हर्षोत्फुल्लतेने जाणवलेल्या त्याच्या जीवन-विषयक अद्भुत ज्ञानामुळे, बाल्झाकची पुस्तके मला अत्यंत प्रिय वाटतात.

१९११

# ‘कामगारवर्गीय लेखकांच्या संग्रहा’ ला प्रस्तावना[21]

वाचकाला पुस्तक समजणे सोपे जावे म्हणून सर्वसाधारणपणे प्रस्तावना लिहिल्या जातात. कॉम्रेडहो, ह्या हेतूने मी प्रस्तावना लिहिण्याची गरज नाही; कारण माझ्याप्रमाणेच ह्या संग्रहाचा अंतर्गत मतितार्थ तुम्हाला स्पष्टपणे समजेल अशी माझी खात्री पटलेली आहे. एक व्यावसायिक लेखक ह्या नात्याने, ह्या संग्रहामधील गद्य-पद्यामधील तांत्रिक व साहित्यिक उणीवांची अधिक तीव्रतेने मला जाणीव होणे शक्य आहे; पण मला असे भासते की; ह्या छोटचा पुस्तकाच्या प्रकाशनामागील अर्थाची तुम्हाला अधिक तीव्र जाणीव असणार.

तुमच्या साथींनी हे पुस्तक लिहिले आहे आणि आपल्या कठीण काळात ही एक नवी व अत्यंत महत्त्वाची घटना आहे; कारण कामगारवर्गाच्या बौद्धिक शक्तींमध्ये वाढ झाल्याची ती बोलकी साक्ष देते. अर्थात तुम्हाला उत्तमरीत्या समजेल की, एखाद्या व्यावसायिक लेखकाला १२० ००० शब्दांची कादंबरी लिहायला जेवढे अवघड जाईल, त्यापेक्षा स्वयंशिक्षित लेखकाला एक छोटी लघुकथा लिहिणे अमाप अधिक अवघड आहे. “पण...” ह्या शब्दचित्राचा लेखक ह्या अडचणींना एवढ्या कडवट उपहासाने सुचवत आहे.

अर्थात तुम्हाला हेही माहीत आहे की, कामगारवर्गीय लेखकाला फुरसतीच्या वेळाचा अभाव असतो. शिवाय, स्वतःच्या अनुभवांना ठळकपणे आणि अचूकपणे वर्णन करण्यात त्याला अडचणी येतात. दुसऱ्या शब्दांमध्ये सांगायचे तर कलात्मकरीत्या वर्णन करणे त्याला अवघड जाते, कारण लेखकाचे हत्यार मानले जाणाऱ्या लेखणीचा तो कसबाने वापर करू शकत नाही. तांत्रिक अज्ञानापायी त्याला अडचणी येतात. पण सर्वांत मोठी अडचण म्हणजे त्याचे अपुरे शब्दभांडार आणि इतर डझनभर शब्दांमधून अत्यंत साधे, सामर्थ्यवान व सर्वांत सुंदर शब्द निवडून काढण्याची त्याची असमर्थता.

पण एवढ्या सगळ्या अडचणी असूनही, मुद्दा फार न लांबविता, मला असे म्हणावेसे वाटते की, तरीही हा संग्रह स्वारस्यपूर्ण आहे, त्याच्याबद्दल खुषी व्यक्त करण्यास तुम्हाला आधार आहे आणि रशियन कामगारवर्गाने स्वतःचे साहित्य निर्माण करण्याचा दिशेने टाकलेले एक पुढचे पाऊल, म्हणून भावी काळात केव्हातरी ह्या छोट्या पुस्तकाचा निर्देश करता येईल.

"भलतंच!" शंकाखोर मंडळी कदाचित मला म्हणतील, "असं साहित्य कधीही कुठंही अस्तित्वात नव्हतं."

पूर्वी कधीही अस्तित्वात नव्हत्या अशा अनेक गोष्टी आता अस्तित्वात आहेत. तसे म्हटले तर आजच्या काळात ज्या प्रकारात आणि मानसिक घडणीत कामगारवर्ग अस्तित्वात आहे, तसा तो भूतकाळात नव्हता. आणि माणसाला जर स्वतःच्या निर्धाराच्या व बुद्धिमत्तेच्या सामर्थ्याबाबत श्रद्धा वाटली नसती, तर आज पक्ष्यांप्रमाणे माणसांनी हवेत संचार केला नसता.

सुंदर प्रकारात संवेदना, भावना आणि विचार व्यक्त करण्याची इच्छा सर्व पुरुषांना असते. कामगारवर्गाच्या आत्म्यामध्ये ही इच्छा त्याच्या बौद्धिक शक्तींच्या वाढीच्या प्रमाणात अधिकाधिक तीव्र रीतीने विकसित होत जाणार आहे. स्वतःचे सामुदायिक नाट्य आणि स्वतःच्या वैयक्तिक घटकांचे नाट्य अधिक मोठ्या प्रमाणात आणि अधिक पीडादायी स्पष्टतेने कामगारवर्ग पाहणार आहे, अनुभवणार आहे.

आत्मा जेव्हा दुथडी भरून वाहू लागतो तेव्हा स्वतःची सुख-दुःखे तो अपरिहार्यपणे जगासमोर उघडी करतो, लोकांच्या कानांमध्ये ओततो.

माझी ठाम खात्री पटली आहे की, कामगारवर्गाने ज्या रीतीने स्वतःची दैनंदिन वर्तमानपत्रे निर्माण केली, त्याच रीतीने तो स्वतःचे साहित्य निर्माण करील. म्हणजे महाप्रचंड प्रयत्न करून आणि अफाट त्यागांची किंमत देऊन.

कारखान्यांमधील शेकडो कामगारांनी, कारागीरांनी व शेतकऱ्यांनी स्वतःचे जीवनविषयक विचार; स्वतःचे अनुभव आणि स्वतःच्या भावना कागदावर व्यक्त करण्यासाठी अत्यंत चिकाटीने केलेल्या प्रयत्नांचे प्रदीर्घ काळ मी निरीक्षण केल्याच्या परिणामी हे मत निर्माण झाले आहे.

रशियामध्ये जेवढे स्वयंशिक्षित लेखक आहेत तेवढे युरोपातील इतर कोणत्याही देशात नाहीत आणि १९०६ पासून त्यांची संख्या अमाप वाढली आहे, ही नाकारता न येणारी वस्तुस्थिती आपल्यासमोर उभी आहे.

ह्या घटनेची कारणे शोधून काढण्याचे प्रस्तुत स्थळ नव्हे. पण रशियन

जनतेच्या आणि रशियन कामगारवर्गाच्या ऐतिहासिक व राजकीय युवकांचा तिच्याशी बराच संबंध आहे. तरुण नेहमीच अधिक संवेदनक्षमतेने अनुभव घेतात आणि सामाजिक आदर्शांना अधिक प्रतिसाद देतात. नवजात राष्ट्राच्या आणि नवजात वर्गाच्या सामाजिक आदर्शवादाचा आधार असते, सामाजिक फेरउभारणीच्या व्यावहारिक प्रयोगांमध्ये त्यांनी अद्याप खर्च न केलेल्या त्यांच्या सामर्थ्याबाबतची त्यांची स्वतःची भावना. मला वाटते की, शेकडो व्यक्तींना जनसमूहांशी – ज्यातून त्या स्वतः निर्माण झाल्या – आत्मिक दळणवळण साधण्याची प्रेरणा देणारी शक्ती म्हणजे हा आदर्शवाद. अथवा दुसऱ्या शब्दांमध्ये सांगायचे तर साहित्यिक निर्मितीचे प्रयत्न करण्याची प्रेरणा हा आदर्शवाद देतो.

ह्या शक्तीचे अस्तित्व आश्चर्यकारक मर्यादेपर्यंत आहे. अगदी अलिकडे पराभूत झालेल्या, उच्छेदन झालेल्या आणि बुद्धिजीवींनी त्याग केलेल्या आपल्या कामगारवर्गाला ह्या शक्तीने किती चटकन वर उठविले व एकत्र सांधले, हे आपण पहात आहोत. बुद्धिजीवींपैकी काही कारागृहांमध्ये व हद्दपारीत समूळ नाश पावले, तर इतरांनी कामगारवर्गाच्या हितसंबंधांचा विश्वासघात केला, भांडवलदारवर्गाची चाकरी पत्करली. भांडवलदारवर्गाच्या लोकशाहीविषयक दृष्टिकोनाचे समर्थन करील अशी विचारप्रणाली निर्माण करण्याचे अयशस्वी प्रयत्न करण्यात ते सध्या गुंतले आहेत.

कामगारवर्गाच्या क्रियाशील शक्तींची संख्या वाढते आहे आणि त्याचवेळी त्यांची सांस्कृतिक पातळी सतत उंचावत आहे. आम्ही एव्हाना म्हणू शकतो की, रशियन कामगारांची जीवनपरिस्थिती भयानक असूनही ते प्रत्यक्षात स्वतःचा बुद्धिजीवीवर्ग निर्माण करीत आहेत; स्वतःची काही शारीरिक ताकद बाजूला काढून ठेवीत आहेत आणि तिचे मानसिक, बौद्धिक ताकदीमध्ये रूपांतर घडवीत आहेत. लेखन आणि साहित्य यांच्याविषयीच्या कामगारवर्गामधील सतत वाढत्या इच्छेचे मूळ हे असे आहे. ज्यांनी लेखनाची थोडीफार क्षमता दाखविली आहे आणि साहित्यिक कार्यासाठी अत्यावश्यक असलेले ज्ञान प्राप्त करण्याचा जे प्रयत्न करीत आहेत; अशा कॉम्रेडना कामकरी समूहांनी शक्य त्या सर्व तऱ्हांनी पाठिंबा द्यावा असे मला वाटते.

लेखकाला प्रत्येक गोष्ट माहीत असावी; अथवा निदान जास्तीत जास्त माहीत असावी. अनुभवांच्या गोंधळामधून, भावनांच्या अवघड गुंतावळ्यामधून, सार्वत्रिक महत्त्वाच्या व वैशिष्ट्यपूर्ण गोष्टी निवडून काढण्यास तो

समर्थ असला पाहिजे. सतत प्रवाहात असलेल्या संकुचित, वैयक्तिक, आत्मनिष्ठ, कायम नसलेल्या व काहीही खूण मागे न ठेवता लौकरच नाहीशा होणाऱ्या गोष्टी झटकून टाकण्यास तो समर्थ असला पाहिजे. जर तो पहिली गोष्ट साध्य करू शकला, तर त्याचे लेखन कलात्मक आणि सामाजिकदृष्टचा महत्त्वाचे होईल; पण जर तो दुसरी गोष्ट साध्य करू शकला नाही, तर सर्व सामाजिक आणि शैक्षणिक आशयविरहीत अशा चुटक्यांचे लेखन तो करील. लोकांमध्ये विशिष्ट भावना जाग्या करणे, जीवनातील विशिष्ट परिस्थितींबद्दल त्यांच्यात विशिष्ट दृष्टिकोन जाणीवपूर्वक अथवा नकळत निर्माण करणे, हा सर्व कलांचा हेतू असतो. "कलेसाठी कला" असा तथाकथित मुक्त दृष्टिकोन धारण करणारेही, त्यांचा हाच हेतू असल्याचे सांगतात. मात्र सामाजिक प्रवृत्तींविषयीचा त्यांचा दृष्टिकोन नकारात्मक आणि विरोधीही असतो.

लेखकाचे काम अत्यंत अवघड आहे. लोकांबद्दल गोष्टी लिहिणे म्हणजे केवळ "लांबलचक गुऱ्हाळ लावणे" नव्हे; पेन्सिलीने लोकांना रेखाटतात अथवा कुंचल्याने रंगवतात, त्याप्रमाणे शब्दांनी त्यांचे चित्रण करायचे असते. असे करण्यासाठी स्वतःच्या विषयाच्या आवश्यक लकबी शोधून काढाव्या लागतात, त्याच्या कृतींचे अत्यंत खोल अर्थ समजून घ्यावे लागतात आणि ह्या सगळयाचे एवढचा ठळक व अचूक शब्दांमध्ये वर्णन करावे लागते, की पुस्तकाच्या पानांवर, त्यावरील काळया ठशामागे, शब्दांच्या जाळयामागे, वाचकाला माणसाचा जिवंत चेहरा दिसतो, त्याच्या कृती आणि भावना यांच्यामधील संबंध आपोआप सिद्ध होतो. आपण जे काही वाचले तसेच सर्व घडले आणि दुसऱ्या तऱ्हेने घडणे शक्यच नव्हते, असे वाचकाला जाणवणे आवश्यक असते.

लेखक आणि वाचक ह्यांच्यात जेथे पूर्ण विश्वास प्रस्थापित होतो, तेथे खऱ्या कलेचा उदय होतो. माणसे ज्याला आत्मा म्हणतात त्या अनुभूतींच्या पात्राला भरणाऱ्या सर्व गोष्टी जगात ओतणे लेखकाचे काम आहे. आपल्या जीवनातील आनंदांबद्दल आणि दुःखांबद्दल, वाईट अथवा चांगल्या, चमत्कारिक अथवा नीच गोष्टींबद्दल जर लेखक बोलला, जणू आपल्या सर्वोत्तम मित्रापाशी "आपले मन" मोकळे करावे तसे जर बोलला, तर वाचक त्याला समजून घेईल आणि मित्र म्हणून त्याचा स्वीकार करील.

मी आत्ता जे काही सांगितले त्यावरून साहित्यिक कार्यामधील

अडचणींची पुरेशी कल्पना मिळते आणि लेखकाला कितपत माहीत पाहिजे व त्याने कितपत विचार केला पाहिजे ह्याची पुरेशी ठाम सूचना मिळते, असे मला वाटते.

माझे हे सर्व युक्तिवाद अनावश्यक आहेत, कारण कामगारवर्गीय लेखकाला त्याच्या जीवन परिस्थितीमुळे ते लागू पडत नाहीत, असे कदाचित तुम्हाला वाटणे शक्य आहे.

पण मी त्याच्याशी सहमत नाही. एकमेकांपासून आपण जेवढ्या जास्त अपेक्षा करू, आपल्याला दडपून टाकणाऱ्या दैनंदिन गोष्टींपासून तेवढ्या जास्त प्रमाणात आपण वर चढू. आपल्यामधील आणि आपल्याबाहेरील जीवनपरिस्थितीचे निरीक्षण करण्याची आपली दृष्टी अधिक विशाल बनेल.

तर मग लोकांच्या वतीने जगापुढे बोलण्याचा प्रयत्न करणाऱ्या व्यक्तींना जनसमूह प्रत्यक्ष मदत कसे करू शकतात?

प्रत्येक माणसाला अवधानाची गरज असते, सर्व लोकांना त्यांच्या कामाबद्दल आदरपात्र होण्याचा हक्क आहे, हे येथे नमूद करण्याची माझी इच्छा नाही. न सांगताच हे समजण्यासारखे आहे आणि जीवनातील सर्व मूल्यांना निर्माण करणाऱ्या अथवा त्यांना निर्माण करण्यात मदत करणाऱ्या, सुसंस्कृत समाज ज्यांच्यात अभिमान बाळगतो अशा सर्व गोष्टी निर्माण करणाऱ्या, कष्टकऱ्यांना विशेषरीत्या हे समजते. स्वशिक्षित लेखकांसाठी एक नियतकालिक प्रकाशित करणे उचित ठरेल असे मला वाटते. कामगार-वर्गीय लेखकांमध्ये ज्याचा अभाव आहे आणि ज्याची त्यांना खूप गरज आहे अशा लेखनतंत्राचा त्या नियतकालिकाने प्रामुख्याने परामर्श घ्यावा. असे नियतकालिक शैलीबद्दल, भाषेबद्दल, लघुकथांच्या, कादंबऱ्यांच्या, नाटकां-च्या रचनेबद्दल, काव्यरचनेच्या नियमांबद्दल, वगैरे विषयांवर सर्वसामान्य लेख प्रकाशित करू शकेल.

स्वशिक्षित लेखकांच्या पुस्तकांवरील नमुनेदार परीक्षणेही ह्या नियतकालिकात छापण्यात यावीत. तंत्र आणि आशय अशा दोन्ही बाबतीत अत्यंत तपशीलवार आढावा त्या परीक्षणांमध्ये घेण्यात यावा. स्वतःच्या मनांना व्यापणाऱ्या गोष्टी स्पष्टपणे आणि खात्रीशीरपणे निवेदन करणे अद्याप ज्यांना जमलेले नाही ज्या गोष्टी आपल्याला माहीत झाल्या पाहिजेत — अशा अत्यंत गुणी, अनुभवी व निरीक्षक भावी लेखकांना भरपूर ज्ञान देणारे असे हे नियतकालिक म्हणजे एक विद्यालय होईल.

साहित्यिक तंत्राच्या केवळ अज्ञानापायी आलेल्या असमर्थतेवर मात करणे सोपे आहे.

कॉम्रेडहो! आठ वर्षांच्या प्रतिगामित्वाच्या काळात जे काही आपण सोसले आणि अनुभवले, ते सर्व काही जगातील कामगारवर्गापुढे इतिहास जेव्हा जाहीररीत्या सांगेल, तेव्हा तुमच्या जोमदारपणाचे, तुमच्या मनाच्या कणखरपणाचे आणि तुमच्या शूर धैर्याचे कामगारवर्गाला अपरिमित आश्चर्य वाटेल.

तुम्ही केवढे कार्य पार पाडले आहे ह्याची कदाचित तुमची तुम्हाला जाणीव झालेली नाही; पण नव्या जागतिक संस्कृतीसाठीच्या संघर्षातील तुमच्या उदाहरणापासून, रशियन कामगारांच्या भावी पिढ्या आणि आपल्या पृथ्वीवरील सर्व कामगारवर्गीय निःसंशयरीत्या नवे सामर्थ्य प्राप्त करतील.

असे घडेल यात काहीही संदेह नाही. ह्या आठ वर्षांमध्ये तुम्ही साध्य केलेल्या कार्याचे सार्वत्रिक सांस्कृतिक महत्त्व जाणून घेण्यात फक्त मृतांनाच अपयश येईल.

संग्रहामध्ये समाविष्ट केलेला एक कवी उद्‌गारतो:

"जागतिक संस्कृतीकडे कूच करा!"

कॉम्रेडहो, तुमचा प्रवास सुखाचा होवो!

जगाला सामावून घेणारी संस्कृती निर्माण करणाऱ्या इच्छाशक्ती आणि बुद्धी चिरायू होवोत!

१९१४

# रशियन कला [22]

**( संक्षिप्त )**

केवळ कलेच्या क्षेत्रात, हृदयाच्या निर्मितीच्या क्षेत्रात, रशियन लोकांची विलक्षण आश्चर्यकारक शक्ती आहे असे दिसते. अत्यंत भयानक परिस्थितीं-मध्ये त्यांनी सुंदर साहित्य निर्माण केले, अद्भुत चित्रे बनविली, अभिजात संगीत रचून सबंध जगाला मुग्ध केले. लोकांची तोंडे बंद केलेली होती, त्यांच्या आत्म्याचे पंख बांधून ठेवलेले होते, पण त्यांच्या हृदयामधून शब्दांचे, ध्वनींचे आणि रंगांचे अनेकानेक थोर कलावंत जन्मले.

महाप्रचंड पूष्कीन;[23] आमचा सर्वांत मोठा अभिमान आणि रशियन मनाचा पूर्ण आविष्कार; त्याच्या शेजारी जादूगार ग्लीन्का[24] आणि अतिसुंदर ब्रूल्लोव;[25] स्वतःशी आणि इतरांशी कठोर वागणारा गोगोल[26], खिन्नवदन लेर्मोन्तोव,[27] दुःखी तुर्गेनेव,[28] कोपिष्ट नेक्रासोव, महाबंडखोर तल्स्तोय आणि आमची ठसठसणारी सदसद्विवेकबुद्धी दस्तोयेवस्की; क्रामस्कोय,[29] रेपिन,[30] अतुलनीय मूसोर्गस्की,[31] "विधायक स्वरूपाचा" रशियन माणूस निर्माण करण्यासाठी संपूर्ण आयुष्य आणि ताकद वेचणारा लेस्कोव[32] आणि सरतेशेवटी थोर गानयोग्य चैकोवस्की[33] व भाषेचा जादूगार अस्त्रोवस्की[34] – हे सर्व एकमेकांपासून कमालीचे भिन्न आहेत, पण आम-च्याकडे, रशियातच केवळ असे घडू शकते की, जणू काय भिन्न शतकांचे भिन्न स्वभावांचे लोक एकाच वेळी, एकाच पिढीत भेटू शकतात.

हे सर्व प्रचंड कार्य अवघ्या एका शतकाच्या अवधीच्या आत रशियात करण्यात आले. १९ व्या शतकात रशियात जन्मलेल्या गुणी कलावंतांची विपुलता आम्हाला विलक्षण अभिमान देते असे नव्हे, तर त्यांची आश्चर्य-कारक विविधताही – तिच्याकडे आमचे कलेचे इतिहासकार दुर्लक्ष करतात – आम्हाला अत्यंत अभिमानास्पद वाटते.

रशियन आत्म्याच्या ज्वलंततेमधील अफाट सुंदर विभिन्नतेचा गर्व बाळगण्याचा आम्हाला अधिकार आहे. आमच्या देशाच्या आत्मिक सामर्थ्या-मधील आमचा विश्वास ती बळकट करो!

अव्यक्त अशा अवघड परिस्थितीत उद्भवलेल्या ह्या आश्चर्यकारक सृजनशील कार्याने अतर्क्य झपाटयाने आकार घेतला.

जरा कल्पना करा: जर पूष्कीन आणि लेर्मोन्तोव ठार मारले गेले नसते, तर ते चेखोवपर्यंत जगले असते – जे नुकतेच आपल्याला सोडून गेले – आपल्याबरोबर अजून दीर्घकाळपर्यंत राहणाऱ्या सुरेख कोरोलेन्कोपर्यंत[35] जगले असते! आम्ही तर्कशुद्ध जगू शकत नाही, आम्ही वाईट रीतीने काम करतो, असे आमच्याबद्दल कुणी म्हणू शकेल. पण हृदयाच्या प्रेरणेने जगण्यात आम्ही यशस्वी आहोत. रशियन कला सर्वप्रथम हृदयाची कला आहे. माणसाबद्दलचे रोमांचक प्रेम तिच्यात सतत तेवत राहिले. आमच्या सर्व लहान-थोर कलावंतांची सृजनशीलता – साहित्यातील "नरोदनिक",[36] चित्रकलेतील "पेरेद्विझनिक",[37] संगीतातील "कूचकिस्त"[38] – ह्या प्रेमाच्या ज्योतीतून स्फुरली आहे.

सामाजिक रोमांचवादाच्या ह्या शक्तीमुळे आम्ही जिवंत आहोत आणि मेलो नाही, हिंसेखाली चिरडलो नाही, राजसत्तेच्या दडपणाखाली सडलो नाही.

१९१७

# ल्येव तल्स्तोय[39]

मी ओलीझ *येथे रहात होतो तेव्हा यदृच्छेने लिहिलेल्या टिपणांमधून प्रस्तुत पुस्तक तयार केलेले आहे. ल्येव तल्स्तोय तेव्हा गास्प्रा ** मध्ये रहात होते. आरंभी ते गंभीर आजारी होते व नंतर आजारामधून बरे होत होते. सर्व प्रकारच्या कागदाच्या कपटयांवर निष्काळजीपणे खरडलेली ही टिपणे हरवली असे मला वाटले होते. पण अलिकडे त्यातील काही टिपणे गवसली. यास्नाया पल्याना येथून तल्स्तोय यांचे "प्रयाण" घडले व त्यांचा मृत्यू घडला, अशा समजुतीनुसार मी लिहिलेले एक अपुरे पत्रही येथे समाविष्ट केले आहे. पत्र जसे लिहिले होते तसेच मी देत आहे; एकही शब्द न वगळता. आणि मी ते पूर्ण केले नाही, कारण मला ते शक्य झाले नाही.

## टिपणे

### १

इतर कोणत्याही विचारापेक्षा वारंवार त्यांच्या मनाची शांती ढळविणारा विचार म्हणजे देवाबद्दलचा विचार. काहीवेळा हा नुसता विचार भासत नाही, तर त्यांच्यावर वर्चस्व गाजविणाऱ्या कशालातरी ते तीव्र विरोध करताहेत असे वाटते. त्यांना त्याबद्दल जेवढे बोलावेसे वाटते तेवढे ते बोलत नाहीत; पण त्याविषयी सतत विचार मात्र करीत राहतात. हे वय झाल्याचे चिन्ह आहे, अथवा त्यांना मरणाची चाहूल लागली आहे म्हणून घडते असे मला वाटत नाही. सुरेख मानवी अभिमानापायी असे बहुधा घडत असावे. किंचित दुखावल्याची संवेदनाही कदाचित असावी – खुद्द ल्येव तल्स्तोयलाही कसल्यातरी रोगजंतूंच्या आधीन होण्याची लज्जास्पद परिस्थिती निर्माण झाल्याबद्दल. जर ते जीवशास्त्रज्ञ असते, तर निःसंशयरीत्या त्यांनी तेजस्वी सिद्धांत निर्माण केले असते, मोठे शोध लावले असते.

---

* ** क्रिमियामधील स्थळे.

२

त्यांचे हात अलौकिक आहेत – कुरूप, सुजलेल्या शिरांमुळे बेढब बनलेले आणि तरीही विलक्षण बोलके. सृजनशील शक्तीने पूर्ण रसरसलेले. कदाचित लेनार्दो दा विंची[40] यांचे हात तसे होते. अशा हातांनी काहीही करणे शक्य आहे. काहीवेळा बोलत असताना ते हाताच्या बोटांची हालचाल करतात. बोटांना हळूहळू वाकवत नेतात आणि एखादा सुरेख भारदस्त शब्द उच्चारताना एकदम बोटे सरळ ताठ करतात. ते देवासारखे आहेत, पण यहुद्यांच्या अथवा ग्रीकांच्या सवाओफ देवासारखे नव्हेत – एखाद्या रशियन देवासारखे आहेत. "सोनेरी लिंबोणीच्या झाडाखाली मेपल लाकडाच्या सिंहासनावर बसलेल्या!" आणि जरी ते फारसे भव्य दिसत नसले तरी इतर सर्व देवांपेक्षा अधिक कावेबाज आहेत.

३

सूलेरझित्स्कीबद्दल त्यांना जिव्हाळा वाटतो. चेखोव यांच्याबद्दल त्यांना पितृसुलभ वात्सल्य वाटते. निर्मात्याचा अभिमान ह्या प्रेमात जाणवू शकेल, पण सूलेरबद्दलची त्यांची भावना जिव्हाळ्याची आहे, अखंड स्वारस्याची आहे; आणि त्याचे कौतुक करण्याचा ह्या अलौकिक बुद्धिमंताला कधीही कंटाळा येत नाही. ह्या भावनेत काहीतरी विचित्र भासण्याचाही संभव आहे. एखाद्या म्हातारीला तिच्या पोपटाबद्दल, कुत्र्याबद्दल अथवा मांजरीबद्दल वाटते तशा प्रेमाची भावना. सूलेर हा परक्या, अज्ञात भूमीमधून आलेल्या एखाद्या चमत्कारिक स्वैर पक्ष्यासारखा आहे. त्याच्यासारखे शंभर लोक एखाद्या प्रांतिक शहराचा चेहरा आणि आत्मा पूर्णतया बदलून टाकू शकतील. त्याच्या चेहऱ्याच्या ते ठिकऱ्या ठिकऱ्या उडवतील; त्याच्या आत्म्याला ते अस्वस्थ, बंडखोर प्रतिभावंताच्या आवेगाने भारून टाकतील. सूलेरवर प्रेम करणे सोपे आणि आनंददायी आहे. पण बायका त्यांच्याकडे दुर्लक्ष करतात असे जेव्हा मी पाहतो तेव्हा मला आश्चर्य वाटते आणि राग येतो. पण कदाचित ह्या दुर्लक्षामागे चातुर्याने लपविलेली सावधगिरी असावी. सूलेरवर भरवसा ठेवणे अशक्य. उद्या तो कोणता उपद्व्याप करून ठेवील?

कदाचित बॉंब फेकील, किंवा दारूच्या गुत्त्यात गाणाऱ्या माणसांमध्ये सामील होईल. तीन युगे पुरेल एवढी शक्ती त्याच्यापाशी आहे. त्याच्यात जीवनाची आग एवढी प्रचंड धगधगतेय, की तापलेल्या लालबुंद लोखंडामधून उडणाऱ्या ठिणग्यांप्रमाणे त्याच्या घामातून ठिणग्या उडतात असे भासते.

पण एकदा ते सूलेरवर फार चिडले होते. लिओपोल्डचा ( सूलेरझित्स्की – अनु.) नेहमी अराजकाकडे कल होता. व्यक्तीस्वातंत्र्याबाबत गरमागरम वाद घालण्याची त्याला हौस होती आणि तो असा वाद घालायचा तेव्हा तल्स्तोय नेहमी त्याची थट्टा करायचे.

मला आठवते की एकदा सूलेरझित्स्कीच्या हाती प्रिन्स क्रोपोत्कीन[41] यांची एक छोटी पुस्तिका लागली होती. त्या पुस्तिकेमुळे त्याला उत्साह चढला होता व सबंध दिवस अराजकाच्या विचारप्रणालीचे त्याने सर्वांसमोर जोरजोराने समर्थन चालविले होते.

"ल्योवूष्का, बस्स कर; मला कंटाळा आला त्याचा!" तल्स्तोय चिडून म्हणाले. "एखाद्या पोपटासारखा एकच शब्द पुन्हा पुन्हा बोलतो आहेस – स्वातंत्र्य, स्वातंत्र्य! पण खरा त्याचा अर्थ काय? जर तुझ्या अर्थानं तुला स्वातंत्र्य मिळालं तर निष्पत्ती कोणती घडेल? तत्त्वज्ञानदृष्टया – अथांग पोकळी, तर प्रत्यक्ष व्यवहारात, जीवनात, तू आळशी बनशील, भिकारी बनशील. तुझ्या संकल्पनेनुसार तू स्वतंत्र बनलास तर जीवनात तुला धरून काय ठेवणार? माणसांशी तुला कोणता धागा बांधून धरणार? हे बघ – पक्षी स्वतंत्र आहेत, पण ते घरटी बांधतात. तू घरटं बांधणार नाहीस. एक क्षणभर गंभीरपणं विचार कर आणि तुला असं आढळून येईल, तुला असं जाणवेल, की स्वातंत्र्य ह्या शब्दाचा अंतिम अर्थ म्हणजे पोकळी, रितेपणा, केवळ आकारहीन मोकळी जागा."

रागाने भुवया आकुंचित करून ते क्षणभर थांबले आणि पुढे सौम्य आवाजात म्हणाले:

"ख्रिस्त स्वतंत्र होता आणि बुद्धही स्वतंत्र होता. त्या दोघांनी जगाच्या पापांचा भार स्वतःच्या शिरांवर घेतला, ऐहिक जीवनाच्या कारावासात ते स्वेच्छेने दाखल झाले. आणि त्यापलिकडे आजवर कुणीही गेलेला नाही – कुणीही! तू आणि मी – काय केलंय आपण? आपल्या शेजारधर्मातून मुक्तता मिळवण्याचा आपण सगळे प्रयत्न करतो, पण वस्तुतः ह्या

कर्तव्यभावनेनंच आपल्याला मानवी प्राणी बनविलेलं आहे आणि ही कर्तव्य-भावना नसती तर आपण जनावरांसारखेच राहिलो असतो..."

ते गालातल्या गालात हसले.

"आणि तरीही उदात्त जीवन कसं जगायचं ह्यावर आत्ता आपण वाद घालतोय. ह्यातून फारसं काही निष्पन्न होत नाही, पण त्याचवेळी काहीच मिळत नाही असं नाही. पहा! चेहरा काळानिळा पडेपर्यंत तू माझ्याशी वाद घालतोस, पण तू मला मारत नाहीस, साधी शिवीसुद्धा तू मला हासडत नाहीस. तू जर खरंच स्वतःला स्वतंत्र समजला असतास, तर तू माझी कत्तल केली असतीस – बस्स!"

आणखी थोडे थांबून ते पुढे म्हणाले:

"स्वातंत्र्य – त्याचा अर्थ सर्वकाही आणि प्रत्येकजण माझ्याशी सहमत, पण मग इतःपर मी अस्तित्वात राहणार नाही, कारण संघर्ष आणि विरोध घडतो, तेव्हाच आपल्याला स्वतःची जाणीव घडत असते."

४

"अल्पसंख्यांना देवाची गरज आहे कारण त्यांच्यापाशी सर्व काही आहे, तर बहुसंख्यांपाशी काहीच नाही म्हणून त्यांना देवाची गरज आहे."

किंवा मी असे म्हणेन: बहुसंख्य देवावर भित्रेपणापायी विश्वास ठेवतात आणि केवळ अगदी थोडे आत्म्याच्या परिप्लुततेपायी* देवावर विश्वास ठेवतात.

"हान्स अँडरसनच्या[12] परीकथा तुम्हाला आवडतात?" त्यांनी विचारमग्न होत विचारले. "मार्को वोवचोकच्या[13] अनुवादात त्या प्रसिद्ध झाल्या तेव्हा मला समजल्या नव्हत्या. पण दहा वर्षांनंतर मी ते पुस्तक परत वाचलं आणि अचानक मला स्पष्ट जाणीव झाली की हान्स अँडरसन फार एकाकी माणूस होता. फार फार एकाकी. त्याच्या जीवनाबद्दल मला काहीही माहिती नाही. मला वाटतं, तो पक्का फंदी आणि भटक्या होता.

---

*गैरअर्थ टाळण्यासाठी मी असे नमूद करीन की, धार्मिक लेखनाला मी शुद्ध साहित्य मानतो; बुद्ध, ख्रिस्त, महंमद यांची आयुष्ये केवळ काल्पनिक कादंबऱ्या आहेत. – लेखकाची टीप.

पण त्यावरून माझा ग्रह अधिकच बळकट होतो की तो एकाकी माणूस होता. म्हणून तो मुलांकडे वळला. त्याची समजूत झाली (पण ती चुकीची होती) की मोठ्या माणसांपेक्षा मुलांना इतरांबद्दल अधिक दया वाटते. मुलांना कुणाचीही दया येत नाही, दया म्हणजे काय हेच त्यांना माहीत नसतं."

५

काथेखीजीज* वाचण्याचा त्यांनी मला सल्ला दिला. ख्रिस्त आणि बुद्ध यांच्याबद्दल बोलताना ते नेहमी काहीसे भावविवश होतात. त्यांच्या शब्दात ना उत्साह असतो, ना आवेश. अंत:करणामधून एकही स्फुल्लिंग उडत नाही. मला वाटते, ख्रिस्ताला ते भाबडा समजतात, दयाविषय मानतात आणि जरी काही अंशी त्याच्याबद्दल त्यांना कौतुक वाटत असले, तरी प्रेम निश्चित वाटत नाही. आणि ख्रिस्त जर रशियन खेड्यात आला, तर मुली त्याला हसतील अशी भीती त्यांना वाटत असल्याचे भासते.

६

त्यांना पाहिले म्हणजे मला सबंध आयुष्यभर पृथ्वीवर भ्रमणाऱ्या यात्रेकरूंची आठवण येते. हाती काठी घेऊन ह्या मठापासून त्या मठापर्यंत, ह्या प्रार्थनामंदिरापासून त्या प्रार्थनामंदिरापर्यंत हजारो मैल अंतर तुडवीत जाणाऱ्या. घरादाराचा ठावठिकाणा नसलेल्या. प्रत्येकाशी आणि प्रत्येक गोष्टीशी परभाव बाळगणाऱ्या. हे जग त्यांच्यासाठी नसते – देवसुद्धा नसतो. सवयीपायी ते देवाची प्रार्थना करतात, पण मनोमनी देवाचा तिटकारा करीत असतात. जगावरून त्यांची पायपीट करीत पृथ्वीच्या टोकांना त्यांना परमेश्वर कशाला रेटत असतो? का? माणसे म्हणजे वाटेवर पडलेले खुंट, धोंडे आहेत असे ते मानतात. एखादा ह्या अडथळ्यांवर अडखळून पडतो आणि काहीवेळा स्वतःला इजा करून घेतो. त्यांच्याशिवाय खरे

---

* ख्रिस्ताची प्रश्नोत्तररूपी शिकवण.

म्हणजे चालू शकते, पण काहीवेळा स्वत:चे वेगळेपण दाखवून लोकांना चकित करण्यात आनंद असतो, त्यांच्याशी मतभेद असल्याचा दिमाख दाखविण्यात आनंद असतो.

७

"थोर फ्रेडरिकने[44] एक शहाणपणाची गोष्ट सांगितली होती: 'प्रत्येकानं आपला आत्मा à sa facon* राखावा' आणि त्यानेच असेही म्हटले होते: 'तुम्हाला हवा तसा विचार करा, पण आज्ञा पाळा.' मरताना त्याने कबूल केले: 'गुलामांवर सत्ता गाजवण्याचा मला कंटाळा आलाय.' तथाकथित थोर लोक नेहमी अत्यंत आत्मविसंगत असतात. त्यांच्या इतर दोषांबरोबर ह्या दोषालाही क्षमा करण्यात आलेली असते. पण सरतेशेवटी, स्वत:लाच विरोध करणे हा दोष नव्हे. मूर्ख हट्टी असतो, पण तो स्वत:ला कधीही विरोध करीत नाही. खरेच, फ्रेडरिक विचित्र माणूस होता — जर्मनांनी त्याला सर्वोत्तम सम्राट मानले, पण तरीही त्याला ते आवडत नव्हते. गोएथे[45] आणि वीलँडसुद्धा त्याला आवडत नव्हते..."

८

काल रात्री बालमोन्तच्या[46] कवितांविषयी बोलताना ते म्हणाले: "सौंदर्यवाद म्हणजे डोळ्यांमध्ये सत्य पाहण्याची भीती." सूलेर त्यांच्याशी सहमत झाला नाही. त्याने काही कविता अत्यंत भावुकपणे वाचून दाखविल्या. मनातील खळबळीमुळे त्याचे उच्चार निसटते येत होते.

"ल्योवूष्का, ही कविता नाही, ही ठकविद्या आहे, मूर्खपणा आहे, मध्य युगात म्हटल्याप्रमाणे केवळ निरर्थक शब्दच्छल आहे. कविता कलाहीन आहे. फेतनं[47] जेव्हा लिहिलं:

काय मी गाईन, माहीत नाही मला,

---

* आपापल्या परीने.

पण माझं गाणं माझ्यातून उमाळून येईल,

तेव्हा त्यानं लोकांची कवितेविषयीची खरी भावना व्यक्त केली होती. शेतगड्यालासुद्धा तो काय गातोय हे माहीत नसतं. तो नुसता गात असतो ओह्! आह्! आय-दा-मी! आणि पक्षी गातो तसं अस्सल गाणं थेट काळजातून बाहेर पडतं. तुमचे नवे कवी नुसते शोध लावत असतात."

९

त्यांच्या आजाराने त्यांना कोरडे बनवलेय, त्यांच्या अंतरंगातील काही-तरी जाळून टाकलेय. अंतर्मनाने ते अधिक तरल, अधिक पारदर्शी बनलेत; जीवनाशी अधिक जुळवून घेऊ लागलेत. त्यांचे डोळे अधिक चौकस बनलेत, त्यांची नजर अधिक भेदक बनलीय. अत्यंत सावधानचित्ताने ते ऐकतात आणि फार पूर्वीचे विसरलेले काहीतरी आठवण्याचा प्रयत्न करतात असे भासते. अथवा काहीतरी नवीन, आजवर अज्ञात अशा गोष्टीची ठाम विश्वासाने वाट पाहतात असे भासते. यास्नाया पल्याना येथे मला ते सर्वज्ञानी माणसासारखे दिसले. त्यांच्या सर्व प्रश्नांची उत्तरे त्यांना गवसल्या-सारखे दिसत होते.

१०

जर ते मासा असते तर महासागरच त्यांचे घर बनला असता. भूप्रदेशाने वेढलेल्या सागरांमध्ये ते कधीही पोहले नसते. मग नद्यांची गोष्ट तर दूरच. गोड्या पाण्यातील मासा वेगाने भोवती फिरतोय; ते काय म्हणतात याचे त्याला स्वारस्य नाही, त्याची त्याला गरज नाही आणि त्यांचे गप्प राहणे त्याला घाबरवीत नाही अथवा कोणत्याही रीतीने कसलाच परिणाम करीत नाही. एखाद्या अस्सल संन्याशाप्रमाणे भव्यपणे आणि समर्थपणे गप्प कसे रहायचे हे त्यांना माहीत आहे. त्यांना सतावणाऱ्या विषयांवर ते खूप बोलतात हे खरे, पण त्याहून बरेच काही ते बोलत नाहीत असे ऐकणाऱ्याला वाटते. अशा काही गोष्टी आहेत ज्या ते कुणा-पाशीही बोलू शकत नाहीत. कदाचित त्यांच्यापाशी असे काही विचार आहेत, ज्यांची त्यांना भीती वाटते.

## ११

ख्रिस्ताने बाप्तिस्मा दिलेल्या मुलाबाबतच्या कथेचा एक रंजक नमुना कुणीतरी त्यांच्याकडे पाठविला. सूलेर आणि चेखोवना त्यांनी ती कथा खूप उत्साहाने वाचून दाखविली. वाचन फार सुरेख केले! जमीनदारांना भुते ज्या पद्धतीने छळत होती तो भाग त्यांना विशेष मजेदार वाटला आणि त्यातील काहीतरी त्यांना आवडले नव्हते. अप्रामाणिक वागण्यास ते समर्थ आहेत; पण हा जर प्रामाणिकपणा असेल, तर आणखीच वाईट.

मग ते म्हणाले:

"पहा, शेतगडी किती छान गोष्टी सांगतात. सर्व काही सोपं, थोडक्या शब्दात आणि खूप भावना ओथंबून. खरं शहाणपण नेहमीच मितभाषी असतं – उदाहरणार्थ, 'देवा आमच्यावर दया कर.'"

पण ही क्रूर गोष्ट आहे.

## १२

माझ्याबाबतचे त्यांचे कुतूहल मानववंशशास्त्रीय आहे. त्यांच्या दृष्टीने मी म्हणजे त्यांना खूप कमी माहीत असलेल्या एका टोळीचा सदस्य आहे – याहून जास्त काही नाही.

## १३

'बैल' ही माझी कथा मी त्यांना वाचून दाखविली. ते चिक्कार हसले आणि "भाषेच्या करामती" मला अवगत असल्याबद्दल त्यांनी माझे कौतुक केले.

"पण शब्द कसे वापरायचे हे तुम्हाला माहीत नाही. तुमचे सगळे शेतगडी डौलदार भाषेत बोलतात. प्रत्यक्ष आयुष्यात शेतगडी मूर्खासारखे, वेडेबागडे बोलतात. त्यांना काय म्हणायचंय ते प्रथम तुम्हाला सांगता येत नाही. असं ते मुद्दाम वागतात. त्यांच्या बाह्यत: मूर्ख शब्दांमागं दुसऱ्या माणसाला म्होरकेपण देण्याची इच्छा नेहमी लपलेली असते. अस्सल शेतगडी

स्वतःच्या मनात काय आहे ते सरळ कधीच दाखवत नाही, तसं त्याला सोयीस्कर वाटत नाही. मूर्ख माणसाशी लोक साधेपणानं आणि आडपडदा न बाळगता वागतात हे त्याला माहीत असतं. आणि हेच त्याला हवं असतं. तुम्ही त्याच्यासमोर उघडे उभे राहता आणि तुमच्या सर्व दुबळ्या जागा तो तात्काळ हेरतो. तो अविश्वासू आहे आणि स्वतःचे गुप्त विचार बायको-पाशी बोलून दाखवायचीसुद्धा त्याला भीती वाटते. पण तुमच्या गोष्टींमध्ये सगळं काही सरळ आहे, प्रत्येक गोष्टीत अकलेच्या खंदकांचा जमावच आहे. आणि ते सूत्रांमध्ये बोलतात. तेही योग्य नाही. रशियन भाषेत सूत्रबद्धता अयोग्य वाटते."

"पण मग वाक्प्रचार, म्हणी यांचं काय?"

"ती बाब वेगळी. त्यांचा काही काल-परवा शोध लागलेला नाही."

"तुम्ही स्वतः अनेकदा सूत्रांमध्ये बोलता!"

"कधीही नाही. आणि मग तुम्ही प्रत्येक गोष्टीला सुशोभित करायचा प्रयत्न करता – माणसांना आणि निसर्गाला, विशेषतः माणसांना. लेस्कोवनं असंच केलं. कुणाच्याही आधीन होऊ नका, कुणाची भीती बाळगू नका – मग तुम्ही ठीक रहाल..."

## १४

त्यांनी मला वाचायला दिलेल्या रोजनिशीमधील एक विचित्र वचन पाहून मी चकित झालो: "देव ही माझी इच्छा आहे."

आज मी रोजनिशी त्यांना परत दिली तेव्हा त्या वचनाचा अर्थ मी विचारला.

"एक अपुरा विचार," पानाकडे डोळे किलकिले करून पहात ते म्हणाले. "मला म्हणायची इच्छा असावी – देव काय आहे हे जाणून घेण्याची माझी इच्छा आहे... नाही, तसं नाही..." ते हसले, वहीची त्यांनी गुंडाळी केली व झग्याच्या रुंद खिशात कोंबली. देवाबरोबरचे त्यांचे संबंध अनिश्चित आहेत. काहीवेळा मला ते "एका गुंफेतील दोन अस्वलांची" आठवण करून देतात.

१५

विज्ञानाविषयी.

"विज्ञान म्हणजे लुच्चा किमयागारानं बनवलेली सोन्याची लड आहे. तुम्हाला जर अधिक सोपं करायचं असलं, प्रत्येकाला समजेल अशा रीतीनं सांगायचं असलं – तर दुसऱ्या शब्दांमध्ये, हवा तेवढा खोटा पैसा विज्ञान निर्माण करतं. माणसांना जेव्हा ह्या पैशाचं खरं मूल्य ठाऊक होईल तेव्हा त्याबद्दल ती तुमचे आभार मानणार नाहीत."

१६

देव, शेतकरी आणि बाई हे त्यांचे संभाषणाचे आवडते विषय आहेत. साहित्याबद्दल ते क्वचित आणि फार कमी बोलतात. जणू हा त्यांना परका विषय आहे. आणि माझ्या निरीक्षणानुसार त्यांचा स्त्रीविषयक दृष्टिकोन हट्टाग्रही विरोधात्मक आहे. स्त्रियांना शासन करण्याइतके दुसरे त्यांच्या आवडीचे काहीही नाही – केवळ किटी[48] अथवा नताशा रोस्तोवासारख्या[49] अगदी सामान्य स्त्रिया वगळल्यास. समर्थतेनुसार सुख प्राप्त न झालेल्या पुरुषाचा हा सूड अथवा "शरीरसौख्याच्या अपमानास्पद उर्मी"विषयी मनाला वाटणारा हा तिरस्कार? जे काही असो, हे शत्रुत्व आहे आणि अत्यंत कडवट वैर आहे. 'आन्ना कारेनिना'मध्ये आहे तसे. रूस्सोच्या[50] 'कबुलीजबाबा'वर रविवारी चेखोव व येल्पात्येवस्की[51] यांच्याशी चर्चा करताना "शरीरसौख्याच्या अपमानास्पद उर्मी" विषयी ते खूप छान बोलले. सूलेरने त्यांचे शब्द टिपून घेतले, पण नंतर कॉफी बनवीत असताना आपली टिपणे त्याने स्पिरीटच्या दिव्याच्या ज्योतीवर जाळून टाकली. त्यापूर्वी त्याने तल्स्तोय यांचे इब्सेन[52] बद्दलचे शेरे जाळून टाकले होते आणि वि. वि. रोझानोव[53] यांच्याशी मिळत्याजुळत्या अशा तल्स्तोय यांच्या विवाहसंस्कारांच्या प्रतीकांविषयीच्या अत्यंत ख्रिश्चनधर्मविरोधी भाष्यांची टिपणे त्याने हरवून टाकली होती.

## १७

फेओदोसियाचे काही श्तून्दीस्त* आज सकाळी येथे आले होते आणि सबंध दिवसभर तल्स्तोय शेतगडयांबद्दल उत्साहाने बोलत होते.

सकाळच्या जेवणाच्या वेळी ते म्हणाले :

"तुम्ही त्यांना पहायला हवं होतं—भक्कम आणि धिप्पाड. त्यांच्यातला एकजण म्हणाला : 'आम्ही न बोलावता आलो आहोत,' आणि दुसरा म्हणाला : 'आम्ही शिव्या न खाता जाऊ शकतो ना!'" आणि बालसुलभ हास्याने त्यांचे सारे अंग गदगदले.

जेवणानंतर व्हरांडयात ते म्हणाले :

"लोकांची भाषा लौकरच आपल्याला संपूर्ण समजेनाशी होईल. 'प्रगतीचा सिद्धांत,' 'इतिहासामधील व्यक्तीची भूमिका, 'विज्ञानाची उत्क्रांती' 'हगवण' याबाबत आपण सध्या बोलतो आणि शेतगडी म्हणतो : 'गवताच्या गंजीत सुई शोधण्यात अर्थ नाही.' सगळे सिद्धांत, इतिहास आणि उत्क्रांती निरर्थक ठरतात, वेडगळ ठरतात, कारण शेतगडयाला ते समजत नाहीत, त्यांची त्याला गरज भासत नाही. पण शेतगडी आपल्यापेक्षा भक्कम आहे आणि त्याची टिकण्याची शक्ती जास्त आहे. आणि (कोण जाणे?) आपल्या वाटयाला अत्सूरी टोळीचे नशीब असायचे. त्या टोळीबद्दल एका पंडिताला सांगण्यात आलं : 'सगळे अत्सूरी लोक नाश पावले, पण त्यांच्या भाषेतील काही शब्द जाणणारा एक पोपट अजून जिवंत आहे.'"

## १८

"दस्तोयेवस्कीनं एक अशी वेडपट व्यक्तिरेखा लिहिली की सबंध आयुष्यभर तो स्वतःला आणि इतरांना शासन करीत राहिला, कारण ज्यावर त्याचा विश्वास नव्हता अशा गोष्टीची त्यानं सेवा बजावली होती. त्यानं हे स्वतःबद्दल लिहिलं होतं, अथवा स्वतःबद्दल हे तो सहज म्हणू शकला असता."

---

* १९ व्या शतकाच्या उत्तरार्धातील रशियन आणि युक्रेनी शेतकऱ्यांचा एक पंथ—सं.

## १९

खोचक, अवघडून टाकणारे प्रश्न विचारायला त्यांना आवडते.

"तुम्हाला स्वत:बद्दल काय वाटतं?"

"तुमच्या बायकोवर तुमचं प्रेम आहे का?"

"माझा मुलगा ल्येव[54] गुणी आहे असं तुम्हाला वाटतं?"

"सोफीया आंद्रेयेवना[55] तुम्हाला आवडते?"

त्यांच्याशी खोटे बोलणे अशक्य आहे.

एकदा त्यांनी विचारले:

"अलेक्सेई माक्सिमोविच, तुम्ही माझ्यावर प्रेम करता?"

रशियन बगातीरचे* हे चातुर्य. जणू झुंजीसाठी प्रथम तो एक प्रयत्न करतो, मग दुसऱ्या तऱ्हेने प्रयत्न करून पाहतो. हे मनोरंजक आहे, पण मला त्याचे फारसे कौतुक नाही. ते सैतान आहेत आणि मी अजून बच्चा आहे. त्यांनी मला असे छळू नये.

## २०

"डिकन्सनं एक फार शहाणपणाची गोष्ट सांगितली होती: 'शेवट-पर्यंत अटीतटीनं झगडा कराल अशा अटीवर तुम्ही तुमचं आयुष्य धरून ठेवता.' एकूण तो भावनाविवश, वाचाळ लेखक होता, फारसा शहाणा नव्हता. पण कादंबरीची रचना केवळ तोच एक करू जाणे. बाल्झाकपेक्षा खूपच अधिक चांगल्या तऱ्हेनं. कुणीतरी म्हणालं: 'पुस्तकं लिहिण्याच्या महत्त्वाकांक्षेनं खूप लोक झपाटलेले असतात, पण फारच थोडयांना त्यांची शरम वाटते.' बाल्झाकला नव्हती, डिकन्सलाही नव्हती आणि त्या दोघांनीही भरपूर वाईट लेखन केलं. आणि तरीही बाल्झाक प्रतिभावंत होता, म्हणजे मला म्हणायचंय की, तो जो काही होता त्याला प्रतिभावंत म्हणतात..."

---

*प्रचंड आकाराचा आणि सामर्थ्याचा रशियन परीकथांमधील नायक — अनु.

'तळागाळातील माणसं' मधील काही दृश्ये मी त्यांना वाचून दाखविली. लक्षपूर्वक ऐकून घेतल्यानंतर त्यांनी विचारले :

"हे तुम्हाला का लिहावंसं वाटलं ?"

मी माझ्या परीने खुलासा केला.

"एखाद्या तरण्याबांड कोंबड्याप्रमाणं तुम्ही घाई करता. आणखी एक गोष्ट – सगळ्या उसवणींना आणि फटींना स्वतःच्या रंगांनी भरून काढण्याचा नेहमी प्रयत्न करता. हान्स अँडरसेननं एका गोष्टीत म्हटलंय : 'मुलामा झिजून जातो, पण चामडं शिल्लक राहतं.' आपले शेतगडी म्हणतात : 'सगळं निघून जातं, फक्त सत्य उरतं.' उगीच लेप फासू नका. पुढं तुमच्या दृष्टीनं ते फार वाईट ठरेल. आणि तुमची भाषा फार रंगेल आहे, करामतींनी भरलेली आहे. तसं चालणार नाही. अधिक साधेपणानं तुम्ही लिहिलं पाहिजे. लोक नेहमी साधं बोलतात. प्रथम त्यांचं बोलणं असंबद्ध भासेल, पण ते स्वतःचं म्हणणं छान प्रकट करतात. एका शिकलेल्या तरुणीनं विचारलं होतं तसं शेतगडी विचारीत नाही : 'चार हे तीनपेक्षा जास्त असताना तिसरा चौथ्यापेक्षा मोठा कसा ?' करामती लेखनाची जरूरी नाही."

ते नाखूष भासले. मी त्यांना जे वाचून दाखविले होते ते त्यांना मुळीच आवडले नव्हते हे उघड होते. थोडे थांबून माझ्या पलिकडे नजर लावीत तुसड्या आवाजात ते म्हणाले :

"तुमचा म्हातारा अप्रिय आहे. त्याच्या भलेपणावर विश्वास बसत नाही. नट छान आहे. 'प्रबोधनाची फळं' वाचलं का ? त्यात माझा एक आचारी आहे, तुमच्या नटासारखा. नाटकं लिहिणं अत्यंत अवघड आहे. तुमची वेश्याही छान आहे. काहीजणी तशा असतात ह्यात काही संशय नाही. तशा प्रकारची तुम्हाला भेटलीय ?"

"हो."

"ते स्पष्ट जाणवतं. सत्य नेहमी आपोआप जाणवतं. पण लेखकाच्या दृष्टिकोनातून तुम्ही फार बोलता. तुमचे नायक वास्तव व्यक्तीरेखा नाहीत, ते सगळे सारख्याच तोंडवळ्याचे आहेत. तुम्हाला बहुधा स्त्रिया समजत

नाहीत. तुमच्या सगळ्या बायका एकजात अपयशी आहेत. त्यांची आठवण रहात नाही..."

आंद्रेई ल्वोविच यांची पत्नी खोलीत आली व तिने आम्हाला चहा प्यायला बोलाविले. ते उठले आणि पटकन बाहेर गेले. जणू संभाषण संपल्याचा त्यांना खूप आनंद झाला होता.

## २२

"आजपर्यंत सर्वांत भयानक स्वप्न कोणतं पडलं होतं?"

मला क्वचितच स्वप्न पडते आणि माझी स्वप्ने आठवणे मला जड जाते, पण दोन माझ्या स्मरणात राहिली आहेत आणि कदाचित माझ्या ऊर्वरीत आयुष्यात मी त्यांना विसरणार नाही.

एकदा मला हिरवट-पिवळ्या रंगाचे सडके-कुजके आकाश स्वप्नात दिसले. त्या आकाशातील तारे गोल, चपटे होते; त्यांची किरणे उजळत नव्हती, ते निस्तेज होते. आजारी माणसाच्या अंगावरील क्षतांसारखे. त्या नासक्या आकाशाच्या पार्श्वभूमीवर त्या ताऱ्यांमधून तांबूस विद्युल्लता सरपटत होती. ती विद्युल्लता खूपच सापासारखी होती आणि जेव्हा जेव्हा ती एखाद्या ताऱ्याला स्पर्श करायची, तेव्हा तेव्हा तो तारा गोलाकार फुगत जायचा आणि आवाज न करता फुटायचा. त्याच्या जागी धुराच्या पुंजक्यासारखा एक काळा डाग उमटायचा व तात्काळ नासक्या, पाणचट आकाशात विरून जायचा. असे सगळे तारे एका पाठोपाठ एक फुटले, आकाश अधिक काळपट व जास्त भयानक बनले. मग ते एकवटू लागले, खदखदू लागले आणि पाणचट थिजलेल्या तुकड्यांच्या स्वरूपात माझ्या डोक्यावर कोसळले. आणि त्या तुकड्यांच्या मधल्या मोकळ्या जागांमधून चकचकीत काळा पृष्ठभाग चमकत होता.

तल्स्तोय म्हणाले:

"तुम्ही खगोलशास्त्रावरचं एखादं शास्त्रीय पुस्तक वाचत असाल, त्यातून ह्या दुःस्वप्नाचा उगम झाला असला पाहिजे. आणि दुसरं स्वप्न कोणतं?"

दुसरे स्वप्न: कागदाच्या तावाप्रमाणे सपाट बर्फाळ मैदान, एकही

उंचवटा नाही, एकही झाड नाही, एकही झुडूप नाही. फक्त अधूनमधून बर्फातून अंधुक वर डोकावणारी एखादी डहाळी. ह्या ओसाड बर्फाच्छादित वाळवंटात एका क्षितिजापासून दुसऱ्या क्षितिजापर्यंत अंधुकसा दिसणारा रस्त्याचा पिवळा पट्टा पसरलेला आहे आणि राखाडी नमदी बुटांची जोडी सावकाशपणे त्या पट्ट्यावरून आपोआप चालत जाते.

त्यांनी आपल्या केसाळ, बुटक्यासारख्या भुवया वर उंचावल्या आणि माझ्याकडे टक लावून पाहिले. थोडा वेळ थांबून ते म्हणाले: "हे भयानक आहे. तुम्हाला खरंच असं स्वप्न पडलं—अथवा तुम्ही रचून सांगता आहात? त्यात काहीसा पुस्तकीपणाही आहे."

अचानक त्यांचा संयम सुटल्यासारखे भासले आणि एका बोटाने स्वतः-च्या गुडघ्यावर ठोकीत ते तुसड्या, कठोर आवाजात म्हणाले:

"तुम्ही दारू पीत नाही. आणि कधी तुम्ही दारूच्या आहारी गेला होता असं दिसतही नाही. आणि तरीही ह्या स्वप्नांमध्ये काहीतरी मद्यप्या-समान आहे. हॉफमान्न[56] नांवाचा एक जर्मन लेखक होता. रस्त्यावरून धावणारी पत्त्यांची टेबलं वगैरे गोष्टी त्याला दिसायच्या. तो दारूबाज होता. आपोआप चालणारे बूट—खरंच महाभयानक. जरी तुम्ही रचून सांगितलं असलं तरी फारच छान! भयानक!"

अचानक त्यांच्या सबंध दाढीभर स्मित पसरले. त्यामुळे त्यांची गालांची हाडेसुद्धा उजळली.

"आणि ही कल्पना करून पहा: रस्त्यावरून अचानकपणं पत्त्यांचं एक टेबल धावत येतंय—बाकदार लाकडी पाय, फळकुटं खाली-वर होत आहेत आणि त्यातून खडूचे भपकारे निघताहेत. हिरव्या लोकरी खरबरीत कापडावरचे आकडेसुद्धा दिसताहेत, ते पळालं कारण काही जकात अधिकाऱ्यांनी लागोपाठ तीन दिवस आणि रात्री त्याच्यावर पत्ते खेळले होते व त्या टेबलाला इतःपर सहन करणं अशक्य ठरलं होतं."

ते हसले, पण त्यांनी माझ्यावर अविश्वास दाखविल्यामुळे मी काहीसा दुखावल्याचे त्यांच्या ध्यानात आले असावे.

"तुमची स्वप्नं मला पुस्तकी भासली, म्हणून तुम्ही दुखावलात? असं दुखावू नका. काहीवेळा एखादा माणूस नकळत अत्यंत विचित्र अविश्वसनीय गोष्टी मनाशी रचतो आणि त्या स्वप्नात दिसल्या असं पुढं पुढं त्याला वाटू लागतं, हे मला ठाऊक आहे."

आज संध्याकाळी आम्ही बाहेर फिरायला गेलो होतो तेव्हा माझा दंड हाती घेऊन ते म्हणाले :

"बूट चालतात – भयंकर, नाही? आपोआप – टप् टप्, टप् टप् आणि हिमाचा त्यांच्याखाली चुराडा होतोय. खरंच, फार छान तरीसुद्धा तुम्ही फार फार पुस्तकी आहात. रागावू नका, पण ते वाईट आहे. तुमच्या मार्गात त्याचा अडथळा येईल हे तुम्हाला माहीत आहे."

त्यांच्यापेक्षा मी जास्त पुस्तकी आहे असे मला वाटत नाही आणि ते काहीही बोलत असले तरी आत्ता मला ते अत्यंत बुद्धिप्रामाण्यवादी भासतात.

## २३

काहीवेळा असे भासते की, जणू आत्ताच ते फार दुरून कुठूनतरी आलेले आहेत; जेथे माणसे वेगळ्या पद्धतीने विचार करतात, वेगळ्या रीतीने संवेदना अनुभवतात, एकमेकांशी अगदी वेगळ्या रीतीने वागतात; त्यांच्या हालचालीसुद्धा आमच्यापेक्षा वेगळ्या आहेत आणि त्यांची भाषा वेगळी आहे. ते एका कोपऱ्यात थकूनभागून बसतात, त्यांची चर्या फिकुटलेली असते, जणू परक्या मातीच्या धुळीचा थर त्यांच्या देहावर असतो आणि परक्या माणसाच्या अथवा मुक्या-बहिऱ्या माणसाच्या नजरेने प्रत्येकाकडे ते कुतूहलाने पहात असतात.

काल रात्री जेवणापूर्वी ते अशाच रीतीने दिवाणखान्यात आले, जणू ते फार फार दूर होते आणि नंतर क्षणभर दिवाणावर गप्प बसून अचानक डोलत, हातांचे पंजे गुडघ्यांवर घासत आणि चेहऱ्याला आक्रसून घेत म्हणाले :

"नाही; नाही, हा त्याचा शेवट नाही."

एका मूर्ख आणि भाबड्या व्यक्तीने त्यांना विचारले :

"काय म्हणायचंय तुम्हाला?"

त्यांनी त्या माणसाकडे स्थिर नजरेने पाहिले. नंतर डॉ. निकीतिन, येल्पात्येवस्की व मी जेथे बसलो होतो त्या व्हरांड्याकडे नजर टाकीत, किंचित पुढे झुकून त्यांनी आम्हाला विचारले :

"कशाबद्दल बोलता आहात?"

"प्लेवेबद्दल." 57

"प्लेवे... प्लेवे..." विचारमग्न होत त्यांनी तो शब्द पुन:पुन्हा उच्चारला. दोन उच्चारांमध्ये ते अशा पद्धतीने थांबले, जणू ते नांव यापूर्वी त्यांनी कधी ऐकलेच नव्हते.

## २४

"मला दारुडे आवडत नाहीत, पण एखाददुसऱ्या प्याल्यानंतर स्वारस्यपूर्ण बनणारी माणसं मला ठाऊक आहेत. त्यांचं बोलणं चतुर बनतं, त्यांच्या विचारांना सौंदर्य प्राप्त होतं, त्यांना चपखलपणा येतो, त्यांच्या वक्तृत्वाला धार चढते. पण जेव्हा ते शांत आणि शुद्धीवर असतात तेव्हा मात्र असं घडत नाही. अशावेळी मद्याला आशीर्वाद द्यायला मी तयार आहे."

सूलेर म्हणाला की तो आणि ल्येव निकोलायेविच त्वेरस्काया रस्त्यावरून चालले होते, तेव्हा दूरवरून दोन उरस्त्राणधारी घोडेस्वार येत असलेले तल्स्तोयनी पाहिले. त्या घोडेस्वारांची पितळी उरस्त्राणे उन्हात चमकत होती, त्यांच्या टाचा किणकिणत होत्या, जणू एकत्र वाढल्याप्रमाणे जोडीने टापा टाकीत ते चालले होते आणि यौवन व ताकदीच्या आत्मतुष्टतेचे तेज त्यांच्या मुद्रांवर झळाळत होते.

तल्स्तोय त्यांना शिव्या घालू लागले.

"कसला भव्य मूर्खपणा! चाबकाखाली शिकवलेली जनावरं नुसती..."

पण जेव्हा उरस्त्राणधारी घोडेस्वार आमच्याजवळून निघून गेले तेव्हा ते निश्चल उभे राहिले आणि प्रेमळ नजरेने त्यांचा पाठपुरावा करीत कौतुकाने म्हणाले:

"तरीसुद्धा ते किती सुंदर आहेत नाही! ल्योवूष्का, ते अगदी प्राचीन रोमन दिसतात, होय ना? सामर्थ्य, सौंदर्य—आह्, देवा रे! माणसात किती अप्रतीम सौंदर्य भरलंय—किती सुरेख!"

## २५

एका खूप उष्म्याच्या दिवशी त्यांनी मला खालच्या रस्त्यावर गाठले. एका शांत, छोटया तातार घोडयावर स्वार होऊन ते निघाले होते. अळंबी-

च्या आकाराची पातळ शुभ्र नमदी टोपी घातलेली त्यांची पांढुरकी, केसाळ मूर्ती एखाद्या बुटक्याप्रमाणे भासत होती.

त्यांनी आपल्या घोड्याचा लगाम खेचला व ते माझ्याशी बोलले. त्यांच्या रिकीबीलगत मी चालत होतो. इतर गोष्टींबरोबर, वि. गे. कोरोलेन्को यांच्याकडून मला पत्र आल्याचाही मी उल्लेख केला. तल्स्तोयनी आपली दाढी रागाने हलविली.

"त्याचा देवावर विश्वास आहे?"

"मला ठाऊक नाही."

"सर्वांत महत्त्वाची गोष्ट तुम्हाला ठाऊक नाही. त्याचा विश्वास आहे, पण निरीश्वरवाद्यांसमोर तसं कबूल करायची त्याला लाज वाटते."

ते तक्रारखोर, चिडक्या सुरात, रागाने डोळे बारीक करून बोलत होते. मी त्यांच्या वाटेत आडवा आलो होतो हे मला दिसत होते, पण जेव्हा मी त्यांना सोडून जाण्याची किंचित हालचाल केली, तेव्हा त्यांनी मला थांबविले.

"काय झालं? मी घोडा हळू चालवतोय."

आणि पुन्हा ते गरजले:

"तुमचा आंद्रेयेव[58] निरीश्वरवाद्यांनाही भितो, पण तो देवावरही विश्वास ठेवतो आणि देवाला घाबरतो."

ग्रँड ड्यूक आ. मि. रोमानोव यांच्या इस्टेटीच्या सीमेशी तीन रोमानोव रस्त्यावर कोंडाळे करून बोलत होते – आय्-तोदोर इस्टेटीचे मालक, गिओर्गी आणि द्यूल्बेरचे प्योत्र निकोलायेविच. मला वाटते, तिघेही छान, उंचेपुरे पुरुष होते. एक-घोड्याच्या गाडीने आणि एका खोगीर चढवलेल्या घोड्याने रस्ता अडला होता. ल्येव निकोलायेविच पलिकडे जाऊ शकत नव्हते. त्यांनी रोमानोवांवर कठोर नजरेने टक लावली. पण रोमानोवांनी आमच्याकडे पाठ फिरविली. खोगीरवाल्या घोड्याने पायांची चाळवाचाळव केली व बाजूला होऊन तल्स्तोय यांच्या घोड्याला त्याने पलिकडे जाऊ दिले.

एक-दोन मिनिटे मुकाट चालल्यानंतर ते म्हणाले:

"त्यांनी ओळखलं मला, गांवढळ कुठले!"

आणि मिनिटभरानंतर म्हणाले:

"तल्स्तोयला वाट करून दिली पाहिजे हे घोड्याला माहीत होतं!"

## २६

"सर्वांत प्रथम स्वत:साठी स्वत:ची काळजी घ्या, मग दुसऱ्यांसाठी खूप करू शकाल."

## २७

"आम्हाला 'माहीत आहे' असं जेव्हा आपण म्हणतो तेव्हा त्याचा अर्थ काय? मला माहीत आहे मी तल्स्तोय, एक लेखक, मला बायको आहे, मुलं आहेत, पांढरे केस आहेत, कुरूप चेहरा आणि दाढी आहे – हे सगळं माझ्या पासपोर्टमध्ये आहे. पण पासपोर्टमध्ये ते आत्म्याची नोंदणी करत नाहीत. माझा आत्मा देवाशी जवळीक साधायला धडपडतो एवढंच मला त्याच्याबद्दल माहीत आहे. पण देव म्हणजे काय? ज्याचा एक कण म्हणजे माझा आत्मा. बस्स. विचार करायला शिकलेल्या कुणालाही ह्यावर विश्वास ठेवणं कठीण जातं, पण केवळ श्रद्धेमार्फतच माणूस देवात वसती करू शकतो. तेर्तल्लियननं[59] म्हटलं होतं: 'विचार वाईट आहे.'"

## २८

त्यांच्या शिकवणीत एकसुरीपणा असला तरी हा अतर्क्य माणूस अमर्याद अष्टपैलू आहे.

आज बागेत गास्प्राच्या मुल्लाबरोबर बोलताना त्यांनी असा काही आव आणला; जणू आयुष्याच्या अखेरच्या घडीची जाणीव झालेला एक श्रद्धाळू खेडवळ. प्रत्यक्षात त्यांची आकृती छोटी आहे आणि त्या भक्कम, धिप्पाड तातारासमोर ते स्वत:ला अधिकच छोटा बनवू पहात होते. जीवनाच्या अर्थावर नुकतीच चिंतनाला सुरुवात करणाऱ्या आणि समोर आलेल्या समस्यांनी बावरून गेलेल्या छोटया म्हाताऱ्या माणसासारखे ते दिसत होते. आपल्या केसाळ भुवया आश्चर्याने उंचावून आणि तीक्ष्ण डोळ्यांची घाबरट उघडझाप करून त्यांनी त्या डोळ्यांमधील असह्य, भेदक बुद्धिमत्तेचे तेज मंदावून टाकले होते. मुल्लाच्या रुंद चेहऱ्यावर त्यांची शोधक नजर

स्थिरावली होती आणि लोकांना अस्वस्थ करणारा त्यांच्या डोळ्यांच्या बाहुल्यांमधील भेदकपणा नाहीसा झालेला होता. जीवनाच्या अर्थाबाबत, आत्मा आणि देव ह्यांच्याबाबत त्यांनी मुल्लाला "बालिश" प्रश्न विचारले. कुराणातील वचनांच्या 'नव्या करारा'तील वचनांशी त्यांनी विलक्षण सफाईने भेंड्या लावल्या. प्रत्यक्षात ते नाटक करीत होते आणि असा असाधारण अभिनय केवळ थोर कलावंत व योगी असणाऱ्यालाच शक्य होता.

काही दिवसांपूर्वी तानेयेव[60] आणि सूलेरबरोबर संगीतावर बोलताना त्यातील सौंदर्यावर ते एखाद्या लहान मुलाप्रमाणे बेभान बनले. अशा स्वतः-च्या बेभानता त्यांना आवडतात, अथवा त्या अनुभवण्याची त्यांची क्षमता त्यांना आवडते, हे स्पष्ट जाणवत होते. शॉपेनहॉवरइतके[61] संगीताबाबत सुरेख आणि सखोल कुणीही लिहिले नव्हते असे ते म्हणाले. त्याबद्दल बोलताना फेटविषयीची गंमतीदार गोष्ट त्यांनी सांगितली व संगीत म्हणजे "आत्म्याची मुकी प्रार्थना" असे म्हटले.

"मुकी का?" सूलेरने प्रश्न केला.

"कारण त्यात शब्द नाहीत. विचारांपेक्षा ध्वनींमध्ये जास्त आत्मा आहे. विचार म्हणजे तांब्याची नाणी भरलेला बटवा; ध्वनीला कशाचाही कलंक नाही, तो आतून विशुद्ध आहे."

अचानक सर्वोत्तम आणि अत्यंत हळुवार असे हृदयस्पर्शी बालिश शब्द आठवून त्यांनी बुद्ध्याच आनंदाने त्यांचा वापर केला. आणि मग दाढीतल्या दाढीत स्मित करीत हळूच, अगदी अलगद स्पर्श करावा त्याप्रमाणे म्हणाले:

"सर्व संगीतकार मूर्ख लोक आहेत; संगीतकार जेवढा अधिक गुणी, तेवढा तो जास्त संकुचित मनाचा. आणि ऐकायला विचित्र वाटेल, पण जवळजवळ ते सगळे धार्मिक असतात."

## २९

टेलिफोनवरून चेखोवना:

"आज माझ्या दृष्टीनं एवढा आनंदाचा दिवस आहे, मी एवढा आनंदी आहे की, तुम्हीही आनंदी असावं असं मला वाटतं. विशेषतः तुम्ही! तुम्ही फार छान आहात, फारच छान!"

## ३०

लोक चुकीच्या गोष्टी बोलतात तेव्हा ते ऐकत नाहीत अथवा विश्वास ठेवीत नाहीत. वस्तुतः ते विचारीत नाहीत, ते उलटतपासणी घेतात. दुर्मीळ वस्तूंचा संग्रह करणाऱ्याप्रमाणे, त्यांच्या संग्रहाचा सुमेळ बिघडणार नाही तेवढ्याच गोष्टी ते स्वीकारतात.

## ३१

टपाल पहात असताना :

"ते खूप गोंगाट करतात, ते लिहितात, आणि जेव्हा मी मरीन, त्यानंतर एका वर्षानं म्हणतील : 'तल्स्तोय? तो जोडे बनवणारा काउंट ना? आणि मग त्याला काहीतरी झालं ना?'"

## ३२

एखाद्या माणसाने लपवलेली एखादी गोष्ट अचानक त्याला सापडल्यानंतर त्याच्या मुद्रेवर जसे धूर्त, समाधानी स्मित उमटते, तसे स्मित त्यांच्या चेहऱ्यावर आणि नजरेत उमटलेले मी अनेकदा पकडले होते. त्यांनी काहीतरी लपवून ठेवले आणि मग ती लपवून ठेवलेली जागा ते विसरले. अनेक दिवसपर्यंत त्यांच्या मनात गुप्त हुरहुर होती, सतत नवल करीत होते : मला एवढी गरज असलेली ही वस्तू मी कुठं ठेवली असावी? त्यांची अस्वस्थता, त्यांची हानी लोकांच्या ध्यानात येईल, मग ते काहीतरी अप्रिय, काहीतरी त्यांना न आवडण्यासारखे करतील, अशी त्यांना भीती वाटत होती. आणि अचानक त्यांना ती आठवली व सापडली. त्यांना आनंदाचे भरते आले व तो आनंद लपविण्याचा इतःपर प्रयत्न न करता प्रत्येकाकडे त्यांनी धूर्त नजर टाकली. जणू म्हणायचे होते :

"आता तुम्ही मला दुखापत करू शकत नाही."

पण त्यांना काय सापडले आणि कुठे सापडले याबाबत मात्र ते चकार शब्दाने बोलत नाहीत.

त्यांच्याकडे पाहताना सतत नवल वाटत राहते. पण त्यांना वारंवार पाहण्याची कुणी इच्छा धरणार नाही आणि मी त्यांच्याशी एकाच घरात कधीही राहू शकणार नाही. मग एका खोलीत राहणे तर दूरच. त्यांच्याबरोबर असणे म्हणजे जेथे सूर्यामुळे सर्व काही जळून गेलेल्या मैदानावर असण्यासारखे आहे, जेथे खुद्द सूर्यही जळून जात आहे व अखंड काळ्या रात्रीची धास्ती आहे.

## पत्र

तुम्हाला मी पत्र टाकले आणि तेवढ्यात तार आली: "तल्स्तोय यांनी पलायन केले." आणि अद्याप तुमच्याशी मनाने संपर्क आहे तोवर मी परत तुम्हाला पत्र लिहीत आहे.

ह्या बातमीच्या संदर्भात मला बोलावीशी वाटणारी प्रत्येक गोष्ट निःसंशयरीत्या गोंधळलेली असेल, कदाचित कठोर आणि अनुदार असेल. तुम्ही त्याबद्दल मला क्षमा केली पाहिजे. कुणीतरी माझा गळा धरून दाबतोय असे मला भासतेय.

माझ्याशी ते खूप आणि तपशीलवार बोलले होते. क्रिमियात गास्प्रा येथे मी रहात होतो तेव्हा त्यांना भेटायला मी वारंवार जात असे आणि त्यांनाही माझ्या भेटीला येणे आवडत असे. त्यांची पुस्तके मी अत्यंत लक्षपूर्वक आणि प्रेमाने वाचली आहेत. तेव्हा त्यांच्याविषयी मला जे काही वाटते ते बोलण्याचा मला हक्क आहे असे वाटते. जरी हे माझे धाष्टर्य असले आणि त्यांच्याबद्दलच्या सर्वसामान्य समजाच्या विरुद्ध असले तरीही. इतर कुणाहीप्रमाणे मलासुद्धा माहीत आहे की, प्रतिभावंत म्हणून ज्याचे नांव घ्यावे असा त्यांच्याइतका लायक, अधिक गुंतागुंतीचा व आत्मविरोधी, हरतऱ्हेने अधिक प्रशंसनीय – होय, हरतऱ्हेने – दुसरा माणूस कधीही झाला नाही. विशिष्ट आणि विशाल अशा दोन्ही अर्थाने ते नामी आहेत. त्याचे शब्दांमध्ये वर्णन करणे अशक्य. त्यांच्यात असे काहीतरी आहे, ज्यामुळे एकजात सर्वांना ओरडून सांगण्याची ऊर्मी माझ्या मनात उसळते: पहा, किती अप्रतीम माणूस आपल्या ग्रहावर राहतोय! कारण सर्वप्रथम ते सर्वस्पर्शी मानव आहेत. खऱ्या अर्थाने माणूस आहेत.

पण काऊंट ल्येव तल्स्तोय यांचे जीवन "संत पाद्री ल्येवच्या जीवनात" पालटण्याच्या त्यांच्या हट्टी, जुलमी प्रयत्नांचा मला नेहमी तिटकारा वाटत आला आहे. "यातना" भोगण्याचा ते प्रदीर्घ काळ प्रयत्न करीत होते हे तुम्हाला माहीत आहे. अद्याप हे साध्य करण्यात त्यांना यश आले नव्हते ह्याचे त्यांना किती वाईट वाटत होते ह्याबद्दल येवगेनी सोलोव्योव[62] आणि सूलेरपाशी ते बोलले होते. स्वतःच्या निर्धारशक्तीची कसोटी पाहण्याच्या स्वाभाविक इच्छेपायी केवळ यातना सोसण्याची त्यांची इच्छा नव्हती, तर यातनांद्वारे स्वतःच्या सिद्धांतांचे वजन वाढविण्याचा, लोकांच्या नजरेत स्वतःची शिकवण अनावर आकर्षक बनविण्याचा, तिला पवित्र रूप देण्याचा आणि लोकांना ती स्वीकारायला लावण्याचा, त्यांच्यावर ती लादण्याचा, त्यांचा उघड – मी पुन्हा म्हणतो – हट्टी इरादा होता. कारण त्यांची शिकवण पुरेशी खात्री पटविणारी नव्हती हे त्यांना चांगले ठाऊक होते. जेव्हा त्यांच्या रोजनिशी प्रसिद्ध होतील तेव्हा स्वतःच्या शिकवणीला आणि व्यक्तिमत्वाला त्यांनी लागू केलेले संशयवादाचे काही उत्तम नमुने तुम्ही पहाल. "हुतात्मे आणि यातना भोगणारे हमखास जुलमी आणि दडपशहा असतात" हे त्यांना माहीत आहे. त्यांना सर्व काही माहीत आहे. आणि तरीही ते म्हणतात: "जर माझ्या विचारांसाठी मी यातना भोगल्या, तर ते अगदी वेगळा ठसा उमटवतील." त्यांच्यातील ह्या गोष्टीचा मला नेहमी तिटकारा वाटत आला आहे, कारण माझ्यावर बळजबरी करण्याचा, माझ्या सदसद्विवेकबुद्धीवर वर्चस्व गाजविण्याचा, हुतात्म्याच्या रक्ताने तिला दिपवून टाकण्याचा, माझ्या मानेवर पोथीनिष्ठेचे जोखड लादण्याचा त्यांचा प्रयत्न त्यातून मला जाणवत आला आहे.

परलोकातील अमरत्वाची जयगीते ते नेहमी आणि सर्वत्र गात आले आहेत, पण ह्या जगातील अमरत्व त्यांना खरे म्हणजे अधिक रुचण्यासारखे आहे. अस्सल अर्थाने ते राष्ट्रीय लेखक आहेत, त्यामुळे त्यांच्या महान आत्म्यामध्ये राष्ट्राच्या सर्व अवगुणांचा समावेश आहे, आमच्या इतिहासाच्या छळांनी आमच्यावर घातलेल्या सर्व घावांच्या खुणा तेथे आहेत... त्यांच्यातील प्रत्येक गोष्ट राष्ट्रीय आहे आणि त्यांची एकूण शिकवण केवळ प्रतिगामी आहे, जुन्या पिढीकडे वळणारी आहे. ती शिकवण झटकून टाकायला, तिच्यावर मात करायला, आपण नुकता आरंभ केला होता.

१९०५ साली लिहिलेले "बुद्धिजीवी, शासनसंस्था, माणसे," हे

त्यांचे पत्र आठवा. किती अप्रिय, किती तिरस्करणीय होते! त्या सबंध पत्रांमधून भिन्नपंथीयाचा तिरस्करणीय "तुम्ही माझं ऐकलं नाही" हा सूर आढळतो. त्यावेळी मी त्यांना उत्तर दिले होते. त्यांनी मला उद्देशून वापरलेल्या शब्दातच मी लिहिले होते की, "रशियन लोकांविषयी आणि त्यांच्या वतीने बोलण्याचा हक्क त्यांनी केव्हाच गमावला होता," कारण त्यांच्याशी जिवाभावाच्या नात्याने बोलायला आलेल्या लोकांचे ऐकून घेण्याची व त्यांना समजून घेण्याची त्यांची अनिच्छा मी स्वतःच्या डोळ्यांनी पाहिली होती. माझे पत्र कठोर होते आणि मी ते पाठविले नाही.

आणि आता आपल्या विचारांना शक्यतो जास्तीत जास्त महत्त्व प्राप्त करून देण्याच्या आशेने ते कदाचित शेवटची झेप घेत असावेत. वासिली बूस्लायेव यांच्याप्रमाणे अशा झेपा मारण्याचा त्यांना नेहमीच छंद आहे, पण सदैव त्यामागील हेतू स्वतःचे पावित्र्य सिद्ध करण्याचा आणि तेजोवलय धुंडाळण्याचा. रशियाच्या प्राचीन इतिहासामुळे आणि प्रतिभावंताच्या वैयक्तिक यातनांपायी त्यांच्या शिकवणी समर्थनीय ठरत असल्या तरी ह्यात शोध जाणवतो. पापाचे आणि जगण्याच्या इच्छेच्या गुलामीचे चिंतन करून त्यामार्फत पावित्र्य साध्य करायचे असते...

ल्येव निकोलायेविच ह्यांच्यात बरेच असे काही आहे ज्यामुळे माझ्या मनात तिरस्कारासमान भावना वारंवार निर्माण झाल्या आहेत, बऱ्याच काही गोष्टींचा माझ्या मनावर बोजा पडला आहे. त्यांचा बेसुमार फुगलेला अहंकार म्हणजे अगदी राक्षसी, अमानुष परिस्थिती आहे. ते महान आहेत हे खरे! मला त्याची पूर्ण खात्री पटलेली आहे. ते जे काही बोलतात, त्याशिवाय बऱ्याच काही गोष्टींबाबत मौन पाळतात. अगदी स्वतःच्या दैनंदिनींमध्येसुद्धा मौन बाळगतात. अशा गोष्टींविषयी कदाचित ते कुणापाशीही कधीही चकार शब्द काढणार नाहीत. हे "काहोतरी" कधी-कधी, तात्पुरते त्यांच्या बोलण्यामधून जाणवते. त्याबद्दलच्या सूचकता त्यांनी मला व ल्ये. सूलेरझित्स्कीला वाचायला दिलेल्या दोन रोजनिशींमध्ये आढळल्या होत्या. "जे काही सांगण्यात आले आहे त्या सर्वांचा नकार" असल्यासारखे त्यात काहीतरी जाणवले होते. अपार निराशेच्या आणि एकाकीपणाच्या भूमीवर उगवलेल्या व परिणत झालेल्या अत्यंत प्रगाढ आणि अटूल शून्यवादासारखे. जो आजवर काहीही नष्ट करू शकला नाही आणि एवढ्या भयावह स्पष्टतेने कदाचित आजवर कुणालाही कधी

जाणवला नाही. त्यांच्या मनात खोलवर माणसांविषयी अत्यंत कठोर बेपर्वाईची भावना असल्याचे मला अनेकदा भासले आहे. इतर माणसांपेक्षा ते एवढ्या उंचीवर आहेत व एवढे सामर्थ्यवान आहेत की, त्या माणसांना ते चिलटे समजतात; त्या माणसांचे पूर्वग्रह हास्यास्पद आणि करुणास्पद मानतात. त्या माणसांपासून ते अतिदूर कुठल्यातरी वाळवंटात गेले आहेत, जेथे त्यांच्या आत्म्याच्या सर्व शक्तींना आत्यंतिकरीत्या एकवटून "सर्वांत महत्त्वाच्या" अशा मृत्यूबाबत ते एकांतात विचार करतात.

सबंध आयुष्यभर त्यांनी मृत्यूची धास्ती बाळगलीय आणि त्याचा तिटकारा केलाय. सबंध आयुष्यभर त्यांना एकाच विचाराने पछाडले आहे — त्यांना, तल्स्तोयना, मेले पाहिजेच का? सगळ्या जगाचे, विश्वाचे, डोळे त्यांच्यावर खिळलेले आहेत. सजीव, थरथरणारे धागे त्यांच्यापाशी चीन, हिंदुस्थान, अमेरिकेहून जुळलेले आहेत. त्यांचा आत्मा सर्व पुरुषांसाठी सदासर्वकाळ आहे. तर मग निसर्गाने आपल्या नियमांना अपवाद करून सर्व पुरुषांमध्ये केवळ त्यांनाच शारीरिक अमरत्व का बहाल करू नये? अर्थात चमत्कारांवर विश्वास ठेवण्याइतके ते दुधखुळे नाहीत आणि तरीही, दुसऱ्या बाजूने ते बंडखोर आहेत, शोधक आहेत. अज्ञात बराकींच्या भीतीपायी आणि निराशेपायी बिथरलेल्या तरुण, रंगरूटाप्रमाणे ते आहेत. मला आठवते की, एकदा गास्प्रा येथे, आजारपणातून ते बरे झाल्यानंतर, ल्येव शेस्तोव[63] यांचे 'नीत्शे[64] आणि काऊंट तल्स्तोय यांच्या शिकवणींमधील बरे-वाईट' वाचल्यानंतर, आ. पा. चेखोव यांच्या शेऱ्याला उत्तर म्हणून ते म्हणाले होते की, त्यांना "पुस्तक आवडले नव्हते":

"आणि मला ते मजेशीर वाटलं. कृत्रिमपणानं लिहिलंय, पण वाईट नाही, स्वारस्यपूर्ण आहे. माणूसघाणे मला आवडतात, मात्र ते प्रामाणिक हवेत. कुठंतरी तो म्हणतो: 'सत्याची जरूरी नाही,' आणि त्याचं अगदी बरोबर आहे — सत्याचा त्याला काय उपयोग? शेवटी तो मरणारच आहे."

आणि त्यांचे शब्द नीटसे आकलन झालेले नाहीत असे त्यांच्या ध्यानात येताच गंमतीने गालातल्या गालात हसून ते पुढे म्हणाले:

"माणूस एकदा विचार करायला शिकला, म्हणजे त्याचे सर्व विचार त्याच्या स्वतःच्या मृत्यूशी निगडित असणं अपरिहार्य आहे. सगळ्या तत्त्वज्ञान्यांचं असंच आहे. आणि मृत्यू जर हमखास येणार आहे, तर सत्यांचा उपयोग काय?"

सत्य सर्वांसाठी सारखेच आहे – देवाविषयीचे प्रेम – असे त्यांनी पुढे विवेचन केले. पण ह्या विषयावर ते बेपर्वाईने आणि कंटाळवाणेपणाने बोलत होते. जेवणानंतर व्हरांड्यात त्यांनी ते पुस्तक परत हाती घेतले आणि लेखकाचा पुढील मजकूर शोधून वाचला: "तल्स्तोय, दस्तोयेव्स्की आणि नीत्शे त्यांच्या प्रश्नांना उत्तरे मिळाल्याखेरीज जगू शकले नसते आणि अजिबात उत्तर न मिळण्यापेक्षा कोणतेही उत्तर त्यांना चालले असते." ह्यावर हसून ते म्हणाले:

"कसला धाडसी हजाम आहे. तो सरळ म्हणतो की, मी स्वत:ला फसवतो, म्हणजे पर्यायानं मी इतरांनाही फसवतो. हा ठळक निष्कर्ष आहे..."

सूलेरने विचारले: "पण 'हजाम' का?"

काहीसे विचारमग्न होत ते म्हणाले: "माझ्या सहज मनात आलं की, तो फॅशनेबल अक्कडबाज होता आणि खेड्यातल्या शेतकरी काकाच्या लग्नाला हजर झालेल्या मॉस्कोच्या एका हजामाची मला आठवण झाली. त्याचं वागणं झकास होतं, म्हणून प्रत्येकाला तुच्छ मानत होता."

हे संभाषण जवळ जवळ शब्दश: मी दिले आहे. मला ते अगदी ठळक-पणे आठवते; मला भिडणाऱ्या प्रत्येक गोष्टीला मी टिपून ठेवतो त्या सवयीनुसार मी ते टिपूनही ठेवले होते. सूलेरने आणि मी अनेक टिपणे केली, पण सूलेरने स्वत:ची टिपणे हरवली. तो अत्यंत निष्काळजी होता आणि तल्स्तोयवर जरी त्याचे प्रेम होते, तरी त्यांच्याविषयीचा त्याचा दृष्टिकोन काहीसा विचित्र होता; अगदी लीनतेचा होता. मीसुद्धा माझी टिपणे कुठेतरी ठेवली आहेत आणि मला ती सापडत नाहीत. ती रशियात असावीत. तल्स्तोय यांचे मी खूप निकटपणे निरीक्षण केले, कारण अस्सल, सजीव श्रद्धा बाळगणाऱ्या माणसाचा मी सदैव शोध घेतला आहे आणि माझ्या आयुष्याच्या अखेरच्या दिवसापर्यंत मी तसा शोध घेत राहीन. आणखी एक कारण म्हणजे आमच्या संस्कृतीच्या अभावासंबंधी बोलताना आ. चेखोवनी एकदा तक्रार केली होती:

"पहा, गोएथेनं उच्चारलेला प्रत्येक शब्द टिपून ठेवण्यात आला, पण तल्स्तोय यांचा आवाज मुद्रित होत नाही. मित्रा, हे अगदी भयानक रशियन धर्तीचं आहे! नंतर माणसं जागी होतील आणि विपर्यासांनी भरलेल्या आठवणी लिहू लागतील."

पण शेस्तोव ह्यांच्या विषयावर पुढे जाऊ :

"तो म्हणतो, 'भयानक दृष्टांतांकडे टक लावून पहात माणूस नेहमी जगू शकत नाही' – एखादा काय करू शकतो आणि काय करू शकत नाही हे त्याला कसं माहीत? जर त्याला माहीत असतं, जर त्याला दृष्टांत झाले असते, तर त्यानं फुटकळ गोष्टी लिहिल्या नसत्या. काहीतरी गंभीर गोष्टींमध्ये तो गुंतला असता, बुद्ध जसा सबंध आयुष्यभर गुंतला होता तसा..."

काहीवेळा असे भासते की, हा वृद्ध महापंडित मृत्यूशी खेळतोय, त्याच्याशी प्रणयचेष्टा करतोय, त्याच्यावर मात करण्याचा प्रयत्न करतोय : मी तुला भीत नाही, माझं तुझ्यावर प्रेम आहे, मी तुझी वाट पाहतोय. आणि सारा वेळ त्याचे छोटे, चौकस डोळे रोखून पहात आहेत – तू कसा दिसतोस? आणि तुझ्यापाठी काय आहे? तू मला संपूर्ण नष्ट करणार, अथवा माझ्यातलं काहीतरी उरणार?

"मी सुखी आहे, भयानक सुखी आहे, अत्यंत सुखी आहे!" ह्या त्यांच्या शब्दांचा एक विचित्र ठसा मागे उरतो. आणि त्यानंतर तात्काळ ते म्हणतात : "आह्, यातना सोसायला!" यातना सोसण्याबाबतही ते प्रामाणिक आहेत. जेव्हा ते आजारी आहेत तेव्हा कारावासात राहण्यास, हद्दपारीवर एकांतात राहण्यास, थोडक्यात म्हणजे हुतात्म्याचा मुकुट स्वीकारण्यास, त्यांना मनापासून आनंद होईल ह्याबाबत माझ्या मनात क्षणभरही संदेह उमटत नाही. हौतात्म्य मृत्यूचे काहीसे समर्थन करू शकेल, बाह्य, औपचारिक दृष्टिकोनामधून मृत्यूला अधिक आकलनीय करू शकेल, त्याला स्वीकारणे अधिक सोपे करू शकेल, असे त्यांना वाटते का? मला खात्री आहे की, ते कधीही सुखी नाहीत – ना "शहाणपणाच्या पुस्तकां"-मध्ये, ना "घोड्याच्या पाठीवर," ना "स्त्रीच्या बाहुपाशात." ह्या "ऐहिक स्वर्गा"मधील सर्व सुखांचा पूर्ण उपभोग घेऊनही ते सुखी होऊ शकणार नाहीत. कारण त्यांच्या मनावर विचारांचा जबरदस्त पगडा आहे व जीवनाचे आणि लोकांचे त्यांना उत्तम ज्ञान आहे. त्यांचे आणखी काही शब्द :

"खलीफा अब्देर रहमानला त्याच्या आयुष्यात चौदा सुखी दिवस लाभले आणि एवढे दिवस मला कधी लाभले असं मला वाटत नाही. याचं कारण माझ्यासाठी, माझ्या आत्म्यासाठी मी कधी जगलो नाही, कसं

जगायचं मला माहीत नाही. नेहमी परिणाम साधण्यासाठी, दुसऱ्यांसाठी जगलो."

आम्ही निघत होतो तेव्हा चेखोव म्हणाले : "ते कधीही सुखी नव्हते ह्यावर माझा विश्वास नाही." माझा आहे. त्यांनी सुख अनुभवले नाही. पण "परिणामासाठी" ते जगले हे मात्र खरे नाही. आपला अतिरिक्त वाटा त्यांनी इतरांना, भिकाऱ्यांना द्यावा तसा नेहमी दिला. त्यांना गोष्टी "करायला" लावण्याचा त्यांना छंद होता : वाचन, चालणे, भाजीपाल्यावर जगणे, शेतगड्यावर प्रेम करणे आणि ल्येव तल्स्तोयच्या तार्किक व धार्मिक विचारांच्या अचूकतेवर विश्वास ठेवणे. लोकांच्या तावडीतून मुक्तता मिळविण्यासाठी त्यांना समाधान वाटेल अथवा गुंतवून ठेवील असे काहीतरी द्यावेच लागते. तळविहीन दलदल "महान गोष्टी"चा प्रश्न समोर असलेल्या सवयीच्या, छळवादी, पण काहीवेळा आरामदायी एकांतवासात माणसाला ते एकटा का राहू देत नाहीत?

सर्व रशियन धर्मोपदेशक – आव्वाकूमचा[65] अपवाद वगळता – उत्साह-शून्य होते. त्यांच्यापाशी क्रियाशील, सजीव श्रद्धा नव्हती. माझ्या 'तळागाळातील माणसं'मध्ये तशा प्रकारचा म्हातारा – ल्यूका – निर्माण करण्याचा मी प्रयत्न केला. त्याला माणसांमध्ये नव्हे तर "सर्व प्रकारच्या उत्तरांमध्ये" स्वारस्य होते. माणसांना टाळणे त्याला अशक्य होते, त्याने त्यांचे सांत्वन केले; पण केवळ त्यांनी त्याच्या वाटेत आडवे येऊ नये एवढ्याचसाठी. अशा व्यक्तींनी केलेले एकूण प्रवचन, त्यांचे एकूण ज्ञान म्हणजे छुप्या तिरस्काराने त्यांनी वाढलेली भिक्षा. त्यांच्या उपदेशामागे शोकपूर्ण आणि याचनेचे शब्द ऐकू येतात:

"मला एकट्याला राहूं दे! देवावर आणि तुमच्या शेजाऱ्यावर प्रेम करा, पण मला एकट्याला सोडा! देवाला शिव्याशाप द्या, अतिदूर गेलेल्यांवर प्रेम करा, पण मला एकट्याला सोडा! मला एकट्याला राहूं दे, कारण मीही केवळ एक माणूस आहे आणि... मरणार आहे."

अरेरे, आयुष्य असे आहे आणि प्रदीर्घ काळ असेच राहणार आहे! दुसऱ्या रीतीने ते असू शकत नाही आणि कधी असणारही नाही, कारण माणसांना त्रास देण्यात येतो, त्यांचा छळ करण्यात येतो, त्यांना कमालीचे एकाकी टाकण्यात येते. सर्वांना एकाकीपणाच्या शृंखलांमध्ये अडकविण्यात

येते व तो एकाकीपणा त्यांच्या आत्म्यातील रस शोषून घेतो. ल्ये. नि. यांनी चर्चबरोबर परत समझोता केला तर मला यत्किंचितही आश्चर्य वाटणार नाही. त्यात एक स्वतंत्र तर्कशास्त्र असेल – सर्व माणसे सारखीच महत्त्वशून्य आहेत, बिशपसुद्धा. वस्तुत: हा समझोता नसेल, तर त्यांच्या दृष्टीने ही कृती म्हणजे केवळ एक तर्कशुद्ध पाऊल असेल : "माझा द्वेष करणाऱ्यांना मी क्षमा करतो." एक ख्रिश्चन कृत्य आणि त्यामागे हलकासा, खोचक उपहास. एका शहाण्या माणसाने मूर्खांवर घेतलेला सूड, असे समजायला हरकत नाही.

पण ज्या तऱ्हेने लिहिण्याची माझी इच्छा होती त्या तऱ्हेने मी लिहीत नाही आणि ज्या गोष्टींबद्दल लिहायची इच्छा होती, त्यांच्याबद्दलही लिहीत नाही. माझ्या अंतरात्म्यात कुत्रा केकाटतो आहे आणि माझ्या डोळ्यांसमोर नाश चमकतोय. वृत्तपत्रे आत्ताच आली आहेत आणि कसे घडेल त्याची मी कल्पना करू शकतो. तुझ्या जगात काल्पनिक गोष्ट रचली जात आहे – "कोणे एके काळी काही रिकामटेकडे आणि भोजनभाऊ होते व त्यांनी एक "संत" पुढे केला." आमच्या देशाला ह्यामुळे किती अपाय होईल ह्याचा जरा विचार करा. आणि तोसुद्धा अशा वेळी जेव्हा लोक भ्रमनिरासापायी माना टाकून पडलेत, बहुतेकांची मने पोकळ आणि भकास बनली आहे व निवडकांची मने औदासीन्याने भरलेली आहेत. हे सगळे भुकेले, आधाशी आत्मे दंतकथेसाठी गोंगाट करताहेत. वेदनेपासून मुक्त व्हायला, छळांचा शम करायला लोक अगदी आसुसले आहेत. आणि ह्याच कल्पित गोष्टीची त्यांनी वांच्छा धरली होती व नेमके हेच नकोसे आहे – पवित्र माणसाचे, संताचे जीवन. उलट त्यांचे मोठेपण आणि त्यांची शुचिता ह्यात आहे की, ते माणूस आहेत; वेडावून टाकणाऱ्या, छळवादी सौंदर्याचा तो माणूस आहे. खऱ्या अर्थाने माणूस आहे. येथे मी स्वत:लाच खोडून काढतोय असे भासते, पण काही हरकत नाही. स्वत:साठी नव्हे तर दुसऱ्यांसाठी देवाला शोधणारा तो माणूस आहे, तेव्हा ह्या माणसाला त्याने निवडलेल्या वाळवंटात स्वस्थ राहू द्यावे. त्याने आपल्याला नवा करार दिला आहे व खुद्द ख्रिस्तामधील अंतर्गत संघर्ष आपण विसरावेत म्हणून त्याने प्रभूची प्रतिमा अधिक सोपी केली आहे, प्रभूमधील आक्रमक वृत्ती नरम केल्या आहेत व त्यांच्या जागी "ज्यानं मला धाडला त्या प्रभूच्या इच्छेचे पालन" बसविले आहे. तल्स्तोय यांचा नवा करार खूपच अधिक स्वीकाराई आहे,

रशियन लोकांच्या "दुखण्यांना" तो मानवणारा आहे हे नाकारण्यात अर्थ नाही. ह्या लोकांना काहीतरी देणे आवश्यक होते, कारण ते तक्रारी करीत होते, त्यांच्या कण्हण्यामुळे पृथ्वी हादरत होती व "मोठ्या गोष्टी"-पासून मानवजातीचे चित्त ढळत होते. 'युद्ध आणि शांतता' व तत्सम बाबी शोकाकुल रशियन भूमीचे दु:ख आणि निराशा हलके करण्यात काहीही करीत नव्हत्या.

'युद्ध आणि शांतता' संबंधी ते स्वत:च म्हणाले होते: "खोटी नम्रता बाजूला ठेवल्यास ते दुसरे 'इलियड'[66] आहे." मि. इ. चैकोवस्कींनी तल्स्तोय यांच्या तोंडून त्यांच्या 'बालपण' आणि 'कुमारवय'[67] बद्दल असेच मूल्यमापन ऐकले होते.

नेपल्सहून काही पत्रकार नुकतेच आले आहेत. एक तर रोमहून धावत आलाय. तल्स्तोय यांच्या "पलायना"बाबत माझी प्रतिक्रिया ते विचारत आहेत. "पलायन" असा शब्द ते वापरतात. मी त्यांच्याशी बोलण्याचे नाकारले. अर्थात तुम्ही समजू शकता की, माझा आत्मा विलक्षण खळ-बळत आहे. तल्स्तोय यांचे संतामध्ये रूपांतर झाल्याचे पाहण्याची माझी इच्छा नाही. त्यांना पापीच राहूं दे, पापी जगाच्या काळजालगत राहूं दे, आम्हा प्रत्येकाच्या काळजाशी सदैव राहूं दे. पूष्कीन आणि ते यांच्या-पेक्षा अधिक थोर आणि अधिक प्रिय आम्हाला दुसरे काहीही नाही...

तल्स्तोय वारले.

तार आली आहे आणि तिच्यात सामान्य शब्दांमध्ये म्हटलेय-ते वारले.

तो काळजावर फार मोठा आघात होता. वेदना आणि दु:खापायी मी रडलो. आता अर्धवट विमनस्क अवस्थेत मी त्यांना डोळ्यांसमोर आणतो आहे—जसे ते मला माहीत होते, जसे मी त्यांना पाहिले होते—आणि त्यांच्याबद्दल बोलण्याची पीडादायी इच्छा मला होते आहे. शवपेटीत निजलेले ते मला दिसताहेत, पाण्याच्या प्रवाहातील गुळगुळीत पाषाणाप्रमाणे. अर्थात मुद्रेवर ते फसवे स्मित आहे—कमालीचे अलिप्त—त्यांच्या पांढऱ्या दाढीत शांतपणे लपलेले. आणि अखेरीस त्यांच्या हातांनी शांतपणे घडी घातलीय—त्यांचे कठीण काम त्यांनी पूर्ण केलेय.

त्यांचे तीक्ष्ण डोळे मला आठवतात—सर्व गोष्टींना ते पहात—आणि

त्यांची बोटे नेहमी हवेत काहीतरी आकृत्या काढताना भासत; त्यांचे बोलणे, त्यांचे विनोद, त्यांचे आवडते शेतकरी-शब्द आणि त्यांचा विलक्षण अनिश्चित आवाज. त्या माणसाने केवढे जीवन आलिंगले, किती अमानुष शहाणे होते ते! किती भेसूर!

एकदा मी त्यांना जसे पाहिले होते तसे बहुधा कुणीही कधीही पाहिले नसेल. गास्प्राच्या सागरतीरावरून मी फिरायला निघालो होतो आणि अचानक, युसूपोव इस्टेटीच्या बाहेरच, खडकांमध्ये त्यांची छोटी, अणीदार आकृती दिसली. चुरगळलेला राखी रंगाचा सूट त्यांनी परिधान केला होता व चुरडलेली टोपी त्यांच्या डोक्यावर होती. तेथे ते बसले होते हातांवर हनुवटी टेकवून समुद्राकडे टक लावून पहात. त्यांच्या दाढीचे पांढरे केस त्यांच्या हातांच्या बोटांमधून पांगले होते व हिरव्या छटेच्या छोट्या छोट्या लाटा त्यांच्या पायांपाशी लीनपणे आणि प्रेमळपणे धाव घेत होत्या. जणू ह्या वृद्ध महापंडिताला आपली कहाणी सांगत होत्या. तो ओझरत्या उजेडाचा दिवस होता. खडकांवर मेघांच्या सावल्या सरकत होत्या, त्यामुळे तो वृद्ध आणि खडक यांच्यावर आळीपाळीने ऊन-सावलीचा खेळ चालला होता. खोल भेगा पडलेल्या प्रचंड खडकांवर उग्र दर्पाच्या समुद्रलव्हाळ्यांचा थर साचला होता. आदल्या दिवशी महाप्रचंड लाटा खडकांवर येऊन आपटल्या होत्या. एखादा प्राचीन पाषाण अचानक सचेतन झाल्याप्रमाणे ते मला भासले. जणू सर्व गोष्टींचा आदी-अंत त्यांना माहीत होता आणि पृथ्वीवरील पाषाणांचा व गवताचा, महासागरातील पाण्याचा, माणसाचा व सबंध जगाचा, पाषाणांपासून सूर्यापर्यंत सर्वांचा अंत केव्हा घडणार याचे ते नवल करीत होते. सागर जणू त्यांच्या आत्म्याचा एक भाग होता व भोवतालचे सर्व काही त्यांच्यातून निर्माण झाले होते, त्यांचाच एक अंश होते. खिन्न चिंतनात गढलेली म्हाताऱ्याची ती निश्चल आकृती खालील अंधारामध्ये काहीशी प्रेषितासारखी, मंत्रमुग्ध, गहन भासत होती. पृथ्वी-वरील उंच निळ्या पोकळीत कसल्यातरी शोधात अदृश्य होत असल्यासारखी भासत होती. जणू आपली निर्धारशक्ती एकवटून तो लाटांना बोलावीत होता आणि परतवून लावीत होता, पाषाणांना हलविणाऱ्या व जाग आणणाऱ्या मेघांच्या आणि सावल्यांच्या हालचालींचे मार्गदर्शन करीत होता. आणि अचानक एका वेड्या क्षणी मला वाटले की, ते उठून उभे राहतील व हात हलवतील आणि सागर स्तब्ध होईल, काचेसारखा दिसेल; पाषाण

हलतील व आरोळी ठोकतील; भोवतालच्या सर्व गोष्टी सजग बनतील. प्रत्येक गोष्टीला कंठ फुटेल; स्वतःच्या, त्यांच्या, त्यांच्याविरुद्धच्या अशा अनेक भाषांमध्ये बोलू लागेल. त्या क्षणी मला काय वाटले होते ते शब्दांमध्ये मांडणे अशक्य आहे. माझ्या आत्म्यात उन्माद आणि भय होते. मग सर्व एका आनंदी विचारात एकवटले:

"जोवर हा माणूस ह्या जगात वसती करीत आहे तोवर मी अनाथ नाही."

त्यानंतर, पायांखालच्या गोटचांच्या आवाजामुळे त्यांचा समाधीभंग होऊ नये म्हणून मी सावकाशपणे मागे वळलो. आणि आता – मी अनाथ बनलोय असे मला जाणवतेय. मी लिहीत असताना आसवे गळताहेत. एवढचा खिन्नपणे, एवढचा निराशेने, एवढचा दुःखाने यापूर्वी मी कधीही रडलो नव्हतो. माझे त्यांच्यावर प्रेम होते अथवा नाही, हेसुद्धा मला माहीत नाही. पण त्यांच्याबद्दल मला प्रेम वाटत होते अथवा द्वेष वाटत होता ह्याचा संबंधच कुठे येतो? माझ्या मनात त्यांनी नेहमी भावना उचंबळून आणल्या होत्या. अफाट, कल्पनातीत खळबळ माजविली होती. त्यांनी निर्माण केलेल्या अप्रिय अथवा विरोधी भावनासुद्धा माणसाच्या मनाला दडपून टाकीत नसत, तर जणू त्यांचा विस्फोट होणार असे भासे. मनाचा त्या विस्तार करीत, त्याला अधिक संवेदनाक्षम बनवीत, त्याला अधिक क्षमता प्राप्त करून देत. जणू आपल्या पायांच्या तळव्यांनी जमिनीचा खडबडीतपणा नाहीसा करीत कडक चालीने पाय घाशीत अचानकपणे जेव्हा ते एखाद्या दारामागून अथवा कोपऱ्यावरून अवतीर्ण होत, जगाच्या पाठीवरून सतत चालण्याची सवय असलेल्या माणसाच्या छोटचा, हलक्या, वेगवान पावलांनी एखाद्याच्या दिशेने जात, कमरपट्टचात अंगठे खुपसून, क्षणभर थांबून व सभोवती चौकस दृष्टिक्षेप टाकून प्रत्येक नव्या गोष्टीला पाहून तिचे महत्त्व तात्काळ जाणून घेत, तेव्हा ते फार भव्य भासत.

"कसं काय?"

ह्या शब्दांचा मी नेहमी असा अर्थ लावलाय: "कसं काय – मला माहीत आहे की त्यात मला फारसा आनंद नाही आणि तुमच्या दृष्टीनं काही अर्थ नाही, पण तरीही: कसं काय!"

ते आत आले – एक छोटा माणूस. आणि तात्काळ प्रत्येकजण त्यांच्यापेक्षा लहान भासला. त्यांची शेतकरी धर्तीची दाढी, त्यांचे खरबरीत पण

असाधारण हात, त्यांचे साधे कपडे, त्यांचा हा सर्व बाह्य उबदार लोकशाही-वादी अवतार अनेकांना फसवायचा.

"अरे भल्या माणसा! तू आहेस होय! अखेर माझ्या मायभूमीचा थोर पुत्र पाहिल्याचा मला परमानंद झाला! रामराम, रामराम, तुला माझं वंदन असो!"

ही मॉस्को-रशियन पद्धत झाली. साधी आणि प्रेमळ. पण आणखी एक रशियन तऱ्हा आहे – "स्वतंत्र विचारा"ची तऱ्हा:

"ल्येव निकोलायेविच! तुमच्या धार्मिक आणि तत्त्वज्ञानपर विचारांशी सहमत नाही, पण तुमच्यातल्या थोर कलावंताबद्दल अतीव आदर..."

आणि त्या शेतकरीछाप दाढीखालून, चुरगळलेल्या लोकशाहीवादी झग्यामधून, अचानकपणे जुना रशियन सभ्य गृहस्थ, उत्तम उमराव, अवतीर्ण व्हायचा. मग "भाबडे", सुशिक्षित आणि इतर लोक गोठून काळेनिळे पडायचे. ह्या शुद्ध रक्ताच्या माणसाला पाहण्यात, त्याच्या हातवाऱ्यांमधील डौल आणि त्याचे उदात्तपण टिपून घेण्यात, त्याच्या बोलण्यातील मानी अलिप्तता निरखण्यात, त्याच्या उध्वस्त करणाऱ्या शब्दांमधील कमालीची अचूकता ऐकण्यात आनंद होता. भूदासांशी व्यवहार करण्याइतपत पुरेसा सद्गृहस्थीपणा त्यांच्यात होता. थोरले मालक तल्स्तोय यांच्यासमोर हजर व्हायच्या तयारीने भूदास आले, म्हणजे तल्स्तोय अत्यंत सहजपणे वावरत, त्यांना घट्ट आलिंगने देत. ते बिचारे दबून जात आणि किंचाळत.

अशाच एका "साध्या" रशियनाबरोबर एकदा यास्नाया पल्याना ते मॉस्को असा प्रवास मी केला होता. त्याला स्वतःचा तोल सावरायला बराच काळ लागला. केविलवाणे स्मित करीत विमनस्कपणे तो पुनःपुन्हा म्हणत होता:

"बापरे, कसला खरपूस चोप! केवढे भयानक होते नाही ते!"

आणि मग खिन्नपणे तो उद्गारला:

"ते खरंच अराजकवादी होते असं मला वाटलं. प्रत्येकजण त्यांना अराजकवादी म्हणतो आणि मी त्यावर विश्वास ठेवला..."

तो एक धनिक, मोठा उद्योगपती होता. त्याचे पोट प्रचंड सुटलेले होते आणि कच्च्या मांसाच्या रंगाचा लठ्ठ चेहरा होता. तल्स्तोयनी अराजकवादी असावे अशी त्याची का इच्छा होती? रशियन मनाचे हे एक "अत्यंत गहन गुपित" राहिले आहे.

तल्स्तोय जेव्हा प्रसन्न करू इच्छित तेव्हा एखाद्या सुंदर, बुद्धिमान स्त्रीपेक्षा अधिक सहजतेने हे कार्य ते पार पाडत. विविध लोकांच्या वर्तुळात ते बसले आहेत – ग्रँड ड्यूक, घरांचे रंगारी, याल्टाचे एक सोशल-डेमोक्रॅट, स्तंदिस्त, एक संगीतकार, काऊंटेसचे कारभारी, कवी – सर्वजण त्यांच्याकडे प्रेमासक्त डोळ्यांनी पहात आहेत. लाओ-त्से[68] याच्या तत्त्वज्ञानाचे विवेचन ते त्यांच्यासमोर करीत आहेत. एकपात्री वाद्यवृंदासारखे ते मला भासत आहेत; ट्रम्पेट, ड्रम, ॲकॉर्डियन आणि बासरी अशी अनेक वाद्ये एकाच वेळी वाजविण्याची कुवत असलेल्या माणसासारखे. मीसुद्धा त्यांच्याकडे टक लावून पहात होतो. आणि आता परत एकदा त्यांना टक लावून पाहण्याची इच्छा होतेय – पण मी त्यांना परत कधीही पाहू शकणार नाही.

येथे बातमीदार आले होते. "ल्येव तल्स्तोय यांच्या मृत्यूची अफवा खोटी असल्याबद्दलची" तार रोमहून आल्याचे ते सांगत होते. त्यांनी खूप गोंगाट आणि बडबड केली. रशियाबद्दल गुळमुळीत सहानुभूती व्यक्त केली. रशियन वृत्तपत्रांनी संशयाला जागा ठेवली नाही.

त्यांच्याशी खोटे बोलणे अशक्य होते. अगदी करुणेपोटीसुद्धा. कोणतीही करुणा उत्पन्न न करता ते अत्यंत आजारी पडू शकत. त्यांच्यासारख्या माणसांची कीव करणे मूर्खपणाचे आहे. त्यांची काळजी घेतली पाहिजे आणि त्यांना जपून ठेवले पाहिजे. झिजलेल्या, कठोर शब्दांची धूळ त्यांच्यावर शिंपडायची नाही.

"मी तुम्हाला आवडत नाही, होय ना?" त्यांनी विचारले. आणि उत्तर असले पाहिजे: "नाही, मला नाही आवडत."

"तुमचं माझ्यावर प्रेम आहे, खरंच?" "नाही, आज माझं तुमच्यावर प्रेम नाही."

अत्यंत निष्ठुरपणे ते प्रश्न विचारीत आणि संन्याशाला शोभतील अशी त्यांची उत्तरे माफक असत.

भूतकाळाबद्दल ते अत्यंत सुरेख बोलत आणि सर्वांत उत्तम तुर्गेनेवबद्दल. फेटचा उल्लेख ते नेहमी गंमतीने गालातल्या गालात हसून करीत, नेहमी त्याची एखादी विनोदी आठवण सांगत. नेक्रासोवबद्दल[69] ते थंडपणे, संशयाने बोलत. पण एकूण लेखक म्हणजे त्यांची मुले असल्याप्रमाणे ते बोलत. ह्या मुलांच्या सर्व उणीवा ठाऊक असलेले ते बाप होते. पण त्या मुलांच्या गुणांपेक्षा त्यांच्या अवगुणांना उघडकीस आणण्याचा त्यांचा

अट्टाहास जाणवे. जेव्हा एखाद्याची मानहानी करणारे असे काहीतरी ते बोलत, तेव्हा जणू आपल्या श्रोत्यांना ते दान टाकीत असल्याचा मला नेहमी भास होई. त्यांची टीका ऐकणे म्हणजे व्यग्र होणे. त्यांच्या तीक्ष्ण स्मितापुढे नजर नकळत खाली वळायची आणि स्मरणात काहीही रहायचे नाही.

एकदा त्यांनी तावातावाने वाद घातला की, ग्री. उस्पेन्स्कीनी[70] तूलाच्या बोलभाषेत लिहिले होते व त्यांच्यापाशी काहीही गुण नव्हते. आणि तरीही माझ्या उपस्थितीत आ. चेखोवना ते म्हणाले होते:

"हा लेखक तुम्ही पहा! त्याची कमालीची प्रामाणिकता पाहिली म्हणजे दस्तोयेवस्कीची आठवण येते, पण दस्तोयेवस्की राजकारणात लुड-बुडत होता आणि वेगवेगळे पवित्रे घेत होता. उस्पेन्स्की त्यापेक्षा खूपच साधा आणि प्रामाणिक आहे. जर त्यानं देवावर विश्वास ठेवला असता, तर तो नक्की पंथविरोधी बनला असता."

"पण तुम्ही म्हणाला होतात की, तो तूलाचा लेखक होता आणि त्याच्यात अजिबात गुण नव्हते."

त्यांच्या केसाळ भुवयांमध्ये त्यांचे डोळे अदृश्य झाले व ते म्हणाले:

"त्याची लेखनशैली वाईट होती. ती काय भाषा म्हणायची? शब्दां-पेक्षा विरामचिन्हंच जास्त. गुण म्हणजे प्रेम. जो प्रेम करतो तो गुणी. प्रेमीजनांकडं जरा नजर टाका—ते सगळे गुणी आहेत."

दस्तोयेवस्कीबद्दल उघड अनिच्छेने ते बोलत. जणू कशावरतरी मात करण्याचा प्रयत्न करीत असल्याप्रमाणे अवघडून, उडवाउडवीचे बोलत.

"त्यानं कन्फ्यूशियच्या[71] अथवा बुद्धाच्या तत्त्वांचा अभ्यास करायला पाहिजे होता. त्यामुळं तो शांत बनला असता. प्रत्येकानं जाणून घ्यावी अशी ती थोर गोष्ट आहे. तो कमालीची संवेदनाशील माणूस होता—जेव्हा त्याला राग यायचा तेव्हा त्याच्या टकलावर टेंगळे येत आणि त्याचे कान थरथरत. त्याला जाणवायचं खूप, पण विचार कसा करायचा हे माहीत नव्हतं. फूरयेवाद्यांकडून,[72] बूताशेविच[73]कडून आणि तत्सम मंडळींकडून तो विचार करायला शिकला. आणि मग सगळं आयुष्य त्यानं त्यांचा द्वेष केला. त्याच्या रक्तात काहीतरी यहुदी अंश होता. तो संशयी, गर्विष्ठ, हेकेखोर आणि दीनवाणा होता. खूप माणसं त्याची पुस्तकं वाचतात ही मोठी गंमतीची गोष्ट आहे. कारण मला समजत नाही.

सरतेशेवटी सगळं अवघड आणि व्यर्थ आहे. ते सगळे वेडे,[74] पौगंडावस्थी,[75] रास्कोल्नीकोव[76] आणि बाकीचे मुळीच तसे नव्हते. खरं म्हणजे सर्व काही खूपच साधं आणि अधिक आकलनीय होतं. आता लेस्कोवला लोक का वाचत नाहीत? तो खरा लेखक आहे–तुम्ही वाचलाय त्याला?"

"हो तर! मला तो आवडतो. विशेषत: त्याची भाषा!"

"त्याला भाषेचं उत्तम ज्ञान होतं, तिच्याशी तो हवं तसा खेळू शकायचा. तुम्हाला तो आवडतो म्हणजे गंमत आहे. तुमच्यात काहीतरी बिन-रशियन आहे, तुमचे विचार रशियन विचार नाहीत. मी असं म्हटलं तर चालेल ना? तुम्ही दुखावणार तर नाही ना? मी म्हातारा झालोय आणि कदाचित इत:पर आधुनिक साहित्याचं आकलन करून घेण्याची माझ्यात क्षमता राहिली नसेल, पण मला नेहमी भासत आलंय की, ते काही रीतीनं बिन-रशियन आहे. लोक काही विशिष्ट प्रकारची पद्यरचना करतात. त्या कविता कशासाठी आणि कुणासाठी हे मला माहीत नाही. पूष्कीन, त्यूतचेव,[77] यांच्यापासून आपण कविता कशी लिहायची हे शिकलं पाहिजे. आता तुम्ही"–चेखोवकडे वळून ते म्हणाले–"तुम्ही रशियन आहात. होय, तुम्ही फार, फार रशियन आहात."

आणि प्रेमळ स्मित करीत त्यांनी चेखोव यांच्या खांद्याभोवती आपल्या हाताचा विळखा घातला. चेखोव शरमून गेले व त्यांच्या घरासंबंधी आणि तातारांसंबंधी खर्ज स्वरात बोलू लागले.

चेखोव यांच्यावर त्यांचे प्रेम होते. जेव्हा ते त्यांच्याकडे पहात तेव्हा त्या क्षणाला त्यांची नजर खूप प्रेमळ बने, जणू चेखोव यांचा चेहरा ती कुरवाळतेय असे भासे. एक दिवस चेखोव बागेतील पायवाटांवरून तल्स्तोय यांची मुलगी अलेक्सान्द्रा ल्वोवना[78] बरोबर फिरत होते व त्यावेळी अद्याप आजारातून बरे न झालेले तल्स्तोय व्हरांड्यात आरामखुर्चीवर बसले होते, पण सर्वांगाने जणू ते चेखोवपाशी जाऊ पहात होते.

"किती मोहक, छान माणूस आहे! नम्र, शांत, अगदी एखाद्या तरुण स्त्रीसारखा! चालतोसुद्धा मुलीप्रमाणं. अत्यंत छान माणूस!" खालच्या आवाजात ते म्हणाले.

एके संध्याकाळी, धूसर प्रकाशात, कपाळाला आठ्या घालून आणि भुवयांची थरथर करीत त्यांनी आम्हाला 'फादर सेर्गेई'मधील एक प्रसंग वाचून दाखविला. त्यात ती बाई संन्याशाला वश करण्यासाठी जाते. त्यांनी

तो प्रसंग पुरता वाचला, मान वर केली, डोळे मिटले व खणखणीत आवाजात ते म्हणाले :

"म्हाताऱ्यानं चांगलं लिहिलंय – फारच छान!"

त्यांनी एवढ्या साधेपणाने ते शब्द उच्चारले होते, स्वतःच्या लेखन-सौंदर्याचे कौतुक एवढे प्रामाणिक होते, की तेव्हा मला जाणवलेली आनंदाची ऊर्मी मी कधीही विसरणार नाही. त्या भावनेला मी कधीही शब्दांमध्ये मांडू शकलो नाही आणि ती लपवून ठेवायला मला महासायास पडले. माझे काळीज जणू थबकल्याचा भास झाला आणि दुसऱ्याच क्षणी प्रत्येक गोष्ट परत सचेतन झाल्यासारखी, ताजी, नवीन झाल्यासारखी वाटली.

वरकरणी चुकीच्या वाटणाऱ्या, विशिष्ट शब्दांची वारंवार पुनरुक्ती असणाऱ्या, शेतकरी धाटणीच्या साधेपणाने भरलेल्या त्यांच्या बोलण्या-मधील अव्यक्त, वैयक्तिक गोडवा केवळ त्यांना बोलताना पाहणारेच जाणू शकत. त्यांच्या आवाजातील चढ-उतारांमध्ये आणि त्यांच्या मुद्रेवरील उत्फुल्लतेतच केवळ त्यांच्या शब्दांची ताकद सामावलेली नव्हती, तर त्यांच्या नेत्रांच्या विभ्रमात आणि तेजातही सामावलेली होती. तसे बोलके डोळे मी आजवर दुसरीकडे कुठेही पाहिलेले नाहीत. तल्स्तोय यांच्या डोळयां-च्या एका जोडीत हजार नेत्र सामावले होते.

सूलेर, चेखोव, सेर्गेई[79] आणि आणखी कुणीतरी बागेत बसून स्त्रियां-बद्दल बोलत होते. खूप वेळपर्यंत ते त्यांचे बोलणे गप्प बसून ऐकत राहिले आणि मग एकदम म्हणाले :

"माझा एक पाय थडग्यात असेल तेव्हा मी बायकांबद्दलचं सत्य सांगीन. मग मी माझ्या शवपेटीत उडी मारीन आणि झाकणाखाली लपून राहीन – मग मला पकडायचा प्रयत्न करून पहाच!" त्यांचे डोळे एवढे बंडखोरपणे आणि भयानक चमकत होते की काही क्षण कुणीही काहीही बोलले नाही.

मला असे दिसते की, वासिली बूस्लायेव यांचे औद्धत्य आणि फादर आव्वाकूम यांचा काहीसा हट्टाग्रह ह्यांचे मिश्रण त्यांनी स्वतःमध्ये केले होते. शिवाय चादायेवचा[80] संशयीपणा लपलेला होताच. आव्वाकूम प्रवृत्ती उपदेश करायची, कलावंताच्या आत्म्याचा छळ करायची; त्यांच्यातील नवगोरद लुच्चा दान्ते[81] आणि शेक्सपीयरचा[82] निषेध त्यांना करायला लावायचा, तर छादायेव प्रवृत्ती ह्या आत्म्याच्या करमणुकींना आणि छळांना पाहून गालातल्या गालात हसायची.

त्यांच्यातील पारंपारिक रशियन त्यांना विज्ञानाचा आणि शासकीय तत्त्वाचा निषेध करायला लावायचा. उदात्त धर्तीवर जीवन उभारण्याच्या असंख्य प्रयत्नांच्या व्यर्थतेपायी निष्क्रीय अराजकवादाकडे वळलेला रशियन.

एक वैशिष्टचपूर्ण गोष्ट: «Simplicissimus» चे [83] व्यंग्यचित्रकार ओलाफ गूलब्रान्स्सोन यांनी कसल्याशा गूढ अंत:प्रेरणेच्या शक्तीद्वारे तल्स्तोय यांच्यामधील बूस्लायेव प्रवृत्ती शोधून काढली. त्या चित्राकडे लक्षपूर्वक पहा आणि खऱ्या तल्स्तोय यांच्याशी त्यात किती साम्य आहे पहा; खोल डोळ्यांचा तो चेहरा किती उद्धट मनाने तुमच्याकडे पाहतो आहे पहा. ह्या मनाला काहीही पवित्र वाटत नाही, त्याला भाबड्या समजुती नाहीत अथवा रिकामटेकड्या श्रद्धा नाहीत.

प्रत्येकाला परका असणारा हा महापंडित माझ्या नजरेसमोर उभा आहे. विचारांच्या वाळवंटांमध्ये एकाकी प्रवास करून सर्वस्पर्शी सत्याचा शोध घेण्याचा त्याने व्यर्थ प्रयत्न केला. मी त्याच्याकडे टक लावून पाहतो आणि गमावण्याची वेदना फार मोठी असली, तरीही ह्या माणसाला पाहिल्याचा अभिमान माझ्या वेदनेला आणि दु:खाला काहीसे हलके करतो.

तल्स्तोय यांना "तल्स्तोयवाद्यां"*मध्ये पाहणे विचित्र वाटे; त्यांच्यात ते एखाद्या भव्य घंटाबुरूजाप्रमाणे उभे आहेत आणि त्यांची घंटा सबंध जगात अखंडपणे वाजते आहे. तर त्यांच्या सभोवती छोटी, चोरटेपणाने वागणारी कुत्री घोटाळत आहेत, त्या घंटानादानुसार भुंकताहेत, एकमेकांना न्याहाळून पहात आहेत. जणू सर्वांत जास्त चांगले कोण भुंकतो हे पाहण्यासाठी. मला नेहमी वाटत आले होते की, यास्नाया पल्याना येथील घर आणि कांऊंटेस पानिना यांची हवेली, अशा दोन्ही स्थळी ह्या लोकांनी ढोंगाचे, भित्रेपणाचे, सौदेबाजीचे व वारसांच्या अपेक्षांचे वातावरण भरून टाकले होते. हे "तल्स्तोयवादी" आणि रशियाच्या एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंत संचार करणारे, पवित्र अवशेष म्हणून कुत्र्यांची हाडे वाटणारे, "इजिप्तचे गुह्य" आणि देवाच्या मातेचे "अश्रू" यांचा व्यापार करणारे यात्रेकरू, यांच्यात काहीतरी साम्य आहे. अशा एका धर्मप्रचारकाने कोंबडी-

---

* तल्स्तोयवादी – मनोराज्यवादी धार्मिक-सामाजिक आंदोलनात भाग घेणारे. नैतिक-धार्मिक सुधारणांच्या मदतीने समाजाचे स्थित्यंतर घडविण्यासंबंधी तल्स्तोय यांच्या शिकवणीचा प्रचार ते करीत.

बद्दलच्या सहानुभूतीपायी यास्नाया पल्याना येथे अंडे नाकारले होते, पण तूला येथील स्टेशनवरच्या उपाहारगृहात मिटक्या मारीत मांस खात म्हटल्याचे मला आठवते :

"म्हातारा अतिरेक करतो!"

ते सगळे उसासे टाकण्यात आणि चुंबने घेण्यात मग्न आहेत, त्या सर्वांचे हात घामट आणि मांसल आहेत व फसवे डोळे आहेत. मात्र त्याचवेळी ही माणसे व्यवहारी वृत्तीची आहेत आणि स्वतःचे ऐहिक व्यवहार अत्यंत सफाईने पार पाडतात.

अर्थात तल्स्तोय यांनी "तल्स्तोयवाद्यांचे" खरे मूल्यमापन केले होते, त्याचप्रमाणे सूलेरझित्स्कीने केले होते. सूलेरझित्स्कीबद्दल तल्स्तोय नेहमी युवा-उत्साहाने आणि कौतुकाने बोलत. त्याच्यावर त्यांची फार ममता होती. एक दिवस एका व्यक्तीने मोठ्या खुमासदारपणे कथन केले की, यास्नाया पल्याना येथे तिचे जीवन अत्यंत सोपे बनले होते आणि तल्स्तोय यांच्या तत्त्वांचा स्वीकार केल्यापासून मन निर्मळ बनले होते. ल्ये. नि. माझ्या दिशेने किंचित झुकले व हळूच म्हणाले :

"हरामखोर खोटं बोलतोय, पण मला सुख मिळावं म्हणून तसं वागतोय."

अनेकांनी त्यांना सुख देण्याचा यत्न केला, पण ते काम उत्तम रीतीने कुणी केल्याचे माझ्या कधी पाहण्यात आले नाही. सार्वत्रिक क्षमा, शेजाऱ्यावर प्रेम, नवा करार आणि बौद्ध धर्म ह्या त्यांच्या पारंपारिक विषयांवर ते माझ्याशी क्वचित बोलत. "माझ्यासारख्या" लोकांना त्या गोष्टी नव्हेत ह्याची आरंभापासूनच त्यांना जाणीव झाली होती. मला हे खूप आवडले होते.

जेव्हा त्यांची इच्छा असे तेव्हा ते अत्यंत मोहकरीत्या चतुर, सहानुभूतीपूर्ण व सौजन्याने वागत. तेव्हा मूर्तिमंत साधेपणाने आणि डौलाने ते बोलत. पण काहीवेळा त्यांना ऐकणे अगदी त्रासदायक होई. स्त्रियांविषयी ज्या तऱ्हेने ते बोलत, ती तऱ्हा मला कधीही आवडली नाही. ह्या बाबतीत ते अगदी "सामान्यमाणसा"प्रमाणे बोलत. त्यांच्या शब्दांमध्ये काहीतरी कृत्रिमता ध्वनित होई, काहीसा अप्रामाणिकपणा आणि त्याचवेळी आत्यंतिक खाजगीपणा जाणवे. जणू कुणीतरी केव्हातरी त्यांना दुखावले होते आणि ती दुखापत ना ते विसरू शकत होते, ना तिला क्षमा करू शकत होते.

त्यांच्याशी प्रथम माझी ओळख झाली त्या संध्याकाळी ते मला त्यांच्या अभ्यासिकेत घेऊन गेले. त्यांनी मला स्वतःच्या पुढ्यात बसविले आणि 'वारेन्का ओलेसोवा' व 'सव्वीस आणि एकटी'[84] बद्दल बोलायला आरंभ केला. त्यांच्या स्वराने मी निराश झालो, अगदी गोंधळून गेलो. निकोप तरुण मुलीला लज्जा वाटणे स्वाभाविक नाही असे अत्यंत ओबडधोबड आणि कठोरपणे मला पटवून देण्याचा त्यांनी प्रयत्न केला.

"जर एखाद्या मुलीचा पंधरावा वाढदिवस झाला असेल आणि ती निरोगी असेल, तर कुणीतरी तिचं चुंबन घ्यावं, तिला आलिंगन द्यावं, अशी तिची इच्छा असते. जे तिला माहीत नसतं आणि समजतही नसतं, त्यापासून तिचं मन माघार घेत असतं. त्यालाच लोक पावित्र्य आणि लज्जा म्हणतात. पण तिच्या देहाला एव्हाना माहीत असतं की, ती अनाकलनीय गोष्ट अटळ आहे, कायदेशीर आहे आणि मनाविरुद्ध ह्या नियमाच्या पूर्णतेची मागणी तो करीत असतो. तुमची वारेन्का ओलेसोवा निकोप आहे असं तिचं वर्णन केलंय, पण तिच्या भावना मात्र रक्तक्षयी प्राण्याच्या आहेत – हे सगळं चुकीचं आहे!"

मी त्याला विरोध केला नाही. अचानक ते प्रेमळ व समजूतदार बनले; माझ्या पत्नीची, माझ्या अभ्यासांची, माझ्या वाचनाची त्यांनी चौकशी केली.

"लोक सांगतात त्याप्रमाणं खरंच तुमचं उत्तम वाचन झालंय? कोरोलेन्को संगीतकार आहे?"

"मला तसं वाटत नाही. मला माहीत नाही."

"खरंच? त्याच्या गोष्टी तुम्हाला आवडतात?"

"खूप."

"ते केवळ विरोधी परिस्थितीपायी. तो कवी आहे आणि तुमच्यात कवीचा अंशही नाही. वेल्तमन[85] वाचलाय?"

"हो."

"चांगला लेखक आहे, होय ना? बुद्धिमान, अचूक, कधीही अतिरेक करत नाही. काहीवेळा तर गोगोलपेक्षा तो जास्त चांगला वाटतो. त्याला बाल्झाक ठाऊक होता. तुम्हाला माहीत आहे, गोगोलनं मार्लीन्स्कीची[86] नक्कल केली."

गोगोलवर बहुधा हॉफमान्न, स्टेर्न[87] आणि कदाचित डिकन्सचा प्रभाव

होता असे जेव्हा मी म्हटले तेव्हा त्यांनी माझ्याकडे एक कटाक्ष टाकला व विचारले :

"कुठं वाचलंत हे? नाही वाचलं? हे खरं नाही. गोगोलनं डिकन्स वाचला होता असं मला वाटत नाही. पण तुम्ही खरंच खूप वाचलंय. जरा जपून – ते धोक्याचं आहे. कोल्त्सोवनं[४४] तशा रीतीनं स्वतःचा नाश करून घेतला."

मला निरोप देतेवेळी त्यांनी माझ्याभोवती हातांचा विळखा घातला व माझे चुंबन घेऊन ते म्हणाले :

"तुम्ही खरे शेतगडी आहात! लेखकांमध्ये तुम्हाला कठीण जाईल, पण कुणालाही भिऊ नका. नेहमी स्वतःला वाटतं ते बोला. काहीवेळा ते बोलणं उद्धट वाटलं तरी क्षिती बाळगू नका. हुशार माणसं ते समजून घेतील."

ह्या पहिल्या भेटीचा माझ्यावर दुहेरी ठसा उमटला. तल्स्तोयना भेटलो म्हणून मला आनंद झाला होता व अभिमानही वाटला होता, पण त्यांचे बोलणे काहीसे उलटतपासणीसारखे वाटले होते. 'कझ्झाक', 'एका घोड्याची कहाणी' 'युद्ध आणि शांतता' ह्यांच्या लेखकाला जणू मी भेटलो नव्हतो, तर लीनता पत्करून, "सर्वसामान्य" रीतीने बोलणे आवश्यक होते असे मानून रस्त्यांवरची भाषा वापरणाऱ्या एका सद्गृहस्थाला भेटलो होतो. आणि ह्यामुळे त्यांच्याविषयीची माझी कल्पना – ज्या कल्पनेची मला सवय झाली होती व जी मला प्रिय बनली होती – काहीशी विस्कटून गेली होती.

पुढच्या वेळी मी त्यांना यास्नाया पल्यानामध्ये भेटलो. तो शरदामधील एक कुंद दिवस होता. पावसाची सुरेख झिमझिम चालली होती. त्यांनी अंगात अवजड ओव्हरकोट घातला होता, पाणी आत न जाणारे गुडघ्यांपर्यंतचे बूट पायात चढविले होते. भोजवृक्षांच्या राईत ते मला फिरायला घेऊन गेले. पाण्याच्या ओहोळांवरून आणि डबक्यांवरून तरुणाच्या उत्साहाने ते उड्या मारीत होते, फांद्यांवरून त्यांच्या डोक्यावर टपकलेले पावसाचे थेंब झटकून टाकीत होते व नेमक्या ह्याच राईत शेन्शीन यांनी त्यांना शॉपेनहॉवर कसा समजावून सांगितला होता ह्याचा चटकदार वृत्तांत कथन करीत होते. भोजवृक्षांच्या ओलसर, रेशमी बुंध्यांना ते प्रेमाने कुरवाळीत होते.

"अलिकडे मी काही कविता वाचल्या :

अळंब्या आता उरल्या नाहीत, पण सगळ्या पोकळ्यांमध्ये
अळंब्यांचा ओलसर गंध भरून राहिलाय...

– फार छान, उत्तम निरीक्षण आहे."

अचानक आमच्या अगदी पायांशीच एक ससा दचकून उठला. तल्स्तोय यांनी अतिउत्तेजित होऊन उडी मारली. त्यांचे गाल लाल बनले आणि त्यांनी एक आरोळी ठोकली. ज्याचे वर्णन करता येणार नाही असे स्मित करीत मग त्यांनी माझ्याकडे पाहिले व अत्यंत समंजसपणे, अगदी माणसासारखे ते हसले. त्या क्षणाला ते कौतुकास्पद होते.

आणखी एका वेळी, बागेत फिरत असताना, शेतवाडीवर घिरट्या घालणाऱ्या एका बहिरीससाण्याच्या जातीच्या पक्ष्याकडे त्यांनी पाहिले. तो शिकारी पक्षी आकाशात स्तब्ध रहात होता व आत्ता झेप घ्यावी अथवा थोडे थांबावे अशा विचाराने मंदपणे पंख हलवीत होता. तल्स्तोय तात्काळ सावध बनले. हाताच्या पंजाने स्वतःच्या डोळ्यांवर आडोसा धरीत ते अस्वस्थपणे पुटपुटले :

"तो हरामखोर आमच्या कोंबडीच्या पिलांमागं आहे. पहा, पहा – आता – अरेच्चा, तो घाबरतोय! बहुधा आमचा गाडीवान तिथं असावा – आपण गाडीवानाला हाक मारली पाहिजे..."

आणि त्यांनी हाक मारली. जेव्हा ते ओरडले तेव्हा शिकारी पक्षी घाबरला व दूर उडून गेला. तल्स्तोय यांनी उसासा टाकला व उघडपणे स्वतःला दोष देत म्हणाले.

"मी ओरडायला नको होतं – एरवीसुद्धा तो निघून गेला असता..."

एकदा तिफ्लिसविषयी * बोलत असताना वि. वि. बेर्वी-फ्लेरोवस्की[89] यांचा मी उल्लेख केला.

"तुम्ही त्यांना ओळखता?" ल्ये. नि. यांनी अधीरपणे विचारले. "त्यांच्याबद्दल मला माहिती सांगा."

मी त्यांना सांगायला सुरुवात केली की; फ्लेरोवस्की उंच होते, त्यांची दाढी लांब होती, शरीरयष्टी सडपातळ होती, डोळे मोठे होते, शिडाच्या कापडाचा लांब अंगरखा ते घालायचे, लाल मद्यात शिजवलेल्या भाताची

---

* तिफ्लिस – आजचे त्बिलिसी.

छोटी पिशवी त्यांच्या कमरपट्ट्याला लटकत असायची आणि कॅन्व्हासची प्रचंड छत्री घेऊन ते फिरायचे ; कॉकेशसपार पहाडांमध्ये माझ्याबरोबर ते फिरले होते आणि एकदा एका अरुंद पाऊलवाटेवर आम्हाला एक बैल आडवा आला होता, त्या चिडलेल्या जनावराला उघडचा छत्रीची भीती दाखवून आम्ही त्याच्या तावडीतून निसटलो होतो, पण सारा वेळ मागे सरकत जात असताना आम्ही खोल दरीत. पडण्याचा धोका होता. अचानक तल्स्तोय यांच्या डोळयांमध्ये अश्रू तरारल्याचे मी पाहिले आणि शरमून मी बोलायचा थांबलो.

"तुम्ही इकडं लक्ष देऊ नका, बोला, पुढं बोला! एका भल्या माणसाविषयी ऐकण्याच्या आनंदापायी असं झालंय! किती स्वारस्यपूर्ण माणूस असावा तो! त्याच्याबद्दल तशीच कल्पना केली होती – इतर माणसांप्रमाणं नाही! सर्व जहाल लेखकांमध्ये तो सर्वांत जास्त परिपक्व, शहाणा आहे. त्याच्या 'वर्णलिपी' मध्ये त्यानं मोठ्या समर्थपणानं दाखवून दिलंय की, आपली सर्व सुशिक्षितावस्था रानटी आहे, तर संस्कृती ही बाब शांततावादी टोळयांची आहे; सामर्थ्यवानांची नव्हे, तर दुबळयांची ती बाब आहे; आणि जीवनसंघर्ष म्हणजे वाईटाचं समर्थन करण्यासाठी शोधून काढलेलं असत्य. अर्थात तुम्ही ह्या विचारांशी सहमत नाही. पण दॉदे [90] सहमत होता, त्याचा पॉल ॲस्टीए [91] आठवा."

"उदाहरणादाखल बोलायचं तर फ्लेरोवस्की यांची विचारप्रणाली आणि युरोपच्या इतिहासातली नॉर्मन लोकांची भूमिका ह्यांची संगती कशी लावायची?"

"नॉर्मनांची! [92] ती बाब वेगळी आहे."

जर त्यांच्यापाशी उत्तर तयार नसले तर ते म्हणायचे: "ती बाब वेगळी आहे."

मला नेहमी जाणवत आले आणि माझी गैरसमजूत होती असे मला वाटत नाही, की ल्ये. नि. यांना साहित्याबद्दल बोलायला आवडत नसे, पण लेखकाच्या व्यक्तिमत्वाबाबत मात्र त्यांना विलक्षण कुतूहल वाटायचे. त्यांच्याकडून वारंवार मी प्रश्न ऐकायचा: "तुम्ही त्याला ओळखता? कसा आहे तो? कुठं जन्म झाला त्याचा?" आणि त्यांच्या चर्चांमध्ये जवळ जवळ नेहमी व्यक्तीचा खास दृष्टिकोनामधून परामर्श असायचा.

वि. कोरोलेन्कोबद्दल ते विचारमग्न होऊन म्हणाले:

"ते वेलिकोरूस * नाहीत आणि म्हणून आपलं आयुष्य आपल्यापेक्षा अधिक चांगल्या रीतीनं आणि अधिक स्पष्टपणानं ते पाहू शकतील."

त्यांचे निरतिशय प्रेम असलेल्या चेखोवबद्दल ते म्हणाले होते :

"त्यांच्या व्यवसायानं त्यांना बिघडवलं. जर ते डॉक्टर नसते, तर त्यांनी अधिक चांगलं लिहिलं असतं."

एका तरुण लेखकाबद्दल ते म्हणाले :

"इंग्रज माणूस असल्याचा तो आव आणतो, पण मॉस्कोच्या लोकांना ते जमत नाही."

मला त्यांनी अनेकदा सांगितले :

"तुम्ही अद्भुत कथा-कादंबऱ्या लिहिणारे आहात. तुमचे सगळे कूवाल्दा[93] आणि इतर निव्वळ काल्पनिक आहेत."

कूवाल्दा हे पात्र प्रत्यक्ष जीवनातून घेतल्याचे मी त्यांना सांगितले.

"कुठं भेटला तो तुम्हाला?"

कझानचे शांततारक्षक अधिकारी कलोन्तायेव यांच्या कचेरीत कूवाल्दा म्हणून ज्याची व्यक्तीरेखा मी रेखाटली तो इसम मला प्रथम कसा भेटला हा प्रसंग मी वर्णन करून सांगितला तेव्हा त्यांना भारी मौज वाटली.

"खानदानी रक्त! ह्याला म्हणतात खानदानी रक्त!" ते हसत आणि डोळे पुसत म्हणाले. "पण किती मोहक आणि गंमतीदार माणूस! तुम्ही गोष्टी लिहिता त्यापेक्षा जास्त चांगल्या निवेदन करता. तुम्ही कल्पनावादी आहात, तुम्ही शोधक आहात आणि तुम्ही हे कबूल कराल."

मी म्हणालो की बहुधा सगळेच लेखक एका विशिष्ट मर्यादेपर्यंत कल्पना लढवत असतात. वास्तव जीवनात कशा प्रकारची माणसे त्यांना आवडली असती ते दाखवीत असतात. मी असेही सांगितले की, जीवनातील वाईट गोष्टींना सर्व ताकदीनिशी – हिंसेचा वापर करूनही – विरोध करण्याची इच्छा बाळगणारे क्रियाशील लोक मला आवडत होते.

"पण खुद्द हिंसा हीच मुख्य वाईट गोष्ट आहे!" माझा दंड धरीत ते ओरडले. "लेखका, तिच्यापासून तू दूर कसा जाणार? 'माझा सह-प्रवासी' – आता ती काल्पनिक नाही, ती चांगली आहे, कारण काल्पनिक

---

* १८ व्या शतकातील साहित्यात रशियनांना दिलेले नांव – सं.

नाही. पण जेव्हा विचार करायला सुरुवात करता तेव्हा तुमचे सगळे लोक सरदार बनतात..."

मी शेरा मारला की, जोवर आपण अटळ माकडासमान "सहप्रवाशां" च्या वेढ्यात रहात आहोत, तोवर आपले सगळे बांधकाम वाळूवरचे बांधकाम ठरणार आणि ते विरोधी वातावरणात घडणार.

आपल्या हाताच्या कोपराने मला हळूच ढोसून ते गालातल्या गालात हसले.

"ह्यावरून फार फार धोकेबाज निष्कर्ष काढता येईल. तुम्ही खरे समाजवादी नाही. तुम्ही कल्पनावादी आहात आणि कल्पनावादी नेहमी असतात त्याप्रमाणं हमखास राजनिष्ठवादी असतात."

"व्हिक्टर ह्यूगोबाबत काय म्हणाल?"

"व्हिक्टर ह्यूगो वेगळा आहे. मला तो आवडत नाही. फार गोंगाटचा आहे."

मी काय वाचत होतो ह्याबद्दल ते मला वारंवार विचारीत आणि माझ्या पुस्तकांची वाईट निवड होती असे हमखासपणे मानून माझी खरडपट्टी काढीत.

"गिब्बन[94]तर कोस्तोमारोवपेक्षा[95] वाईट आहे. तुम्ही मॉमसेन[96] वाचला पाहिजे—तो फार रटाळ आहे, पण फार भक्कम आहे."

मी सर्वांत प्रथम «Les Freres Zemganno» वाचले होते असे जेव्हा त्यांना आढळले तेव्हा ते अत्यंत उद्विग्न बनले होते.

"कमाल आहे तुमची—अगदी मूर्ख कादंबरी! म्हणून तुम्ही असे बिघडलात. तीन फ्रेंच लेखक आहेत—स्तेन्दाल, बाल्झाक आणि फ्लॉबेर—त्यात तुम्ही मोपासाँची भर घालू शकाल, पण चेखोव अधिक चांगला आहे. गोन्कूर निव्वळ विदूषक आहेत, ते गंभीरपणाचा केवळ आव आणतात. त्यांच्यासारख्याच काल्पनिक लोकांनी लिहिलेल्या पुस्तकांवरून त्यांनी जीवनाचा अभ्यास केला आणि त्यांनी ते सगळं फार गंभीरपणानं घेतलं, पण कुणालाही त्यांच्या लेखनाची गरज नाही."

मी त्यांच्याशी सहमत झालो नाही व ह्याचा तल्स्तोय यांना जरा राग आला. त्यांना विरोध सहन होत नसे आणि त्यांचे युक्तीवाद काहीवेळा विचित्र दुराग्रही असत.

"निकृष्टावस्था नांवाची गोष्टच मुळी नाही," ते म्हणाले. "हा सगळा त्या इटलीच्या लोम्ब्रोझोचा[97]शोध."

रशियातील व्यापारी घराण्यांच्या इतिहासामधून एकामागोमाग एक पुरावा सादर केला तेव्हा ते उत्तरले:

"हे खरं नाही, हे सगळं चतुर पुस्तकांमधून निर्माण झालंय..."

माझ्या माहितीच्या एका व्यापारी घराण्याच्या तीन पिढ्यांची कहाणी मी त्यांना सांगितली. त्या कथेत निकृष्टावस्थेने विशेष कठोर भूमिका बजावली होती. मनःक्षोभापायी माझी बाही पकडून ते म्हणाले:

"हे खरं! हे मला माहीत आहे–तुलामध्ये अशी दोन कुटुंबं आहेत. तुम्ही याबद्दल लिहिलं पाहिजे. थोडक्यात एक मोठी कादंबरी–मला काय म्हणायचंय ते समजलं? अशा रीतीनं ते केलं पाहिजे!"

आणि त्यांचे डोळे उत्सुकतेने चमकले.

"पण त्यांच्यातले काही सरदार बनतील, ल्येव निकोलायेविच."

"तसली भाषा मुळीच नको! हे फार गंभीर आहे. सबंध कुटुंबासाठी प्रार्थना करायला एकजण संन्यासी बनतो–फार सुरेख. हे वास्तव जीवन. तुम्ही पाप करा आणि मी जाऊन तुमच्या पापांचं क्षालन करतो. आणखी दुसरा–कंटाळलेला देखतचोर–तोसुद्धा खरा आहे. आणि तो दारू पिऊन पशू आणि डांबीस बनतो, आणि प्रत्येकावर प्रेम करतो आणि अचानक खून करतो–किती छान आहे! चोरांमध्ये आणि भटक्यांमध्ये नायक शोधत बसण्याऐवजी तुम्ही ह्याबद्दल लिहिलं पाहिजे. नायक खोटे असतात, काल्पनिक असतात; फक्त माणसं असली पाहिजेत, माणसं–बस्स!"

माझ्या कथांमध्ये शिरकाव झालेल्या अतिरेकीपणांना त्यांनी वारंवार मला दाखवून दिले होते. पण एकदा, 'मृतात्मे'च्या दुसऱ्या भागाबद्दल उमदेपणाने स्मित करीत ते म्हणाले होते:

"आपण सर्वांत कट्टर अद्भुत लेखन करणारे आहोत. मी सुद्धा. काहीवेळा लिहिता लिहिता एखाद्या पात्राबद्दल अचानक दया वाटू लागते आणि त्याला गुण चिकटवायला सुरुवात होते, अथवा दुसऱ्याचा चांगुलपणा थोडा कमी केला जातो, म्हणजे पहिला त्याच्या तुलनेत फारच काळाकुट्ट दिसत नाही."

आणि तात्काळ, कठोर न्यायाधीशाच्या कडक स्वरात ते म्हणाले:

"म्हणून मी म्हणतो की कला म्हणजे खोटेपणा, फसवणूक, लहरी मसाला, मानवतेला अपायकारी. तुम्ही वास्तव जीवनाबद्दल तर लिहीत नाहीच, पण स्वतःच्या जीवनविषयक विचारांबद्दल, आयुष्याबद्दल तुम्हा

स्वतःला काय वाटते ह्याबद्दल लिहिता. तो मनोरा, अथवा समुद्र अथवा तो तातार मला कसा दिसतो ते जाणून कुणाचं काय भलं होणार? कुणाला पाहिजे ती माहिती? काय उपयोग तिचा?"

काहीवेळा त्यांचे विचार आणि त्यांच्या भावना म्हणजे केवळ लहरी असे मला भासायचे. आणि त्यांना मुद्दाम विकृत स्वरूप दिलेले असायचे. पण अनेकदा आपल्या विचारांच्या कठोर थेटपणाने श्रोत्यांना ते गारेगार करायचे व नरम बनवायचे. क्रूर देवाची उलटतपासणी घेणाऱ्या निर्भय जॉवप्रमाणे.

एक दिवस द्यूल्बेरपासून आय्–तोदोरला जाणाऱ्या खालच्या रस्त्यावरून मी त्यांच्याबरोबर चालत होतो. तरुणाप्रमाणे झपाझप हलकी पावले टाकीत, नेहमीपेक्षा अधिक प्रक्षोभ दाखवीत ते म्हणाले :

"देह हा आत्म्याच्या उत्तम प्रशिक्षित कुत्र्यासारखा असला पाहिजे. आत्मा त्याला जिथं पाठवील तिथं त्यानं गेलं पाहिजे. आणि आपल्याकडं पहा! देह बंडखोर आणि अस्वस्थ आहे आणि आत्मा त्याच्यामागून करुणास्पद असहायतेनं फिरतोय."

हृदयाच्या जागेवरती त्यांनी आपली छाती जोरात चोळली, भुवया उंचावल्या आणि तंद्रीत ते पुढे म्हणाले :

"शरदाचा मोसम होता–मॉस्कोत सूखारेव मनोऱ्यापाशी एकदा मी एक झिंगलेली बाई पाहिली होती. गटारात पडली होती. घाणेरड्या पाण्याचा ओहोळ आवारामधून वहात वहात नेमका तिच्या मानेशी आणि पाठीशी येत होता. त्या थंड पाण्यात धडपडत, वळवळत, बडबडत ती भिजत होती. तिला वर उठता येत नव्हतं."

त्यांनी शहारा दिला, क्षणभर डोळे मिटले, मान हलविली व खालच्या आवाजात ते पुढे म्हणाले :

"इथं बसू या. झिंगलेल्या बाईपेक्षा अधिक भयानक, अधिक किळसवाणं दुसरं काहीही नाही. जाऊन तिला मदत करावीशी मला वाटत होतं, पण मला शक्य झालं नाही. मी अंग चोरलं. ती संपूर्ण घाण आणि ओली बनली होती, तिला स्पर्श केल्यानंतर निदान महिनाभर हात स्वच्छ झाले नसते–भयानक! आणि जवळच्या फूटपाथवर राखी डोळ्यांचा, सोनेरी केसांचा एक छोटा मुलगा बसला होता. त्याच्या गालांवरून आसवं ओघळत होती, तो नाक सुरसुरत होता आणि असहायपणं विव्हळत होता :

"'आ... ई... ई... ऊठ...'
"ती वारंवार तिचे हात चाळवत होती, फुरफुर आवाज करत होती, डोकं वर उचलत होती आणि पुन्हा घाणीत पडत होती."
ते गप्प झाले आणि नंतर सभोवार नजर टाकून अस्वस्थपणे अगदी अस्पष्ट आवाजात परत म्हणाले:
"भयानक! भयानक! तुम्ही झिंगलेल्या खूप बायका पाहिल्यात? होय? अरे बापरे! लिहू नका त्याबद्दल! तुम्ही लिहीणं योग्य नाही!"
"का नाही?"
माझ्या डोळ्यांमध्ये रोखून पहात, स्मित करीत त्यांनी तेच शब्द उच्चारले:
"का नाही?"
मग विचारमग्न होत सावकाशपणे ते म्हणाले:
"मला माहीत नाही. पशुत्वाबद्दल लिहिणं मला लज्जास्पद वाटतं. पण तसं पाहिलं तर–का नाही? माणसानं प्रत्येक गोष्टीबद्दल लिहावं..."
त्यांच्या डोळ्यांमध्ये आसवे तरारली. त्यांनी ती पुसली व सारा वेळ स्मित करीत स्वतःच्या हातरुमालाकडे ते पहात राहिले. दरम्यान त्यांच्या सुरकुत्यांवरून परत आसवांच्या धारा ओघळल्या.
"मी रडतोय," ते म्हणाले. "मी म्हातारा आहे. कुठल्याही भयानक गोष्टीचा मी विचार केला म्हणजे माझं काळीज धडधडायला लागतं."
मग हळूच मला ढोशीत ते म्हणाले:
"तुम्हीसुद्धा एक दिवस म्हातारे व्हाल आणि प्रत्येक गोष्ट न बदलता तशीच राहील आणि आत्ता मी रडतोय त्यापेक्षा तुम्ही जास्त दुःखानं रडाल, शेतकरी बायका म्हणतात तसं 'टपटपा आसवं गाळाल'... पण प्रत्येक गोष्टीबाबत लिहिलं पाहिजे, प्रत्येक... नाही तर छोटा सोनेरी केसांचा मुलगा दुखावेल, तो तुमच्यावर राग धरील... तो म्हणेल, ते खरं नाही, संपूर्ण सत्य नाही."
त्यांनी स्वतःचे शरीर जोरात झटकले आणि गोंजारल्या स्वरात म्हणाले:
"आता तुम्ही मला काहीतरी सांगा. तुम्ही फार छान बोलता. काहीतरी लहान मुलाबद्दल सांगा, तुमच्याबद्दल सांगा. एकेकाळी तुम्ही-सुद्धा लहान मूल होतात ह्यावर विश्वास ठेवणं कठीण जातं... तुम्ही इतके विचित्र आहात! तुम्ही मोठ्या वयाचेच जन्माला आलात असं भासतं.

तुमच्या विचारांमध्ये खूपसं बालिश, अपरिपक्व आहे; पण तरीही तुम्हाला आयुष्याची फार जाण आहे – आणखी जाण असण्याची तुम्हाला गरज नाही. चला, सांगा मला काहीतरी..."

देवदाराच्या जमिनीतून वर आलेल्या मुळांवर ते ऐसपैस बसले आणि भुऱ्या टोकदार पानांमधल्या मुंग्यांची धावपळ पाहू लागले.

उत्तरेकडील माणसाच्या डोळ्याला अत्यंत विविध भासणाऱ्या दक्षिणेच्या निसर्गात, ह्या सगळ्या वैभवशाली, लज्जाहीन मुसमुसत्या यौवनाच्या वनस्पती जगतात. ल्येव तल्स्तोय बसले आहेत. त्यांच्या नांवातच त्यांची आंतरिक शक्ती व्यक्त होते! * – हा गाठाळ आणि पिळदार छोटा माणूस जणू भक्कम, प्रगाढ मातीच्या मुळांच्या बनविल्यासारखा वाटतो. मी परत म्हणतो की, क्रिमियाच्या चकचकीत निसर्गात ते एकाच वेळी त्यांच्या योग्य ठिकाणी असल्यासारखे भासतात आणि विशोभितही वाटतात. सबंध ग्रामीण प्रदेशाचा मालक – मालक आणि निर्माता असा हा पुराणपुरुष – शंभर वर्षांच्या अनुपस्थितीनंतर त्याने स्वतःच स्थापलेल्या इस्टेटीवर परत आला आहे. तो बरेच काही विसरलाय आणि बऱ्याच गोष्टी त्याला नवीन आहेत. गोष्टी असाव्यात तशा आहेत, पण पूर्णत्वाने नव्हे. आणि जे काही योग्य नाही ते काय व का, ह्याचा त्याला तात्काळ छडा लावायचा आहे.

अनुभवी जगप्रवाशाप्रमाणे जलद, वेगवान चालीने पायवाटांवरून आणि रस्त्यांवरून ते चालत जातात. त्यांच्या तीक्ष्ण नजरेतून एकही दगड, एकही विचार सुटू शकत नाही. त्यांची नजर पहात असते, मापत असते, जोखत असते, तुलना करीत असते. आपल्या अविरत विचाराचे सजीव बीज त्यांनी सभोवती विखुरले होते. सूलेरला ते म्हणाले:

"सूलेर, तू कधीही वाचत नाहीस आणि ते फार वाईट आहे; ही अहंमन्यता आहे. गोर्की खूप वाचतात आणि तेही चुकीचं आहे – स्वतःमध्ये विश्वासाचा अभाव असल्याचं ते लक्षण! मी खूप लिहितो आणि ते योग्य नाही, कारण वृद्धत्वाच्या पोकळ अभिमानापायी मी तसं करतो; माझ्याप्रमाणं प्रत्येकानं विचार करावा अशा इच्छेपायी तसं करतो. अर्थात माझी विचार करण्याची तऱ्हा माझ्या दृष्टीनं योग्य आहे, पण गोर्कींना मात्र ती चुकीची वाटते. आणि तू मुळी विचारच करत नाहीस. तू नुसती

---

* ल्येव – सिंह. – अनु.

डोळ्यांची उघडझाप करतोस आणि कशाचातरी आधार पकडायला भोवती पाहतोस. आणि अशा गोष्टींचा आधार धरतोस ज्यांच्याशी तुला काहीही कर्तव्य नाही – तू अनेकदा तसं केलं आहेस. तू आधार पकडून लटकत राहतोस आणि ज्या गोष्टीला तो लटकत असतोस ती तुझ्यापासून सुटून खाली कोसळू लागली, म्हणजे तू तिला सोडून देतोस. चेखोव यांची एक छान कथा आहे – 'लाडकी' – त्या कथेतल्या बाईसारखा आहेस तू!"

"कोणत्या रीतीनं?" हसून सूलेरने विचारले.

"प्रेम करायला तू नेहमी सज्ज आहेस, पण निवड कशी करायची हे तुला माहीत नाही आणि क्षुल्लक बाबींवर तू नेहमी तुझी ताकद वाया घालवतोस."

"प्रत्येकजण तसाच नाही का?"

"प्रत्येकजण?" तल्स्तोय यांनी पुनरुच्चार केला. "नाही, नाही – प्रत्येकजण नाही."

आणि अचानक त्यांनी माझ्यावर मोहरा धरला:

"देवावर तुमचा का विश्वास नाही?"

"माझी श्रद्धा नाही."

"हे खरं नाही. स्वभावानं तुम्ही श्रद्धाळू आहात, देवाविना तुमचं चालणार नाही. लौकरच तुम्हाला हे जाणवू लागेल. तुम्ही विश्वास ठेवत नाही, कारण तुम्ही हट्टी आहात आणि तुम्ही संतापला आहात – तुम्हाला हवं तसं जग बनलेलं नाही. काही माणसं लाजरेपणापायी अश्रद्ध असतात. तरुण पुरुष काहीवेळा तसे असतात. एखाद्या स्त्रीची ते पूजा करतात, पण उघडरीत्या दाखवू शकत नाहीत. त्यांच्याबद्दल गैरसमजूत होईल अशी त्यांना भीती वाटत असते. शिवाय त्यांच्यात धैर्य नसतं. प्रेमाप्रमाणं श्रद्धेलाही धैर्य लागतं, धाडस लागतं. तुम्ही स्वतःशी म्हटलं पाहिजे: 'माझा विश्वास आहे' आणि सगळं काही ठीक होईल, तुम्हाला हवी तशी प्रत्येक गोष्ट दिसू लागेल; प्रत्येक गोष्ट स्वतःच तुम्हाला खुलासा करील, तुम्हाला आकर्षित करील. उदाहरणार्थ, बऱ्याच गोष्टींवर तुम्ही प्रेम करता आणि श्रद्धा म्हणजे केवळ प्रेमाला अधिक तीव्र करणं. तुम्ही आणखी प्रेम केलं म्हणजे त्या प्रेमाचं श्रद्धेत रूपांतर होतं. पुरुष नेहमी जगातील सर्वोत्तम स्त्रीवर प्रेम करतात आणि प्रत्येकजण जगातल्या सर्वोत्तम स्त्रीवर प्रेम करत असतो आणि पहा – ह्यालाच श्रद्धा म्हणतात. अश्रद्ध माणूस प्रेम करू शकत

नाही. आज तो एकीच्या प्रेमात पडतो, तर वर्षानंतर दुसरीच्या. अशा माणसांचा आत्मा भटक्या असतो, तो नपुंसक असतो आणि हे योग्य नव्हे. तुम्ही जन्मतःच सश्रद्ध आहात आणि स्वतःच्या स्वभावाविरुद्ध वागण्याचा प्रयत्न करून काही उपयोग नाही. तुम्ही नेहमी म्हणता – सौंदर्य! आणि सौंदर्य म्हणजे काय? सर्वोच्च आणि अत्यंत निर्दोष – देव!"

पूर्वी ह्या गोष्टींबाबत माझ्याशी ते कधी बोलले नव्हते आणि विषयाचे महत्त्व, त्याचा अनपेक्षितपणा, ह्यांमुळे मी बावरून गेलो. गांगरून गेलो. मी काहीच बोललो नाही. दिवाणावर ते बसले होते, त्यांनी पाय दिवाणाखाली खुपसले होते. स्वतःचे दाढीभर दिग्विजयी स्मित झळकवीत, हाताच्या बोटाने मला दटावीत ते म्हणाले :

"काहीही न बोलता तुमची त्यातून सुटका होणार नाही, समजलं!"

आणि देवावर विश्वास न ठेवणारा मी, त्यांच्याकडे एक चोरटी, अगदी भित्री नजर टाकीत स्वतःशी म्हणालो :

"हा माणूस देवासारखा आहे."

१९१९

# फेनीमोर कूपरच्या 'पथशोधका'ला प्रस्तावना[98]

'हरणपारधी' 'पथशोधक', 'अखेरचा मोहीकन', 'चामडयाच्या पायमोज्यांची मालिका' आणि 'प्रेअरी'–फेनीमोर कूपर[99] यांची ही पाच पुस्तके सार्थपणे सर्वोत्तम मानली जातात. जवळ जवळ शंभर वर्षापूर्वी उदयाला आलेल्या ह्या पुस्तकांनी अमेरिका व युरोपमध्ये तात्काळ सर्वमान्य कौतुक प्राप्त केले. आमचे प्रसिद्ध टीकाकार विस्सारीओन बेलीन्स्की[100] ही पुस्तके वाचून मुग्ध झाले आणि १९ व्या शतकाच्या पूर्वार्धातील अनेक नामवंत रशियन व्यक्तींनी त्यांची मुक्तकंठाने प्रशंसा केली.

उत्तर अमेरिकेतील राज्यांच्या स्थापनेचा इतिहास कथन करणारी वास्तव आणि सुंदर चित्रे म्हणून फेनीमोर कूपर ह्यांच्या कादंबऱ्या काळाच्या ओघामध्ये विटल्या नाहीत, निबिड जंगलांच्या, ओसाड मैदानांच्या व भटक्या रेड इंडियन टोळयांच्या भूमीत जोमदार माणसांनी दीडशे वर्षांत एक प्रभावी राज्य कसे स्थापन केले, ह्याचा तो बोधक इतिहास आहे.

नात्ती बुम्पो नामक एका मुक्त शिकाऱ्याच्या व्यक्तिमत्वाने ही पाचही पुस्तके एकत्र जोडली गेली आहेत. 'हरणपारधी' पासून वाचकाला ह्या विचित्र माणसाची ओळख होते. तो निरक्षर आहे आणि असंस्कृत आहे, पण अस्सल सुसंस्कृत माणसाचे सर्वोत्तम गुण त्याच्या ठायी परम प्रमाणात वसत आहेत. माणसांबरोबरचे त्याचे नाते निष्कलंक प्रामाणिकपणाचे आहे. माणसांविषयीच्या त्याच्या प्रेमाला कोणीही तडा देऊ शकत नाही. स्वतःच्या शेजाऱ्याला मदत करण्याची त्याची सतत, स्वाभाविक इच्छा आहे आणि त्याचे आयुष्य सुकर बनविण्यासाठी तो प्रयत्नांची पराकाष्ठा करतो.

फेनीमोर कूपरनी आपल्या पुस्तकांच्या प्रस्तावनांमध्ये अनेकदा नमूद केले आहे की, नात्ती बुम्पो हा वास्तवातील माणूस होता; हा माणूस प्रत्यक्ष अस्तित्वात होता. पण वाचकाच्या दृष्टीने त्यामुळे काहीही फरक पडत नाही, कारण काल्पनिक, आदर्श घटना व गोष्टी ह्या मानवामध्ये अस्सल परोपकारी दृष्टिकोन आणि भावना जोपासण्यास प्रत्यक्ष घटना व

गोष्टींइतक्याच प्रभावी ठरतात. आदर्श गोष्टीमुळे, अद्याप अस्तित्वात नसलेल्या पण काल्पनिकरीत्या वास्तव बनू शकणाऱ्या गोष्टीमुळे, जीवन अधिक चांगल्या परिस्थितीकडे वाटचाल करते.

वास्तवता नेहमी आदर्शाचे रूप असते, पण जेव्हा आपण तिचे खंडन करतो, तेव्हा त्याचा अर्थ आपण स्वतःच निर्माण केलेल्या आदर्शाबाबत इतःपर आपण समाधानी नसतो. आपल्या कल्पनाशक्तीने त्याहून अधिक चांगला आदर्श निर्माण केलेला असतो. म्हणून मी म्हणतो: नात्ती बुम्पो हा प्रत्यक्ष रक्त-मांसाचा माणूस अमेरिकेत खरोखरीच अस्तित्वात होता अथवा नव्हता हे महत्त्वाचे नाही, तर पाच पुस्तके त्याच्याविषयी लिहिण्यात आली आहेत, सर्वोत्तम मानवी गुणांच्या साक्षात रूपाने ह्या पुस्तकांमध्ये तो वास करीत आहे, हे महत्त्वाचे आहे.

पहिल्या पुस्तकात हरणपारधी म्हणून, दुसऱ्यात पथशोधक म्हणून, तिसऱ्यात मोहीकनांचा शेवटचा नेता म्हणून, चौथ्यामध्ये चामड्याचा पायमोजा म्हणून आणि अखेरच्या पुस्तकात एकाकी, वृद्ध फासेपारधी म्हणून नात्ती बुम्पो सर्वत्र वाचकाचे प्रेम संपादन करतो. त्याच्या विचारांमधील प्रामाणिक साधेपणा आणि त्याची साहसी कृत्ये वाचकाला त्याच्या प्रेमात पाडतात.

"नव्या जगातील" जंगलांच्या आणि मैदानांच्या नव्या वाटा त्याने लोकांसाठी उजळून काढल्या, पण नंतर ह्याच लोकांनी त्यांचे स्वार्थी कायदे त्याने मोडल्याबद्दल त्याला गुन्हेगार ठरविले. त्याच्या स्वातंत्र्याच्या भावनेला त्या कायद्यांचे आकलन होत नव्हते. असंस्कृत लोकांच्या भूमीत भौतिक संस्कृतीचा भौगोलिकरीत्या प्रसार करण्यास सबंध आयुष्यभर त्याच्या नकळत तो कारणीभूत ठरला. पण ज्या संस्कृतीच्या वाटा त्याने सर्वप्रथम शोधल्या, त्या संस्कृतीच्या परिस्थितीत राहण्यास अखेरी तो असमर्थ ठरला.

संस्थापकांचे नशीब अनेकदा असेच असते. जीवनाचा अभ्यास करणारी माणसे आपल्या समकालीनांपेक्षा त्या जीवनाच्या वाटा धुंडाळीत खूप दूरवर भरकटत जातात. ह्या अर्थाने नात्ती बुम्पो हा रूपकात्मक बनतो. ज्यांच्या यातनांमुळे आणि पराक्रमांमुळे आपले जीवन अत्यंत समृद्ध बनते अशा मानव-जातीच्या अस्सल मित्रांच्या रांगेत त्याला स्थान लाभते.

फेनीमोर कूपर यांच्या पुस्तकांचे शैक्षणिक महत्त्व निर्विवाद आहे. जवळ जवळ एक शतकभर सर्व देशांमधील तरुण मंडळींची ती आवडती पुस्तके

आहेत. उदाहरणार्थ, रशियन क्रांतिकारकांच्या स्मृतीचित्रांमध्ये अनेकदा आपल्याला ह्या लेखकाचा उल्लेख आढळतो. त्यांच्यात प्रतिष्ठेची, धैर्याची भावना जोपासण्यास व त्यांना कृतीला उद्युक्त करण्यास ह्या लेखकाची पुस्तके कारणीभूत ठरली होती.

१९२३

# नि. से. लेस्कोव [101]

निकोलाय सेम्योनोविच लेस्कोव यांचा जन्म ओऱ्योल येथे झाला. त्यांचे आजोबा पाद्री होते, आजी व्यापाऱ्याची बायको होती, वडील सरकारी कर्मचारी होते आणि आई उमराव घराण्यातील होती. अशा रीतीने चार सामाजिक स्तरांशी त्यांचे रक्ताचे नाते जडलेले होते. पण त्यांच्यावर प्रगाढ प्रभाव मात्र पाचव्या स्तरातील व्यक्तीचा पडला असावा. ही पाचवी व्यक्ती म्हणजे त्यांची भूदास-दाई. ती एका शिपायाची बायको होती. लेस्कोव यांच्याच शब्दात सांगायचे तर तिच्या कथा "काहीवेळा जीवनाची आंबट चव मिसळलेल्या मिठाईसारख्या असत, तर काहीवेळा चरबीयुक्त डुकराच्या मांसाला झणझणीत मोहरीचा लगदा फासल्यासारख्या असत."

अगदी लहानपणापासून लेस्कोवना लोकांची ओळख पटू लागली होती. तिशीच्या आत त्यांनी सर्व वेलिकारूस्सियाचा (महान रशिया – अनु.) प्रवास केला होता. ते स्तेप प्रांतांमध्ये गेले होते. प्रदीर्घ काळपर्यंत त्यांनी युक्रेनमध्ये वास्तव्य केले होते. ह्या प्रांतामधील जीवनपद्धती आणि संस्कृती किंचित वेगळ्या धाटणीची होती. एखाद्या परक्या प्रांतात राहणे म्हणजे स्वतःकडे दुसऱ्याच्या डोळ्यांनी पाहण्यासारखे असते. परिपक्व वयात ते लेखक बनले. लोकांच्या जीवनाबद्दलचे त्यांचे ज्ञान पुस्तकी नव्हते, खरेखुरे होते. "लोकांचा आत्मा" म्हणून संबोधण्यात येणारी सूक्ष्म वस्तू त्यांना पूर्ण गवसली होती.

लेस्कोव यांची साहित्यिक कारकीर्द एका वेदनादायी नाट्याने सुरू झाली. जर रशियन सुसंस्कृत लोक एकमेकांशी अधिक लक्षपूर्वक आणि काळजीपूर्वक वागू शकले असते, तर ते नाट्य घडले नसते. अजूनही तशा वर्तनाची गरज आहे, कारण आपल्या देशात अजून बुद्धिजीवी फार कमी आहेत. पीटरबुर्गमध्ये कामानिमित्त रहायला आलेल्या लेस्कोव यांचे हृदय पहिल्याच वर्षांत काही कारण नसताना विदीर्ण करण्यात आले.

१८६२ च्या उन्हाळ्यात पीटरबुर्गच्या आसपासच्या जंगलांमध्ये अनेक संशयास्पद आगी लागल्या. घातपात असल्याची अफवा उठली. विद्यार्थ्यांनी जंगलांना आगी लावल्या होत्या अशी वदंता होती. लेस्कोव यांनी वर्तमानपत्रात एक लेख लिहून सरकारी अधिकाऱ्यांना सवाल केला की, आगी लावण्यात विद्यार्थ्यांचा हात होता हे त्यांनी पुराव्यासह सिद्ध करावे, अथवा ठामपणे आणि विनाविलंब अफवेतील खोटेपणा जाहीर करावा. काही हलक्या बुद्धीच्या लोकांनी त्या लेखाचा चुकीचा अर्थ लावला की, आगी लावण्याचा आरोप अनियंत्रित विद्यार्थ्यांवर खुद्द लेस्कोवच करीत आहेत. लेस्कोव यांनी हा दुष्ट गैरसमज खोडून काढण्याचा काहीवेळा प्रयत्न केला, पण कुणीही त्यांच्यावर विश्वास ठेवला नाही, कारण एखाद्या व्यक्तीला दोषमुक्त सोडून देण्यापेक्षा तिच्यावर ठपका ठेवणे अधिक प्रिय असते.

ह्या मूर्ख आरोपामुळे लेस्कोव कमालीचे घायाळ झाले. साहित्यिक जगात ते नवखे आणि परके होते, त्यांना मित्र नव्हते आणि त्यांचे कुणी समर्थकही नव्हते. स्वतःचे समर्थन करण्यास असमर्थ ठरलेल्या लेस्कोवनी पीटरबुर्ग सोडले व प्रागकडे प्रयाण केले. नंतर ते पॅरिसला गेले. अपमानापायी धुमसणाऱ्या त्यांच्या मनाने सूडाच्या भावनेने 'कुठेही नाही' नांवाचे पुस्तक लिहिले. "तत्कालीन घडामोडींच्या" कालवृत्तांतासारखे त्या पुस्तकाचे स्वरूप होते. गेल्या शतकातील सातव्या दशकामधील बुद्धिजीवी वर्गाचे ह्या पुस्तकात दुष्टाव्याने चित्रण करण्यात आलेले होते. उदाहरणार्थ, वि. अ. स्लेप्त्सोव[102] यांच्यासारख्या बुद्धिमान आणि गुणी लेखकाचे, 'कठीण काळ' नामक उत्तम कथेच्या लेखकाचे, चुकीचे चित्रण करण्यात आले होते. सर्वप्रथम म्हणजे 'कुठेही नाही' पुस्तकाचे लेखन अगदी सामान्य प्रतीचे होते. ते वाचताना वाचकाला जाणवते की, लेखक ज्यांच्याबद्दल लिहीत आहे त्या माणसांविषयी त्याला अगदी कमी माहिती आहे. "शून्यवादा"*चा निषेध करण्याच्या हेतूने हे पुस्तक लिहिण्यात आले होते. त्या काळातील तरुणांच्या मनःस्थितीचे ते नांव होते. सनातन गुलामगिरीच्या बंधनातून नुकत्याच मुक्त झालेल्या देशाचे भूतकाळाशी असलेले सर्व पाश एका फटक्यात तोडून टाकण्याच्या तरुणांच्या धाडसी इच्छेमधून शून्यवाद

---

* शून्यवाद – सर्व मान्य मूल्यांचा निषेध : आदर्श, संस्कृती, सामाजिक जीवनाच्या पद्धतीचा निषेध.

जन्मला आला होता. पहिल्या निकोलायच्या[103] राजवटीत विशेष चमत्कारिक आणि अवजड बनलेल्या राजकीय व धार्मिक दडपणाचे सर्व थर निपटून टाकण्याची त्यांची इच्छा होती.

सुधारणापूर्व जीवनाच्या दुर्गंधमय घाणेरड्या कर्दमातून बाहेर पडण्याच्या तरुणांच्या ह्या शूर इच्छेमध्ये एक निकोप घटक होता. लेस्कोवना तो समजला नाही आणि तरुणांच्या उफाळत्या वर्तनाच्या खऱ्या अर्थाचे योग्य मूल्यमापन ते करू शकले नाही. पण त्यांच्या चौकस आणि स्थिर मनाला चांगली जाणीव होती की, भूतकाळ आमच्यापैकी प्रत्येकाच्या दृष्टीने एक ओझे होता आणि मनाच्या केवळ सतत व सावध प्रयत्नातूनच माणूस ताठ उभा राहू शकला असता. निर्धाराच्या एकाच प्रयत्नात इतिहासाचे अवजड ओझे खांद्यांवरून फेकून देण्यात यशस्वी झालेले लोक रशियात फार कमी आहेत. "नव्या" माणसांनी भूतकाळापासून घेतलेल्या सर्व गोष्टी लेस्कोवनी पाहिल्या, पण भविष्यासाठी त्यांच्या जे मौल्यवान होते, त्याकडे मात्र त्यांनी दुर्लक्ष केले. 'कुठेही नाही' नामक कादंबरीत जवळ जवळ प्रत्येकजण दुष्ट अथवा विचित्र आणि कुरूप आहे. सर्व व्यक्तिरेखा वास्तवापासून फारकत घेतलेल्या आहेत. त्या हतबल आहेत, बडबड्या, बढाईखोर आहेत आणि "कुठे" जावे हे त्यांना ठाऊक नाही.

पण ह्या पुस्तकातील एक विशेष महत्त्वाची गोष्ट म्हणजे ह्या दयनीय आणि अप्रामाणिक लोकांच्या गर्दीत लेस्कोवना स्वतःच्या मनाजोगता एक नायक गवसला आहे. हा नायक म्हणजे रेयनेर. तो आदर्शवादी आहे, काहीसा विचित्र स्वभावाचा आहे आणि 'काय केले पाहिजे?' नामक चेर्नीशेवस्कीं[104]च्या विख्यात कादंबरीतील राहमेतोवच्या व्यक्तिरेखेशी त्याचे किंचित साधर्म्य आहे. हा रेयनर स्वतःला समाजवादी म्हणवतो आणि रशियात उघडपणे क्रांतिकारक प्रचारकार्य करीत आहे. १८६३ च्या पोलिश उठावात त्याला वीरमरण येते. लेस्कोवनी त्याच्याभोवती उदात्ततेचे वलय निर्माण केलेले आहे, पावित्र्य निर्माण केले आहे. पण तरीही, कादंबरीने सार्वत्रिक तिटकारा निर्माण केला आणि तिला निंदाजनक मानण्यात आले. एकमताने तिच्यावर ठपका ठेवण्यात आला. विख्यात साहित्य–समीक्षक पीसारेव[105] यांनी तर एका लेखात पृच्छा केली: "लेस्कोव यांच्याबरोबर काम करण्यास, एकाच मासिकात त्यांच्या लेखनाबरोबर स्वतःचे लेखन प्रसिद्ध होऊ देण्यास, एक तरी प्रामाणिक लेखक राजी होईल काय?"

हा जवळ जवळ ठार मारण्याचा प्रकार होता. दुखावलेल्या आणि चिडलेल्या लेस्कोवनी ताबडतोब एक मोठी आणि सर्वार्थाने वाईट अशी 'उपसलेल्या कटयारी' नामक कादंबरी लिहिली. ह्या कादंबरीत 'कुठेही नाही' पेक्षा शून्यवाद्यांना अधिक वाईट चित्रित करण्यात आले आहे. त्यांचे चित्रण एवढे दुर्मुखल्या, मूर्ख आणि हताश पद्धतीने करण्यात आलेले आहे, की खुद्द मूर्खतेपेक्षा तिरस्कार अधिक केविलवाणा व चेतनाहीन असतो असे जणू लेस्कोव दाखवू पहात होते. हे पुस्तक म्हणजे कडवट निराशा आणि वैयक्तिक सूड. त्यातील सर्व नायक धमक्या घालून पैसे उकळणारे, चोर आणि खुनी आहेत. पण ह्या पुस्तकात लेस्कोवनी एक विलक्षण व्यक्ती रेखाटली आहे—आन्ना स्कोकोवा नांवाची क्रांतिकारक मुलगी. बाह्यत: ती विचित्र आणि उत्साहाने मुसमुसलेली आहे. ती नेहमी वटवट करते. दुसऱ्यांची ओळख करून घेताना ती स्वत:ची वान्स्कोक अशी ओळख करून देते. ही मुलगी नमुनेदार आहे. जीवनाची ती थेट प्रतिमा आहे. तिचे एवढे कसबी चित्रण झाले आहे की त्यावर विश्वास बसत नाही. अशा डझनावारी वान्स्कोक रशियन क्रांतिचळवळीत जन्माला आल्या. तिला फारशी अक्कल नाही, ती जवळ जवळ मूर्खच आहे, ती दमत नाही आणि आत्मत्यागाला सज्ज आहे. ती स्वत: पवित्र असल्यामुळे इतरांच्या पवित्रतेवर तिची श्रद्धा आहे. इतरांनी तिला काही करायला सांगितल्यास वाट्टेल ते करण्याची तिची तयारी आहे. जर ठार मारण्याची कामगिरी तिच्यावर सोपवली, तर ती ठार मारील, पण त्याचवेळी पक्षाच्या कट्टर विरोधकाचा फाटलेला सदरा ती त्याच उत्साहाने शिवून देईल. आदल्या दिवशी तिला मार देणाऱ्या व्यक्तीच्या जखमेवर कोणताही आकस मनात न बाळगता ती मलमपट्टी करील. तळघरातील छापखान्यात काम करताना तेथील कोंदट वातावरण अनेक महिनेपर्यंत सहन करण्याची तिची ताकद आहे. स्वत:च्या छातीवर जिवंत बाँब लपविण्यास ती समर्थ आहे. तिचा छळ झाल्यास ती स्मित करू शकते आणि तिचा छळ करणाऱ्यांबद्दल तिला कीवही वाटते, कारण तिच्या देहाचा छळ करण्यातून त्यांना काहीच निष्पन्न होणार नाही हे तिला माहीत आहे. "स्वत:च्या मित्रांसाठी" मृत्यूच्या भेटीला जायला प्रत्येक क्षणाला ती सज्ज आहे.

ही व्यक्ती एक साधन आहे, पण ती पवित्र आहे, विचित्र आहे, पण परीकथांमधील परीप्रमाणे सुंदर आहे. लोकांविषयीच्या कंपायमान प्रेमाने

ती प्रज्वलित झालेली आहे. हे प्रेम विझविता येणार नाही. हे पवित्र प्रेम आहे, पण काहीवेळा त्याचे साधर्म्य भासते कुत्र्याच्या आपल्या धन्याबद्दलच्या आंधळया भक्तीशी.

'उपसलेल्या कट्यारी' ह्या दुष्ट कादंबरीच्या लेखनानंतर लौकरच लेस्कोव यांच्या साहित्यिक कार्यात अद्भुत बदल घडून आला. प्रतिमा निर्माण करण्यात त्याचे रूपांतर झाले. रशियन संतांच्या प्रतिमा गोळा करण्यास त्यांनी आरंभ केला. जेथे सर्व वर्गांचे आणि दर्जांचे लोक सारख्याच रीतीने असुखी असणे शक्य आहे अशा रशिया नामक भिकार आणि घाणेरडया, मूर्ख आणि क्रूर देशात गुलामगिरीमुळे जे काही संपून गेले होते, त्याला जणू उत्तेजन आणि स्फूर्ती देण्याचे कार्य लेस्कोवनी हाती घेतले. त्या नतद्रष्ट देशावर अशा रीतीने प्रेम करावे की, ह्या प्रेमाच्या यातनांमुळे दररोज आणि दर तासाला माणसाच्या हृदयातून भळभळा रक्त सांडावे; मदोन्मत्त छळवाद्याने एखाद्या निष्पापाचा छळ करावा अशा धर्तीचे प्रेम.

माणसाला सांत्वन करून घेण्याचा आणि गोंजारून घेण्याचा अधिकार आहे व सांत्वन कसे करावे आणि कसे गोंजारावे ह्याची माणसाला माहिती पाहिजे, असे लेस्कोवना त्यांच्या पूर्वसूरींपैकी कुणीहीपेक्षा जास्त चांगले समजले होते. रशियन मूर्ख संतांच्या आयुष्यातील प्रसंगांचे त्यांनी वर्णन केले. त्यांचे नायक संशयास्पद चारित्र्याचे आहेत हे खरे, कारण स्वतःच्या मुक्तीचा विचार करण्यास त्यांच्यापाशी सवड नाही. स्वतःच्या शेजाऱ्यांच्या मुक्तीची आणि सांत्वनाची ते सतत चिंता करतात. पापविहीन आणि स्वर्गीय जीवनाचा लाभ व्हावा म्हणून देवाची उपासना करायला हे जग सोडून ते फिवाईदा वाळवंटामध्ये, दाट अरण्यांमध्ये, गुंफांमध्ये आणि एकाकी मठांमध्ये जात नाहीत. उलट ऐहिक जीवनाच्या घाण कर्दमात ते वेडयासारखे शिरतात. ह्या जगात रक्ताने न्हाऊन निघालेला, लोभाने आणि मत्सराने पिसाळलेला, क्रौर्यात आणि दुष्टाव्यात सैतानाशी बरोबरी करणारा माणूस लडबडत असतो: देवाचे आकलन करून घेण्याच्या नादात माणसाला विसरून जाणाऱ्या आदरणीय धर्मगुरूंप्रमाणे आणि कर्मठ संन्याशांप्रमाणे थोडेफार करण्यास अथवा काहीतरी करण्यासही कदाचित ते असमर्थ ठरतील. आणि मानवी जीवन कमी पाशवी करण्यास असमर्थ

असलेल्या देवाच्या परोपकारहीन शहाणपणाच्या अगतिकतेचे समर्थन करीत असताना, माणसाला ते निष्ठुरपणे दोष देतात.

लेस्कोव यांचे सावध आणि अविश्वासू मन प्रत्येक गोष्टीचा संशय घेते. पण रशियाचे समर्थन करण्याचे, त्याच्या पाप्यांच्या हितासाठी त्याच्या संतांच्या गोड प्रतिमा निर्माण करण्याचे उद्दिष्ट बाळगणाऱ्या लेस्कोवनी स्वतःचे मन वापरले नाही, हृदय वापरले. म्हणूनच जीवनावर आणि लोकांवर प्रेम करणाऱ्या वान्स्कोक, रेयनेर व तत्सम ह्या जगातील भटके एवढे महत्त्वाचे आहेत की, कोणतेही पूर्वग्रह नसलेल्या व विचारी वाचकांच्या अंतःकरणांना ते भिडतात.

आठव्या दशकात लेस्कोव यांनी 'मठनिवासी' नामक एक उत्कृष्ट पुस्तक लिहिले. त्यानंतर धूर्त कथा प्रसिद्ध करण्याचा त्यांनी सपाटा लावला. त्यावेळी रशियन साहित्याचा मुख्य आणि एकमेव नायक रशियन शेतकरी होता असे भासते. जवळ जवळ सर्व लेखक आणि पत्रकार लोकांच्या बुद्धिमत्तेचे व प्रेमळपणाचे एकमुखाने गोडवे गात होते. बुद्धिजीवीवर्ग गृहीत धरून होता की, गुलामगिरीच्या बंधनांमधून मुक्त झालेले लोक स्वतःचे बळकट पंख पसरतील आणि आत्मिक व नागरी स्वातंत्र्याकडे एखाद्या गरुडाप्रमाणे झेपावतील. त्या काळातील बुद्धिजीवीवर्गाबद्दल मूर्ख सत्ताधाऱ्यांना फार संशय वाटत होता. बुद्धिजीवीवर्गाच्या शक्तींचा वापर करण्याची त्यांची इच्छा नव्हती आणि इच्छा असली तरी तसे करणे त्यांना जमत नव्हते. तसेच, मागासलेल्या, असंस्कृत अशा व्यापारी व उद्योगधंद्यांच्या जगातही बुद्धिजीवींना स्थान नव्हते. निष्ठूर आणि नीरस राजसत्तेच्या जागी सनदशीर राज्यव्यवस्था स्थापन करण्याचे स्वप्न बुद्धिजीवी पहात होते. त्यांना खात्री होती की, शेतकरी कालपर्यंत जरी गुलाम होता, तरी गावाच्या समाजाचा एक घटक म्हणून प्रातिनिधिक सरकारच्या फायद्यांची त्याला चांगली जाणीव होती. त्यांची मनःपूर्वक खात्री होती की, रशियन खेड्यांमध्ये ज्ञानाची तहान होती आणि म्हणून आपले सर्वोत्तम विचार, भावना व पुस्तकांमधून उचललेले इतर सर्व काही घेऊन ते खेड्यांकडे धावत होते. "खेड्यांकडे" निघालेल्या इंजनावरी तरुणांना निरोप देण्याच्या प्रसंगी लेखक आणि पत्रकार काव्यमय भाषेत व गद्यात भाषणे देत होते, "भीती आणि शंकेविना पराक्रमासाठी" निघालेल्यांच्या निर्भयतेचे[106] कौतुक करीत होते.

जीवनाच्या कार्यासाठी अश्रद्ध जेवढे नालायक असतात, तेवढेच सश्रद्धांचे संख्याधिक्य असह्य असते. आमच्या शून्यवाद्यांचीसुद्धा त्यांच्या विचारप्रणालीवर विलक्षण श्रद्धा आहे. रशियन लोकांच्या धार्मिक भावना अति-बळकट होत्या, तेव्हा व्यक्तीबद्दलची त्यांची प्रेम व आदरभावना फार दुबळी होती. म्हणून त्यांना लेस्कोव उमगले नाहीत. पण लेस्कोव स्वत: संशयवादी असल्यामुळे विचारी आणि दक्ष प्रेमाची दुर्मिळ देणगी त्यांच्यापाशी होती. माणसाच्या भिन्न भिन्न व विपुल यातना सखोलरीत्या जाणून घेण्यास ते समर्थ होते. रशियाच्या प्राचीन जीवनपद्धतीच्या सगळ्या विचित्रपणांसकट त्यांचे रशियावर प्रेम होते. नोकरशहांनी शिणवून टाकलेल्या ह्या अर्धपोटी आणि अर्धवट झिंगलेल्या लोकांवर त्यांचे प्रेम होते: "सर्वगुणसंपन्न होण्यास" ते लायक होते असा लेस्कोव यांचा प्रामाणिक विश्वास होता. पण सर्व गोष्टींवर प्रेम करताना त्यांनी कुठेही डोळेझाक केली नव्हती. असे यातनामयी प्रेम हृदयाची सर्व शक्ती शोषून घेते आणि त्याच्या मोबदल्यात हातात काहीच पडत नाही. ह्या माणसाच्या आत्म्यात ठाम विश्वास आणि शंका, कल्पनावाद आणि संशयवाद यांचे विलक्षण मिश्रण होते.

शेतकऱ्याच्या मूर्तिपूजनात जेव्हा एक पाखंडी आवाज गंभीरपणे उमटला तेव्हा सर्वत्र विस्मयाचे आणि अविश्वासाचे वातावरण पसरले. रशियन लोक खूप वाचतात, पण त्यात अवधानपूर्णता फारशी नसते. जी पुस्तके वाचकांच्या विचारांशी, आवडीनिवडींशी आणि पुराणमतवादाशी पूर्णतया जुळत, तीच पुस्तके आठव्या दशकात सर्वसाधारणपणे चांगली समजली जात. काळाच्या आज्ञांबाबत, लेस्कोव यांच्या कथांमधील नरोदवादाच्या दंडनियमांबाबत प्रत्येकाच्या मनात काहीतरी नवेपणाची व विरोधी भावना होती. हे नवीन काहींना विदूषकाच्या उपहासासारखे वाटत होते, तर काहींना भूदास-मालकाचा आणि प्रतिगाम्याचा राग असल्यासारखे वाटत होते. लेस्कोव यांच्या कथांचा प्रकार जवळजवळ कुणालाच आवडत नव्हता. लेस्कोव प्रत्येकाचे नावडते बनले. नरोदवादाचा स्वीकार करणे तरुणांमध्ये त्यावेळी प्रचलित बनले होते, पण लेस्कोव तरुणांना नरोदवादाकडे प्रवृत्त करीत नव्हते. उलट 'अर्धा मेंढा-अर्धा बैल' ह्या करुण कथेत इशारा आढळतो: "उडी मारण्यापूर्वी नजर टाक!" परिपक्व वयाच्या लोकांना लेस्कोव यांच्या कथांमध्ये "नागरी विचार" विशेष तेजस्वीपणे व्यक्त

झाल्यासारखे वाटत नव्हते. क्रांतिकारक बुद्धिजीवीवर्ग त्यांच्या 'कुठेही नाही' आणि 'उपसलेल्या कटयारी' कादंबऱ्या विसरू शकत नव्हता व त्याबद्दल त्यांना क्षमा करू शकत नव्हता. प्रत्येक सामाजिक दर्जात, प्रत्येक गटात, संत पाहणारा लेखक कुणालाच खूष करू शकत नव्हता, प्रत्येकाला त्याचा संशय येत होता व त्यामुळे ह्या लेखकाला बाजूला व्हावे लागले होते. पुराणमतवादी, उदारमतवादी, जहाल — सर्वजण एकमताने लेस्कोवना राजकीयदृष्टया संशयास्पद मानत होते. खरे स्वातंत्र्य पक्षांच्या बाहेर कुठेतरी असते ह्याचा ही वस्तुस्थिती म्हणजे आणखी एक पुरावा.

जर्मनीतील एक सर्वोत्तम लोकशाहीवादी, कवी हायने[107] म्हणाले होते की, "ज्याला लोकांबद्दल प्रेम वाटते — त्याने त्यांना आंघोळ करायला लावली पाहिजे." अशा दुष्ट विनोदांबद्दल हायने यांना क्षमा झाली असली, तरी लेस्कोव यांचे मनःपूर्वक कडवट उद्‌गार त्यांच्या माथी पुराणमतवादाचा शिक्का मारण्यासाठी वापरण्यात आले.

शेतकरीवर्गाच्या स्वतंत्र विचारसरणीवर, सामाजिक न्यायाबाबत त्याला वाटणाऱ्या ओढीबद्दल, विश्वास बाळगण्याची लोकांची इच्छा होती, पण लेस्कोव 'अर्धा मेंढा-अर्धा बैल' सारख्या कथा लिहीत होते. ह्या कथेत दाखविले आहे की, धर्म-पाठशाळेतील एकजण शेतकऱ्यांची खात्री पटवून देण्याचा प्रयत्न करीत असतो की लाकडाचा व्यापारीच त्यांचा वैरी आहे. शेतकरी त्या प्रचारकाशी सहमत होतात: "होय, तुमचे बरोबर आहे" आणि नंतर लौकरच व्यापाऱ्याला कळवतात: "पहा, तो दोषी आहे!" व्यापाऱ्यापासून आपली सुटका नाही हे समजून चुकलेला बिचारा प्रचारक गळफास लावून आत्महत्त्या करतो. तो झाडावर टांगलेला आहे आणि त्याच्यावर नजर ठेवणारा शेतकरी तेथे प्रेत पहायला आलेल्या व्यापाऱ्याला म्हणतो: "तो सडणार — तुम्ही जगणार!"

शेतकऱ्यावर विश्वास ठेवणाऱ्या लोकांना अशा कथा आवडतील? 'बेशरम' नामक कथेत सेवास्तोपोल मोहीमेत* भरपूर पैसे हडप करणारा एक मोदी आहे. युद्धात अपंग बनलेले अंमलदार जेव्हा त्याच्यावर ठपका ठेवतात, तेव्हा तो म्हणतो:

---

* १८५३-५६ च्या क्रिमियामधील युद्धाच्या काळात सेवास्तोपोलला ३४९ दिवस वेढा होता.

"–तुमच्या नशिबी लढणे होते आणि सर्वोत्तम परीने तुम्ही आपली कामगिरी पार पाडत होतात. वीरांप्रमाणे तुम्ही लढत आणि मरत होतात, सबंध युरोपात तुमची कीर्ती पसरत होती. आम्हाला आमचे काम होते. ती अशी जागा होती जेथे आम्ही चोरी करू शकत होतो. आम्हीसुद्धा खूप यश साध्य केले. आम्ही एवढ्या चोऱ्या करत होतो, की आम्हीसुद्धा खूप प्रसिद्ध बनलो. पण जर उदाहरणार्थ आपल्या जागा बदलण्याचा हुकूम मिळाला असता, जर आम्हाला खंदकांमध्ये आणि तुम्हाला भांडारखान्यात पाठवले असते, तर मला वाटते की, आम्ही लढलो असतो आणि तुम्ही चोऱ्या केल्या असत्या."

"बेशरम" बद्दलची कथा निवेदन करणारा माणूस पुढे म्हणतो: "बेशरमचे बरोबर होते असे भासते!" अशा कथा कुणाला बरे आवडणार?

ह्या श्रेष्ठ लेखकाचे जीवन असे होते. लोकांपासून व लेखकांपासून अलिप्त राहणारा तो एकाकी होता आणि त्याच्या आयुष्याच्या अखेरीपर्यंत त्याच्याबद्दल गैरसमजच राहिले. केवळ आत्ता त्याच्याकडे लोक विशेष लक्ष देऊ लागले आहेत. आणि हे अगदी योग्य वेळी घडतेय, कारण रशियन माणसांबद्दल आपण परत खूप विचार केला पाहिजे. त्यांचा स्वभाव जाणून घेण्याचा आपण परत प्रयत्न केला पाहिजे.

एक साहित्यिक म्हणून लेस्कोव यांची योग्यता ल्येव तल्स्तोय, गोगोल, तुर्गेनेव, गोन्चारोव[108] यांच्यासारख्या रशियन साहित्यामधील श्रेष्ठींच्या तोलामोलाची आहे. लेस्कोव यांच्या गुणांची ताकद आणि त्यांचे सौंदर्य रशियन भूमीतील उपरीनिर्दिष्ट निर्मात्यांच्या गुणांपेक्षा कणभरही कमी नाही. जीवनपरिस्थितीच्या व्यापक आकलनात, दैनंदिन जीवनातील रहस्यांच्या सखोल अवगाहनात, रशियन भाषेवरील सुंदर प्रभुत्वात, निर्दिष्ट पूर्वसूरींमध्ये आणि समकालीनांमध्ये लेस्कोव तोलामोलाचे होते. रशियन साहित्यपुंगवांमध्ये आणि लेस्कोव यांच्यात फरक म्हणजे ते लवचिक पद्धतीने लिहीत. त्यांचे शब्द चिकणमातीसारखे होते. देवांप्रमाणे त्यांनी आकारहीन गोष्टीतून लोकांच्या आकृती व प्रतिमा निर्माण केल्या. कुणाचा विश्वास बसणार नाही एवढ्या त्या प्रतिमा जिवंत होत्या. त्यांचे पुस्तक वाचताना सजीव केलेले नायक जणू तुमच्याभोवती वावरत असल्याचा, तुम्हाला स्पर्श करीत असल्याचा भास होतो. त्यांच्या यातना तुम्हाला तीव्रपणे जाणवतात. तुम्ही त्यांच्याबरोबर हसता आणि रडता, त्यांचा द्वेष करता

आणि त्यांच्यावर प्रेम करता. त्यांचे आवाज तुम्ही ऐकू शकता, त्यांच्या डोळयांमधील आनंदाची चमक अथवा दु:खाचे धुके पाहू शकता. त्यांच्याबरोबर राहताना एकतर तुम्हाला त्यांच्याबद्दल स्नेहल अनुकंपा वाटते, अथवा वैरभावना जाणवते. आणि लिहिलेले सर्व काही वास्तव जीवनाइतकेच छान आहे, फक्त किंचित जास्त स्पष्ट आणि सुंदर.

लेस्कोव साहित्यिक जादूगारसुद्धा आहेत, पण त्यांची लेखनशैली लवचिक नव्हती. ते निवेदक होते आणि ह्या कलेत ते अजोड आहेत. त्यांची प्रत्येक कथा म्हणजे स्फुरलेले गीत. त्यांनी गुंफलेल्या विशुद्ध रशियन शब्दांच्या सुंदर ओळी काहीवेळा विचारमग्न करतात, तर काहीवेळा त्यांच्यातून हास्याचे खळखळणे ऐकू येते. लोकांबद्दलचे भित्रे प्रेम ह्यातून नेहमीच प्रतीत होते. बायकांच्या प्रेमासारखे हे प्रेम नाजुक आहे. ह्या नितळ प्रेमाला स्वत:चीच लाज वाटते. त्यांच्या कथांमध्ये लोक अनेकदा स्वत:बद्दल बोलतात, पण त्यांची भाषा एवढी विस्मयकारक सजग असते, एवढी खरी असते, एवढी खात्री पटवणारी असते, की ते गूढरीत्या प्रत्यक्ष दिसू लागतात. तल्स्तोय यांच्या पुस्तकांमधील नायकांप्रमाणेच ते स्पष्ट आहेत. थोडक्यात, कारागिरीच्या दुसऱ्या रीतीने लेस्कोव तोच परिणाम साध्य करतात.

तुर्गेनेव, गोन्चारोव आणि इतरांचे त्यांच्या पुस्तकांमधील अस्तित्व त्यांची इच्छा असते तेव्हाच फक्त जाणवते. त्यांनी रेखाटलेल्या व्यक्तीच्या जीवनात त्यांचा स्वत:चा सहभाग वाचकाला जाणवलाच पाहिजे, असे त्यांना वाटेपर्यंत त्यांचे अस्तित्व जाणवत नाही. लेस्कोव सर्वसाधारणपणे वाचकाच्या आसपास असतात. पण एखाद्या म्हाताऱ्या आणि चतुर दाईने परत कथन केल्याप्रमाणे वाटणाऱ्या त्यांच्या विचित्र अर्धवट-कथा, अर्धवट-कहाण्या ऐकताना त्यांचा आवाज अडथळा आणत नाही. त्यांची निवेदनकला होमरच्या अथवा सर्वज्ञानी हेरोडोटसच्या[109] तोलाची आहे, पण प्राचीन कवीचा कंटाळवाणा गंभीरपणा अथवा "इतिहासाच्या जनका"चा भाबडा खरेपणा त्यांच्या कथांमध्ये नाही. तल्स्तोय आणि तुर्गेनेव यांना स्वत:च्या नायकांभोवती काहीतरी पार्श्वभूमी निर्माण करायला आवडते. त्यामुळे ते अधिक सजीव भासतात. त्यांनी निसर्गदृश्यांचा विपुल वापर केला, मानवी भावनांच्या खेळाचे आणि विचारमालिकांचे त्यांनी वर्णन केले. लेस्कोवनी अशा युक्त्यांचा वापर सहसा टाळला. बोली भाषेची कसबी किनार लावून त्यांनी हेच परिणाम साध्य केले.

कठोर लोकांना विशुद्धवादी असेही म्हणतात. अर्थात ह्या नावामुळे ते अधिक चांगले अथवा सुंदर मुळीच दिसत नाहीत. खुद्द लेखकांपेक्षा लेखकांची लेखनरहस्ये व त्यांच्या लहरी आपल्याला जास्त चांगल्या समजतात असा ह्या कठोर टीकाकारांचा दावा असतो. भिन्न नव्या शोधलेल्या शब्दांचा वापर करून रशियन भाषा बिघडवली, असा त्यांचा लेस्कोव यांच्यावर आरोप आहे. पण एखाद्याचे विनोद यशस्वी होत नसले, तरी त्याने एखादेवेळी विनोद केल्यास बिघडले कुठे? देवसुद्धा काहीवेळा वाईट रीतीने विनोद करतात.

सरतेशेवटी ध्यानात घेतले पाहिजे की, लेस्कोव अशा काळात लिहीत होते, जेव्हा अनुवादित साहित्यामधील अनेक परकी शब्दांचा रशियन भाषेत धो धो ओघ लागला होता. पिंडाने मनस्वी रशियन असलेल्या आणि रशियन भाषेचे उत्तम ज्ञान असलेल्या व त्या भाषेच्या सौंदर्यावर प्रेम करणाऱ्या लेस्कोव यांना "गरान्तीया", "सूबसीदिया", "कन्त्सेस्सिया", "ग्रून्देस्त्वों" यांच्यासारख्या वाईट अर्थाच्या व वाईट गोष्ट अभिप्रेत असलेल्या शब्दांचा राग येणे स्वाभाविक होते.

लेस्कोव अस्सल रशियन लेखक आहेत. त्यांच्यावर कोणताही परकी प्रभाव नाही. त्यांची पुस्तके वाचताना रशियाचे त्याच्या सर्व बऱ्या-वाईटासह आकलन होते, गुरफटलेल्या रशियन माणसाचे स्पष्ट दर्शन घडते.

१९२३

# रोमाँ रोलाँ[110]

काहीतरी "चिरंतना"चा विध्वंस झाला नाही असे एकही युग नव्हते आणि तसे ते असू शकणार नाही. स्वतःच्या सामर्थ्याचाही चक्काचूर करू शकेल अशा अंतिम सत्याच्या शोधार्थ विचारशक्तीने स्वेच्छेने, प्रयत्नांच्या पराकाष्ठेने निर्माण केलेल्या श्रद्धा व भाबडचा समजुती नष्ट करण्याचा यत्न केला नाही, असे एकही युग यापूर्वी कधी झाले नाही.

सध्या युरोपातील लोक ज्या अगतिकतेच्या, आत्म-परित्यागाच्या आणि श्रद्धाहीन अशा शोकमय परिस्थितीत रहात आहेत, तसे युग यापूर्वी कधीही अस्तित्वात नव्हते, असे मला वाटते. १९१४-१९१८ च्या कत्तलीच्या भयानकतांमुळे युरोपच्या जनतेची दृष्टी अंध बनली आहे आणि देशव्यापी यादवीच्या वर्गयुद्धात अधिक भयानकता घडणार असे ती गृहीत धरून चालत आहे.

"आपल्यानंतर खुशाल जगबुडी येवो" असे जीवनविषयक तत्त्वज्ञान बाळगणाऱ्या माणसांची संख्या पूर्वी कधी नव्हती एवढी वाढली आहे. आपल्या काळात मानसिक आणि इंद्रियविषयक विकृतीने जेवढे किळसवाणे प्रकार धारण केले आहेत, तसे अद्याप कधीही घडले नव्हते. वास्तवतेच्या वेश्याप्रवृत्तींच्या आहारी एवढचा दुबळेपणाने, एवढचा यांत्रिकपणे माणसे कधीही गेली नव्हती.

परस्परांना समूळ नष्ट करण्यासाठी उपकरणे बनविण्यास एवढचा जोरदारपणे, एवढचा एकतानतेने माणसे झटत होती असा एखादा कालखंड भूतकाळात सापडेल का? आणि मानवतावादाची व औदार्याची विचारप्रणाली निर्माण करण्यासाठी एवढे भिकार प्रयत्न करणारे युग यापूर्वी कधीही झाले नव्हते. अमानवीकरणाच्या आपल्या ह्या दिवसांमध्ये मानवतावादासंबंधी बोलणे म्हणजे प्रत्यक्षात "वाईट तऱ्हा" समजले जाते. आणि जर सवयीपायी "माणसावर दया करा" अशी आरोळी ठोकण्यात आली, तर उघड द्वेषाने आणि सूडाच्या धमकीसह तिचा उच्चार होतो.

"युरोपच्या अधःपाता"बद्दल माणसे अत्यंत उत्तेजितपणे, चतुरपणे

आणि "चवीने"ही लिहीतात व बोलतात. पण युरोपच्या पुनरुज्जीवनाची गरज असल्याची भाषा कुणी केल्याचे मला ऐकू येत नाही.

अमंगळ दिवस आहेत. विनाशाचे पोकळ ध्वनी सर्वत्र ऐकू येत आहेत आणि तिरस्करणीय खिन्नता सगळीकडे भरून राहिली आहे. आणि लोक जेव्हा आनंद साजरा करतात, तेव्हा त्यांच्या किंचाळया १९०६ नंतर मृत्यूची शिक्षा झालेल्या रशियन तुरुंगामधील माणसांनी रचलेल्या बेबंद आनंदी गीताची मला आठवण करून देतात:

माझ्या दोस्तांनो, तुमच्याबरोबरच्या इथल्या जीवनात,
माझ्या आनंदोत्सवाचा शेवटचा दिवस...

सत्ताधारी वर्गांच्या भपकेबाज निर्लज्ज चैनींमुळे अधिकाधिक संतापत चाललेले कामकरी लोक अखिल-युरोपीय सेनेमध्ये संघटित होत आहेत. कालबाह्य झालेल्या सर्व गोष्टी, कुजलेल्या अथवा सध्या सडत असलेल्या सर्व गोष्टी लोखंडी झाडूने झाडून टाकण्याचा त्यांचा इरादा आहे. ह्या कामाचे मी मन:पूर्वक कौतुक करतो. मात्र मला नेहमी आठवण राहते की, क्रांती लोकांसाठी आहे, क्रांतीसाठी लोक नसतात. प्राथमिक आणि जागृत शक्तींच्या मूर्खपणाची अर्थात मला भीती वाटत आहे आणि तिटकाराही वाटतोय. ह्या आपल्या संकटकाळातही सांस्कृतिक मूल्ये निर्माण करण्याचे काम चालू ठेवणाऱ्या लोकांचे जीवन व प्रयत्न मला अत्यंत प्रिय वाटतात.

रोमाँ रोल्लाँ [11] हे अशा अथक चिकाटीच्या माणसांपैकी एक आहेत. कदाचित असे ते एकमेव आहेत. त्यांना माझे मित्र म्हणण्याचा थोर खास हक्क मला आहे आणि म्हणून त्यांच्याविषयी बोलणे मला अत्यंत अवघड जात आहे. याचे कारण, स्वत:च्या मित्रांविषयी बोलताना त्यांच्या सैद्धांतिक अथवा इतर "उणीवां"वर भर देणे आवश्यक वाटणाऱ्या माणसांपैकी मी नव्हे. अशा माणसांनी स्वत:च्या मित्रांविषयी लिहिलेल्या आठवणी अगर व्यक्त केलेली मते ज्या ज्या वेळी मी वाचतो, त्या त्या वेळी माझ्या नजरे-समोर एक अलिखित वास्तुलेख दिसतो: "त्याच्याएवढाच मी चांगला आहे," अथवा "मी जास्त चांगला आहे." मला नेहमी वाटते की, देवाने आदामला उद्देशून केलेल्या शापवाणीतील प्रत्येक गोष्ट बायबलमध्ये छापलेली नाही. "तुझ्या निढळाच्या घामाची तू भाकर खाशील" ह्या शब्दांनंतर पुढे आले पाहिजे: "आणि शासन म्हणून मी तुला मित्र देईन." अशा

प्रकारच्या मित्रापासून रोमाँ रोल्लाँचा नशीब बचाव करील अशी माझी खात्री आहे.

मी स्वत: टीकाकार नसल्यामुळे त्यांच्याबद्दल 'श्रद्धेची शोकांतिका', 'ज्याँ ख्रिस्तोफ'चे कवी आणि लेखक म्हणून, तसेच 'कोला ब्य्रूनोन' ह्या उत्तम, विशुद्ध फ्रेंच कवितेचे निर्माते म्हणून, मी बोलणार नाही. आपल्या काळातील बहुधा ते सर्वांत आश्चर्यकारक पुस्तक आहे. एवढया शोकांतिका घडल्यानंतर, स्वत:च्या देशबांधवांबद्दल – फ्रेंचांबद्दल – अढळ आणि धैर्यशील श्रद्धा व्यक्त करणारे 'कोला ब्य्रूनोन' सारखे जोमदार पुस्तक फ्रान्समध्ये लिहायला अद्भुतकारी प्रेमाने अंत:करण ओत:प्रोत भरलेलेच असले पाहिजे. मला रोमाँ रोल्लाँ यांचे सर्वप्रथम कौतुक वाटते त्यांच्या सर्व पुस्तकांमधून व्यक्त होणाऱ्या, त्यांच्या प्रत्येक कृतीमधून व्यक्त होणाऱ्या ह्या श्रद्धेबद्दल. माझ्या दृष्टीने फार पूर्वीपासून रोमाँ रोल्लाँ हे फ्रान्सचे ल्येव तल्स्तोय आहेत. मात्र ह्या फ्रेंच तल्स्तोयना विचारशक्तीबद्दल तिटकारा नाही. ह्या भयानक तिटकाऱ्यापायी रशियन बुद्धिप्रामाण्यवाद्याला अपार हालअपेष्टा सोसाव्या लागल्या.

लोक म्हणतात की, रोमाँ रोल्लाँ डॉन क्विक्झोट[112] आहेत. मला वाटते की, एखाद्याबद्दल असे उद्गार काढणे ही सर्वोत्तम गोष्ट आहे. आम्हा माणसांबद्दल कोणतीही दयामाया न बाळगता इतिहासाच्या शक्तीं-मार्फत खेळल्या जाणाऱ्या खेळात भलेपणासाठी झटणारा माणूसही एक शक्ती असतो आणि ह्या खेळाच्या लहरीपणाला विरोध करण्यास तो समर्थ असतो.

ल्येव तल्स्तोय यांचे इतिहासाचे तत्त्वज्ञान सत्यापासून फारकत घेणारे होते आणि इतिहासामधील व्यक्तीच्या भूमिकेचे कार्ल मार्क्स यांचे मूल्यमापन तेवढे योग्य नव्हते, असे व्लादीमिर लेनिन सिद्ध करू शकले आहेत. अस्सल फ्रेंच माणसाप्रमाणे रोमाँ रोल्लाँ निग्रही आणि शूर आहेत. खऱ्या अर्थाने ते मुक्तात्मा आहेत. "लेनिन आपल्या काळातील सर्वांत थोर कृतिशील मानव होते आणि अत्यंत नि:स्वार्थ होते," असे लेनिन यांच्या मृत्यूची वार्ता ऐकल्यानंतर दुष्टपणे आनंद व्यक्त करणाऱ्या हजारो सनातन प्रवृत्तीच्या लोकांना अत्यंत शांतपणे ठणकावून सांगणाऱ्या माणसाचा स्वत:च्या योग्यपणाबाबत केवढा दांडगा विश्वास असला पाहिजे.

युद्धाविरुद्ध आपला आवाज उंचावणारे रोमाँ रोल्लाँ हे युरोपातील

पहिले लेखक होते. त्याबद्दल अनेकांनी त्यांचा द्वेष केला. त्यात आश्चर्य नाही – सत्याबद्दल माणूस कुणाला आवडतो ?

जगाला प्रदीर्घ काळापासून गरज असलेल्या अधिक दयाळू सत्याचा लौकरच जन्म सुंदल, असे 'सुन्दर आत्मा' मध्ये त्यांचे काळीज त्यांना सांगते. सध्या जगाचा नाश करायला मदत करणाऱ्या स्त्रीची जागा घेण्यासाठी एक नवी स्त्री जन्माला येणार असे त्यांना जाणवते. ह्या नव्या स्त्रीला जाणीव आहे की, तिने संस्कृतीला संजीवनी दिली पाहिजे. म्हणून त्या संस्कृतीची वैध मालकीण ह्या नात्याने, तिने निर्माण केलेल्या पुरुषांची माता ह्या नात्याने आणि त्यांच्या कृतींना ती जबाबदार राहील अशा नात्याने ह्या जगात ती सन्मानपूर्वक प्रवेश करू इच्छित आहे.

रोमाँ रोल्लाँ यांची जग आणि लोक ह्यांच्याबद्दलची प्रेमाची निष्ठा मला चकित करते. प्रेमाच्या शक्तीवरील त्यांची जबर श्रद्धा पाहून मला त्यांचा हेवा वाटतो. त्यांना मी आशावादी मानीत नाही ; ते आदर्श संन्यासी आहेत. "सर्व काही नष्ट होते, फक्त सत्य शिल्लक राहते," ह्या रशियन म्हणीवर अर्थातच त्यांचा गाढ विश्वास आहे. लोकांचा छळ करून शेवटी फक्त विशुद्ध आणि सुंदर सत्य मागे ठेवणाऱ्या त्या अगणित हालअपेष्टांकडे पौरुषपूर्वक आणि विश्वासपूर्वक डोळेझाक न करता, रोमाँ रोल्लाँ स्वतःच्या कवीच्या आणि तत्त्वचिंतकाच्या कार्याचा पाठपुरावा करीत आहेत.

मी त्यांना कधीही पाहिलेले नाही, पण मी कल्पना करतो की त्यांचे डोळे शांत आणि खिन्न आहेत व त्यांचा आवाज खालच्या सुरातील असला, तरी ठाम आहे.

माझ्या लहानपणापासून मी ज्या देशावर प्रेम केले त्या फ्रान्समध्ये रोमाँ रोल्लाँ यांच्यासारखा एक सुरेख माणूस आणि सहृदय कलाकार राहतो, ह्याचा मला आनंद होतो.

१९२६

# मिखाईल प्रीश्विन[113]

तुमच्याबद्दल लिहिणे सोपे नाही कारण तुमच्यासारखे थोर कसब अंगी असणे आवश्यक आहे आणि ते माझ्यापाशी नाही ह्याची मला जाणीव आहे.

शिवाय, गेली पंचवीस वर्षे रशियन साहित्यात उत्कृष्ट कामगिरी बजाविणाऱ्या मि. प्रीश्विन[114] यांच्यासारख्या अभिजात कलाकाराच्या साहित्याबद्दल मा. गोर्की खुलासेवजा लेख लिहीत आहे, ही कल्पना जरा विचित्र वाटते. तुमच्या वाचकांच्या माथी अज्ञानाचा, असमंजसतेचा दोष मी मारतो आहे असे भासेल.

पुन्हा एकदा लिहिताना मला विशिष्ट संकोच वाटतोय, कारण जरी मी तुमच्यापेक्षा आधी लेखन सुरू केले असले, तरीही एक दक्ष वाचक ह्या नात्याने तुमच्या पुस्तकांपासून मी खूप काही शिकलोय. हे मी शिष्टाचारापायी अगर "खोटया नम्रते"ने म्हणतोय असे मात्र कृपया समजू नका. हे मी शिकलेले सत्य आहे. मी अजूनही शिकतोय आणि केवळ तुमच्यासारख्या श्रेष्ठ साहित्यप्रभुपासूनच नव्हे, तर ज्यांनी नुकतेच लेखन सुरू केले आहे, ज्यांचे गुण आणि ज्यांची क्षमता ह्यांचा अद्याप मेळ बसलेला नाही, पण ज्यांचा भरदार, ताजा, नवा आवाज घुमतोय अशा माझ्याहून पस्तीस वर्षांनी लहान असलेल्या लेखकांपासून मी शिकतोय.

"शिकण्याला काळ-वेळाचे बंधन नाही" म्हणून मी केवळ शिकतोय असेही नाही, तर शिकणे हे माणसाला स्वाभाविक आणि प्रसन्न वाटते म्हणूनही मी शिकतोय. आणि त्याहूनही महत्त्वाचे म्हणजे अर्थातच एक कलाकार दुसऱ्या कलाकारापासूनच केवळ कसब शिकू शकतो.

तुमच्या 'काळा अरब', 'कलोबोक', 'निर्भय पक्ष्यांचा प्रदेश' आणि इतर अनेक कथांच्या काळापासून मी तुमच्याकडून शिकायला आरंभ केला. तुमच्या भाषेतील विशुद्धता आणि साध्या शब्दांच्या लवचिक संयोगांमधून शारीरिक संवेदनेची अनुभूती देण्याचे तुमच्या लेखनातील निर्दोष कसब,

ह्याचे मला आकर्षण वाटले. तुमच्याएवढे हे सामर्थ्य आपल्या फार थोड्या लेखकांपाशी आहे.

पण तुमच्या पुस्तकांची पुन:पुन्हा पारायणे केल्यानंतर मला त्यांच्यात आणखी एक आणि त्याहूनही विशेष म्हणजे अधिक महत्त्वाचा गुण आढळला व तो केवळ तुमच्या ठायींच आहे. इतर कुणाही रशियन लेखकाच्या लेखनात मला तो आढळलेला नाही.

शब्दांमार्फत रमणीय निसर्गचित्र रंगविणारे आपल्यामध्ये अनेक होते आणि अद्यापही आहेत.

इ. तुर्गेनेव, अक्साकोव,[115] यांची 'शिकाऱ्याची टिपणे,' आणि ल्येव तल्स्तोय यांनी रेखाटलेली सुंदर शब्दचित्रे यांची केवळ आठवण करावी. आ. पा. चेखोव यांनी आपले 'स्तेप' जणू रंगीत मण्यांनी विणल्यासारखे भासते. सेर्गेयेव-त्सेन्स्की[116] क्रिमियाच्या निसर्गाचे वर्णन करतात तेव्हा शोपेनचे[117] बासरीवादन होत असल्याचा भास होतो. आपल्या शब्दप्रभूंच्या निसर्गवर्णनांमध्ये खूप काही कौशल्यपूर्ण, हृदयस्पर्शी आणि सामर्थ्यवान आहे.

प्रदीर्घ काळपर्यंत निसर्गाच्या ह्या भावरम्य स्तुतीस्तोत्रांचे मला कौतुक होते. पण काळ जसा उलटत गेला, तशी माझ्या मनात त्यांच्याबद्दल आश्चर्याची भावना उमटू लागली आणि काहीवेळा तर निषेधाची भावना निर्माण होऊ लागली. मला असे वाटू लागले की, "निसर्गाच्या सौंदर्या"-बद्दल बोलण्यासाठी वापरण्यात येणाऱ्या त्या मंत्रमुग्ध भाषेमागे देवमाशाला भुलविण्याचा अजाण प्रयत्न लपलेला होता – त्या भयानक, मतिमंद प्राण्याला! जो निरर्थकपणे आणि अतिप्रचंड प्रमाणात प्रजेला जन्म देतो व तितक्याच निरर्थकपणे स्वत:च्या प्रजेला भक्षण करतो! अद्याप आकलन न झालेल्या काही विशिष्ट गूढांना सामोरे गेल्यानंतर माणसाला जी मानभंगाची जाणीव होते, त्यासारखे ह्यात काहीतरी आहे. निसर्गाच्या सौंदर्यापुढे माणसाने गुडघे टेकून जमिनीवर मस्तक ठेवण्यात काहीतरी "रानटी आणि पिढीजात" आहे. वस्तुत: हे सौंदर्य स्वत:च्या कल्पनाशक्तीमार्फत तो निसर्गाला प्राप्त करून देत असतो.

सरतेशेवटी वाळवंटात कसलेही सौंदर्य नाही, तर अरबाच्या मनात सौंदर्य आहे. आणि फिन्लंडच्या उदास निसर्गात सौंदर्य नाही, तर फिन्निश माणसाने ते सौंदर्य शोधले व आपल्या उग्रप्रकृती देशाला चिकटविले. कुणीतरी म्हटले आहे: "लेवितानने[118] रशियन निसर्गामधील असे सौंदर्य शोधून

काढले जे त्यांच्यापूर्वी कुणीही कधी पाहिले नव्हते." आणि कुणालाही ते शक्य झाले नसते, कारण ते मुळी तेथे नव्हतेच. लेवितानने ते "शोधले" नाही, तर पृथ्वीला त्यांनी दिलेली ती मानवी देणगी होती. त्यांच्यापूर्वी जेकब न्यूइस्दाल,[119] क्लॉद लॉरेन[120] आणि अनेक कुंचलाप्रभूंनी पृथ्वीवर सौंदर्याच्या देणगीचा वर्षाव केलेला होता. 'कॉस्मॉस' चे लेखक हूम्बोल्त[121] यांच्यासारख्या शास्त्रज्ञांनीसुद्धा पृथ्वीला भरपूर सजविले. पाणशेवाळी आणि श्लेष्ममय जलचर ह्यांच्या हिडीस गुंतवळ्यात "आकृती-सौंदर्य" शोधण्यासाठी भौतिकवादी हेक्केलची[122] निवड झाली होती. त्यांना ते सौंदर्य सापडले आणि ते खरेच सुंदर असल्याची त्यांनी आपली जवळजवळ खात्री पटविली. तरीही, प्राचीन ग्रीक लोक – सौंदर्याचे अत्यंत सुसंस्कृत मर्मज्ञ – श्लेष्ममय जलचराला किळसवाणा प्राणी मानीत. हिमवादळाच्या भयानक कण्हण्या-विव्हळण्यांबाबत, विनाशक सागरी लाटांच्या, भूकंपांच्या आणि वादळांच्या भूतनृत्याबाबत उत्कृष्ट श्रवणमधुर भाषेत बोलायला माणूस शिकला आहे. आणि ह्याबद्दल माणसाचे गुणगान व कौतुक केलेच पाहिजे, कारण त्याच्या ह्या निर्धारशक्तीमधून, त्याच्या कल्पनाशक्तीमधून, अंतराळातील ओसाड तुकड्याचे त्याच्या वसतीस्थानामध्ये सतत रूपांतर घडत असते; पृथ्वीला तो स्वतःसाठी अधिकाधिक सोयीस्कर बनवीत असतो; तिच्या सर्व गुप्त शक्तींना स्वतःच्या मनात पकडून ठेवण्याचा प्रयत्न करीत असतो.

मिखाईल मिखाइलोविच, तुमच्या पुस्तकांमध्ये माणूस निसर्गासमोर लोटांगण घालताना मला दिसत नाही. खरे म्हणजे तुम्ही निसर्गाबद्दल लिहिता असे मला वाटतच नाही, तर निसर्गाहून श्रेष्ठ अशा कशाबद्दलतरी – पृथ्वीबद्दल, आपल्या थोर मातेबद्दल – लिहिता असे वाटते. पृथ्वीविषयीचे प्रेम आणि तिच्याबद्दलचे ज्ञान यांचा सुरेख मेळ तुमच्या पुस्तकांमध्ये जसा मला दिसतो व जाणवतो, तसे इतर कोणत्याही रशियन लेखकाच्या पुस्तकांमध्ये मला कधी आढळले नाही, कधी जाणवले नाही.

जंगले आणि दलदली, मासे आणि पक्षी, झुडुपे आणि पशू, कुत्रे आणि कीटक – ह्या सर्वांविषयीचे पूर्ण ज्ञान तुम्हाला आहे. तुमच्या संकल्पनेतील जग विशेष संपन्न आणि विशाल आहे. आणि त्याहून विशेष म्हणजे पृथ्वीविषयीचे, तिच्यावर राहणाऱ्या सर्वांविषयीचे, एकूण "जीवसृष्टी" विषयीचे तुमचे प्रेम विपुल साध्या, तेजस्वी शब्दांनी व्यक्त करण्याची तुमची

हातोटी. 'जोडे' मध्ये तुम्ही लिहिता : "चांगले काय याबद्दल बोलण्याइतके दुसरे अधिक अवघड काहीही नाही." पण मला वाटते, ह्याचे एकमेव कारण म्हणजे ह्याच कथेत तुम्ही म्हटल्याप्रमाणे, "शब्दाचे सामर्थ्य शारीरिक संवेदनेएवढे जोरदार करण्याची इच्छा असते."

'बेरेन्देईचे निर्झर' मध्ये मला तुमचे दर्शन घडते एका प्रेमळ, उमद्या, विवाहेच्छुक तरुणाच्या रूपात. "पृथ्वीच्या रहस्यां"बाबतचे तुमचे शब्द माझ्या कानात घुमतात भावी काळातील मानवाच्या, पृथ्वीचा मालक असलेल्याच्या, तिच्या सर्व अद्भुतांच्या आणि आनंदांच्या निर्माणकर्त्याच्या शब्दांसारखे. तुमच्या लेखनामध्ये मला हे अस्सल वैशिष्टय जाणवते आणि मला ते अभिनव व असीम महत्त्वाचे भासते.

लोक पृथ्वीला उद्देशून सर्वसाधारणपणे म्हणतात :

"आम्ही तुझे आहोत."

तुम्ही तिला म्हणता :

"तू माझी आहेस."

मिखाईल मिखाईलोविच, मानवी प्राण्यांबद्दल तुमच्या मनात मित्रभाव असल्याचे तुमच्या पुस्तकांमधून स्पष्टपणे आढळते. तुमच्या बाबतीत एवढ्या नि:संदिग्धपणे आणि बिनशर्तपणे म्हणता येते तसे फारच थोड्या कलाकारांबाबत म्हणता येईल. मानवाविषयीची तुमची भावना तार्किक सुसंगतीनुसार तुमच्या पृथ्वीविषयक प्रेमातून, उद्‌भवली आहे. काही वेळा असे भासते की, इतर मानवजातीपेक्षा एक अंश अधिक उंचीवर तुम्ही उभे आहात, मात्र त्यात तुम्ही कुणाचाही अवमान करीत नाही. मानवाविषयीच्या तुमच्या चिकित्सक दृष्टीमुळे, सौहार्द भावनेमुळे असे घडणे स्वाभाविक आहे. माणसे भिन्न भिन्न असतात : गरजेपायी दुष्ट बनलेली अथवा दुबळेपणातून चांगली बनलेली ; छळाविषयीच्या द्वेषातून छळवादी अथवा वस्तुस्थितीपुढे शरणागत होण्याच्या सवयीपायी बळी जाणारी. तुमची माणसे मातीमधून बनलेली आहेत आणि मातीशी स्नेह ठेवणारी आहेत. इतर लेखकांच्या माणसांपेक्षा त्यांचा "भूशास्त्रीय आणि जीवशास्त्रीय" कल अधिक आहे. थोर मातेचे ते लोक सर्वांत जास्त वैध पुत्र आहेत, "मानवतेच्या पवित्र देहाचे" अस्सल जिवंत कण आहेत. गारगोटीच्या कुऱ्हाडीपासून ते विमानापर्यंतची मानवजातीची कष्टकारक आणि अद्भुत प्रगती तुम्ही नेहमी आणि अत्यंत प्रगाढपणे आठवता.

पण माणसांमधल्या वाईट गोष्टींपेक्षा चांगल्या गोष्टींवरून त्यांचे मूल्यमापन करण्याचे तुम्हाला ठाऊक आहे, ह्याचे मला मुख्यत्वे कौतुक वाटते. हा साधा शहाणपणा बहुतेक लोकांनी जर साध्य केलाच, तर त्यासाठी त्यांना अपार प्रयत्न करावे लागतात. माणसामधील चांगुलपणा ही त्याने केलेल्या अद्भुत करामतींमधील सर्वांत अद्भुत गोष्ट होय, हे समजून घेण्याची आपली इच्छा नसते. सरतेशेवटी, माणसांनी "चांगले" असण्याची गरज नसते. निसर्गनियम अथवा सामाजिक अस्तित्वाच्या परिस्थिती माणसांमधील दयाळूपणाला व मानवतेला मुळीच उत्तेजन देत नाहीत. असे असूनही, तुम्हाला आणि मला अनेक खरीखुरी चांगली माणसे ठाऊक आहेत. ही माणसे कशामुळे चांगली बनली? केवळ त्यांच्या स्वेच्छेपायी. इतर कोणताही हेतू मला आढळत नाही. माणसे आहेत त्यापेक्षा चांगली बनण्याची त्यांची इच्छा असते व ही इच्छा ती साध्य करतात. ह्या अत्यंत गुंतागुंतीच्या प्राण्यापेक्षा ह्या पृथ्वीवर अधिक सुरेख आणि अद्भुत काय आहे? एवढे खरे की, अंतर्गत संघर्षांनी तो भरलेला आहे. पण भयानक कल्पनाशक्तीचे तो स्वतः संगोपन करतोय आणि स्वतःलाच हसण्याची अतिदुष्ट क्षमता तो अंगी बाणवतोय.

माणसांचे निरीक्षण करण्यास आणि त्यांच्याबद्दल विचार करण्यास मी अनेक लोकांपासून शिकलो. आणि एक कलाकार म्हणून तुमच्याशी झालेल्या ओळखीमुळेही मला हे करण्यास शिकविले; कसे ते मला सांगता येत नाही, पण पूर्वीपेक्षा माझी ती क्षमता वाढली.

विशेषतः रशियनांबाबत, ते ज्या काही जीवनामधून गेले आहेत आणि आजही ज्यामधून ते जात आहेत ते लक्षात घेता, अधिक लक्षपूर्वक आणि आदरपूर्वक, वेगळ्या, अधिक वरच्या दृष्टीकोनामधून त्यांच्याकडे पाहणे आवश्यक आहे. अर्थात अद्याप त्यांचे देवदूतांमध्ये रूपांतर होण्यास खूप अवकाश आहे ह्याची मला उत्तम जाणीव आहे. त्यांनी देवदूत बनावे अशी माझी इच्छाही नाही. पण त्यांनी आपले काम प्रेमाने करावे आणि त्या कामाच्या प्रचंड महत्त्वाची त्यांना जाणीव असावी, एवढीच माझी इच्छा आहे.

नव्या जीवनाची निर्मिती करण्याचा प्रयत्न करणाऱ्या आपण सर्वांनी एकमेकांबाबत विशेष निकटता आणि आस्था बाळगणे अत्यंत महत्त्वाचे आहे. आपण राहतो त्या काळाच्या कठोरतेमुळे आणि आपण हाती घेतलेल्या कामाच्या अफाटतेमुळे असे घडणे आवश्यक आहे.

“जर तुम्ही लेखक आहात – तुम्ही लिहिलेच पाहिजे!”

काही बाबतीत माझे गैरसमज झाले आहेत आणि काही बाबतींचा मी अतिरेक केला आहे, यात काही संदेह नाही. पण जर तसे असेल, तर माझ्या बाजूने मला त्याची पूर्ण जाणीव आहे; कारण मी विचार करणारा माणूस आहे आणि काही अंशी उर्मट आहे हे प्रत्येकाला माहीत आहे. पण माझ्या पद्धतीने गैरसमज होण्यात काही अपाय नाही असे मला वाटते, कारण “उदात्त असत्यांमार्फत” स्वतःचे वा इतरांचे सांत्वन करण्याच्या इच्छेतून माझे गैरसमज उद्‌भवत नाहीत, तर जे अपरिहार्यपणे अस्तित्वात येईल, ज्याचीच केवळ लोकांना गरज आहे आणि पृथ्वीवरील माणसे ह्या नात्याने ज्यातून त्यांना स्फूर्ती मिळायची आहे, अशा सत्याच्या बाजूने माझ्या चुका घडल्या आहेत ह्या ठाम धारणेतून ते उद्‌भवले आहेत.

१९२६

# आनातोल फ्रान्स[123]

अत्यंत वैशिष्ट्यपूर्णरीत्या आणि अनुकूलरीत्या इतर राष्ट्रांपेक्षा फ्रान्सचे वेगळेपण कशामध्ये आहे असे जर मला विचारले तर मी उत्तर देईन: निराशावादाप्रमाणे धर्मांधता फ्रेंच माणसाच्या विचारसरणीला परकी आहे. मला असे वाटते की, फ्रेंच संशयात्मे प्रोतागोर[124] अथवा पीरोनचे[125] शिष्य नाहीत, तर सॉक्रेटिसचे[126] ते शिष्य आहेत.

क्रमिक पुस्तकांमधील सत्यांना, आचारसंहितेच्या मूलभूत तत्त्वांना, हानीकारक असलेल्या विचाराच्या बेबंद अराजकाला बुद्धिमत्तेच्या प्रचंड सामर्थ्याने सॉक्रेटिसने आळा घातला व वितंडवाद्यांच्या प्रभावाला मर्यादा घातली हे प्रत्येकाला माहीत आहे. माणसाची विचारधारा जर संपूर्ण मुक्त असली आणि स्वतःचे व जगाचे अभिज्ञान करणे हे तिचे जर उद्दिष्ट असले, तर माणसाच्या इच्छाशक्तीद्वारे वस्तुनिष्ठ सत्य साध्य करणे शक्य आहे, असे त्याने प्रस्थापित केले.

अर्थात अशी शक्यता आहे की, फ्रान्सच्या आत्मिक विकासाच्या इतिहासाबद्दलचे माझे ज्ञान तोकडे आहे आणि माझे निष्कर्ष चुकीचे आहेत. पण जे काही थोडेफार मला ठाऊक आहे त्यावरून माझ्यासमोर असे चित्र उभे राहते की, फ्रेंच माणसाच्या बुद्धिमत्तेमध्ये सुदैवाने धर्मांध आणि थंडचा आत्मविश्वासाचे वावडे आहे; ह्या ना त्या पुरातन तत्त्वाला सदासर्वकाळ स्थापित करण्याच्या जुलमी इच्छेचे त्याला सुदैवाने वावडे आहे; ह्या ना त्या व्यवस्थेच्या संकुचित बोळकंडीत विचाराला कोंबण्याचा तो प्रयत्न करीत नाही आणि पोथीनिष्ठांची अभंगता चौकशी करणाऱ्याच्या हुजतखोर क्रौर्याने राखत बसत नाही. अभिज्ञेच्या स्वातंत्र्याला मर्यादा घालणारा हेकट पंडितांचा आवडता प्रोक्रूस्ताचा[127] पलंग फ्रान्समध्ये कधीच फारसा लोकप्रिय होऊ शकला नाही असे माझे मत आहे. आणि "मी विचार करतो, म्हणून मी आहे," असे बोलणारा एक फ्रेंच माणूस होता हे मला अगदी स्वाभाविक वाटते.

राब्ले[128] आणि मॉन्तेनपासून[129] ते वोल्तेरपर्यंत,[130] फ्रेंचांच्या संशय-वादाने, सॉक्रेटिसप्रमाणेच प्रबोधनाच्या गरजेचे प्रतिपादन केले. "तज्ज्ञ माणूस" म्हणून बोलताना राब्लेने लोकांना सल्ला दिला की, निसर्गाचा अभ्यास करा, निसर्गातील शक्तींना मानवाच्या कल्याणासाठी राबवा. मॉन्तेनने म्हटले होते की, "लोकांपासून दडून राहणारे" तत्त्वज्ञान म्हणजे निव्वळ "ढोंगीपणा."

जोनाथन स्विफ्टचे[131] एकही आनंदी स्मित मला आठवत नाही, पण संन्यासी असलेला राब्ले म्हणजे हास्याचा धबधबा होता. त्यापूर्वी तसा कुणी घडला नाही आणि त्यानंतर रोमाँ रोल्लाँच्या 'कोला ब्यूनोन' पर्यंत तसा कुणी झाला नाही. राब्लेवादी हसणे फ्रान्समध्ये सतत घुमत राहिले आहे आणि मनसोक्त हसणे हे डोके ठिकाणावर असल्याचे एक खात्रीलायक चिन्ह आहे.

इतर देशांमध्ये आपल्याला निराशावादी तत्त्वज्ञ आणि निराशावादी कवी दिसतात. पण जगामधील आणि स्वत:मधील सुसंवादाच्या व्यर्थ शोधा-पायी अपमानीत झालेला व स्वत:ला आणि जगाला तीव्र आवेगाने शिव्याशाप देणारा माणूस वेगळा; आणि ह्या जगातील विपुल छळांचे मनावर व शरीरावर होणारे आघात मुकाट सोसणारा आणि ते छळ नष्ट केले पाहिजेत म्हणून ओरडणारा माणूस वेगळा. म्हणून बॉदलेरचा[132] निराशा-वाद मी मान्य करतो, पण वस्तुस्थितींच्या दुष्ट गोंधळाला दुर्मुखलेपणाने लेनाऊचे[133] स्वीकारणे मला अजिबात पसंत नाही. बाल्झाकचे[134] खरे आणि तिरस्काराने भरलेले पुढील शब्द पुन:पुन्हा उद्धृत करायला मला फार आवडतात: "सत्याप्रमाणे मूर्ख!"

मी असेही म्हणेन की, "युरोपचा अध:पात" आणि युरोपीय संस्कृतीची आगामी अखेर, ह्या विषयांवर कदाचित फ्रान्समध्येच सर्वांत कमी बोलले आणि लिहिले जाते.

जीवनाच्या सर्व अंगांना सहजरीत्या सामावणाऱ्या ह्या सर्व तुलना अनावश्यक असल्याचे वाचकाला वाटणे कदाचित शक्य आहे. पण ज़ेव्हा आनातोल फ्रान्स[135] यांच्या बुद्धिमत्तेविषयी बोलायचे असते, तेव्हा राष्ट्रा-च्या स्वभाववैशिष्ट्याला दुर्लक्षिणे अशक्य आहे. दस्तोयेवस्की आणि तल्स्तोय यांनी आपापल्या परींनी रशियन माणसाच्या आत्म्याचे पूर्णत्वाने दर्शन घडविले आहे. माझ्या मते, त्याच प्रगाढपणे आणि सर्वसमावेशकतेने फ्रेंच

माणसाचे दर्शन आनातोल फ्रान्स यांनी घडविले आहे. ह्या तुलनेबद्दल रशियन बाजूने आक्षेप येण्याच्या शक्यता आहेत, पण तो केवळ आवडी-निवडींबाबतचा वाद राहील. शिवाय, मी सौंदर्यवादी कक्षांची तुलना करीत नाही, तर राष्ट्राचा स्वभाव कोणत्या प्रमाणात व्यक्त झाला आहे याबाबत बोलत आहे आणि ह्या दृष्टिकोनातून आनातोल फ्रान्स जगातील महाश्रेष्ठ प्रतिभावंतांच्या तोडीचे आहेत असे माझे मत आहे. ह्यात भर घालून म्हटले पाहिजे की, निकोप मनाचा माणूस आपल्याला काहीसा साधासोपा वाटतो. पण हे अगदी चुकीचे, अपायकारक आहे आणि जीवनाविषयीच्या विकृत चवीचा हा पुरावा आहे.

आनातोल फ्रान्स यांच्या विचारसौंदर्याबद्दल मी बोलणार नाही, कारण त्यांची भाषा मला अवगत नाही. त्यांच्या शैलीच्या डौलदार सामर्थ्याबद्दल आणि संपन्नतेबाबत काहीही न बोलण्याची माझ्यावर सक्ती आहे, पण त्यांच्या पुस्तकांच्या रशियन अनुवादांमध्येही हे गुण पूर्णतया ठळकपणे दिसून येतात. आनातोल फ्रान्स यांचे धैर्य आणि त्यांची आत्मिक निकोपता मला सर्वांत अधिक प्रभावित करतात. «Mens sana in corpore sano»* चे ते खरोखरीच आदर्श उदाहरण आहेत. आत्यंतिक सामाजिक आपत्तींच्या काळात ते राहिले, पण घडामोडींच्या मूल्यमापनात त्यांच्या तीव्र बुद्धीने काही चूक केल्याचे कधी मला आठवत नाही. मात्र मला कबूल केले पाहिजे की, त्यांचा युद्धविषयक दृष्टिकोन आणि कम्युनिझमबाबतचा दृष्टिकोन यांच्यामधील दुवा मला कधीही स्पष्टसा उमगलेला नाही. त्यांच्या-पाशी उच्चभ्रू मनाची विलक्षण अलिप्तता होती आणि ह्या उमरावी अलिप्तपणापायी जगाच्या दु:खांना विशाल रूप देणे त्यांना कधी जमले नाही. लोकांविरुद्ध त्यांनी तक्रारी केल्या नाहीत अथवा वैयक्तिक दु:खांना वेशीवर टांगले नाही. पण ह्या विलक्षण पुरुषाने फार यातना भोगल्या ह्यात काही संशय नाही. 'पेंग्विनचे बेट' सारख्या धाडसी पुस्तकावर काम करतानाच केवळ त्यांना हालअपेष्टा सोसाव्या लागल्या असे नाही. 'संशय-वादाविषयी' ह्या लेखात ते धर्मगुरूचा साहाय्यक जॉन दिआकोन ह्याची कथा देतात :

"सम्राट त्रायानला[136] कायमचे बहिष्कृत केल्याच्या विचाराने संत

* निकोप शरीरात निकोप आत्मा.

ग्रेगोरी जेव्हा रडले, तेव्हा देवाने त्रायानच्या आत्म्याला चिरंतन यातनां-पासून मुक्त केले. आत्मा नरकात राहिला, पण त्यानंतर त्याने तेथे कोणतेही हाल सोसले नाही."

युरोपातील सत्ताधारी वर्गांनी घाणेरड्या नरकात राहण्याची कला अत्यंत कलात्मकतेने आणि सुरेखरीत्या साध्य केली आहे. बाह्यत: उपहा-सात्मक भासणाऱ्या आणि प्राचीन तत्त्वज्ञाचे थोर मन लाभलेल्या आनातोल फ्रान्स यांनी सर्व "वाईट" गोष्टींचे आश्चर्यकारक कुतूहलाने निरीक्षण केले व त्यांचा अनुभव घेतला. स्वत:च्या मोठ्या नाकामार्फत त्यांनी सूक्ष्माती-सूक्ष्म अशा नरकातील सर्व दुर्गंधांना हुंगून पाहिले आणि सॉक्रेटिसप्रमाणे, सर्वांच्या मते चांगल्या ठरलेल्या गोष्टींमधील वाईटपणा त्यांनी उघड करून दाखविला व हे काम त्यांनी अत्यंत क्षमतेने केले. खेदजनक "ड्रेयफूस[137] खटल्याबाबतचा" त्यांचा दृष्टिकोन, पॉल मार्गरीटच्या छळाबाबत त्यांनी लिहिलेले पत्र आणि इतर अनेक गोष्टी पुरेशा खात्रीशीरपणे दाखवितात की, त्यांच्या संशयवादाला लोकांबाबतची आणि जगाबाबतची उदासीनता माहीत नव्हती. पीरोनचे त्यांना कौतुक होते व ह्या संशयात्म्याची शिकवण त्यांना "नैतिक शिकवण" वाटली.

चांगले आणि वाईट ह्याबाबतच्या आमच्या संकल्पनांमधील सापेक्षता अनातोल फ्रान्स ह्यांच्याइतकी कुणालाही जाणवली नव्हती. गी दे मोपासाँ[138] यांच्या 'प्येर आणि ज्याँ' ह्या पुस्तकावरील परीक्षणात त्यांनी संन्याशाच्या सौम्य उपहासाने म्हटले होते की, सापेक्षाला सर्वंकष समजण्याची लोकांची सहजप्रवृत्त चूक किती "भाबडी" होती.

त्यांचा ठाम विश्वास होता की, "आपल्याला फक्त एकच वास्तवता माहीत आहे – आपला विचार. आपला विचार जगाला निर्माण करतो." अत्यंत निष्ठेने आणि अविचलपणे त्यांनी फक्त एकाच सत्यावर विश्वास ठेवला – सौंदर्य. 'इतिहासाची पापे' नामक श्री. बुर्दो[139] यांच्या पुस्तका-वरील परीक्षणातील त्यांचे शब्द शुद्ध ओतीव सोने होते:

"सौंदर्य आणि सत्य यांच्यामधील एकाची निवड मला करायची असेल तर मी घुटमळणार नाही: मी सौंदर्याला निवडीन, कारण खुद्द सत्यापेक्षा अधिक उच्च आणि सखोल सत्य त्यात सामावलेले आहे ह्याची मला खात्री असेल."

सौंदर्यशास्त्र हे आनातोल फ्रान्स यांचे नीतिशास्त्र होते. भावी काळाचे ते नीतिशास्त्र होते. न्यायामध्ये त्यांनी सर्वप्रथम सौंदर्य पाहिले. जीवन जेव्हा सौंदर्याने संपृक्त होईल तेव्हाच ते न्याय्य बनेल, हे त्यांनी चतुरपणे आधी जाणले. मला असे वाटते की, विचारालासुद्धा त्यांनी एवढे मौल्यवान मानले ह्याचे कारण तो मानवी मनाच्या सौंदर्याचे अत्यंत परिपूर्ण रूप आहे असे त्यांनी गृहीत धरले होते. मात्र आपण विचाराचे साधन आहोत, विचाराला आधीन झालेले प्राणी आहोत, असे त्यांना कधीही जाणवले नव्हते. त्यांच्या दृष्टीने विचार कधीही पूजनीय दैवी वस्तू नव्हता अथवा बुद्धिमत्तेचे त्यांना स्तोम वाटत नव्हते.

आनातोल फ्रान्स हे विचारावर सत्ता गाजविणारे होते, त्यांनी विचाराला जन्म दिला, त्याची जोपासना केली, त्याला शब्दांच्या वस्त्रांनी अलंकृत केले व मोठ्या डौलदारपणे आणि थाटामाटाने त्याला जगात आणले, असे मला वाटते. हा त्यांचा विचार आनंदी व सजग होता. त्याचे स्मित उपरोधिक होते, पण त्यात दुष्टावा नव्हता. बुद्धिमान संगीतकाराच्या सहजतेने त्यांनी ह्या विचाराच्या कपटी खेळांचे नियंत्रण केले. स्वतःला श्रेष्ठ कलाकार मानणाऱ्या आणि अराजकाच्या टप्प्याशी येऊन पोहोचलेल्या वाद्यवृंदातील सर्व कलाकारांचे निर्देशन करणाऱ्याची भूमिका त्यांनी पार पाडली.

जगातील इतर प्रत्येक गोष्टीप्रमाणे बुद्धिमत्तासुद्धा शांततेची आणि निवांतपणाची आस धरते. पोथीनिष्ठांना, विचारप्रणालींना आणि व्यवस्थांना काहीशा घाईने, धाडसाने व वारंवार दुजोरा देते. त्यामुळे आपल्या संकल्पना अधिक सखोल व विस्तृत करण्याच्या विचारस्वातंत्र्याच्या पुढील कार्यात अडथळा येतो. आनातोल फ्रान्स ह्यांनी एका विचित्र आकाराच्या प्राण्यामध्ये बुद्धिमत्तेला पाहिले असावे अशी मी अनेकदा कल्पना केली होती: त्याला आबादोन्नाचे[140] मस्तक व रागीट चेहरा होता आणि माणसाला विविध सत्यांच्या भक्कम जाळ्यात अडकवून जगाच्या अभिज्ञेत त्याची इच्छा गुंतवणाऱ्या सपंख कोळ्याचे त्याला शरीर होते. एका गुंतागुंतीच्या पूर्णाकृतीला एक छोटा भाग गुलाम करू पाहतो हे जेव्हा आनातोल फ्रान्स यांनी पाहिले, तेव्हा त्यांच्या मुद्रेवर उपरोधिक स्मित उमटले.

जर आनातोल फ्रान्स यांना बुद्धिप्रामाण्यवादी म्हणायचेच असेल, तर

बुद्धिमत्ता म्हणजे जणू सिंह अथवा साप समजून त्यांना शिकविणारे असे ते बुद्धिप्रामाण्यवादी होते. बुद्धीशी खेळण्यात, तिच्याशी युक्तिवाद करण्यात, तिला चिडविण्यात आणि सतावण्यात त्यांना मजा वाटायची. बुद्धीने प्रतिपादन केलेल्या सत्यांची असुरक्षितता ते सतत दाखवून देत होते व त्या दाखविण्यातील साधेपणा मला मोठा चतुर वाटतो. "खरडेवहीतल्या सत्यां"च्या जाड, खरबरीत त्वचेवर जेव्हा त्यांच्या तर्कशास्त्रीय प्रहारांचा रोख असे, तेव्हा ते विशेष जोरदार असत. ह्या थोर फ्रेंच माणसाच्या सुप्रसिद्ध सार्थ उपरोधामधून तसे एकही सत्य सुटल्याचे मला आठवत नाही. श्री. कॉइनारनी प्रवचन दिलेल्या प्रत्येक गोष्टीची, 'राणी पेदाके' मध्ये बोलल्या गेलेल्या प्रत्येक गोष्टीची, अक्षरशः राख करण्यात आली. नीतिवचनांच्या असुरक्षितपणाला आणि अनेकदा बेढब असलेल्या अशा चौकटींना उघडेवाघडे करून दाखविण्यात आले.

आनातोल फ्रान्स यांचे बोलणे मी ऐकतोय असे मला भासते. त्यांच्या खेळातील जोडीदारीणीविषयीचा – बुद्धीविषयीचा – आदर एकही मिनिट न गमावता, अस्सल फ्रेंच माणसाच्या अदबीने ते तिला उद्देशून म्हणताहेत :

"ओहो, सिनिओरे, तुम्ही खरोखरीच थोर आहात, निर्विवादपणे उत्तम आहात, पण तुमचे एवढे वय होऊनही तुम्ही अद्याप फार लहान आहात आणि संपूर्ण निर्दोषता तुमच्यापासून अजून खूप लांब आहे. तुम्ही बंडखोरी छान करता, पण काही वेळा मला असे भासते की; सत्याच्या उबदार घरट्यात निवांतपणा शोधण्याच्या चिंतेपायी तुम्ही ह्या बंडखोरीला प्रवृत्त होता आणि तुमची कितीही इच्छा असली तरी निवांत राहणे तुमच्या आवाक्यात नाही. तुम्ही फार गोष्टी सुरू करून ठेवल्या आहेत आणि तुम्हाला खूप कष्ट करावे लागणार आहेत, खूप धिटाईने काम करावे लागणार आहे, पोथीनिष्ठांचे बेडौल घण घालण्याऐवजी गृहीतसिद्धांतांची निर्मिती करावी लागणार आहे."

फ्रान्सच्या वैभवमुकुटामध्ये – ज्या देशात गुणी असणे फारसे आश्चर्याचे नाही – आनातोल फ्रान्स यांचे नांव शतकानुशतके झळकत राहील हे सांगण्याची गरज नाही.

ह्या शहाण्या माणसाच्या चिरविश्रांतीच्या स्थळी, त्यांच्या थडग्यावर, आनातोल फ्रान्स असे फक्त दोनच शब्द कोरण्याचे ठरविणारे सूज्ञ होते.

स्वतःच्या गुणवत्तेच्या भांडारांनी आपले जग समृद्ध करून गेलेल्या, त्याची कला व त्याची मोहक प्रतिमा ह्यांना खरोखरीच समजून घेऊन तिचे मूल्य समजणे आपल्याला सोपे करून गेलेल्या, ह्या माणसाचे महत्त्व ह्या दोन शब्दांमधून पूर्णपणे व्यक्त होते.

१९२७

# कामगारवर्गीय लेखक

**पक्रोवस्क शहरातील तंत्रविद्यालयाच्या साहित्यवर्तुळाच्या सदस्यांना पत्र**

प्रिय साथीहो! मी "कामगारवर्गीय" अथवा "बिगर-कामगारवर्गीय" लेखक आहे ह्याबद्दलच्या टीकाकारांमधील वादात वैयक्तिकरीत्या मला मुळीच रस नाही. सोविएत संघाच्या सर्व कानाकोपऱ्यांमधील कामगारांकडून महोत्सवानिमित्त मला आलेल्या अभिनंदनांमध्ये "आमचा", "कामगार-वर्गीय"; "साथी" असे कामगारांनी एकमुखाने मला संबोधले आहे. आणि टीकाकारांपेक्षा कामगारांचा आवाज निश्चितच मला जास्त महत्त्वाचा वाटतो. कामगार मला परका मानत नाहीत; तर स्वतःचा "साथी" मानतात, ह्या वस्तुस्थितीचा मला फार अभिमान वाटतो. माझा हा प्रामाणिक अभिमान आहे आणि मोठा गौरव आहे.

सोविएत जनता ज्या वास्तव परिस्थितीमध्ये आहे, त्या परिस्थितीशी "कामगारवर्गीय" हा शब्दप्रयोग पूर्णतः सुसंवादी ठरत नाही असे मला वाटते.

तुम्हाला माहीतच आहे की, स्वतःच्या मिळकतीवर राहणाऱ्या आणि अस्तित्वाची इतर कोणतीही साधने नसलेल्या लोकांचा वर्ग म्हणजे "काम-गारवर्ग". पण ह्या देशात ज्यांनी राजकीय सत्ता हस्तगत केली आहे आणि आता हळूहळू देशाच्या अर्थव्यवस्थेला व भांडारांना जे स्वतःच्या कबजात घेत आहेत, अशा सोविएत कामगारांना आणि शेतकऱ्यांना, काम-करी समूहांना, ही प्रवृत्ती लागू करणे शक्य आहे का? हा प्रश्न सोडविणे तुमचे काम आहे.

तुम्ही विचारता: "खरा कामगारवर्गीय लेखक कोणत्या लक्षणांवरून ओळखायचा?" अशी खूप लक्षणे आहेत असे मला तरी वाटत नाही. माणसाला आतून आणि बाहेरून अशा दोन्ही बाजूंनी दडपणाऱ्या प्रत्येक गोष्टीबद्दल लेखकाला वाटणारा सक्रिय तिटकारा; माणसाच्या क्षमतांच्या मुक्त वाढीला आणि विकासाला अटकाव करणाऱ्या प्रत्येक गोष्टीबद्दल लेखकाला वाटणारा तिटकारा; रिकामटेकडे, परपुष्ट, हलकट माणसे,

हांजीखोर आणि एकूण कोणत्याही प्रकारचा व दर्जाचा प्रत्येक खलपुरुष, ह्यांच्याबद्दल लेखकाला वाटणारा कठोर तिटकारा.

माणूस हा सर्व सृजनशील शक्तीचा उगम आहे, जगातील सर्व प्रकारच्या वस्तूंचा आणि सर्व चमत्कारांचा निर्माता आहे, असा मानवा-बद्दल लेखकाला वाटणारा आदर; माणूस हा नैसर्गिक आपत्तींविरुद्ध झुंजणारा आहे आणि नव्या "दुसऱ्या" निसर्गाचा निर्माता आहे, म्हणून लेखकाला वाटणारा आदर. स्वतःच्या शारीरिक शक्तींच्या वृथा व्ययातून — वर्गीय राज्यात अपरिहार्यपणे मूर्ख आणि दुष्ट असलेले व्यय — मुक्तता व्हावी म्हणून मानवाने स्वतःच्या कष्टांमधून, विज्ञानामधून आणि तंत्रांमधून हा नवा "दुसरा" निसर्ग निर्माण केला आहे.

सामुदायिक श्रमाला लेखकाने दिलेले काव्यात्म रूप: एका माणसाची दुसऱ्यावर सत्ता आणि निरर्थक शोषण ह्यांना पूर्णतया वगळून टाकणारे नवे जीवन-प्रकार निर्माण करणे, सामुदायिक श्रमाचे ध्येय आहे.

स्त्री म्हणजे केवळ शरीरसुखाचे साधन नाही, तर खडतर जीवन-क्रमातील ती खात्रीशीर साथी आणि मदतनीस आहे, असा लेखकाचा स्त्रीविषयीचा दृष्टिकोन.

मुलांविषयी दयाळू वृत्ती: आपण करीत असलेल्या प्रत्येक गोष्टीबाबत आपण मुलांना जबाबदार असतो.

जीवनाबाबत वाचकांचा क्रियाशील दृष्टिकोन जागा करण्याचे, स्वतः-च्या सामर्थ्याबाबत त्यांच्यात विश्वास बिंबविण्याचे, जीवनाच्या महान आशयाला व श्रमाच्या आनंदाच्या महान महत्त्वाला समजून — जाणून घेण्यास आतून — बाहेरून त्यांना प्रतिबंध करणाऱ्या प्रत्येक गोष्टीवर ते विजय मिळवू शकतील असा विश्वास त्यांच्यात निर्माण करण्याचे, लेखकाचे प्रयत्न.

असा लेखक श्रमिक जगताला आवश्यक आहे असे थोडक्यात माझे मत आहे.

तुम्हाला माहीत आहे की, सत्ता हाती घेण्याची इच्छा श्रमिक जगात जागी होत आहे आणि ही प्रक्रिया सबंध जगभर चालू आहे; केवळ युरोपातच नव्हे तर आशिया आणि आफ्रिकेतही.

आणि तुम्हाला, सोविएत संघातील कामगारसामर्थ्याच्या अग्रदलाला, ठाऊक पाहिजे की, जगामधील कामकरी समूहांच्या दृष्टीने तुम्ही एक

उदाहरण आहात, एक धडा आहात; कोटचवधी डोळे तुमच्याकडे पहात आहेत आणि कोटचवधी कान तुमच्याकडे लागले आहेत.

तुम्हा तरुण मंडळींवर इतिहासाने एक फार मोठी कामगिरी सोपविली आहे – मानवाबद्दलच्या नव्या दृष्टिकोनाचे पुरस्कर्ते होणे; नवजीवनाच्या उभारणीचे शिक्षक होणे. ह्यामुळे परिश्रमपूर्वक अभ्यास करणे तुम्हाला क्रमप्राप्त आहे. माणूस जेवढा अधिक ज्ञानी बनतो, तेवढा तो अधिक सामर्थ्यवान होतो, ही गोष्ट निर्विवाद आहे. आपले ध्येय किती महान आहे आणि भव्य आहे, ही जाणीव माणसाला अधिक सामर्थ्यवान बनविते.

आणि मग सर्वसामान्य अशा "जीवनातील सर्व क्षुल्लक गोष्टी", सगळी जुनी गलिच्छता आणि घाण, "शतकानुशतकांची धूळ", "क्षुद्र-प्रवृत्तीवादा"ची "मध्यमवर्गीय" लाजिरवाणी मनोरचना बनविणाऱ्या सर्व गोष्टी, लेखकाच्या दृष्टीने अस्तित्वात रहात नाहीत; त्यांची त्याला बाधा होऊ शकत नाही.

"घरकेंद्री वृत्ती"च्या फालतू विषाला लेखकाने बळी पडू नये. त्याने त्याविरुद्ध निग्रहाने संघर्ष करावा. "जीवनातील क्षुल्लक गोष्टींचा" त्याला अडथळा होतो, अडचण घडते असे त्याने विव्हळू नये. दैनंदिन जीवनातील दोष प्रत्येकाला अडथळा करतात, तक्रार करणे चांगले नव्हे, कट्टर संघर्ष आणि आनंददायी श्रम ह्यांच्या साह्याने आपल्या जीवनातील सर्व अडचणींवर मात करता येते, हे त्याला माहीत असावे.

लेखकाला ठाम माहीत असावे आणि त्याने आठवण ठेवावी की, माणूस स्वभावतः "खलपुरुष" नाही, पण वर्गीय शासनसंस्थेच्या तिरस्करणीय समाजरचनेमुळे तो बिघडला आहे. हिंसेविना, मत्सर, लोभ, तिटकारा ह्यांना जागृत केल्याविना, सक्तीच्या आणि अनेकदा निरर्थक अशा श्रमा-बद्दल चीड निर्माण केल्याविना, सहजप्राप्तीच्या प्रयत्नांविना, हलक्या आणि नीच सुखांविना, व्यसनांविना, मद्यपान व इतर हलकट गोष्टींविना, ही शासनसंस्था अस्तित्वातच राहू शकत नाही.

तुम्हा तरुण मंडळींना माहीत हवे आणि तुम्ही लक्षात ठेवले पाहिजे की, कुणीही "जन्मतः हलकट" असतो असे प्रतिपादन करणे फायदेशीर व आवश्यक असलेली माणसे आहेत. ही माणसे म्हणतात की, कुणाच्याही शारीरिक, पाशवी अंतःप्रवृत्तींमध्ये नीचपणा दडलेला असतो; "सैताना"-मार्फत त्या नीचपणाला जागे करण्यात आले आणि करण्यात येते, सर्व

मानवी कृत्ये म्हणजे "मानवी आत्म्याच्या कबजासाठी सैतान व देव यांच्यात चाललेल्या चिरंतन संघर्षाचे प्रतिबिंब" आहेत.

अधिक चांगल्या जीवनाबद्दलच्या, श्रमाला आणि सृजनाला मुक्त करण्याच्या मानवी इच्छेला मर्यादा घालण्याची, त्या इच्छेला ठार मारण्याची आकांक्षा, मानवाला वर्गीय शासनसंस्थेचा आणि समाजाचा गुलाम बनविण्याची आकांक्षा, अशा प्रवचनाचा आधार आहे. माणूस म्हणजे कच्चा माल आहे, कच्चा धातू आहे व त्याच्यापासून कुऱ्हाडी, साखळया, बागनेटे; इस्त्र्या – थोडक्यात, सर्व हत्यारे आणि उपकरणे – बनविता येतात, असे हे प्रवचन मानते.

ह्या सिद्धांताचे पुरस्कर्तेही "हलकट" आहेत. म्हणजे प्रामाणिक; क्रियाशील; कामकरी जीवनाला हे लोक नालायक आहेत. कामकरी लोकांच्या दृष्टीने दुष्ट आणि अपमानास्पद अशा जीवनाच्या प्रकारांविना इतर जीवनप्रकारांची जे कल्पनाच करू शकत नाहीत व तशी कल्पना करण्याची ज्यांची इच्छा नाही, असे हे लोक आहेत. तथाकथित "जंगली" – आफ्रिकी निग्रो टोळया अथवा याकुत, बुर्यात, तुंगूस ह्या सैबेरियातील जमाती – प्रत्यक्षात अत्यंत दयाळू माणसे असल्याचे मानववंशशास्त्रज्ञांनी दाखवून दिले असल्यामुळे, "जन्मतः" अथवा सैतानाने निर्माण केल्यापायी दुष्ट अंतःप्रवृत्ती असतात हा सिद्धांत सहजरीत्या खोटा पाडता येतो.

ह्या प्रवचनकारांपैकी अधिक सुजाण अथवा अधिक धूर्त लोकांनी "उत्क्रांतीचा सिद्धांत" नामीरीत्या शोधून काढला आहे. सामाजिक आणि शासनसंस्थीय जीवनप्रकारांचा मंद, सातत्यशील विकास.

पण सुजाणता आणि धूर्तता जवळजवळ एकच व सारखी गोष्ट आहे. तुम्हाला एव्हाना माहीत आहे की, भांडवलदारी समाजाच्या "उत्क्रांती"-मधून चार वर्षेपर्यंत रक्तपाती कत्तली घडल्या; अत्यंत निकोप प्रकृतीच्या दशलक्षावधी माणसांचा त्या कत्तलींमध्ये नाश घडला; कामगारांचा, "उत्क्रांती"च्या रक्षक स्वरूपावर विश्वास ठेवणाऱ्या सोशलिस्टांचाही त्यांनी बळी घेतला; "सांस्कृतिक" युरोपचे प्रचंड जंगलीकरण घडले; रक्तपातामधून अफाट संपत्तीसंचय करणारे अगणित सट्टेबाज निर्माण झाले; नव्या आणि अधिक घनघोर युद्धाचा धोका निर्माण झाला आहे.

सरतेशेवटी तुम्हाला ठाऊक आहे की, सोविएत संघाने सादर केलेला

सार्वत्रिक नि:शस्त्रीकरणाच्या कराराचा मसुदा उत्क्रांतीच्या सिद्धांताच्या संरक्षक स्वरूपावर विश्वासणाऱ्या सांस्कृतिक लोकांनी फेटाळून लावला.

तुम्हाला जाणीव झाली पाहिजे आणि तुम्ही नेहमी लक्षात ठेवले पाहिजे की, राष्ट्रसंघाचा[112] कुप्रसिद्ध भेकडपणा म्हणजे दुसरेतिसरे काहीही नव्हे, तर युरोपीय संस्कृतीची आणि स्वत:च्या मानवताविरोधी आशयाला उघड केलेल्या वर्गीय समाजाची अंतिम दिवाळखोरी आहे.

तुम्हाला प्रामाणिक माणसे बनायचे असेल, तर तुम्ही क्रांतिकारक झाले पाहिजे.

१९२८

# मी लिहायला कसा शिकलो[143]

कॉम्रेडहो !

जेथे जेथे मला तुमच्याशी बोलण्याची संधी मिळाली. तेथे तेथे तोंडी अगर लेखी स्वरूपात मला अनेकांनी विचारले आहे की, मी लिहायला कसा शिकलो. हाच प्रश्न सोविएत संघाच्या सर्व भागांमधून पत्रांद्वारे विचारण्यात आला आहे. सर्वसाधारणपणे नुकताच लिहायला आरंभ केलेल्या तरुण मंडळींकडून हा प्रश्न विचारण्यात आला आहे. "कथा कशा लिहाव्यात ह्यावर एक पुस्तक तयार करा," अथवा "साहित्याच्या सिद्धांताचा विकास करा," किंवा "साहित्यावर क्रमिक पुस्तक प्रसिद्ध करा," अशी विनंती मला अनेकांनी केली आहे. असे क्रमिक पुस्तक मी लिहू शकत नाही आणि तसे करणे मला शक्यही होणार नाही. शिवाय, अशी पुस्तके आधीपासूनच अस्तित्वात आहेत आणि जरी ती फार चांगली नसली, तरी उपयुक्त आहेत.

लेखनाला आरंभ करणाऱ्यांना साहित्याच्या इतिहासाचे ज्ञान असणे आवश्यक आहे. माणसाचा व्यवसाय कोणताही असो, त्याला त्याच्या विकासाचा इतिहास माहीत असावा. एखाद्या उद्यमात अगर त्याहूनही अधिक चांगले म्हणजे एखाद्या कारखान्यात काम करणाऱ्या कामगारांना जर त्याचा उदय कसा झाला व हळूहळू विकास कसा झाला हे माहीत असले, उत्पादन निर्दोष कसे बनविण्यात आले हे माहीत असले, तर ते अधिक चांगल्या रीतीने काम करू शकतील, सांस्कृतिक इतिहासाच्या दृष्टीने त्यांचे श्रम किती महत्त्वाचे आहेत ह्याची त्यांना पूर्ण जाणीव असेल व ते अधिक उत्साहाने काम करतील.

परकी साहित्याचे ज्ञानही आवश्यक आहे, कारण सारतः साहित्यिक सृजनशीलता सर्व देशांमध्ये आणि सर्व माणसांशी सारखीच असते. पूष्कीनने गोगोलला 'मृतात्मे'चा विषय पुरविला, तर खुद्द पूष्कीनने तो कदाचित इंग्लिश लेखक लॉरेन्स स्टर्न ह्याच्या «The Sentimental Journey»

मधून घेतला, ह्यासारख्या वरपांगी, बाह्य दुव्यांची केवळ ही बाब नव्हे. त्याचप्रमाणे 'मृतात्मे' आणि डिकन्स ह्यांच्या «The Pickwick Papers» मधील विषयाचे साधर्म्यही फारसे महत्त्वाचे नाही. महत्त्वाचे आहे ह्या वस्तुस्थितीची जाणीव होणे की, अनादी कालापासून, "माणसांची मने पकडण्यासाठी" सर्वत्र जाळे विणून ठेवण्यात आले आहे आणि त्याउलट; माणसांना भोळ्या समजुती, दूषित पूर्वग्रह व पक्षपातांपासून मुक्त करणे हेच स्वतःच्या कार्याचे उद्दिष्ट मानणारे लोक नेहमी आणि सर्वत्र आहेत. हे जाणून घेणे महत्त्वाचे आहे की, लोकांना प्रसन्न करणाऱ्या क्षुल्लक गोष्टीं-मध्ये गुंतून पडण्यास जसे नेहमी उत्तेजन देण्यात आले आहे; तसेच स्वतः-च्या जीवनाभोवतालच्या क्षुद्र आणि वाईट गोष्टींविरुद्ध बंड करून उठणारे लोकही आहेत. अंतिम विश्लेषणात हेही जाणून घेणे महत्त्वाचे आहे की, लोकांना ज्यांनी पुढचा मार्ग दाखविला व त्या मार्गावरून जाण्यास त्यांना प्रवृत्त केले; त्या बंडखोरांनी वर्गीय समाजाने, भांडवलदारी सरकारने; निर्माण केलेल्या दुष्ट परिस्थितींशी जुळवून घेण्याचा आणि समझोता घडविण्याचा प्रचार करणाऱ्यांवर वरचष्मा प्रस्थापित केला आहे. भांडवल-दारी समाजाने कामकरी लोकांना लोभाची, मत्सराची, श्रमाविषयी आळस व तिटकाऱ्याची, अशा किळसवाण्या दुर्गुणांची बाधा घडविली आहे.

मानवी श्रम आणि सृजनशीलता ह्यांचा इतिहास मानवाच्या इतिहासा-पेक्षा खूपच अधिक रंजक आणि महत्त्वाचा आहे. शंभर वर्षे पुरी करण्या-पूर्वीच माणूस मरतो, पण त्याच्या कलाकृती शतकानुशतके जगतात. स्वतः-च्या विषयाच्या विकासाचा इतिहास माहीत असलेला शास्त्रज्ञ विज्ञानाच्या प्रचंड सिद्धींचा व त्याच्या जलद वाढीचा खुलासा करू शकतो. विज्ञान आणि साहित्य ह्यांच्यात खूप साम्य आहे: दोन्हींमध्ये निरीक्षण, तुलना आणि अभ्यास मुख्य भूमिका बजावतात; लेखक आणि शास्त्रज्ञ अशा दोघांनाही कल्पनाशक्ती व "अंतर्ज्ञान" पाहिजे.

वस्तुस्थितींच्या साखळीतील मोकळ्या फटी भरून काढण्यास कल्पनाशक्ती व अंतर्ज्ञान मदत करतात; "गृहीते" व सिद्धांत निर्माण करण्यास शास्त्र-ज्ञाला मदत करतात. त्यायोगे नैसर्गिक शक्ती व परिस्थिती यांविषयीच्या मनातील कुतूहलांना कमी–अधिक प्रभावी प्रमाणात मार्गदर्शन लाभते. हळूहळू त्या नैसर्गिक शक्तींवर आणि परिस्थितींवर प्रभुत्व प्राप्त करून माणसाचे मन व त्याची इच्छाशक्ती मानवी संस्कृतीला निर्माण करतात

आणि ही मानवी संस्कृती म्हणजेच प्रत्यक्षात आपला "दुसरा स्वभाव" बनते.

दोन वस्तुस्थितींद्वारा हे विधान उत्तमरीत्या सिद्ध करता येईल: ख्यातनाम रसायनशास्त्रज्ञ द्मित्री मेन्देलेयेव[144] ह्यांनी त्या काळात ज्ञात असलेल्या घटकांच्या – लोह, शिसे, गंधक, पारा, इ. – अभ्यासावर आधारीत स्वतःचा तक्ता बनविला. त्यात नमूद केले होते की, अद्याप शोध न लागलेले अनेक घटक निसर्गात अस्तित्वात होते. ह्या अज्ञात घटकांपैकी प्रत्येकाचे विशिष्ट गुरूत्वही त्यांनी नमूद केले होते. त्यानंतर हे सर्व घटक सापडले आहेत; त्याशिवाय, खुद्द मेन्देलेयेव ह्यांनाही ज्या घटकांच्या अस्तित्वाची अजिबात कल्पना नव्हती, असे घटक शोधून काढण्यात मेन्देलेयेव-पद्धती उपयोगी पडली आहे.

आणखी एक वस्तुस्थिती: ख्यातनाम फ्रेंच कादंबरीकार आणि एक श्रेष्ठ लेखक, होनारे दे बाल्झाक ह्यांनी स्वतःच्या एका पुस्तकात म्हटले होते की, मानवी शरीरयंत्रणेत तेव्हा विज्ञानाला कदाचित अज्ञात असलेले काही जोमदार स्राव घडत होते अशी त्यांची धारणा होती व त्यांचा माणसाच्या विविध मानसिक-शारीरिक वैशिष्ट्यांवर परिणाम घडत होता. त्यानंतर अनेक दशकांनी, मानवी शरीरयंत्रणेतील स्राव निर्माण करणाऱ्या, पूर्वी अज्ञात असलेल्या अशा अनेक "ग्रंथीं"चा शोध लागला व त्यातून पुढे अत्यंत महत्त्वाचे असे "स्राव-ग्रंथीं"चे शास्त्र निर्माण झाले. शास्त्रज्ञांच्या आणि प्रमुख लेखकांच्या सृजनशील कार्यांचा असा संयोग अनेकदा घडला आहे. लोमोनोसोव[145] व गोएथे एकाच वेळी कवी आणि शास्त्रज्ञ होते. तीच कथा कादंबरीकार स्त्रिन्दबेर्ग[146] यांच्याबाबत. वातावरणातून नत्रवायू वेगळा काढणे शक्य असल्याचे आधी जाणणाऱ्या लोकांमध्ये त्यांच्या 'कप्तान कोल' ह्याचा समावेश होता.

व्यक्तीरेखांना आणि "नमुन्यां"ना आकार देण्याशी संबंधित असलेल्या साहित्यिक सृजनाच्या कलेसाठी कल्पनाशक्तीची आणि शोधकतेची गरज असते. एखादा दुकानदार, मुलकी नोकर, अगर कामगार रेखाटताना जर लेखकाने स्वतःच्या ओळखीच्या एकाच माणसाचे कमी-अधिक प्रामाणिक छायाचित्र निर्माण केले, तर ते केवळ एक छायाचित्र ठरेल. त्याला कोणतेही सामाजिक अथवा शैक्षणिक महत्त्व असणार नाही व माणूस अथवा

जीवन ह्यांच्याविषयीचे आपले ज्ञान विस्तारण्यात ते काहीही मदत करणार नाही.

मात्र वीस, पन्नास अथवा शंभरसुद्धा दुकानदारांची, मुलकी सेवकांची अगर कामगारांची सर्वांत वैशिष्टयपूर्ण अशी वर्गीय वैशिष्टचे, त्यांच्या सवयी, आवडी-निवडी, हातवारे, समजुती आणि बोलण्याची ढब साररूपाने सादर करण्यात जर लेखक समर्थ ठरला, एकाच दुकानदाराच्या, मुलकी सेवकाच्या अथवा कामगाराच्या व्यक्तीरेखेत ह्या सर्व गोष्टींना संक्षेपरूपाने सामावण्यात जर समर्थ ठरला, तर त्यायोगे तो एक "नमुना" निर्माण करतो आणि ती कला आहे. कलाकाराच्या निरीक्षणांचा पल्ला आणि त्याचा संपन्न जीवनानुभव त्याला अशी ताकद प्राप्त करून देतात जी त्याच्या वस्तुस्थितीविषयक वैयक्तिक दृष्टिकोनावर – दुसऱ्या शब्दात, त्याच्या आत्मनिष्ठ दृष्टिकोनावर – मात करते. वैयक्तिकरीत्या बाल्झाक भांडवलदारी समाजव्यवस्थेचा कैवारी होता, पण त्याच्या पुस्तकांमधून मात्र त्याने आश्चर्यकारक आणि निष्ठुर नागवेपणाने मध्यमवर्गीयांच्या दुष्ट व हलक्या प्रवृत्तीचे वर्णन केलेले आहे. लेखक आपापल्या वर्गाचे व काळाचे वस्तुनिष्ठ इतिहासकार बनल्याच्या अनेक घटना घडल्या आहेत. प्राणी कोणत्या परिस्थितीत खातात आणि जगतात, त्यांच्या पुनरुत्पादनाची आणि नष्ट होण्याची कारणे, ह्यांचा अभ्यास करणाऱ्या व प्राण्यांच्या पाशवी जीवनसंघर्षाची वर्णने करणाऱ्या पंडिती प्राणीशास्त्रज्ञांच्या तोलाची वस्तुनिष्ठता अशा लेखकांच्या लेखनात असते.

जीवनसंघर्षामध्ये माणसाच्या आत्मरक्षणाच्या प्रेरणेने त्याच्यात दोन प्रभावी सृजनशील शक्ती निर्माण केलेल्या आहेत – ज्ञान आणि कल्पनाशक्ती. ज्ञान, अभिज्ञेची देणगी म्हणजे नैसर्गिक परिस्थिती आणि सामाजिक जीवनातील घडामोडी निरीक्षण करण्याची, त्यांची तुलना करण्याची व त्यांचा अभ्यास करण्याची समर्थता. थोडक्यात, ज्ञान म्हणजे विचार करणे. कल्पनाशक्तीसुद्धा सारतः जगाबद्दलचा विचार करण्याची एक तऱ्हा होय. पण प्रतिमांच्या स्वरूपात तो विचार असतो. निसर्गातील वस्तूंना व महाभूतांच्या शक्तींना मानवी गुण, भावना आणि इरादेसुद्धा चिकटविण्याची समर्थता म्हणजे कल्पनाशक्ती असे म्हणता येईल.

वारा "विव्हळतो" अथवा "कण्हतो", चंद्राचा "खिन्न प्रकाश", "बडबडा" ओढा, "कुजबुजणारा" निर्झर अशा व तत्सम अनेक नैसर्गिक

परिस्थितींना अधिक ठळक बनविण्याच्या उद्दिष्टाने वापरलेल्या अभिव्यक्ती आपण ऐकतो आणि बोलतो.

ह्याला "सगुणरूप" देणे म्हणतात. माणूस ज्या ज्या गोष्टी पाहतो त्या त्या सर्वांना स्वतःचे मानवी गुण चिकटविण्याची माणसाची एक तऱ्हा आहे, असे येथे ध्यानात येईल: ह्या गोष्टींची तो कल्पना करतो व नैसर्गिक परिस्थितीबरोबर त्यांना जोडतो; स्वतःच्या श्रमामधून आणि मनामधून निर्माण होणाऱ्या प्रत्येक गोष्टीशी सांगड घालतो. सगुणरूपाला साहित्यात थारा देऊ नये असे मानणारे काही लोक आहेत. सगुणरूप साहित्याला विरोधी आहे असेही ते मानतात. पण हीच माणसे म्हणतात: "गारठ्याने त्याच्या कानांना चिमटा काढला," "सूर्याने स्मित केले", "मे नजीक आला"; एवढेच नव्हे तर "दुष्ट हवा" म्हणतात. वस्तुतः हवेच्या संदर्भात नैतिक मापदंड लावणे अवघड ठरेल.

झेनोफानीस ह्या प्राचीन ग्रीक तत्त्ववेत्त्याने प्रतिपादन केले होते की; प्राण्यांना जर कल्पनाशक्तीची देणगी लाभली असती, तर देव म्हणजे एक महाप्रचंड आणि अजिंक्य सिंह आहे असे सिंहांना वाटले असते, उंदरांना देव म्हणजे उंदीर वाटला असता; इत्यादी. डासांचा देव बहुधा डास असता, तर क्षयरोगग्रंथीच्या सूक्ष्म जंतूचा देव हा सूक्ष्म जंतू असता. माणसाने स्वतःच्या देवाला सर्वसाक्षी सर्वशक्तिमान आणि सर्वोत्पादक बनविले आहे. दुसऱ्या शब्दात, स्वतःच्या सर्वोत्तम आकांक्षा त्याने देवाला प्राप्त करून दिल्या आहेत. "जीवनाच्या आत्यंतिक दारिद्र्या"मधून आणि जीवनाला अधिक संपन्न; अधिक न्याय्य व चांगले बनविण्याच्या माणसाच्या अंधुक ऊर्मीमधून निर्माण झालेली बनावट गोष्ट म्हणजे देव. सर्वसामान्य जीवनापासून देवाला वरच्या पातळीवर चढविण्यात आले आहे, कारण स्त्री-पुरुषांच्या सर्वोत्तम गुणांना व इच्छांना जीवनाच्या वास्तवतांमध्ये जागा सापडत नाही. त्यांचे जीवन म्हणजे निव्वळ निर्वाहासाठी चाललेला खडतर संघर्ष असते.

आपल्याला दिसते की, अंगच्या सर्वोत्तम गुणांचा बंधनविरहित विकास घडविण्यासाठी जीवनाची नवी घडी कशी घातली पाहिजे हे कामगारवर्गातील काही लोकांना जेव्हा समजले तेव्हा आपोआप कालबाह्य बनलेला देव एक अनावश्यक वस्तू ठरला. त्यांच्यातील सर्वोत्तम देवाच्या प्रतिमेत उदात्त

करण्याची इत:पर गरज उरली नाही, कारण त्या सर्वोत्तमाचे आता सजीव आणि ऐहिक वास्तवतेत रूपांतर करणे शक्य ठरले.

साहित्यिक "नमुने" जसे निर्माण करतात त्याचप्रमाणे संक्षेपाच्या व साकार करण्याच्या नियमांनुसार देव निर्माण करण्यात आला. विविध वीरांनी केलेल्या वैशिष्टचपूर्ण पराक्रमांचे संकलन करून अथवा त्यांचा "संक्षेप" करून, मग त्यांना एकाच वीराच्या व्यक्तिमत्वात साकार करण्यात आले. उदाहरणार्थ, हर्क्यूलस अथवा विख्यात रशियन शेतकरी वीर इल्या मूरोमेत्स.[147] कोणत्याही व्यापाऱ्याची, उमरावाची अथवा शेतकऱ्याची खास वैशिष्टचे "संक्षिप्त" करण्यात येतात व नंतर कुणा एका व्यापाऱ्या-च्या, उमरावाच्या अथवा शेतकऱ्याच्या व्यक्तिमत्वात त्यांचे नमुनेकरण होते. दुसऱ्या शब्दात, आता "साहित्यिक नमुना" निर्माण झाला.

अशा पद्धतीने फाऊस्त,[148] हॅम्लेट[149] आणि डॉन क्विक्झोट निर्माण करण्यात आले. तल्स्तोयनी दीन व "देवभीरू" प्लातोन कारातायेव[150] निर्माण केला, दस्तोयेवस्कींनी कारामाझोव[151] आणि स्विद्रीगायलोव[152] निर्माण केले, गोन्चारोवनी अब्लोमोव[153] निर्माण केला.

ही माणसे वास्तवात कधीही अस्तित्वात नव्हती, पण त्यांच्यासारखे अनेकजण होते. केवळ अधिक क्षुद्र आणि घडणीचा कमी एकेरीपणा असलेले. एकेक विटांमधून बांधकाम करणारे ज्याप्रमाणे मनोरे व मंदिरे उभारतात, त्याप्रमाणे लेखकांनी साहित्यिक "नमुने" निर्माण केले आहेत. त्यांच्यात विशिष्ट मानवी गुण सारांशाने असतात. थापाड्याला आपण ख्लेस्ताकोव[154] म्हणतो, तर हांजीखोराला मोल्चालिन[155] म्हणतात, ढोंग्याला तार्त्यूफ[156] म्हणतात आणि मत्सरी माणसाला अथेल्लो[157] म्हणतात. ही यादी खूप लांबविता येईल.

साहित्यात दोन "प्रवाह" अथवा पठड्या आहेत: रोमांचवाद आणि वास्तववाद. लोकांचे आणि त्यांच्या जीवनपरिस्थितीचे खरेखुरे, चकाकी न दिलेले चित्रण म्हणजे वास्तववाद. रोमांचवादाच्या अनेक व्याख्या पुढे सादर करण्यात आल्या आहेत, पण साहित्याच्या सर्व इतिहासकारांचे समाधान घडेल अशी नेमकी अथवा सर्वसमावेशी व्याख्या आजपर्यंत निर्माण झालेली नाही. दोन अगदी परस्परविरोधी प्रवृत्ती रोमांचवादात आढळून येतात: निष्क्रिय आणि सक्रिय. जीवनाला सुशोभित बनवून माणसाला त्याच्या जीवनाशी पुन्हा जुळवून घ्यायला लावण्याचा निष्क्रिय रोमांचवाद

प्रयत्न करतो ; अथवा त्याच्या अंतरंगातील जगाच्या निरर्थक आत्मनिरीक्षणाद्वारे, प्रेम, मृत्यू आणि इतर निर्भार अशा "जीवनाच्या न सोडविता येणाऱ्या समस्यांच्या" विचारांच्या – ज्या समस्या "तर्का"ने अथवा चिंतनाने नव्हे, तर केवळ विज्ञानामार्फतच सोडविता येतात – आत्मनिरीक्षणाद्वारे त्याच्या भोवतालच्या गोष्टींपासून त्याचे लक्ष दुसरीकडे वेधवून घेण्याचा प्रयत्न करतो. सक्रिय रोमांचवाद माणसाची जगण्याची इच्छा दृढ करतो, त्याच्या भोवतालच्या जीवनाविरुद्ध त्याला उठवितो, त्या जीवनाने लादलेल्या कोणत्याही जोखडाविरुद्ध त्याला उठवितो.

असे असले तरीही, बाल्झाक, तुर्गेनेव, तल्स्तोय, गोगोल, लेस्कोव अथवा चेखोव यांच्यासारखे अभिजात लेखक रोमांचवादी होते किंवा वास्तववादी होते हे पुरेशा अचूकपणे सांगणे अवघड आहे, कारण थोर कलाकारांमध्ये वास्तववाद व रोमांचवाद यांचा संकर झाल्याचे भासते. बाल्झाक वास्तववादी होता, पण तरीही त्याने वास्तववादापासून अतिदूर अशा «La pean de Chagrin» ['खडबडीत कातडे'] सारख्या कादंबऱ्या लिहिल्या. तुर्गेनेवनेसुद्धा रोमांचकारी शैलीत लेखन केले, तसेच गोगोलपासून ते चेखोव व बूनिनपर्यंत[158] आमच्या सर्व आघाडीच्या लेखकांनी रोमांचकारी शैलीत लेखन केले. रोमांचवाद आणि वास्तववाद यांचा हा संयोग आमच्या थोर लेखकांचे फार मोठे वैशिष्टच ठरला आहे. त्यामुळे त्यांच्या लेखनात अभिजातता निर्माण झाली आहे व सबंध जागतिक साहित्यावर त्यांच्या लेखनाचा सतत वाढत्या प्रमाणात आणि ठळकरीत्या जोरदार प्रभाव पडत आहे.

कॉम्रेडहो, "लिहायची ऊर्मी का निर्माण होते?" ह्या प्रश्नाचा जर तुम्ही विचार केलात, तर वास्तववाद आणि रोमांचवाद ह्यांच्यामधील नाते तुम्हाला अधिक स्पष्टपणे समजेल. ह्या प्रश्नाची दोन उत्तरे आहेत. त्यांपैकी एक उत्तर माझ्याशी पत्रव्यवहार करणाऱ्या एका कामगाराच्या १५ वर्षांच्या मुलीने दिले आहे. मला पाठवलेल्या पत्रात तिने लिहिले होते :

"मी १५ वर्षांची आहे, पण एवढ्या लहान वयातही लेखकाचा गुण माझ्यात निर्माण झालाय, कारण जीवन अत्यंत नीरस आहे."

अर्थात, "लेखकाचा गुण" असे म्हणण्याऐवजी, "अत्यंत नीरस जीवन" उजळून संपन्न बनविण्यासाठी लेखनाची इच्छा म्हणणे अधिक

बरोबर ठरले असते. मग प्रश्न निर्माण होतो: अशा प्रकारच्या जीवन-परिस्थितीत कशाबद्दल लिहिणे शक्य आहे?

वोल्गा नदीतीरावरील प्रदेशात राहणाऱ्या, उराल व सैबेरियात राहणाऱ्या अनेक राष्ट्रजमातींनी ह्या प्रश्नाला उत्तर उपलब्ध करून दिले आहे. अगदी कालपर्यंत त्यांच्यापैकी अनेकांपाशी लिपीसुद्धा नव्हती, तरीही आजपासून अनेक शतके मागच्या काळात, गाणी, कहाण्या, देवांविषयीच्या शौर्यशाली दंतकथा व पुराणकथा निर्माण करून घनदाट जंगलांमधील, दलदलीच्या प्रदेशांमधील, पूर्वेतील ओसाड स्तेपमधील व उत्तरेतील तूंद्रा-मधील त्यांचे "अत्यंत नीरस जीवन" त्यांनी संपन्न बनविले आणि त्याला सुंदर केले. हे सर्व "धार्मिक सृजनशीलतेमध्ये" समाविष्ट होते, पण सारतः ते कलाप्रांतात दाखल होते.

माझ्या तरुण पत्रकर्त्रीच्या लेखनगुणाचा खरोखरीच जर विकास घडला – तसा तो घडावा अशी माझी मनःपूर्वक इच्छा आहे – तर कदाचित ती "रोमांचकारी" शैलीत लेखन करील. स्वतःच्या "अत्यंत नीरस जीवनाला" सुंदर काल्पनिक गोष्टींनी सजविण्याचा ती प्रयत्न करील व लोक आहेत त्यापेक्षा त्यांचे अधिक चांगले वर्णन करील. 'इवान इवानो-विचनी इवान निकीफरोविचशी कसे भांडण केले', 'जुन्या धाटणीचे जमीन-दार' आणि 'मृतात्मे' ह्यांचे लेखक गोगोल आहेत, पण 'तारास बूल्बा' सुद्धा त्यांनीच लिहिले. पहिल्या तीन कथा 'मृत आत्मे' असलेल्या लोकांचे वर्णन करतात आणि भयानक सत्याचे चित्रण करतात, कारण अशी माणसे पूर्वी रहात होती आणि आजही तशी अस्तित्वात आहेत. अशा वर्णनांच्या वेळी गोगोल "वास्तववादी" आहेत.

'तारास बूल्बा' मध्ये झापोरोझ्येच्या कझाकांचे चित्रण देवभीरू, उमदे आणि बलाढ्य पुरुष असे केले आहे. आपल्या शत्रूंना ते स्वतःच्या भाल्यां-च्या टोकांवर हवेत उचलून धरीत; जरी स्पष्ट आहे की, माणसाच्या वजनाखाली भाल्याचा लाकडी दांडा तुटू शकतो! गोगोलने वर्णन केलेला कझाक वास्तवात कधीच अस्तित्वात नव्हता आणि ती कथा म्हणजे कल्पित लेखनाचा एक नमुना आहे. तिच्यात, त्याचप्रमाणे सर्व 'रूदी पान्को' कथांमध्ये, गोगोल रोमांचवादी होते. "मृतात्म्यांचे अत्यंत नीरस जीवन" निरीक्षण्याचा त्यांना खूप कंटाळा आला असावा, हे कदाचित कारण असावे.

अनेक बाबतीत माणूस अजून पशू आहे, पण त्याचवेळी सांस्कृतिक

अर्थाने तो अद्याप एक कच्चा तरुण आहे आणि त्याचे थोडे कौतुक करणे व त्याला नटविणे उपयुक्त आहे. त्यामुळे त्याच्यात आत्मप्रतिष्ठा निर्माण होते व स्वत:च्या सृजनशक्तींमध्ये त्याला विश्वास वाटू लागतो. शिवाय, माणसाचे कौतुक करणे सर्वथा योग्य आहे, कारण त्याच्या ताकदीमधून आणि त्याच्या इच्छाशक्तीमधूनच चांगली आणि सामाजिकदृष्टचा मौल्यवान अशी प्रत्येक गोष्ट निर्माण झालेली आहे.

आत्ता जे काही मी बोललो त्या सर्वाचा अर्थ, साहित्यात रोमांचवाद आवश्यक असल्याचे मी प्रतिपादन करतो, असा होतो का? होय, त्या गरजेची आवश्यकता मी मान्य करतो, पण केवळ अत्यंत महत्त्वाच्या अशा विशिष्ट व्यापक अर्थाने.

सतरा वर्षांच्या एका तरुण कामगार पत्रकर्त्याकडून माझ्यापर्यंत आरोळी पोहोचत आहे: "माझ्या मनात एवढे ठसे भरले आहेत की, लेखन न करणे मला अशक्य आहे."

ह्याबाबतीत लेखनाची आस जीवनाच्या "दारिद्र्या"मधून निर्माण होत नाही, तर जीवनाच्या संपदेमधून, ठशांच्या विपुलतेमधून आणि त्यांचे वर्णन करण्याच्या आंतरिक उमाळ्यामधून निर्माण होते. माझे बहुसंख्य तरुण पत्रलेखक लेखन करू इच्छितात याचे कारण केवळ त्यांच्यापाशी जीवनाचे ठसे विपुल आहेत व जे काही त्यांनी पाहिले आणि अनुभवले, त्याबाबत "गप्प राहणे त्यांना शक्य होत नाही." त्यांच्यामधून अनेक "वास्तववादी" कदाचित उदयाला येतील, पण मला वाटते की, त्यांच्या वास्तववादाला विशिष्ट रोमांचवादाची छटा लाभलेली असेल. निकोप आत्मिक उत्थानाच्या काळात असे घडणे अपरिहार्य आणि योग्य आहे व सध्या आपण अशाच काळामधून जात आहोत.

तर मी का लिहायला आरंभ केला, ह्या प्रश्नाचे मी उत्तर देतो: माझ्यावर "अत्यंत नीरस जीवना"चा दबाव पडला म्हणून आणि त्याच-प्रमाणे माझ्या मनात विपुल ठसे निर्माण झाल्यामुळे "लेखन न करणे अशक्य ठरले" म्हणून. पहिल्या कारणापायी माझ्या "नीरस" जीवनात 'बहिरीससाणा आणि गवती साप यांची गोष्ट', 'जळत्या हृदयाची दंतकथा',[159] 'वादळी सागरपक्षी' सारख्या काल्पनिक गोष्टी निर्माण करण्यास मी उद्युक्त बनलो. दुसऱ्या कारणापायी 'सव्वीस पुरुष आणि

एक मुलगी,' 'ओर्लोव जोडपे', 'आडदांड' सारख्या "वास्तववादी" स्वरूपाच्या कथा मी लिहिल्या.

आपल्या "रोमांचवादा"च्या संदर्भात पुढील आठवण केली पाहिजे. चेखोव यांच्या 'शेतगडी' व 'घळीत' आणि बूनिन यांची 'खेडे' व शेतकरीवर्गाबाबतच्या त्यांच्या सर्व कथा अवतीर्ण होईपर्यंत, आमच्या उमरावांच्या साहित्यात शेतकऱ्याला एक दीन आणि सहनशील माणूस म्हणून सादर करण्याचा छंद होता. आणि त्याचे हे चित्रण अत्यंत कुशलपणे करण्यात येई. दुसऱ्या जगामधील "ख्रिस्ताच्या सत्या"सारख्या काही गोष्टींची आकांक्षा धरणारा, जीवनाच्या वास्तवामध्ये मुळे नसलेल्या अशा कशाचीतरी आकांक्षा बाळगणारा, असा शेतकरी चित्रित करण्यात येई. पण तरीसुद्धा 'होर आणि कालीनिच' ह्या तुर्गेनेवच्या कथेतील कालीनिचसारख्या व तल्स्तोय यांच्या 'युद्ध आणि शांतता' मधील प्लातोन कारातायेवसारख्या शेतकऱ्यांना तशी स्वप्ने पडत होती. भूदासपद्धती रद्द करण्यापूर्वी सुमारे वीस वर्षे "देवाच्या सत्यां"ची दीनपणे आणि चिकाटीने स्वप्ने पाहणारा माणूस म्हणून शेतकरी चित्रित करण्याची प्रवृत्ती उदयाला आली. वस्तुतः तोपावेतो भूदास शेतकरीवर्गाच्या अडाण्यांमधून एव्हाना गुणी उद्योगपती निर्माण झाले होते. शेतकरीवर्गामधून पुढे आलेल्या त्या बलाढ्य आणि उत्तुंग व्यक्तीचा – लोमोनोसोव, कवी व नामवंत शास्त्रज्ञ – वृत्तपत्रांमधून अधिकाधिक वारंवारपणे निर्देश घडत होता.

पण कालपर्यंत नागरी हक्कांपासून वंचित असलेले कारखानदार, जहाजबांधणीकार आणि व्यापारी आता उमरावांच्या जोडीने जीवनात स्वतःचे स्थान विश्वासपूर्वक निर्माण करू लागले व प्राचीन रोममध्ये "मुक्त गुलाम" जसे स्वतःच्या माजी मालकांपाशी एकाच मेजावर बसत, त्याप्रमाणे बसू लागले. अशी माणसे आपल्यामधून पुढे आणून शेतकरीवर्ग स्वतःच्या सुप्त सामर्थ्याची आणि गुणांची जाणीव करून देत होता. हा वास्तववादी, खरा, निर्धाराने आणि जीवनतहानेने मुसमुसलेला, उभारणीकार, संपदा गोळा करणारा आणि अत्यंत व्यवहारी माणूस, काळाचा नवा नायक म्हणून मान्य करण्यात व त्याचे चित्रण करण्यात उमरावांनी निर्मिलेल्या साहित्याला अपयश आले. उलट, सदसद्विवेकबुद्धीने जखडलेल्या दीनवाण्या स्वभावाच्या भूदासांचे आवडीने चित्रण करण्याची प्रथा त्या साहित्याने पुढे चालू ठेवली. १८५२ मध्ये ल्येव तल्स्तोयनी 'एका जमीन-

दाराची सकाळ' नामक करुण व्यक्तिचित्र लिहिले होते. एका प्रेमळ अंतः-करणाच्या आणि उदार मनाच्या मालकावर त्याचे भूदास कसा अविश्वास दाखवितात ह्याचे फार सुरेख वर्णन त्यात होते. १८६२ मध्ये तल्स्तोयनी शेतकऱ्यांच्या मुलांना शिक्षण द्यायला आरंभ केला, विज्ञानाला आणि "प्रगती"ला त्यांनी अमान्य केले व योग्य कसे जगावे हे शिकण्यासाठी लोकांनी शेतगड्यापाशी जावे, असा प्रचार सुरू केला. आठव्या दशकात त्यांनी "लोकां"साठी कथा लिहिल्या. ख्रिस्तप्रेमी आणि रोमांचक वृत्तीचे शेतकरी म्हणून त्यांनी त्यांचे चित्रण केले; खेड्यातील जीवन सुखाचे आहे आणि शेतकऱ्याचे जमीन नांगरणे हे पवित्र श्रम आहेत अशी शिकवण दिली. 'माणसाला किती जमीन लागते?' ह्या कथेत शेवटी त्यांनी प्रति-पादन केले की, थडग्यासाठी माणसाला फक्त सहा फूट जमिनीची गरज असते.

गरीब आणि ख्रिस्तप्रेमी माणसे प्रत्यक्ष परिस्थितीपायी आर्थिक जीवना-च्या नव्या प्रकारांची रचनाकार बनत होती. साल्तीकोव-श्चेद्रिन[160] व ग्लेब उस्पेन्स्की यांनी वर्णिलेल्या लोभी व कबजा करणाऱ्या मध्यमवर्गीयां-मध्ये आणि मोठ्या उद्योगपतींमध्ये त्या माणसांचे रूपांतर घडत होते. त्याचवेळी बंडखोर आणि क्रांतिकारक यांचा उदय घडत होता. पण ह्या सगळ्या लोकांकडे उमरावी साहित्य मात्र दुर्लक्ष करीत होते. आपल्या साहित्यामधील एक सर्वोत्तम कादंबरी मानल्या गेलेल्या 'अब्लोमोव'मध्ये लेखक गोन्चारोव यांनी अतिरिकामटेकडेपणापायी वेडेपणाच्या अवस्थेला पोहोचलेल्या एका रशियन उमरावाच्या व्यक्तिरेखेच्या विरोधात एक जर्मन दाखविला आहे; पण एखादा "माजी" रशियन भूदास दाखविला नाही. वस्तुतः स्वतः गोन्चारोव त्या भूदासांमध्ये राहिलेले होते व एव्हाना भूदा-सांनी देशाचे आर्थिक जीवन हाकण्यास आरंभ केला होता. जर उमरावां-मधील लेखकांनी एखाद्या क्रांतिकारकाचे वर्णन केलेच, तर तो माणूस एक तर परदेशी बल्गारियन[161] असायचा, अथवा 'रूदीन'प्रमाणे[162] केवळ शब्दानेच बंडखोर असायचा. काळाचा नायक ह्या नात्याने, निर्धारी आणि कृतीशील रशियनाचे साहित्यात दर्शन घडत नव्हते. पण साहित्यिकांच्या "नजरेच्या टप्प्यापल्याड" रशियन माणूस बॉंबच्या मदतीने प्रत्यक्षात बराच गोंगाट माजवीत होता. रशियन उमरावी साहित्याला सक्रिय आणि सहेतुक रोमांच-वादाचे वावडे होते हे दाखविण्यास भरपूर पुरावा उपलब्ध आहे. शिल्लेर-

सारखा[163] लेखक निर्माण करण्यात ते निःष्प्रभ ठरले आणि 'दरोडेखोर' ऐवजी 'मृतात्मे', [164] 'जिवंत प्रेत,' [165] 'मृत घरे,' [166] 'तीन मृत्यू' [167] आणि इतर अनेक मृत्यूंची सुरेख चित्रणे करीत राहिले. दस्तोयेवस्कीचे 'अपराध आणि शासन' बहुधा शिल्लेरच्या 'दरोडेखोर'च्या निषेधार्थ लिहिले गेले.

सक्रिय सामाजिक-क्रांतिकारक रोमांचवाद राझनोचिनेत्स* बुद्धिमंतांच्या साहित्यालाही परका होता. राझनोचिनेत्सला स्वतःच्या भवितव्याचीच फार चिंता होती आणि जीवननाटचात तो आपले स्थान शोधीत होता. एकतंत्री सत्तेचा घण आणि "लोकांची" ऐरण यांच्या दरम्यान तो सापडला होता.

जीवनात मूळ नसलेल्या आणि "ना मोर ना चिमणी" अशी अवस्था असलेल्या बुद्धिजीवी लोकांच्या शोकांतिकेचे वास्तव आणि प्रभावी चित्रण स्लेप्त्सोवच्या 'कठीण काळ' आणि असीपोविच-नवोद्वोस्कींच्या[168] 'ना मोर ना चिमणी अशाच्या जीवनातील प्रसंग' मध्ये होते. अथवा कूश्चेवस्की-च्या[169] आणि गुणी, कमालीचा बुद्धिमान, पण गुणांचे पुरेसे चीज न झालेला लेखक पोम्यालोवस्की[170] याच्या 'मोलोतोव' आणि 'क्षुद्र सुख' मध्ये अहंकारी, क्षुद्र प्रवृत्तीच्या माणसांचे दर्शन घडते. जाता जाता सांगायचे म्हणजे ह्या दोन्ही कथांचे स्वारस्य आपल्या आजच्या काळातही टिकून राहिले आहे, कारण क्षुद्रप्रवृत्ती माणूस परत निर्माण झाला आहे आणि ज्या देशात समाजसत्तावादी संस्कृती उभारण्यासाठी कामगारवर्गाने आपल्या रक्ताचे पाट ओतून किंमत दिली आहे त्या देशात हा क्षुद्रप्रवृत्ती यशस्वीरीत्या स्वतःसाठी विशिष्ट सवंग वैभव प्राप्त करू लागला आहे.

ग्रामीण जीवनाला आदर्शरूप देण्याच्या दक्ष प्रयत्नांमध्ये तथाकथित नरो-दनिक लेखकांनी उमराववर्गातील लेखकांच्या सुरात आपला सूर मिसळला. ह्या नरोदनिकांना शेतकऱ्यामध्ये एक स्वाभाविक समाजवादी दिसला, ज्याला खेड्यातील "समुदाया"शिवाय, "मीर"शिवाय, दुसरे कोणतेही

---

* राझनोचिनेत्स – शेतकरीवर्ग, धर्मगुरू, मध्यमवर्गीय आणि कनिष्ठ उमराव, अशा समाजाच्या विभागांमधून रशियन बुद्धिजीवी वर्गात दाखल झालेल्या कुणाही माणसाला १९ व्या शतकाच्या उत्तरार्धात मिळालेले नांव. – सं.

सत्य माहीत नव्हते. अत्यंत बुद्धिमान उमराव हेर्झेन[171] ह्यांनी शेतकरी-वर्गाबाबतचा हा दृष्टिकोन सर्वांत प्रथम जोपासला आणि "वास्तव" व "न्याया"चे अशी दोन सत्ये शोधून काढणाऱ्या नि. मिखायलोवस्कींनी[172] त्यांचा मार्ग अनुसरला. नरोदनिक लेखकांचा "समाजा"वरील प्रभाव दुबळा आणि अल्पजीवी होता. त्यांचा "रोमांचवाद" हा त्यांच्या उमराव सहकाऱ्यांच्या रोमांचवादापेक्षा गुणांच्या अल्पतेत केवळ भिन्न होता आणि त्यांचे स्वप्नरंजक – मिनाय आणि मित्यायसारखे[173] शेतकरी – म्हणजे पोलीकूष्का,[174] कालीनीच आणि कारातायेव व इतर तत्सम धर्मभीरू शेतगड्यांच्या व्यक्तिरेखांची फक्त भ्रष्ट नक्कल होती.

आत्ताच निर्देश केलेल्या गटाशी खूप नजीक असलेले असे दोन अत्यंत महत्त्वाचे लेखक त्या काळात होते. पण नरोदनिकांपेक्षा सामाजिकदृष्ट्या ते खूपच दूरदृष्टीचे होते व सर्व नरोदनिकांचे गुण एकत्र केले असते तरी ह्या दोघांच्या गुणांचे पारडे बरेच जड भरले असते. हे दोन लेखक म्हणजे दि. मामिन-सिबिऱ्याक[175] आणि ग्लेब उस्पेन्स्की. शहरी आणि ग्रामीण जीवन, औद्योगिक कामगार आणि शेतकरी ह्याच्यातील फरक ह्यांनी प्रथम दाखविला व ह्यांनीच त्यांची प्रथम दखल घेतली. ह्याबाबत ग्लेब उस्पेन्स्कींनी विशेष भेद दाखविला. त्यांनी दोन श्रेष्ठ पुस्तके लिहिली: 'रास्तेऱ्यायेव रस्त्याची नीतीमत्ता' आणि 'मातीची ताकद.' ह्या पुस्तकांचे सामाजिक मूल्य अजूनही टिकून आहे. सर्वसाधारणपणे, उस्पेन्स्कींच्या कथांचे शैक्षणिक महत्त्व कायम आहे आणि त्यांची निरीक्षणशक्ती व भोवतालच्या जीवनाचे त्यांचे व्यापक ज्ञान; ह्यापासून आमच्या तरुण लेखकांनी बोध घेतल्यास त्यांचे भले होईल.

मी आधीच नमूद केलेल्या 'शेतगडी', 'घळीत' ह्या कथांमधून, तसेच 'नवी हवेली' मधूनही, शेतकऱ्याला आदर्शरूप देण्यास स्वतःचा कडवा विरोध असल्याचे आन्तोन चेखोवनी दाखवून दिले आहे. ह्या प्रवृत्तीला त्याहूनही जास्त कट्टर विरोध इवान बूनिन यांनी स्वतःच्या 'खेडे' ह्या लघुकादंबरीत, तसेच सर्व शेतकरीकथांमधून व्यक्त केला. अत्यंत वैशिष्ट्य-पूर्ण वस्तुस्थिती म्हणजे सेम्योन पोद्याचेव[176] व खूप गुणी आणि विकसनशील लेखक इवान वोल्नोव[177] ह्यांच्यासारख्या शेतकरी-लेखकांनी तेवढ्याच परखडपणे ग्रामीण जीवनाचे वर्णन केले आहे. शेतकऱ्याची मनोवृत्ती आणि

ग्रामीण जीवन ह्यांसारखे विषय आज अत्यंत प्रचलित आणि महत्त्वाचे आहेत ही गोष्ट आमच्या तरुण लेखकांनी पूर्णत्वाने जाणून घेतली पाहिजे.

आत्ता जे काही म्हटले गेले त्या सर्वावरून स्पष्ट होते की, "रोमांचवाद" म्हणजे जीवनाविषयीच्या सक्रिय दृष्टिकोनाची शिकवण आहे, श्रमाच्या प्रतिष्ठेच्या सक्रिय दृष्टिकोनाची शिकवण आहे, जीवनाच्या नव्या प्रकारांच्या उभारणीमधील जगण्याच्या इच्छेचे तो स्फूर्तिस्थान आहे, ज्या जुन्या जगाच्या दुष्ट वारसाला आपण मोठ्या कष्टाने नाहीसे करीत आहोत त्या जुन्या जगाचा तो द्वेषस्थान आहे, ह्याची आपल्या साहित्याला अद्याप माहिती नाही. क्षुद्रप्रवृत्तीवादाचे कोणत्याही प्रकारे पुनरुज्जीवन घडू नये आणि त्यापुढे, त्या क्षुद्रप्रवृत्तीवादामार्गे वर्गीय राज्याचे व परपुष्टांकडून आणि पुंडांकडून कामगार-शेतकऱ्यांचे शोषण घडण्याचे पुनरुज्जीवन होऊ नये, असे आपल्याला खरोखरीच वाटत असेल, तर ह्या शिकवणीची आत्यंतिक गरज आहे. सोविएत संघाचे सर्व शत्रू अशा "पुनरुज्जीवना"-ची आतुरतेने वाट पहात आहेत. जुने वर्गीय राज्य पुन्हा स्थापित करणे कामगारवर्गाला भाग पाडण्याच्या विशिष्ट उद्दिष्टाने ते सोविएत संघाची आर्थिक नाकेबंदी करीत आहेत. कामगार-लेखकाने अत्यंत स्पष्टपणे जाणून घेतले पाहिजे की, कामगारवर्ग आणि भांडवलदारवर्ग ह्यांच्यातील विरोध कधीही मिटणार नाही आणि केवळ संपूर्ण विजय अथवा संपूर्ण विनाशच हा विरोध सोडवू शकेल. ह्या शोकजनक विरोधामधून, इतिहासाच्या क्रमाने कामगारवर्गावर एवढ्या कठोरपणे लादलेल्या ह्या कार्याच्या अवघड स्वरूपामधून, सक्रिय "रोमांचवादा"चा उदय झाला पाहिजे; त्या सृजनशील आकांक्षेचा, निर्धाराच्या आणि मनाच्या त्या धाष्टर्यतेचा व रशियन क्रांतिकारक कामकरी माणसाचे नेहमी वैशिष्टय ठरलेल्या त्या क्रांतिकारक गुणांचा उदय झाला पाहिजे.

अर्थात, स्वातंत्र्याचा मार्ग सोपा नाही ह्याची मला जाणीव आहे. सुंदर मुलींच्या सहवासात चहा पीत बसण्याचा अथवा "स्वतःच्या रूपाचे कौतुक" न्याहाळीत आरशासमोर दंग राहण्याचा काळ अजून सर्वांच्या जीवनात आलेला नाही. मात्र ह्या गोष्टींमध्ये रमण्याकडे बऱ्याच तरुण मंडळींचा कल आहे. जीवनाच्या वास्तवता अधिकाधिक प्रमाणात पटवून देऊ पाहत आहेत की, सद्यःपरिस्थितीत शांततामय अलिप्त जीवनाची उभारणी अशक्य आहे; एकांतात अथवा निवडलेल्या जोडीदाराबरोबर

राहूनही सुख लाभणार नाही; क्षुद्रप्रवृत्तीचे वैभव कायम टिकणार नाही, कारण तशा प्रकारच्या सुबत्तेच्या पायांचे दगड सबंध जगभर ढासळून पडत आहेत. अनेक लक्षणांमधून खात्रीलायकपणे हे सिद्ध होत आहे: जगभरच्या क्षुद्रप्रवृत्तींना दुष्टाव्याने, दु:खाने आणि भीतीने घेरले आहे; युरोपच्या साहित्यामधून शोक ऐकू येत आहे; उद्याची भीती गुदमरवून टाकण्याच्या व्यर्थ आशेपायी समृद्ध क्षुद्रप्रवृत्ती अतिरेकी चैनीचा आश्रय घेत आहे आणि सरतेशेवटी, नीच सुखांबद्दल विकृत इच्छा निर्माण होत आहेत, गुन्हे आणि आत्महत्या यांचा प्रसार होत आहे. "जुने जग" खरोखरीच मरणांतिक आजारी आहे आणि त्याच्या अपकारक उच्छ्वासांचा परिणाम टाळण्यासाठी त्या जगाचा त्याग करण्याची आपण त्वरा केली पाहिजे.

युरोपातील माणसाचा नैतिक अध:पात घडत आहे; तर आमच्या देशातील कामकरी जनसमूहांमध्ये आमच्या सामर्थ्याबाबत ठाम विश्वास निर्माण होत आहे आणि सामुदायिकाची सत्ता विकसित होत आहे. तुम्हा तरुणांनी नेहमी जाणून घेतले पाहिजे की, अधिक चांगल्या जीवनाकडे वाटचाल करताना अडथळ्यांवर मात केल्यानंतर असा विश्वास माणसामध्ये निर्माण होत असतो आणि अशा प्रकारचा विश्वास सर्वांत प्रबळ सृजनशील शक्ती आहे. तुम्हाला हेही ठाऊक पाहिजे की, त्या "जुन्या जगात" फक्त विज्ञान उदात्त आहे आणि म्हणून निर्विवादपणे मौल्यवान आहे. समाजसत्तावादाच्या विचारांचा अपवाद वगळता, "जुन्या जगात" प्रसारीत होणारे सर्व "विचार" उदात्ततेला पारखे आहेत, कारण कामकरी समूहांच्या संस्कृतीचा व स्वातंत्र्याचा बळी घेऊन व्यक्तींच्या "सुखाला" आणि सत्तेला स्थापित करण्याचा व त्यांची न्याय्यता पटवून देण्याचा ह्या ना त्या प्रकारे ते विचार प्रयत्न करीत असतात.

माझ्या तारुण्यात मी आयुष्याविषयी कधी तक्रार केल्याची मला आठवण नाही. ज्या माणसांमध्ये मी रहात होतो त्यांना कुरकुर करायला आवडत असे, पण केवळ एकमेकांना मदत करायची टाळण्यासाठी धूर्तपणाने तसे ते वागत हे जेव्हा माझ्या ध्यानात आले, तेव्हा त्यांचे अनुकरण न करण्याचा मी प्रयत्न केला. लौकरच मला असे आढळून आले की, जे लोक कोणताही प्रतिकार करण्यास असमर्थ होते, जे लोक काम करू शकत नव्हते अथवा काम करणार नव्हते आणि सर्वसाधारणपणे आपल्या सोबती-

च्या माणसांच्या जीवावर आराम करण्याकडे ज्यांचा कल होता, अशीच माणसे सर्वांत जास्त कुरकुरत.

माझ्या काळात जीवनाबद्दलची भीती मी खूप प्रमाणात अनुभवली. आज मी त्या भीतीला आंधळ्या माणसाची भीती म्हणतो. अत्यंत खडतर परिस्थितींमध्ये मी राहिलो आहे आणि त्यांचे वर्णन करण्याचा प्रसंग मला लाभला होता. माझ्या बालपणात मी लोकांची निरर्थक पाशवी वागणूक पाहिली होती. त्यांची परस्परांबद्दलची वैरभावना मला आकलन होत नसे. काहींवर पाठीचा कणा मोडेतो कष्ट लादलेले आणि इतरांनी केवळ मनमुराद वैभव भोगलेले पाहून मी चकित झालो होतो. अगदी लहान वया-पासून मला समजले होते की; धार्मिक माणसांची प्रवृत्ती अशी होती: जी माणसे त्यांच्यासाठी राबत होती त्यांना ती जेवढे दूर ठेवतील आणि कष्टकऱ्यांशी जेवढा अधिक कठोर व्यवहार करतील, तेवढी ती "देवाच्या जास्त जवळ" जातील. तुमच्यापेक्षा खूपच अधिक जीवनातील तिरस्करणीय प्रसंग मला पहावे लागले आहेत, शिवाय मी त्यांना अत्यंत किळसवाण्या स्वरूपांमध्ये पाहिलेय, कारण आत्ता तुम्हाला भेटणारा क्षुद्रप्रवृत्ती माणूस क्रांतीने खूपच नरम आणलेला आहे व त्याच्या हक्काचा त्याला तेवढा विश्वास राहिलेला नाही. मी पाहिलेल्या क्षुद्रप्रवृत्तीवादाला स्वतःच्या सुस्थितीची ठाम खात्री होती; आरामशीर आणि संकटविहीन जीवन सदैव लाभणार असा त्याला विश्वास होता.

त्या दरम्यान परदेशी कादंबऱ्यांचे अनुवाद वाचायला मी एव्हाना आरंभ केला होता. डिकन्स आणि बाल्झाक यांच्यासारख्या सुरेख लेखकांच्या पुस्तकांचा त्यात समावेश होता. आईन्सवर्थ, बूल्वेर-लीटन आणि द्यूमाँ यांच्या ऐतिहासिक कादंबऱ्या मी वाचत होतो. मी जी माणसे पाहिली होती व जी मला माहीत होती, त्यांच्यापासून अगदी भिन्न असे लोक त्या कादंबऱ्यांमधून वर्णिलेले होते. ठाम निर्धाराचे आणि अदम्य स्वभावाचे ते लोक होते व त्यांच्यामधील वैरांचा जन्म महत्त्वाच्या मतभेदांपायी घडत होता. पण माझ्याभोवतालची सर्व माणसे क्षुद्र आणि हलकी होती. शेजाऱ्याच्या मुलाने कोंबडीची तंगडी मोडली अथवा खिडकीची काच फोडली, किंवा पाय पक्वान्न बिघडले, कोबीचे सार अति उकळले, अगर दूध नासले, अशा कारणांस्तव त्यांच्या लोभाच्या, शत्रुत्वाच्या आणि दुष्टा-व्याच्या भावना उफाळून यायच्या; अशा क्षुल्लक कारणांपायी त्यांच्यात

मारामाऱ्या व्हायच्या, वाद घडायचे. पौंडभर साखरेच्या अगर वारभर कापडाच्या किंमतीत दुकानदाराने एक कोपेक वाढविला म्हणून हे लोक तासन्तास दु:ख करीत बसायचे. शेजाऱ्यावर कोणतीही क्षुल्लक आपत्ती कोसळल्यास त्यांना मनस्वी आनंद व्हायचा. ह्या आनंदाला ते सहानुभूती-च्या देखाव्यामागे लपवायचे. एका कोपेकचे नाणे क्षुद्रप्रवृत्तीच्या स्वर्गात चमकायचे आणि लोकांमध्ये क्षुल्लक व नीच वैर निर्माण करायचे. भांडी आणि तवे; कोंबडचा आणि कोबी, धिरडी आणि चर्चेला जाणे, वाढदिवस आणि दफनविधी, खादाडपणा आणि सूकरवृत्ती – ज्या माणसांमध्ये मी वाढलो त्या माणसांच्या जीवनाचे सार ह्या गोष्टींमध्ये सामावले होते. त्या किळसवाण्या अस्तित्वामुळे क्षणात मी बधीर होऊन जायचा, तर क्षणात त्या गुंगीतून स्वत:ला जागे करण्यासाठी खोडी काढण्याची अतीव इच्छा व्हायची. कदाचित अशा कंटाळवाणेपणापायी १९ वर्षांच्या एका पत्रलेखकाने अलिकडेच मला पुढील शब्दांमध्ये कळविले:

स्वयंपाकघर, कुचाळक्या आणि केकाटण्याभोवती केंद्रित झालेल्या, बधीर करणाऱ्या कंटाळवाणेपणाचा माझ्या देहातील धागा न् धागा द्वेष करतो.

ह्याच प्रकारच्या कंटाळवाणेपणामधून सर्व तऱ्हेच्या खोडचा करण्यास मी प्रवृत्त झालो. मी घरांच्या छपरांवर चढायचा आणि धुरांडचांमध्ये कापडाचे बोळे कोंबायचा; उकळणाऱ्या कोबीच्या सारात मूठ मूठ मीठ टाकायचा; घडचाळांमध्ये धुळीच्या लोटांच्या फुंकरी मारायचा. थोडक्यात म्हणजे मी गुंडगिरी करायचा. ह्याचे कारण मी जिवंत व्यक्ती होतो ही जाणीव अनुभवण्याची मला तीव्र इच्छा व्हायची, पण ती वस्तुस्थिती स्वत:ला पटवून द्यायला इतर मार्ग शोधण्यास मी असमर्थ होतो. दाट जंगलात कोसळलेल्या झाडांच्या बुंध्यांखाली, झुडुपांच्या जंजाळात व गुडघ्यांपर्यंत मी ज्याच्यात बुडालो होतो अशा कुजणाऱ्या पालापाचोळ्यात माझी वाट हरवली होती, अशी माझी भावना होती.

पुढील प्रसंग मला आठवतो: ज्या रस्त्यावर मी रहात होतो तेथून सशस्त्र पहाऱ्यात सैबेरियाला पाठविण्यात येणाऱ्या गुन्हेगारांच्या जथ्यांना तुरुंगातून बोटींच्या धक्क्यापर्यंत न्यायचे. मग वोल्गा आणि कामा नद्यांवर प्रवास करणाऱ्या बोटींमधून त्यांना पुढे घेऊन जात. त्या नीरस आणि मलिन जथ्यांबद्दल मला आश्चर्यकारक आकर्षण वाटायचे. त्यामागील कारण

बहुधा मला मत्सर वाटत होता की, जरी त्यांच्यातील काहींना बेड्या घातलेल्या असत आणि सगळ्यांवर जरी सशस्त्र पहारा होता, तरी त्यांना एक विशिष्ट मुक्कामाचे उद्दिष्ट होते; पण मी मात्र एखाद्या एकाकी घुशीप्रमाणे तळघरात रहात होतो आणि विटांची फरशी असलेल्या माझ्या घाणेरड्या स्वयंपाकघरात मला राबावे लागत होते. एक दिवस बेड्या घातलेल्या गुन्हेगारांचा एक मोठा गट नदीकिनाऱ्याकडे नेण्यात येत होता. हाता-पायांमध्ये साखळदंड अडकविलेले दोन गुन्हेगार फूटपाथच्या अगदी कडेने चालत होते. त्यातील एक मजबूत बांध्याचा, काळी दाढीवाला माणूस होता. त्याचे डोळे घोड्यासारखे होते, त्याच्या कपाळावर जखमेचा काळा-निळा वण होता व कान फाटलेला होता. अगदी भयानक आकृती. मी फूटपाथवरून अगदी त्याच्या पुढून चालत होतो. अचानक त्याने मला मोठ्यांदा आणि आनंदी आवाजात हाक मारली: "अरे ए पोरा, चल ये, आमच्यात सामील हो!"

विलक्षणरीत्या त्याच्याकडे आकर्षित होऊन मी त्या माणसापाशी धावलो. पण एका सशस्त्र पहारेकऱ्याने मला मूर्ख म्हणून शिव्या घातल्या आणि मागे लोटले. त्या पहारेकऱ्याने तसे केले नसते, तर जणू स्वप्नात असल्याप्रमाणे मी त्या भयानक माणसाच्या पाठोपाठ गेलो असतो. कारण एकच: तो सर्वसामान्यांपेक्षा वेगळा होता व मला माहीत असलेल्या माणसांसारखा मुळीच नव्हता. तो जरी भयानक आणि जेरबंद होता, तरी दुसऱ्या प्रकारच्या जीवनाकडे मी आकर्षित झालो होतो. तो माणूस आणि त्याचा आनंदी, प्रेमळ आवाज माझ्या स्मरणातून लौकर जाईना. त्याच्या संगतीनेच, त्या काळातील आणखी एक तशीच ठाम आठवण आहे. एक जाडजूड पुस्तक कसेतरी माझ्या हाती लागले होते. त्या पुस्तकाचा आरंभ फाटून हरवला होता आणि मी ते पुस्तक वाचायला सुरुवात केली. मला काहीही बोध होत नव्हता. फक्त एक पानभराची गोष्ट समजली होती, जिच्यात एक राजा एका साध्या धनुर्धराला सरदार बनवू इच्छित होता व त्यावर त्या धनुर्धारी माणसाने कवितेत उत्तर दिले होते:

"शेतकरी रिसाल्यातला स्वार म्हणूनच मला जगूं दे मरूं दे:
माझा बाप तसाच जगला, त्याच्या मुलानं तसंच जगलं पाहिजे.
कारण थोरा-मोठ्यांपेक्षा, हलक्या कुळातल्यांनीच,
मोठमोठ्या कामगिऱ्या पार पाडल्या आहेत."

ह्या काहीशा अवघड ओळी मी उतरवून काढल्या आणि पुढे अनेक वर्षेपर्यंत त्यांचा मला उपयोग झाला. एखाद्या प्रवाशाला सोटयाचा जसा उपयोग होतो तसा. अथवा त्यावेळी "पृथ्वीवरील थोर" मानले जाणारे क्षुद्रप्रवृत्ती लोक ज्या भुलावण्या दाखवीत होते व हीन उपदेश करीत होते, त्यांविरुद्ध ह्या ओळींनी ढालीप्रमाणे माझे रक्षण केले. वारा जसा जहाजाच्या शिडांमध्ये प्रेरक शक्ती भरतो, तशी कल्पनेमध्ये प्रेरक शक्ती भरणाऱ्या ओळी अनेक तरुणांच्या जीवनात भेटतात, असे मला वाटते.

दहा वर्षांनंतर मला समजले की, शेक्सपीयरच्या आधीचा एक लेखक रॉबर्ट ग्रीन ह्याच्या १६ व्या शतकामधील «The Comedy of the Merry Archer George Green and Robin Hood» मधील ह्या ओळी होत्या. हा शोध लागला तेव्हा मला खूप आनंद झाला. प्राचीन काळापासून लोकांचा खरा मित्र असलेल्या आणि त्यांच्या खडतर जीवनात मदत करणाऱ्या साहित्याबद्दल मला अधिकच ममत्व वाटू लागले.

होय, कॉम्रेडहो, जीवनातील गावढळपणाचा आणि क्रौर्याचा मला विपुल अनुभव मिळाला आहे. एकदा तर मी आत्महत्येच्या प्रयत्नापर्यंत मजल मारली. अनेक वर्षेपर्यंत ह्या गोष्टीची आठवण झाली म्हणजे जळत्या शरमेची आणि आत्म-तिरस्काराची भावना जाणवायची.

लोक दुष्ट असण्यापेक्षा अडाणी जास्त होते, त्यांच्यापासून अगर जीवनापासून मला भय नव्हते, तर माझ्या सामाजिक आणि इतर प्रकारच्या अज्ञानापासून, जीवनाविरुद्धच्या माझ्या रक्षणहीनतेपासून व अगतिकतेपासून मला भय होते, ह्याची जेव्हा मला जाणीव झाली, तेव्हा त्या भीतीपासून मी मुक्त झालो. परिस्थिती नेमकी तशीच होती. मला वाटते की ह्या गोष्टीवर तुम्ही चांगला विचार करावा, कारण विशिष्ट लोकांचे विव्हळणे व तक्रारी करणे केवळ त्यांच्या रक्षणहीनतेच्या जाणीवेमधून निर्माण होते; माणसाला विहीनतेपासून आणि अंतरंगातून दडपण्यासाठी "जुने जग" वापरीत असलेल्या प्रत्येक गोष्टीविरुद्ध सामना करण्याच्या स्वतःच्या सामर्थ्याबाबत त्यांना विश्वास वाटत नसल्यामुळे तसे घडते.

त्या काळात माझ्यासारखे "समाजाचे" सावत्रपुत्र एकाकी होते, पण तुमची संख्या एव्हाना शेकड्यांमध्ये आहे; स्वतःच्या सामर्थ्याची जाण असलेल्या, हाती सत्ता असलेल्या, व्यक्तींच्या उपयुक्त श्रमाला पूर्ण श्रेय देण्यास त्वरित शिकणाऱ्या कामगारवर्गामधून तुम्ही आला आहात, ह्याची

तुम्हाला जाणीव असली पाहिजे. आपल्या कामगारांच्या आणि शेतकऱ्यांच्या सरकारमध्ये तुम्हाला सत्ता आहे; तुमच्या क्षमतांचा पूर्णत्वाने विकास घडविण्यास तुम्ही त्या सत्तेचा वापर केला पाहिजे आणि त्यात ती तुम्हाला मदत करील. सरकार ही गोष्ट हळूहळू करीत आहे. पण भांडवलदारवर्गाने — त्याच्या आणि तुमच्या कट्टर शत्रूने — जर त्याच्या जीवनात आणि कामात अडथळे आणले नसते, तर ते खूपच अधिक यशस्वीपणे ही कामगिरी पार पाडू शकेल.

तुम्ही स्वत:बाबत आणि स्वत:च्या सामर्थ्याबाबत विश्वासाची भावना बाणविली पाहिजे. अडथळे पार करून आणि निर्धाराला बळकट करून हा विश्वास साध्य करता येतो. भूतकाळाच्या हलक्या आणि दुष्ट वारशाला तुम्ही स्वत:मधून आणि तुमच्या भोवतालीमधून नष्ट करायला शिकले पाहिजे. अन्यथा तुम्ही "जुन्या जगाचा त्याग"* करायला समर्थ कसे व्हाल? त्या गीताच्या शिकवणीनुसार वागण्याची तुमची ताकद आणि इच्छा असल्याविना तुम्ही ते गीत गाऊ शकणार नाही. स्वत:वरील अगदी छोटासा विजयसुद्धा माणसाला खूपच अधिक बलवान बनवितो. देहाला प्रशिक्षण दिल्यास माणूस किती अधिक निरोगी, चपळ व सहनशील बनतो, हे तुम्हाला चांगले ठाऊक आहे. मनाला आणि निर्धाराला तशाच प्रकारचे प्रशिक्षण मिळाले पाहिजे.

अशा प्रशिक्षणापासून साध्य होणाऱ्या लक्षणीय यश:सिद्धीचे एक उदाहरण पहा: काही थोड्या काळापूर्वी बर्लिनमध्ये एका बाईने प्रत्येक हातात दोन-दोन पेन्सिली धरून व आणखी एक पेन्सिल दातांमध्ये धरून, पाच भिन्न भाषांमधील पाच शब्द एकाच वेळी लिहून दाखविले. ही गोष्ट अविश्वसनीय भासण्याची शक्यता आहे, कारण केवळ शारीरिक अर्थानेच हे अवघड आहे असे नव्हे, तर त्यासाठी विचाराची अनन्यसाधारण विभागणी असणे आवश्यक आहे. असे असले तरीही, ही सत्य घटना आहे. याउलट, ही वस्तुस्थिती असेही दाखविते की, अराजकी भांडवलदारी समाजात बुद्धिमान गुणांना कसे वाया घालविले जाते. तेथे लक्ष वेधून घेण्यासाठी माणसाला स्वत:च्या हातां-च्या आधारावर रस्त्यांमधून चालावे लागते, अगदी कमी अथवा अजिबात व्यावहारिक मूल्य नसलेले वेगांचे विक्रम स्थापन करावे लागतात, वीस

---

*१८७५ साली लिहिण्यात आलेल्या कामगारांचे 'मार्सेल्येझा' नामक क्रांतिगीतामधील शब्द — अनु.

प्रतिस्पर्ध्यांविरुद्ध एकाच वेळी बुद्धिबळाचे सामने खेळावे लागतात, कसरतींचे आणि कवितारचनेचे अफाट स्टंट करावे लागतात; सर्वसाधारणपणे, अतितृप्त आणि कंटाळलेल्या माणसांच्या संवेदनांना गुदगुल्या करण्यासाठी सर्व प्रकारच्या जाहिरातबाजीचे भडक खेळ शोधून काढावे लागतात.

तुम्हा तरुणांना माहीत हवे की विज्ञानाच्या, कलेच्या आणि तंत्रशास्त्राच्या क्षेत्रात मानवजातीने साध्य केलेली खरीखुरी मौल्यवान व चिरंतन उपयुक्त आणि सुंदर अशी प्रत्येक गोष्ट अत्यंत अव्यक्त अशा कठीण परिस्थितींमध्ये, "समाजाच्या" गाढ अज्ञानाला तोंड देऊन, चर्चच्या जोरदार विरोधाला सहन करून, भांडवलदारांच्या अतितृष्णेला सोसून आणि कलेच्या व विज्ञानाच्या "आश्रयदात्यांच्या" लहरी सांभाळून काम करणाऱ्या व्यक्तींनी निर्माण केली आहे. संस्कृतीच्या निर्मात्यांमध्ये अनेक सामान्य कामकरी माणसे होती हे लक्षात ठेवले पाहिजे, उदाहरणार्थ, थोर पदार्थवैज्ञानिक फॅरडे[178] आणि संशोधक एडिसन;[179] कापूस पिंजण्याचे यंत्र शोधणारा आर्कराईट[180] न्हावी होता; कलात्मक कुंभारकामाचा एक सर्वोत्तम निर्माता बर्नार्ड पालीस्सी[181] एक लोहार होता; जगाला ज्ञात असलेला सर्वांत थोर नाटककार शेक्सपीयर एक सामान्य नट होता. मोलीएरही[182] तसाच. आपल्या अंगच्या गुणांचा लोकांनी कसा विकास घडविला ह्याची अशी शेकडो उदाहरणे देता येतील.

आता मानवजातीच्या ताब्यात असलेल्या वैज्ञानिक ज्ञानाच्या आणि तांत्रिक साहित्याच्या प्रचंड साठ्यांचे फायदे न भोगणाऱ्या व्यक्तींना हे शक्य होते हे ह्यावरून सिद्ध झाले. आपल्या देशात सांस्कृतिक कार्य करणे किती सोपे बनले आहे ह्याचा जरा विचार करा. निरर्थक श्रमांपासून लोकांना पूर्णतया मुक्त करण्याचा आपण प्रयत्न करीत आहोत; त्वरेने अध:पतित होणाऱ्या धनिक वर्गाला पुढे आणणाऱ्या व कष्टकरी वर्गाला अध:पतनाचा धोका निर्माण करणाऱ्या शोषणापासून, कामगारांच्या घडणाऱ्या दुष्ट शोषणापासून, मुक्त करण्याचा आपण प्रयत्न करीत आहोत.

आता तुमच्यासमोर एक महान आणि पूर्णतया स्पष्ट कार्य उभे आहे— "जुन्या जगाचा त्याग करण्याचे" आणि नवे जग निर्माण करण्याचे. हे काम सुरू झाले आहे. आमच्या कामगारवर्गाने आदर्श घालून दिल्यानंतर, जुन्या जगाने कितीही अडथळे आणले तरी ती प्रक्रिया सर्वांगांनी विकसित होत आहे आणि विकसित होत जाणार आहे. जगभरचे कामकरी लोक कामासाठी आपल्या बाह्या वर सरसावीत आहेत. व्यक्तींच्या कामाभोवती सहानुभूतीचे

वातावरण निर्माण होत आहे. इत:पर त्यांना सामुदायिकामधील एकाकी तुकडे असल्यासारखे वाटत नाही, तर सृजनाच्या इच्छेला घोषित करणाऱ्या सामुदायिकाच्या त्या अग्रदूत बनल्या आहेत.

एवढ्या धिटाईने प्रथमच असे उद्दिष्ट एखाद्याने स्वत:समोर ठेवल्यानंतर "काय केले पाहिजे?" अशा प्रश्नांना मुळी जागाच उरत नाही. "जगणं अवघड आहे?" पण खरेच हे एवढे अवघड आहे का? तुमच्या मागण्या वाढल्या आहेत आणि तुमच्या पूर्वजांनी ज्यांचा कधी विचारही मनी आणला नाही व ज्यांना कधी पाहिले नाही, अशा गोष्टी तुम्हाला आवश्यक वाटतात, म्हणून तर हे अवघड झाले ना? तुमच्या मागण्या कदाचित अति वाढल्यात का?

अर्थात मला जाणीव आहे की, तुमच्यातील अनेकांना सामुदायिक कामाचा आनंद आणि त्यातील काव्य यांची समज आहे. आणि दशलक्षावधी कोपेक गोळा करण्याऐवजी, जगातील सर्वांत मोठा चमत्कार असलेल्या आणि जगातील सर्व चमत्कारांना निर्माण करणाऱ्या मानवावरील कोपेकची दुष्ट सत्ता नष्ट करण्याची तुमची आकांक्षा आहे.

मी लिहायला कसा शिकलो ह्या प्रश्नाचे मी आता उत्तर देतो.

थेट जीवनामधून आणि पुस्तकांमधून, अशा दोन्ही ठिकाणांहून मी ठसे गोळा केले. जीवनातील ठशांची कच्च्या मालाबरोबर तुलना करता येईल, तर, पुस्तकातील ठशांची निम-तयार मालाशी तुलना करता येईल. अथवा अधिक ओबडधोबड स्वरूपात, पण साध्या शब्दात सांगायचे तर पहिल्या बाबतीत मला जनावराशी वागावे लागले आणि दुसऱ्या बाबतीत कातडी उत्तम सोलून काढलेल्या जनावराचा मला परामर्श घ्यावा लागला. परकी साहित्याचा, विशेषत: फ्रान्समधील साहित्याचा, मी फार फार ऋणी आहे.

माझे आजोबा क्रूर आणि कंजूस होते, पण बाल्झाकचे «Eugénie Grandet» ('यूजीन ग्रान्दे') वाचेपर्यंत मला ते नीटसे समजले नव्हते. यूजीनचे वडील, म्हातारे ग्रान्दे, हेसुद्धा क्रूर आणि कंजूस होते, पण माझ्या आजोबांपेक्षा ते अधिक मूर्ख आणि कमी स्वारस्यपूर्ण होते. त्या फ्रेंच माणसाच्या तुलनेने, मला न आवडणारा रशियन म्हातारा अधिक चांगला ठरला होता. त्यामुळे माझा माझ्या आजोबांविषयीचा दृष्टिकोन बदलला नाही, पण मला एक मोठा शोध लागला: **माणसामध्ये मला जे आढळले नव्हते**

अथवा माहीत नव्हते असे काहीतरी पुस्तकांनी मला उघड करून दाखविले होते.

जॉर्ज इलियटची नीरस कादंबरी «Middle March» ने आणि ऑएर-बाख व स्पीलहागेन यांच्या पुस्तकांनी मला दाखविले की, इंग्लिश आणि जर्मन प्रांतिक गावांमधील माणसे ज्या पद्धतीने रहात होती ती नीझ्नी-नवगोरद* मधील ज्वेज्दीन्स्काया रस्त्यावरील जीवनाची पद्धत नव्हती, पण त्याहून फारशी चांगलीही नव्हती. त्यांचे बोलण्याचे बहुतेक विषय सारखेच होते – त्यांचे इंग्लिश आणि जर्मन कोपेक, देवाला घाबरण्याची आणि देवावर प्रेम करण्याची गरज. पण अगदी आमच्या रस्त्यावरील माणसांप्रमाणेच, ती माणसेही एकमेकांचा द्वेष करीत होती. विशेषत: त्यांच्या भोवतालच्या बहुसंख्यांपेक्षा या ना त्या पद्धतीने वेगळ्या साच्यामध्ये घडलेल्या माणसांचा. परकी माणसे आणि रशियन ह्यांच्यातील साम्ये शोधण्याचा मी प्रयत्न करीत नव्हतो. वस्तुत: मी भेद शोधायला निघालो होतो, पण तरीही मला साधर्म्य आढळले.

माझ्या आजोबांचे जिवलग मित्र दिवाळे वाजलेले दोन व्यापारी थॅकरे यांच्या «Vanity Fair» मधील माणसांप्रमाणेच बोलत आणि त्यांचे बोलण्याचे विषयही सारखे होते. जुन्या करारातील स्तोत्रांच्या पुस्तकावरून मी लिहा-वाचायला शिकलो. मला ते पुस्तक आवडायचे, कारण त्यातील भाषा सुंदर आणि नादमय होती. म्हातारे पुरुष जेव्हा एकमेकांपाशी स्वत:च्या मुलांविषयीच्या तक्रारी सांगायचे, तेव्हा राजा डेव्हिडने [183] स्वत:च्या मुलाविषयी; कर्तव्यचुकार अब्सालोमविषयी, देवापाशी केलेल्या तक्रारी मला आठवायच्या. एकूण माणसे आणि विशेषत: तरुण माणसे अधिकाधिक वाईट जगत होती, अधिक मूर्ख व आळशी बनली होती आणि देवाची धास्ती बाळगेनाशी झाली होती, असे जेव्हा हे म्हातारे लोक दावा करीत, तेव्हा ते खरे बोलत नव्हते असे मला भासायचे. डिकन्सचे ढोंगी नेमक्या ह्याच गोष्टींविषयी बोलले होते.

सांप्रदायिक पोथीनिष्ठ आणि पुराणमतवादी पाद्री ह्यांच्यामधील युक्तिवादांना काही काळ लक्षपूर्वक ऐकल्यानंतर मला आढळले की, इतर देशांमधील चर्चच्या लोकांप्रमाणेच दोघेही शब्दांना धरून बसायचे. चर्चमधील सर्व माणसांना शब्द हे इतरांना मुठीत ठेवण्याचे साधन वाटत होते आणि ह्या

---

* सध्याचे गोर्की शहर.

चर्चवाल्यांशी साधर्म्य असलेले काही लेखक होते. ह्या साधर्म्यात लौकरच मला संशयास्पद जाणवू लागले.

अर्थात माझ्या वाचनात पद्धतशीरपणा अथवा सातत्य नव्हते. सर्व काही योगायोगाचा मामला होता. माझ्या मालकाच्या भावाला क्सवियें दे मॉन्ते-पिन, गाबोरीआँ, ह्यांच्या "पिवळया मुखपृष्ठां"च्या कादंबऱ्या वाचण्याचा नाद होता. ही पुस्तके वाचल्यानंतर "निरीश्वरवादी-क्रांतिकारकांचा" उपहास करणारी व त्यांच्या विरोधी चित्रणांची रशियन पुस्तके हाती पडली. ज्या माणसांमध्ये मी रहात होतो त्यांच्याशी मुळीच साधर्म्य नसलेल्या, पण मला हाक मारून बरोबर चलण्याचा आग्रह धरणाऱ्या गुन्हेगाराशी साम्य असलेल्या, अशा लोकांविषयी वाचायला मला स्वारस्य वाटत होते. अर्थात, लेखकांच्या इराद्यांचा एक भाग असलेला "क्रांतिकारकपणा" त्या माणसांमध्ये कुठे दडला होता ते मात्र मला समजायचे नाही, कारण सर्व "क्रांतिकारकांना" ते सारखेच दोष चिकटवीत.

'मोलोतोव' आणि 'क्षुद्रप्रवृत्ती सुख' ह्या पोम्यालोवस्कींच्या कथा माझ्या हाती लागल्या. क्षुद्रप्रवृत्ती अस्तित्वातील "अत्यंत नीरस जीवन" व क्षुद्रप्रवृत्ती सुखाचा क्षुल्लकपणा त्यांनी मला दाखविला. मला अंधुकपणे जाणवले की, उदास "निरीश्वरवादी" काही अंशी संपन्न मोलोतोवपेक्षा अधिक चांगले होते. पोम्यालोवस्कीनंतर झारूबिन [184] यांचे 'रशियन जीवनाच्या अंधाऱ्या आणि प्रकाशित बाजू' नामक अत्यंत रटाळ पुस्तक वाचले. त्या पुस्तकात कोणतीही प्रकाशित बाजू मला आढळली नाही, पण अंधाऱ्या जूबा मात्र जास्त स्पष्ट दिसल्या व अधिक किळसवाण्या भासल्या.

भिकार पुस्तके मी अगणित वाचली, पण तीसुद्धा मला उपयुक्त ठरली. जीवनाच्या उजळत्या पैलूंबरोबरच अंधाऱ्या बाजू ठाऊक असणेही चांगले असते. माणसाने जास्तीत जास्त ज्ञान संपादन केले पाहिजे. त्याचा अनुभव जेवढा अधिक विविध, तेवढी अधिक उंची लाभते आणि दृष्टीचे क्षेत्र अधिक विशाल बनते.

परकीय साहित्याने तुलनेसाठी मला विपुल सामग्री पुरविली आणि त्यातील कसबाने मी चकित झालो. ह्या पुस्तकांमधील माणसे एवढी जिवंत आणि ठळक रंगविली होती की, मला ती अक्षरशः खरीखुरी वाटायची. रशियनांपेक्षा ही माणसे मला नेहमी जास्त क्रियाशील आढळत. ती कमी बोलत आणि कृती जास्त करीत.

स्तेन्दाल, बाल्झाक आणि फ्लॉबेर ह्या "मोठ्या" फ्रेंच लेखकांनी माझ्यावर खरा व प्रगाढ रचनात्मक प्रभाव पाडला. सर्व "नवागतांनी" ह्या लेखकांना वाचावे असा मी सल्ला देईन. ते खरोखर बुद्धिमान कलाकार आहेत व लेखनप्रकाराचे श्रेष्ठ प्रभू आहेत. रशियन साहित्यात त्यांच्यासम अद्याप कुणीही नाही. मी त्यांचे रशियन अनुवाद वाचले, पण फ्रेंच लेखनाची शक्ती अनुभवण्यास त्यामुळे मला प्रतिबंध घडला नाही. असंख्य "बुलेवार्द" कादंबऱ्यांनंतर, मायन रीड,[185] जेम्स फेनीमोर कूपर, गुस्ताव एमार[186] आणि पोन्सन दू तेरेल यांच्यानंतर, ह्या थोर लेखकांच्या कथांनी माझ्यावर अद्भुत परिणाम केला.

त्रोईत्सी सणाच्या एका रविवारी फ्लोबेरचे «Un Colur Simple» मी वाचत असल्याचे आठवते. सणाची मौज लुटणाऱ्यांपासून स्वतःला चुकविण्यासाठी एका पडवीच्या छपरावर मी बैठक मारली होती. निवेदनशैलीने मी चकित झालो होतो. जणू दृष्टी आणि श्रवणशक्ती हिरावून घेतल्यासारखे वाटत होते. कोणतीही श्रेष्ठ कामगिरी न बजावलेल्या, अथवा कोणत्याही प्रकारचा गुन्हा न केलेल्या एका सामान्य स्त्रीच्या, एका स्वयंपाकीणीच्या, व्यक्तीमत्वाने माझ्या सभोवतालच्या सणाच्या धामधुमीचे सारे आवाज जणू बंद करून टाकले होते. मला अत्यंत परिचित असे साधे शब्द त्या स्वयंपाकीणीच्या "सामान्य" आयुष्याच्या गोष्टीत वापरलेले होते, पण त्याच शब्दांनी मी एवढा डहुळून का निघालो होतो ते मात्र मला समजत नव्हते. ते पुस्तक जणू माझ्यावर कसलीतरी जादू करीत होते असे मला भासत होते. मी कबूल करीन की, एखाद्या जंगली माणसाप्रमाणे त्या पुस्तकाची पाने अनेक वेळा मी उजेडापाशी धरून बसलो होतो. मी काय करीत होते ह्याचे मला भान नव्हते, पण त्या पुस्तकाच्या पानांवरील ओळींमधून गूढता उकलण्याची किल्ली शोधण्याचा माझा प्रयत्न चालला होता.

गूढ आणि रक्तपाती गुन्ह्यांचे वर्णन करणारी डझनावारी पुस्तके मला परिचित होती, पण जेव्हा मी स्तेन्दालचे «Chroniques italiennes» ['इटलीचा वृत्तांत' वाचले, तेव्हा ते सारे कसे करण्यात आले हे मला समजेना. ह्या लेखकाने क्रूर कृत्यांची आणि सूडवादी खुन्यांची वर्णन केली होती, पण मला त्याच्या कथा वाचताना "संतांची चरित्रे" वाचल्यासारखे वाटत होते; नरकात "छळ सोसणाऱ्यांचे सांत्वन करायला" तेथे गेलेल्या

देवाच्या मातेची कथा सांगणारी आमच्या 'देवीचे स्वप्न' ऐकत होतो असे भासले होते.

बाल्झाकच्या «La pean de Chargin» ['खडबडीत कातडे'] मधील एक बँकर मेजवानी देत असल्याच्या प्रसंगाची पाने वाचत होतो तेव्हा मी अक्षरशः चकित झालो. सुमारे दोन डझन पाहुणे एकाचवेळी बडबड करून गोंगाट माजवतात, हे वर्णन वाचताना माझ्या कानांचे पडदे फाटत असल्याचा मला भास होत होता. त्याहून जास्त महत्त्वाचे म्हणजे मी प्रत्येक पाहुण्याचे बोलणे केवळ ऐकले एवढेच नव्हे, तर प्रत्यक्षात मला तो दिसलासुद्धा. बाल्झाकने त्या बँकरच्या पाहुण्यांच्या नाक-डोळ्यांचे वर्णन केलेले नाही, अथवा ते कसे दिसत होते तेही सांगितलेले नाही; पण मला मात्र त्या लोकांचे डोळे, स्मितहास्ये आणि हातवारे दिसत होते.

शब्दांच्या माध्यमाद्वारे लोकांचे वर्णन करण्याच्या कलेमधील बाल्झाक आणि इतर फ्रेंच लोकांची हातोटी मला नेहमी चकित करायची. लोकांचे बोलणे सजीव आणि श्राव्य करण्याची त्यांची हातोटी विलक्षण होती. संवाद लिहिण्यातील त्यांचे कसब अजब होते. बाल्झाकची पुस्तके म्हणजे तैलरंगातील चित्रे भासायची. प्रथम जेव्हा मी रूबेन्सची[187] चित्रे पाहिली तेव्हा माझ्या मनात तात्काळ बाल्झाकचा विचार आला. जेव्हा मी दस्तोयेवस्कीची वेडी पुस्तके वाचली तेव्हा अपरिहार्यपणे माझ्या मनात विचार आला की, कादंबरी-लेखनातील ह्या थोर लेखकाचा तो फार फार ऋणी होता. गोन्कूरसच्या भेदक शब्दांच्या कादंबऱ्याही मला आवडायच्या. झरणीने काढलेल्या चित्रांसारख्या त्या छेदक भासत. उदास रंगांमधील भव्य चित्रांप्रमाणे झोलाची[188] खिन्न पुस्तके भासायची. ह्यूगोच्या कादंबऱ्यांचा मात्र माझ्यावर परिणाम घडला नाही आणि «Quatre—Vingt—treize» ('९३ वे वर्ष') सुद्धा मी निर्विकारपणे वाचले. पुढे अनातोल फ्रान्सचे «Les dieux ont Soit» ('देवांच्या इच्छा') जेव्हा मी वाचले, तेव्हा कुठे त्या निर्विकारपणाचा अर्थ मला समजला. अनेक गोष्टींचा तिटकारा करायला शिकल्यानंतरच केवळ मी स्तेन्दाल वाचला. त्याच्या निवांत बोलण्यामुळे व छद्मी स्मितामुळे माझ्या तिटकाऱ्याला बळकटी मिळाली.

उपरोक्त गोष्टींवरून स्पष्ट होते की, लिहायचे कसे ते मी फ्रेंच लेखकांपासून शिकलो. हा योगायोग होता, पण त्याच्या निष्पत्ती हितप्रद ठरल्या. म्हणून तरुण लेखकांना मी सल्ला देईन की, थोर लेखकांची पुस्तके मूळ

भाषेत वाचता यावीत आणि त्यांच्यापासून शब्दांची कला शिकता यावी, ह्यासाठी त्यांनी फ्रेंच भाषेचा अभ्यास करावा.

गोगोल, तल्स्तोय, तुर्गेनेव, गोन्चारोव, दस्तोयेवस्की आणि लेस्कोव ह्या रशियन साहित्यश्रेष्ठांची पुस्तके मी खूप नंतर वाचली. लेस्कोव ह्यांच्या लेखनाचा माझ्यावर निःसंशय प्रभाव होता. त्यांचे आश्चर्यकारक ज्ञान आणि त्यांची भाषासंपदा यांचे मला कौतुक होते. रशियन जीवनाची अगदी जवळून सूक्ष्म ओळख असलेले असे ते एक उत्तम लेखक आहेत. पण आमच्या साहित्यात त्यांना त्यांच्या योग्यतेएवढी मान्यता लाभलेली नाही. चेखोव यांनी लेस्कोव यांचे ऋण मान्य केले होते.

ह्या परस्पर दुव्यांचा आणि प्रभावांचा उल्लेख मी एवढ्याचसाठी केला की, परकी आणि रशियन साहित्याच्या विकासाचे ज्ञान असणे लेखकाला अगदी "अत्यावश्यक" आहे हे परत सांगण्यासाठी.

वयाच्या विशीत मला जाणीव झाली की, लोक सांगू शकतील त्यापेक्षा खूपच अधिक असे मी पाहिले होते, ऐकले होते, अनुभवले होते आणि ते लोकांना सांगणे आवश्यक होते. इतर माणसांपेक्षा विशिष्ट गोष्टी मला वेगळ्या रीतीने माहीत होत्या व जाणवत होत्या असे मला भासायचे. ह्या दोन्हींमुळे मी अस्वस्थ बनलो आणि माझा स्वभाव गडबड्या व बडबड्या बनला. तुर्गेनेवसारख्या श्रेष्ठ साहित्यकाराची पुस्तके वाचत असतानाही काहीवेळा मला असे जाणवायचे की, मुख्य व्यक्तीरेखांविषयी, उदाहरणार्थ, 'शिकाऱ्याची रेखाटने', तुर्गेनेवनी सांगितले होते त्यापेक्षा मी काहीतरी वेगळे सांगू शकलो असतो. तो काळपावेतो निवेदक म्हणून मी चांगलीच कीर्ती संपादन केली होती. धक्क्यावरचे हमाल, बेकरीवाले, उडाणटप्पू, सुतार, रेलकामगार, यात्रेकरू आणि ज्या माणसांमध्ये मी रहात होतो ती बहुतेक सर्व माणसे, माझे श्रोते होते. मी वाचलेल्या पुस्तकांमधील आशय जेव्हा मी परत कथन करायचा, तेव्हा कथानकात मी बदल करायचा, जे काही मी वाचलेले असायचे त्यात फरक करून सांगायचा, माझ्या स्वतःच्या जीवनानुभवातून निर्माण झालेल्या गोष्टींची भर घालायचा, असे माझ्या वारंवार ध्यानात यायचे. जीवनातील प्रत्यक्ष गोष्टी आणि साहित्य ह्यांचा माझ्या मनात संयोग घडल्यामुळे तसे घडत होते. पुस्तक माणसाप्रमाणेच जीवनातील एक वस्तुस्थिती आहे. ते एक सजीव आणि बोलके सत्य आहे.

माणसाने निर्माण केलेल्या अथवा तो निर्माण करीत असलेल्या इतर सर्व वस्तूंपेक्षा, "वस्तू" म्हणून ते खूपच कमी आहे.

माझे कथन ऐकणाऱ्या बुद्धिजीवी लोकांनी मला सल्ला दिला: "तू लिहिलं पाहिजे. प्रयत्न करून पहा."

अनेकदा मी उन्मन व्हायचा. बोलण्याची अतीव इच्छा व्हायची, शब्दांचे कढ आतून फुटायचे. मला दडपून टाकणाऱ्या अथवा आनंदित करणाऱ्या सर्व गोष्टी व्यक्त करण्याची तीव्र इच्छा व्हायची. "माझ्या उरावरचा भार हलका करायला" मी उत्सुक होतो. माझ्या अंतरंगातील ताणामुळे छळाचे क्षण यायचे. अशा क्षणी माझ्या घशात आवंढा यायचा आणि जोरात ओरडून सांगावेसे वाटायचे की, काच फुंकणारा माझा मित्र अनातोली फार गुणी मुलगा होता, पण त्याला मदत मिळाली नाही तर त्याचा नाश होईल; रस्त्यावर वेश्याव्यवसाय करणारी थेरेसा वस्तुतः फार चांगली बाई होती आणि ती वेश्या होती हा तिच्यावर अन्याय होता, तिच्याकडे जाणाऱ्या विद्यार्थ्यांना हे समजत नव्हते. त्याचप्रमाणे, तरुण व उत्तम वाचन असलेल्या याकोवलेवा सुईणीपेक्षा भीक मागून जगणारी मतीत्सा म्हातारी जास्त बुद्धिमान होती; हे विद्यार्थ्यांना समजत नव्हते.

गूरी प्लेतन्योव हा विद्यार्थी माझा जिवलग मित्र होता. पण थेरेसा आणि अनातोलीबद्दलच्या मी केलेल्या कविता त्याच्यापासूनही मी लपवून ठेवल्या होत्या. अर्थात तशा कविता करण्यामागे तळघरात काम करणाऱ्या बेकरीवाल्यांवर घाण पाण्याचे लोंढे ओतण्याचा माझा मुळीच उद्देश नव्हता. वसंतामध्ये वितळणारा बर्फ, सुंदर नदी वोल्गा, आत्म्याला छिन्नभिन्न करणारे घाणीच्या कर्दमासमान जीवन, असे माझ्या कवितांचे विषय होते.

मी अगदी सहजपणे कविता करीत असे, पण जे काही मी लिहीत होतो ते तिरस्करणीय होते असे मला आढळले. स्वतःच्या अंगी कसबाचा आणि गुणांचा अभाव होता ह्याचा मला राग होता. पूष्कीन, लेर्मोन्तोव, नेक्रासोव यांच्या कविता मी वाचल्या होत्या. कूरोचकीन[189] यांनी केलेले बेरांजेचे[190] अनुवाद मी वाचले होते व मला स्पष्ट जाणीव होती की, ह्यांपैकी एकाही कवीशी माझे यत्किंचितही साधर्म्य नव्हते. गद्य लिहिण्याचे धाडस मला होत नव्हते. कवितेपेक्षा ते अधिक अवघड भासत होते. गद्यलेखनासाठी विशिष्ट चौकस दृष्टी आवश्यक होती; इतरांना न आढळणाऱ्या गोष्टी पाहण्याची सूक्ष्मदर्शी, वेचक शक्ती आवश्यक होती; मुद्देसूद आणि नेटक्या

शैलीची गरज होती. असे असूनही गद्यलेखनाचा प्रयत्न मी सुरू केला. मात्र सामान्य गद्यलेखन माझ्या कुवतीच्या पलिकडे असल्याचे आढळल्यामुळे "तालबद्ध" गद्याची मी निवड केली. साध्या शैलीत लिहिण्याचे माझे प्रयत्न सपशेल फसले. 'म्हाताऱ्या ओकचे गीत' नामक एक प्रचंड "कविता" तालबद्ध गद्यात मी लिहिली होती. वि. ग. कोरोलेन्को यांनी अवघ्या डझनभर शब्दांमध्ये माझ्या त्या वेड्याबागड्या लेखनाच्या चिंध्या उडविल्या. माझ्या आठवणीनुसार, जर माझी चूक होत नसेल, तर 'ज्नानीये' (ज्ञान – अनु.) नियतकालिकात प्रसिद्ध झालेल्या उत्क्रांतीच्या सिद्धांतावरील 'जीवन चक्र'[191] लेखाच्या वाचनानंतर माझ्या मनात निर्माण झालेले विचार मी व्यक्त केले होते. "ह्या जगात मतभेद व्यक्त करण्यासाठीच मी आलो आहे" एवढे त्यातील एकच वाक्य माझ्या स्मरणात अद्यापपर्यंत राहिले आहे. उत्क्रांतीच्या सिद्धांताशी मी खरेच सहमत नव्हतो हे मला सांगितले पाहिजे.

"तालबद्ध" गद्य लिहिण्याच्या माझ्या छंदापासून मला परावृत्त करण्यात कोरोलेन्कोंना यश आले नाही. पाच वर्षांनंतर माझ्या 'आर्खिप आजोबा' ह्या कथेचे कौतुक त्यांनी केले, पण "कवितेशी साधर्म्य राखणाऱ्या कशाने-तरी" गोष्ट सजविल्याबद्दल त्यांनी नापसंती व्यक्त केली. प्रथम मी त्यांच्यावर विश्वास ठेवला नाही, पण घरी जेव्हा मी गोष्टीवर नजर टाकली तेव्हा स्तेपमधील धुवांधार पावसाचे आख्खे पानभर वर्णन त्या नतद्रष्ट "तालबद्ध" गद्यामध्ये लिहिले गेल्याचे मला आढळले व अतीव खेद झाला. ह्या वाईट खोडीने माझा प्रदीर्घ काळपर्यंत पाठलाग केला आणि माझ्या कथांमध्ये अनाठायी व माझी इच्छा नसतानाही ते झिरपत राहिले... "दिमाखदार" शैलीत लिहिण्याचा माझा एकूण प्रयत्न चालायचा. ह्याचे एक उदाहरण देतो: "दारुडा माणूस दिव्याच्या खांबाला मिठी घालून उभा होता, स्वतःची थरथरती सावली न्याहाळताना त्याच्या मुद्रेवर स्मित झळकत होते." जाता जाता सांगायचे म्हणजे मीच लिहिल्यानुसार, त्या रात्री वारा नव्हता आणि चांदणे होते; त्या काळी अशा चांदण्या रात्री रस्त्यावरचे दिवे पेटवीत नसत, शिवाय जरी दिवे पेटलेले असते, तरी जर वारा नसला तर माणसाची सावली स्थिर राहते. माझ्या प्रत्येक गोष्टीत अशा विसंगती आणि चुका आढळत. ह्याबद्दल मी ठामपणे स्वतःला दोष देईन.

"सागर स्मित करीत होता," मी लिहिले होते आणि तसे म्हणणे चांगले होते असे मी बराच काळपर्यंत समजत होतो. सौंदर्याच्या शोधात

मी सतत वर्णनाच्या अचूकतेमध्ये तफावती करीत होतो आणि वस्तूंना चुकीच्या जागी ठेवण्याची व लोकांचे चुकीचे वर्णन करण्याची गफलत करीत होतो.

"तुमची भट्टी हवी तशी उभी रहात नाही," असे ल्येव तल्स्तोयनी एकदा माझ्या 'सव्वीस पुरुष आणि एक मुलगी' गोष्टीवर शेरा मारला होता. त्याचा अर्थ असा होता की, मी ज्या पद्धतीने वर्णन केले होते त्यानुसार बेकरीवाल्यांचे चेहरे भट्टीच्या आगीमुळे उजळून निघणे शक्य नव्हते. माझ्या 'फोमा गोर्देयेव' मधील मेदीन्स्कायाबद्दल बोलताना चेखोव म्हणाले होते की, "तिला बहुधा तीन कान आहेत–एक तिच्या हनुवटीवरसुद्धा–पहा," आणि खरेच त्यांच्या बोलण्यात पूर्ण सत्य होते, कारण प्रकाशाच्या दिशेने उभे राहण्याची तिची पद्धत संपूर्ण चुकीची होती.

अशा चुका जरी क्षुल्लक भासल्या, तरी त्या फार महत्त्वाच्या असतात, कारण त्या कलेच्या सत्याचे उल्लंघन करतात. सर्वसाधारणपणे अचूक शब्द निवडणे आणि अत्यंत थोडक्या शब्दांमध्ये खूपसे व्यक्त होईल अशा रीतीने त्यांची मांडणी करणे अत्यंत अवघड आहे. "शब्दांची काटकसर तर करायचीच, पण तरीही विचाराचा अमर्याद पल्ला मारायचा"*; शब्दांमार्फत सजीव चित्रे निर्माण करायची; व्यक्तिरेखेच्या स्वभावातील मुख्य वैशिष्टये नेमक्या शब्दात व्यक्त करायची, वाचकाच्या मनावर त्या व्यक्तिरेखेचे वागणे आणि बोलणे ताबडतोब ठसवायचे, हे अत्यंत अवघड आहे. शब्दांच्या माध्यमामार्फत लोकांना आणि वस्तूंना "रंग देणे" वेगळे, व 'युद्ध आणि शांतता' मधील व्यक्तिरेखांप्रमाणे त्या प्रत्यक्ष दृग्गोचर व्हाव्यात म्हणून "त्रिमितीमध्ये" त्यांचे ठळकपणे वर्ण करणे वेगळे...

मध्य रशियामधील एका छोटया प्रांतिक गावाचे अंगठयाच्या नखाएवढे रेखाचित्र वर्णन करण्यासाठी एकदा मी जवळजवळ तीन तास बैठक मारल्यानंतर पुढील मजकूर निर्माण झाला:

"चढउतारांच्या दरीला उदास रस्त्यांचे असे काही छेद गेले होते की, रंगीबेरंगी अकूरोव गाव एखाद्या रुंद आणि सुरकुतल्या तळहातावरील चकचकीत खेळण्यासारखे भासत होते."

मी एक चांगला मजकूर लिहिला अशी तेव्हा माझी समजूत झाली,

---

*आ. चेखोव

पण गोष्ट प्रसिद्ध झाल्यानंतर मला जाणवले की, नक्षीदार सुंठीच्या बिस्कीटा-प्रमाणे अथवा चॉकलेटच्या खोक्यावरील चित्राप्रमाणे ते सर्व दिसत होते.

सर्वसाधारणपणे शब्दांचा वापर अत्यंत काटेकोर अचूकतेने केला पाहिजे. दुसऱ्या एका क्षेत्रातील एक उदाहरण देतो. "धर्म म्हणजे अफू" असे म्हणतात. पण अफूचा वापर डॉक्टरमंडळी वेदनाशमक म्हणून करतात, म्हणजे अफू ही चांगली वस्तू आहे. पण अफूचे तंबाखूप्रमाणे धूम्रपान करतात, अफूच्या धूम्रपानाने माणसे मरतात, मद्यापेक्षा अफू हे फार अधिक अपायकारक वीष आहे, ही वस्तुस्थिती बहुसंख्य लोकांना ठाऊक नाही.

माझ्या अपयशांपायी नेहमी माझी कवीच्या दु:खद शब्दांसारखी मन:स्थिती होते: "शब्दांच्या छळापेक्षा अधिक पराकाष्ठेचा छळवाद जगात दुसरा कोणताही नाही."[192]

मला वाटते, कवी नादसन यांनी म्हटले होते: "आमची भाषा थंड आणि करुणास्पद आहे."[193] आणि भाषेच्या "दारिद्र्या"बद्दल तक्रार न करणारा कवी विरळाच.

मला असे भासते की, ह्या तक्रारी रशियन भाषेच्या "दारिद्र्या"-विरुद्ध नाहीत, तर एकूण मानवी भाषेविरुद्ध आहेत. शब्द ज्यांना शोधू शकत नाहीत अथवा व्यक्त करू शकत नाहीत अशा भावना व असे विचार अस्तित्वात असल्यामुळे असे घडते. पण "शब्द ज्यांना शोधू शकत नाहीत" अशा गोष्टी असल्या तरीही, रशियन भाषा म्हणजे एक अक्षय संपदा आहे आणि चकित करणाऱ्या वेगाने ती अधिक संपन्न बनत आहे. आपल्या भाषेच्या वाढीच्या वेगवानतेला सिद्ध करण्यासाठी गोगोल आणि चेखोव, तुर्गेनेव आणि बूनिन, दस्तोयेवस्की आणि लेओनिद लेओनोव[194] यांनी वापरलेल्या शब्दभांडाराची तुलना करणे योग्य ठरेल. लेओनोव यांनी स्वत:च वृत्तपत्रांमध्ये निवेदन केले आहे की, दस्तोयेवस्कींमधून ते निर्माण झाले आहेत; पण काही विशिष्ट बाबतीत ते म्हणू शकले असते – आणि मी मना-च्या मूल्यमापनाला आवाहन करतो – की ल्येव तल्स्तोयपासूनही ते निर्माण झालेले आहेत. अर्थात हे दोन्ही दुवे ह्या तरुण लेखकाचे महत्त्वच केवळ सिद्ध करतात आणि त्याच्या अस्सलपणाला मुळीच बाधा आणत नाहीत. 'चोर' ह्या कादंबरीत लेओनोव यांनी नि:संशयरीत्या भाषासंपदेचे आश्चर्य-कारक दर्शन घडविले आहे. त्यांनी स्वत:चे अनेक अत्यंत उचित शब्द निर्माण केले आहेत, शिवाय गुंतागुंत व कल्पनारम्यता ह्या दृष्टींनी त्यांची कादंबरी

लक्षवेधी आहे. मला असे दिसते की, लेओनोव हा स्वतःचा संदेश देणारा एक माणूस आहे आणि तो संदेश अत्यंत अभिजात आहे. हा संदेश द्यायला त्यांनी नुकताच आरंभ केला आहे आणि ह्या कामी ना दस्तोयेवस्की ना इतर कुणी त्यांना अडथळा आणू शकेल.

लोक भाषा निर्माण करतात ह्याची तुम्हाला आठवण करून देणे उचित ठरेल. साहित्यिक भाषा आणि लोकांची भाषा ह्यांच्याविषयी बोलणे म्हणजे केवळ एक "कच्चा माल" आहे, तर दुसरीवर श्रेष्ठींनी मेहनत केलेली आहे असे म्हणण्यासारखे आहे. ह्याची सर्वप्रथम पूर्ण जाणीव पुष्कीनला झाली आणि लोकांनी पुरविलेले भाषा-साहित्य कसे वापरावे व त्यावर कशी मेहनत करावी हेसुद्धा त्यांनीच दाखवून दिले.

कलाकारावर त्याच्या देशात आणि त्याच्या वर्गात घडणाऱ्या सर्व गोष्टींचे पडसाद उमटत असतात. कलाकार म्हणजे त्याच्या देशाचा आणि वर्गाचा कान, डोळा आणि हृदय. स्वतःच्या काळाचा तो आवाज असतो. शक्य तेवढे जास्तीत जास्त ज्ञान करून घेणे हे त्याचे कर्तव्य आहे. भूतकाळ त्याला जेवढा जास्त चांगला ज्ञात, तेवढे वर्तमानकाळाचे अधिक चांगले आकलन त्याला घडते; आणि आपल्या काळाच्या सार्वत्रिक क्रांतिकारकतेचे व त्याच्यासमोरील उभ्या असलेल्या कार्यांच्या व्याप्तीची अधिक सखोल आणि सूक्ष्म जाणीव त्याला घडेल. लोकांच्या इतिहासाचे ज्ञान घडणे आवश्यक आहे, त्याचप्रमाणे त्यांच्या सामाजिक आणि राजकीय विचाराच्या धारणेचे ज्ञान आवश्यक आहे. ज्ञानी लोकांनी, संस्कृतीच्या इतिहासकारांनी आणि मानववंशशास्त्रज्ञांनी, निर्देशित केले आहे की, ही विचारसरणी परीकथा, दंतकथा, म्हणी व वाक्प्रचार ह्यांच्याद्वारे व्यक्त होत असते. लोक कशा प्रकारे विचार करतात ह्याची अत्यंत बोधक व पूर्ण अभिव्यक्ती वस्तुतः म्हणी आणि वाक्प्रचारांमधून घडते. मोजके शब्द, मुद्देसूदपणा आणि कल्पनारम्यता ह्यांचे अत्युत्तम शिक्षण देणारे हे साहित्य आहे म्हणूनच केवळ नव्हे, तर पुढील कारणासाठीही नवशिक्या लेखकांनी त्याच्याकडे लक्ष द्यावे: सोविएतांच्या भूमीत लोकसंख्येत सर्वांत जास्त प्रमाण शेतकऱ्यांचे आहे; ह्या मातीमधून इतिहासाने कामकरी लोक, शहरनिवासी, व्यापारी, पाद्री, अंमलदार, उमराव, शास्त्रज्ञ आणि कलाकार घडविले आहेत. ज्यांनी सरकारी चर्चवर नियंत्रण राखले होते त्यांच्या व चर्चपासून विभक्त झालेल्या विविध संप्रदायांच्या सतत प्रभावाखाली शेतकऱ्याचे मन सापडलेले होते.

म्हणी आणि वाक्प्रचार ह्यांच्यासारख्या आयत्या बनविलेल्या व ठरीव साचांच्या भाषेत विचार करण्याची शेतकऱ्यांना शतकानुशतके सवय लावण्यात आलेली आहे. ह्यांपैकी बहुतेक म्हणी व वाक्प्रचार म्हणजे दुसरेतिसरे काहीही नसून संकलित स्वरूपातील चर्चेची शिकवण आहे...

...सर्वसाधारणरीत्या कामकरी लोकांनी गोळा केलेला सामाजिक आणि ऐतिहासिक अनुभव संक्षिप्तपणे म्हणी व वाक्प्रचारांमध्ये सामावलेला असतो. मुठीमध्ये बोटे आवळली जातात त्याप्रमाणे घट्ट स्वरूपात शब्द वापरणे शिकण्यासाठी लेखकाला अशा साहित्याची फार गरज असते. तसेच इतरांनी संक्षिप्त बनविलेल्या शब्दांचा विस्तार करण्यासाठीही अशा साहित्याची गरज असते. काळाच्या कार्यांशी विरोधी लपलेला अर्थ उघडकीला आणण्यास अथवा कालबाह्य शब्दांना उघडकीला आणण्यास त्याची मदत होते.

म्हणींपासून मी खूप काही शिकलो. अथवा दुसऱ्या शब्दांमध्ये सांगायचे तर सूत्रांच्या भाषेत विचार करण्यापासून मी खूप काही शिकलो. पुढील प्रसंग मला आठवतो: विनोदाची अत्यंत आवड असलेला माझा मित्र, देवडीवाला याकोव सल्दातोव, एकदा लांब दांड्याची नवी केरसुणी हाती घेऊन रस्ता झाडत होता. याकोवने माझ्याकडे पाहून मजेने डोळा मारला व तो म्हणाला:

"मी काहीही केलं तरी त्यातून कधीही पार पडणार नाही. जेवढं अधिक मी झाडतो, तेवढा जास्त कचरा येत राहतोय."

तो केवळ सत्य सांगत होता ह्याची मला जाणीव झाली. शेजाऱ्यांनी जरी रस्त्याचा काही भाग स्वच्छ राखला असता, तरी वाऱ्याने नजीकच्या रस्त्यांवरची धूळ तेथे आणली असती. शहरातील सगळे रस्ते जरी स्वच्छ ठेवले असते, तरी भोवतालच्या शेतांमधून आणि रस्त्यांवरून अथवा शेजारच्या शहरांमधून धुळीचे लोट आले असते. अर्थात प्रत्येकाने स्वतःच्या घराभोवतालच्या परिसर स्वच्छ राखलाच पाहिजे, पण त्याऐवजी जर सबंध रस्ता, सबंध शहर आणि सबंध जग स्वच्छ राखण्याचा प्रयत्न केला, तर त्या श्रमाच्या अधिक निष्पत्ती लाभतील.

अशाच पद्धतीने म्हण रचता येते. म्हण कशी अस्तित्वात येते त्याचे एक उदाहरण देतो. एके प्रसंगी नीझ्नी-नवगोरदमध्ये कॉलऱ्याची साथ पसरली होती तेव्हा गावातील एका माणसाने अफवा फैलावायला आरंभ केला की, रोगाची बाधा झालेल्यांचा डॉक्टर निकाल लावीत होते. गव्हर्नर बारानोव

यांनी त्या माणसाला अटक करण्याचा हुकूम दिला आणि कॉलऱ्याच्या रोग्यांची शुश्रूषा करण्यासाठी त्याला इस्पितळात धाडले. असे म्हणतात की, त्या अफवावाल्या माणसाने काही काळानंतर स्वत:ला धडा मिळाल्याबद्दल गव्हर्नरचे आभार मानले तेव्हा गव्हर्नरनी उलट टोमणा मारला :

"सत्याचा जेव्हा तुमच्या डोळ्यावर तडाखा बसतो, तेव्हा तुम्ही खोटं बोलायचं थांबवता!"

बारानोव रांगडया प्रवृत्तीचा माणूस होता, पण मूर्ख नव्हता आणि मला वाटते की, अशा गोष्टी बोलण्यास तो चांगला समर्थ होता. शिवाय, हे शब्द कुणीही उच्चारले असले, तरी त्यामुळे फरक काय पडतो?

अशा सजीव विचारांनी मला विचार करण्यास आणि लिहिण्यास मदत केली. देवडीवाल्यांकडून आणि वकीलांकडून, जातीबाहेर गेलेल्या लोकांकडून व सर्व प्रकारच्या आणि परिस्थितींमधल्या लोकांकडून मी ऐकलेल्या विचारांच्या समानार्थी विचार मला पुस्तकांमध्ये आढळले. पण पुस्तकांमध्ये ह्या विचारांना दुसऱ्या शब्दांचे अवगुंठन होते. अशा रीतीने जीवनातील वस्तुस्थिती आणि साहित्य एकमेकांना पूरक ठरतात.

साहित्यिक मंडळी "नमुने" आणि व्यक्तिरेखा कशा निर्माण करतात ह्याबद्दल मी आधीच बोललो आहे, पण तरीही दोन स्वारस्यपूर्ण उदाहरणे देतो.

गोएथेचा 'फाऊस्ट' कलात्मक सृजनाची उत्तम निर्मिती आहे. ही "कल्पित" आणि रचलेली गोष्ट आहे. नेमके सांगायचे तर जीवनातून जे काही मिळाले त्याला तर्काची जोड लावलेली आहे आणि त्याचवेळी विचाराला प्रतिमांमध्ये रूपांतरित केलेले आहे. मी प्रथम 'फाऊस्ट' वाचले तेव्हा मी सुमारे वीस वर्षांचा होतो. काही काळानंतर मला आढळले की, जर्मन गोएथेपूर्वी सुमारे दोनशे वर्षे, ख्रिस्तोफर मार्लो[195] नामक इंग्रजाने फाऊस्ट-विषयी लिहिले होते; 'पान त्वार्दोवस्की' नामक हीन दर्जाची आणि भपकेबाज पोलिश कादंबरी म्हणजे 'फाऊस्ट'चाच एक प्रकार होता आणि पॉल म्युस्से[196] ह्या फ्रेंच लेखकाची «Tean le -Trouveur» ('सुखाचा शोधक') कादंबरीही त्याच विषयावरची होती. व्यक्तिगत सुखासाठी हपापलेला व इतर माणसांवर आणि निसर्गातील रहस्यांवर स्वत:ची सत्ता गाजवू पाहणारा एक माणूस सैतानाला स्वत:चा आत्मा कसा विकून बसला, ह्याबद्दलच्या एका मध्ययुगीन दंतकथेमधून फाऊस्टविषयीची सगळी पुस्तके निर्माण झाल्याचे मला

आढळले. जीवनाची निरीक्षणे आणि हीण धातूंचे सोन्यात रूपांतर करण्याचा व जीवनरस शोधण्याचा प्रयत्न करणाऱ्या किमयागारांचे कार्य, ह्यांच्यामधून ही दंतकथा निर्माण झाली. त्यांच्यात निष्ठावंत स्वप्नाळू आणि झपाटलेली माणसे होती, पण त्याचप्रमाणे भोंदू व ढोंगी लोकांचाही भरणा होता. "सर्वोच्च सत्ता" हस्तगत करण्याच्या ह्या व्यक्तींच्या प्रयत्नांमधील फोल-पणाची टवाळी उडविण्यासाठी मध्ययुगीन डॉक्टर फाऊस्टच्या साहसांची कथा रचण्यात आली. खुद्द सैतानाच्याही ताकदीपलिकडे असलेले सर्वशक्तिमान विज्ञानाचे आणि अमरत्वाचे गुण फाऊस्टला चिकटविण्यात आले.

दु:खी फाऊस्टच्या जोडीने आणखी एक व्यक्ती उदयाला आली. ही व्यक्ती सर्व लोकांना परिचित होती: इटलीमध्ये तिचे नांव पुलचीनेल्लो होते, इंग्लंडात पंच, तुर्कस्तानात कारापेत आणि आपल्या देशात पेत्रूष्का. कठपुत-ळयांच्या खेळातील अजिंक्य नायक. तो नेहमी शिखरावर असतो; पोली-सांवर, पाद्रयांवर, प्रत्यक्ष सैतानावर आणि मृत्यूवरही मात करतो. तो स्वत: अमर आहे. कामकरी लोकांनी ह्या भाबड्या आणि वेड्याबागड्या व्यक्तिरेखेत स्वत:चे रूप पाहिले; सरतेशेवटी केवळ आपणच सर्व आणि प्रत्येक गोष्टीवर मात करू शकू हा त्यांचा विश्वास त्यांनी पेत्रूष्कामध्ये पाहिला.

मी जे आधीच म्हटले आहे ते ह्या दोन उदाहरणांनी परत एकदा सिद्ध होते: "निनांवी" रचना, म्हणजे ज्यांच्याबद्दल आपल्याला काहीही माहिती नाही अशा लोकांनी * निर्मिलेले साहित्यही संक्षेपाचे नियम पाळते, कोणत्याही सामाजिक गटाच्या विशिष्ट स्वभावविशेषांचे आणि वैशिष्टयांचे नियम पाळते, त्याचप्रमाणे त्या गटाच्या प्रातिनिधिक व्यक्तीमध्ये ही वैशिष्टये प्रतिरूपाने दाखविण्याच्या नियमांनाही पाळते. कलाकार जेव्हा हे नियम प्रामाणिकपणे पाळतो, तेव्हा "नमुने" निर्माण करण्यास तो समर्थ ठरतो. अशा पद्धतीने शार्ल दे कोस्तर [197] यांनी 'थील उलेनस्पीगेल' निर्माण केला; रोमाँ रोल्लाँ यांनी बर्गंडीचा 'कोलास ब्र्यूनोन' निर्माण केला व आल्फोन्स दॉदे यांनी 'तार्तारीन द प्रोवेन्साल' निर्माण केला. सूक्ष्म अवलोकन, साधर्म्ये आणि भिन्नता शोधण्याची क्षमता व सतत आणि अखंड अभ्यास, ,यांच्या साहाय्यानेच

---

* अशा लेखनाला "लोक-निर्मिती" म्हणण्याचा आपल्याला अधिकार आहे, कारण सणांच्या दिवशी रंगमंचावर सादर करण्यासाठी कारागीर संघांमध्ये बहुधा त्यांची रचना झाली. – लेखकाची टीप.

केवळ अशी "नमुनेदार" माणसे रंगविता येतात. जेथे अचूक ज्ञान नसते, तेथे तर्काचा वापर करावा लागतो आणि दहापैकी नऊ तर्क हमखास चुकीचे ठरतात.

अब्लोमोव, रूदीन, ऱ्याझानोव* ह्यांच्या तोडीचे नमुने आणि व्यक्तिरेखा निर्माण करण्यास मी समर्थ आहे असे मला स्वतःला वाटत नाही. तरीसुद्धा, 'फोमा गोर्देयेव' लिहिताना, स्वतःच्या बापजाद्यांच्या आयुष्यांशी आणि कामाशी सूर जमवू न शकणाऱ्या, तशा प्रकारच्या एकसूरी व "अत्यंत नीरस" जीवनात फारसा अर्थ नाही अशी अंधुक भावना मनात बाळगणाऱ्या, व्यापारी घरांमधील अनेक कुलदीपकांना पाहणे मला आवश्यक ठरले होते. अपमानास्पद अशा कंटाळवाण्या आयुष्याला जगण्याची शिक्षा मिळालेल्या फोमा गोर्देयेवसारख्या विचार करण्यास आरंभ करणाऱ्या लोकांमधून एका बाजूला दारूबाज, गुंड, दुराचारी निर्माण झाले; तर दुसऱ्या बाजूला नियमाला अपवाद ठरणारे, लेनिनवादी 'ईस्क्रा'च्या प्रकाशनाला अर्थभांडवल पुरविणारे श्रीमंत साव्वा मोरोझोवसारखे लोक निर्माण झाले. पेर्म येथील जहाजमालक नि. मेश्कोव यांनी सामाजिक-क्रांतिकारकांना आर्थिक पाठबळ दिले. कालूगाचे कारखानदार गोन्चारोव, मॉस्कोतील नि. श्मिद्त आणि इतर अनेक असे लोक निर्माण झाले. अशाच लोकांमधून चेरेपोवेत्सचे महापौर मिल्यूतिनसारखे सांस्कृतिक पुढारी उदयाला आले. विज्ञान, कला आणि इतर सांस्कृतिक कार्यांची जोपासना करण्यात खूप कौशल्य आणि निष्ठा व्यक्त करणारे अनेक व्यापारी मॉस्कोतून व इतर प्रांतांमधून उदयाला आले. फोमाचा धर्मपिता मायाकिनसुद्धा छोटचा वैशिष्टचांमधून, "म्हणीं"मधून घडला होता. मला वाटते त्यात मी सूक्ष्म तारतम्य दाखविले आहे: १९०५ नंतर, कामगारांच्या आणि शेतकऱ्यांच्या मृत देहांनी जेव्हा मायाकिनांसारख्या लोकांचा सत्तेकडे जाणारा मार्ग तयार केला, तेव्हा ह्या लोकांनी कामगारवर्गविरोधी संघर्षात खूप महत्त्वाची भूमिका बजाविली आणि आजही स्वतःच्या जुन्या घरटचांकडे परतण्याचे स्वप्न हे लोक पहात आहेत.

"अगदी नीच आणि बहिष्कृत" लोकांबद्दल मी का लिहिले असे तरुण मंडळी मला विचारीत आहेत.

---

*'कठीण काळ' मध्ये राझनोचिनेत्स बुद्धिजीवीचा प्रकार म्हणून स्लेप्त्सोवनी उत्तम रेखाटन केले आहे.—लेखकाची टीप.

कारण अगदी सोपे होते. अगदी क्षुद्र प्रवृत्तीच्या लोकांमध्ये मी रहात होतो व माझ्या भोवतालची माणसे दुसऱ्यांचे रक्त शोषण्याच्या वेडाने झपाटलेली होती; त्या रक्ताचे कोपेकमध्ये आणि कोपेकचे रूबलमध्ये रूपांतर करण्यात गुंतलेली होती. पाच कोपेकच्या तांब्याच्या नाण्यांप्रमाणे ते नीरस लोक डासां-चिलटांप्रमाणे रहात होते व माझ्या १९ वर्षांच्या पत्रलेखकाप्रमाणे त्या लोकांबद्दल माझ्या देहाचा इंच न् इंच निकोप तिरस्कार करीत होता.

गुंड आणि भटके मला सर्वसामान्य थरातील लोकांपेक्षा वेगळे भासत. त्यांनी जात गमावल्यामुळे आणि त्यांच्या वर्गातून त्यांची हकालपट्टी झाल्यामुळे त्यांच्या पूर्वीच्या पार्श्वभूमीची खास वैशिष्टचे त्यांच्यामधून नाहीशी झालेली असत व म्हणून ते सर्वसामान्य माणसांपेक्षा आगळे ठरत.

नीझ्नी-नवगोरदमधील तथाकथित 'मिल्योन्कात' नीच आणि बहिष्कृतांमध्ये माजी सुखवस्तु नगरवासी गुण्यागोविंदाने रहात असत. गरीब स्वभावाचा स्वप्नाळू माझा – मामेभाऊ अलेक्सान्दर कशिरीन; इटालियन चित्रकार तोन्तीनी; ग्लादकोव नांवाचा माजी जिम्नाशियम शिक्षक; एक बॅरन ब.; दरोडेखोरीबद्दल शिक्षा भोगलेला एके काळचा साहाय्यक पोलीस इन्स्पेक्टर आणि ख्यातनाम चोर "नीकोल्का जनरल."

समान स्वभावाच्या सुमारे वीस लोकांचा चित्रविचित्र जमाव कझानमधील 'स्तेक्ल्यान्नी झावोद'मध्ये रहात होता. त्यांच्यात "विद्यार्थी" रादलोव अथवा रादूनोव होता; दहा वर्षे सक्तमजुरी भोगलेला, चिंध्या आणि हाडे गोळा करणारा एक वयस्क माणूस होता; गव्हर्नर आन्द्रीयेवस्कींचा एके काळचा नोकर वास्का ग्राचिक होता; एका पाद्र्याचा मुलगा व व्यवसायाने इंजिन-ड्रायव्हर असलेला ब्येलोरशियन रोदझियेविच होता; गुरांचा सर्जन दावीदोव होता. त्यांच्यापैकी बहुतेक लोक आजारी होते व त्यांना अपायकारक होईल एवढे मद्यसेवन करीत होते. ते मारामाऱ्यासुद्धा करीत. पण तरीही त्यांच्यात बांधिलकीची आणि परस्परांना मदत करण्याची भावना होती. जी काही कमाई अथवा चोरी ते करीत, ती सामुदायिक भोजनावर व मद्यपानावर खर्च करीत. "सर्वसामान्य लोकां"पेक्षा जरी त्यांचे जीवन अधिक खडतर होते, तरी ही माणसे सर्वसामान्यांपेक्षा अधिक श्रेष्ठ वाटत, कारण त्यांच्यात अतिलोभीपणा नव्हता. एकमेकांना ते पायदळी तुडवीत नव्हते आणि पैसे बाजूला काढून ठेवीत नव्हते. त्यांच्यातील काहीजण कदाचित थोडी बचत करीत असावेत, कारण त्यांच्यात "काटकसरीचे" आणि "सुव्यवस्थित"

जीवनाच्या आसक्तीचे काही अवशेष अद्याप शिल्लक होते. त्यांच्या काही बचती असाव्यात, कारण हिकमती आणि यशस्वी चोर वास्का ग्राचिक अनेकदा आपली लूट "खजिनदार" रोदझियेविचकडे सुरक्षित ठेवण्यासाठी आणून द्यायचा. रोदझियेविच ह्या नीच-बहिष्कृत समाजाचा जणू सर-व्यवस्थापक होता. सर्वांचा त्याच्यावर विश्वास होता आणि आश्चर्य म्हणजे तो अत्यंत सौम्य आणि दुबळ्या मनाचा माणूस होता.

अनेक प्रसंगांची आठवण मी सांगू शकेन: एके प्रसंगी बांधिलकीमधील एकाने गुडघ्यापर्यंत उंच बुटांची एक जोडी चोरून आणली होती. सर्वांच्या संमतीने असे ठरविण्यात आले की, बूट विकून ते पैसे दारूवर खर्च करायचे. पण त्यावेळी चौकीवर मार खाल्ल्यामुळे आजारी असलेल्या रोदझियेविचने म्हटले की, फक्त बुटांचा वरचा भाग विकावा आणि उरला भाग "विद्यार्थ्या"ला द्यावा, कारण त्याचे बूट निकामी झाले होते. तो म्हणाला की, "विद्यार्थी थंडीमुळे मरेल आणि तो एक भला माणूस आहे."

बुटांपासून वरचे भाग अलग करण्यात आले तेव्हा माजी कैद्याने सुचविले की, त्यांची पादत्राणे बनवावीत: एक जोडी त्याच्यासाठी आणि दुसरी रोदझियेविचसाठी. अशा रीतीने त्या चोरलेल्या बुटांचा दारू खरीदण्यासाठी शेवटी वापर झालाच नाही. ग्राचिक म्हणाला की, त्या सर्व लोकांबद्दल त्याच्या मनात मित्रभावना होती आणि "शिकलेल्या माणसां"ची त्याला आवड होती, म्हणून तो त्यांना मदत करीत होता.

"एखाद्या सुंदर बाईपेक्षा सुशिक्षित माणूस मला जास्त आवडतो," तो मला म्हणाला होता. काळ्या केसांचा, रेखीव नाक-डोळ्यांचा व प्रसन्न स्मित करणारा तो माणूस अगदी विक्षिप्त होता. एरवी उदास आणि मितभाषी असायचा, पण काहीवेळा मात्र बेबंद आणि बेफाम उत्साहाचे त्याला झटके यायचे. अशा वेळी तो गायचा, नाचायचा, स्वत:च्या पराक्रमांच्या फुशारक्या मारायचा व जणू काही कधीही न परतण्यासाठी लढाईवर जायला निघाल्याप्रमाणे सर्वांना मिठ्या मारायचा. एका दारूच्या गुत्त्याखाली तळघरात राहणाऱ्या आठ भिकाऱ्यांना तो मदत करीत होता. ते सर्व जराजर्जर म्हातारे स्त्री-पुरुष होते, पण त्यांच्यात एक वर्षाचे तान्हे बाळ असलेली एक वेडी तरुणी होती. तो चोर कसा बनला त्याची हकीकत अशी: गव्हर्नरच्या पदरी नोकर म्हणून काम करीत असताना एकदा त्याने सबंध रात्र आपल्या प्रेयसीच्या संगतीत घालविली. सकाळी झिंगल्या अवस्थेत घरी परतत असताना

त्याने एका गवळणीकडून जबरदस्तीने दुधाची चरवी घेतली व चरवीतील दूध घटाघटा पिऊन टाकले. त्याला पकडण्यात आले तेव्हा त्याने प्रतिकार केला आणि न्यायाधीशाने त्याला कारागृहात धाडले. उदार मनाचे म्हणून जरी न्यायाधीशांची ख्याती होती, तरी आपली कर्तव्ये मात्र ते अत्यंत कठोरपणे बजावीत. तुरुंगातून सुटल्यानंतर वास्काने न्यायाधीशांच्या अभ्यासिकेत चोरून प्रवेश केला, त्यांचे सर्व कागदपत्र फाडून टाकले, त्यांचे गजराचे घड्याळ आणि दुर्बीण चोरली व परत एकदा तो तुरुंगात दाखल झाला. घरफोडीच्या एका अयशस्वी प्रयत्नानंतर, कुणा रात्रीच्या पहारेकऱ्यापासून तो पळून जात होता, तेव्हा त्याच्याशी माझी ओळख झाली. त्याच्या पाठलाग करणाऱ्यांपैकी एकाला मी पाडले, पळून जायला वास्काला मदत केली व त्याच्याबरोबर मीही पसार झालो.

ह्या बहिष्कृतांमध्ये विचित्र माणसे होती व त्यांच्यामधील बरेच काही मला समजू शकत नव्हते. त्यांचा कैवार घ्यावा असे मला वाटण्याचे कारण म्हणजे आयुष्याबद्दल त्यांच्या तक्रारी नव्हत्या. सुखवस्तूंच्या सोप्या आयुष्याबद्दल त्यांना हेवा वाटत नव्हता. आंबट द्राक्षांचा किंचितही दृष्टिकोन न बाळगता ते त्या आयुष्याबद्दल कुचेष्टेने आणि उपहासाने बोलत. उलट त्या विषयात अभिमानाची भावना त्यांच्या ठायी होती. जणू त्यांना जाणीव झाली होती की, जरी त्यांची आयुष्ये दारिद्र्याने गांजलेली होती, तरी सोपे जीवन जगणाऱ्यांपेक्षा ते स्वतः खूप चांगले होते.

'नोच आणि बहिष्कृत'मध्ये ज्याचे मी वर्णन केले आहे तो गरीबखान्याचा राखणदार कूवाल्दा ह्या माणसाला मी प्रथम कलोन्तायेव यांच्या न्यायालयात पाहिले. न्यायाधीशांच्या प्रश्नांना ह्या फाटक्या कपड्यांमधील माणसाने ज्या थाटात उत्तरे दिली आणि पोलीसाने, फिर्यादी वकीलाने व गुत्त्याचा मालक फिर्यादी कूवाल्दा ह्यांनी सादर केलेल्या पुराव्याला तोंड देताना त्याने जो तिरस्कार व्यक्त केला, तो पाहून मी चकित झालो होतो. अदेस्सामधील एका भटक्याने मस्करीने सांगितलेला व 'चेल्काश'मध्ये मी वर्णन केलेला प्रसंगही मला असाच थक्क करून गेला होता. निकोलायेव शहरी एका इस्पितळात आमची भेट झाली होती. त्याच्या सुंदर शुभ्र दातांचे दर्शन घडविणाऱ्या त्याच्या स्मिताचे व काही काम करण्यासाठी त्याने पदरी ठेवलेल्या एका तरुणाने त्याला कसे फसविले त्या हकीकतीच्या शेवटाचे मला

सुखद स्मरण आहे : "तर मी त्याला पैशासकट जाऊ दिलं ; जा मूर्खा, निघून जा आणि त्याचं काय करावंसं वाटेल ते कर."

द्यूमाँच्या "उदात्त" नायकांची त्याने मला आठवण करून दिली. इस्पितळातून बाहेर पडल्यानंतर कलिंगडांनी माझी सरबराई करीत त्याने मला विचारले होते : "एखाद्या फायदेशीर उद्योगात माझ्याबरोबर सामील होशील काय? मला वाटतं, त्या कामाला तू लायक पोरगा आहेस."

ती बाब मनाला खूष करणारी होती, पण चोरटी वाहतूक व चोऱ्या यांच्यापेक्षा अधिक हितकर गोष्टी असल्याचे एव्हाना मला समजून चुकले होते.

बहिष्कृत आणि भटक्यांबद्दल मला ओढा का वाटत होता, "सर्वसामान्यांपेक्षा वेगळ्या" आणि नीरस क्षुद्रप्रवृत्ती नसलेल्या लोकांचे वर्णन करण्याची तीव्र इच्छा मला का होत होती, त्याचा हा खुलासा आहे. परकी साहित्याचाही माझ्यावर प्रभाव होता. सर्वप्रथम फ्रेंच साहित्याचा माझ्यावर प्रभाव होता. रशियन साहित्यापेक्षा मला ते अधिक ठाशीव आणि रंगीबेरंगी भासायचे. पण मुख्य कारण मात्र होते "अत्यंत नीरस आयुष्या"ला कल्पनाशक्तीमार्फत सजग करण्याची माझी इच्छा. माझ्या पंधरा वर्षांच्या पत्रलेखिकेने लिहिली आहे तशी.

आधीच मी म्हटल्याप्रमाणे ह्या इच्छेला "रोमांचवाद" असे म्हणतात. काही टीकाकारांच्या मते माझा रोमांचवाद म्हणजे माझ्या तत्त्वज्ञानामधील कल्पनावादाचे प्रतिबिंब. ते मूल्यमापन चुकीचे आहे असे मला वाटते.

तत्त्वज्ञानविषयक कल्पनावाद शिकवितो की, मानव, प्राणी आणि सर्व मानवनिर्मित गोष्टी "कल्पनांच्या" प्रभावाखाली असतात. मानवाने निर्माण केलेल्या प्रत्येक गोष्टीचे अत्यंत परिपूर्ण नमुने आहेत, त्या नमुन्यांवर त्याचे कार्य पूर्णतः अवलंबून आहे आणि "कल्पनां"ची नक्कल करणे हेच त्याचे काम आहे. त्या कल्पनांचे अस्तित्व त्याला काहीशा संदिग्ध स्वरूपात जाणवते असे म्हणतात. ह्या दृष्टिकोनातून पाहता आपल्यापेक्षा वर कुठेतरी शृंखलांची आणि अंतर्गत ज्वलनाच्या इंजिनाची कल्पना अस्तित्वात आहे ; क्षयाच्या सूक्ष्म जंतूची आणि आधुनिक बंदुकीची कल्पना अस्तित्वात आहे ; क्षुद्रप्रवृत्ती, बेडूक, घूस यांच्याविषयीची आणि सर्वसाधारणपणे पृथ्वीवर अस्तित्वात असलेल्या व माणसाने निर्माण केलेल्या प्रत्येक गोष्टीविषयीची कल्पना अस्तित्वात आहे. ह्यावरून अगदी स्पष्टपणे आणि अटळरीत्या मान्य करावे लागते की,

सर्व कल्पनांचा निर्माता अस्तित्वात आहे व ह्या निर्मात्याने काही कारणास्तव गरुड आणि ऊ, हत्ती आणि बेडूक ह्यांना निर्माण केले.

माणसाच्या बाहेर कोणतीही कल्पना अस्तित्वात नाही असे माझे मत आहे. सर्व गोष्टींचा आणि सर्व कल्पनांचा केवळ माणूसच निर्माता आहे, असे माझे मत आहे. तोच किमयागार आहे आणि सर्व नैसर्गिक शक्तींचा तोच भावी मालक आहे. आपल्या जगात जे काही सर्वांत सुंदर आहे ते माणसाच्या श्रमांमधून निर्माण झाले आहे, त्याच्या चतुर हातांमधून निर्माण झाले आहे. श्रमाच्या प्रक्रियेमधून आपले सर्व विचार आणि आपल्या सर्व कल्पना निर्माण होतात. कला, विज्ञान आणि तंत्रशास्त्र ह्यांचा इतिहास ह्या गोष्टीची आपल्याला खात्री पटवून देतो. वस्तुस्थितीमधून विचार निर्माण होतो. मानवाला मी "वंदन करतो," कारण त्याच्या तर्कशक्तीच्या, त्याच्या कल्पनाशक्तीच्या आणि त्याच्या अनुमानाच्या मूर्त रूपाविना आपल्या जगात मला दुसरे काहीही दिसत नाही. "छायाचित्रकला" हा जसा माणसाचा एक शोध आहे, तसाच देव हासुद्धा एक शोध. फरक एवढाच की, जे प्रत्यक्षात आहे त्याची कॅमेरा नोंद करतो, तर देव म्हणजे माणसाने स्वतःच्या इच्छांना मूर्त रूप देणाऱ्या व्यक्तीचे काढलेले छायाचित्र. त्याच्या कल्पनेतील ही व्यक्ती सर्वसाक्षी, सर्वशक्तिमान आणि पूर्ण न्यायी वागण्यास समर्थ आहे.

"पावित्र्या"बद्दल बोलण्याची जर गरजच असेल, तर माझ्या दृष्टीने एकमेव पवित्र गोष्ट म्हणजे माणसाचे स्वतःविषयीचे असमाधान, तो आहे त्यापेक्षा अधिक चांगला बनण्याची त्याची धडपड. जीवनात गोंधळ माजविणाऱ्या सर्व घाणीविषयी आणि त्याने स्वतः निर्माण केलेल्या घाणीविषयी त्याला वाटणारा तिरस्कारही मला पवित्र वाटतो, मत्सर, लोभ, गुन्हा, रोगराई, युद्धे आणि जगातील लोकांमधील सर्व वैमनस्य, ह्यांना विराम देण्याची त्याची इच्छा मला पवित्र वाटते. त्याचे श्रम मला पवित्र वाटतात.

१९२८

# संस्कृती

कामगारवर्गाने संस्कृतीसंबंधी पुढील दृष्टिकोन स्वीकारणे इष्ट ठरेल असे मला वाटते.

ज्या सर्व गोष्टींना संस्कृती म्हटले जाते त्या आत्मरक्षणाच्या अंतःप्रेरणेतून उद्भवल्या आहेत. सावत्र मातेसमान असलेल्या निसर्गाविरुद्ध संघर्ष करताना मानवाने ह्या गोष्टींना स्वतःच्या श्रमांमधून निर्माण केले आहे. स्वतःच्या इच्छेच्या आणि मनाच्या बळावर "दुसरा निसर्ग" निर्माण करण्याच्या मानवाच्या प्रयत्नांची फलश्रुती म्हणजे संस्कृती.

पहिला निसर्ग म्हणजे असंघटित, प्राथमिक शक्तींचा गोंधळ. भूकंप, महापूर, वादळे, दुष्काळ, असह्य थंडी अथवा उष्णता ह्या त्याच्या करामती. रोगट अतिसूक्ष्म जीव निर्माण करण्यात – मानवाच्या रक्तामध्ये विषमज्वर, ज्वर व तत्सम विषांना भिनवणारे डास, माशा, उवा ह्यांसारखे अत्यंत अपायकारक कीटक, सूक्ष्म जंतू – पहिला निसर्ग आपले सामर्थ्य खर्च करतो. अपायकारक अथवा निरुपयोगी अशा असंख्य वनस्पतींना आणि गवतांना तो निर्माण करतो. माणसाला खाऊ घालणाऱ्या धान्यांच्या आणि फळांच्या पैदाशीसाठी आवश्यक असणाऱ्या आरोग्यदायी जीवनरसांना परपुष्ट बांडगुळांच्या पुनरुत्पादनात वाया घालवतो. एखाद्याला असे वाटेल की, माणसासाठी उपयुक्त ठरणारी आणि आता आपण ज्यांच्यावर उदरनिर्वाह करतो ती धान्ये निसर्गाने कधी निर्माणच केली नाहीत. प्रदीर्घ यातना आणि अनेक लोकांचे मृत्यू सोसून आरंभीची माणसे हळूहळू खाद्यपदार्थांना सरावत होती. युरोपीय लोकांनी प्रथम बटाटे खायला सुरुवात केली तेव्हा त्यांना गंभीर आजार सोसावे लागले होते, ही वस्तुस्थिती आहे. आणि असे केवळ बटाट्यांबाबतच घडले नाही. मानवाला अपायकारक अथवा निरुपयोगी अशा परपुष्ट जीवांच्या घाणीबरोबरच निसर्गाने मानवालाही निर्माण केले, पण इतर पशूंप्रमाणे त्यालाही पशू बनविले.

हा पशू शारीरिक वेदना सहन करण्याबाबत जरा अधिक संवेदनाक्षम ठरला व म्हणून इतर सर्व प्राण्यांपेक्षा आत्मरक्षणाची क्षमता त्याने अधिक

लौकर, तीव्रतेने आणि विविधपणे आत्मसात केली. आत्मरक्षणाच्या अंतः-प्रेरणेने त्याला वनस्पतींमधून आणि गवतांमधून उपयुक्त धान्ये, फळे व मुळ्या शोधायला शिकविले; जनावरे पाळायला, जनावरांच्या कातड्यांची वस्त्रे ल्यायला, गुंफांमध्ये रहायला शिकविले; शिकारीची अस्त्रे शोधायला, आत्मरक्षणासाठी शस्त्रे बनवायला आणि श्रम हलके करण्यासाठी दगडी उपकरणे बनवायला शिकविले.

निरीक्षण आणि अभ्यास यांच्यामधून साध्य झालेल्या छोट्या आणि अगदी साध्या सत्यांमधून सर्व व प्रत्येक शहाणपण तयार झाले आहे. पण जीवनाच्या प्रखर संघर्षात आणि जीवनाच्या धास्तीमुळे, "स्वतःच्या व्यक्तिमत्वासाठी," माणसाच्या आत्मरक्षणाच्या अंतःप्रेरणेने त्याला "लबाडीचा तात्त्विकपणा" करायला शिकविले. म्हणून लोकांनी धूर्त शब्दांचा कचरा आणि धूळ यांची उधळण करून साध्या सत्याचा प्रकाश मंदावून टाकला. त्यामुळे सत्यावरील अडथळा दूर करण्याची, सर्व सत्ये आणि प्रत्येक सत्य कसे उदयाला आले ह्याची आठवण करून देण्याची, आवश्यकता निर्माण होते.

मानवी संस्कृती जीवशास्त्रीय परिस्थिती आहे. माणसाच्या जीवनाच्या इच्छेवर – वनस्पती, कीटक, पक्षी आणि प्राणी अशा सर्व सजीवांचे वैशिष्टय असलेली आंधळी इच्छा – ती व्यक्त होते, जोपासली जाते आणि विचार करते. इतर प्राण्यांपेक्षा आपण अधिक दुबळे आहोत असे माणसाच्या ज्या क्षणी लक्षात आले, त्या क्षणापासून त्याने स्वतःची संस्कृती निर्माण करण्यास आरंभ केला. ह्या दुबळेपणाच्या जाणीवेपायी त्याची आत्मरक्षणाची अंतः-प्रेरणा अधिक वेगाने व यशस्वीरीत्या विकसित झाली. आत्मरक्षणाच्या अंतःप्रेरणेच्या आधारावरच अत्यंत मौल्यवान अशी मानवी क्षमता – निरीक्ष-णाची क्षमता – विकसित झाली आहे. मुंगी, कावळा, वाघ ह्यांनाही अशी क्षमता आहे; पण मानवाने निरीक्षण आणि तुलना करता करता त्या क्षमतेचा आणखी विकास घडविला. जीवनाच्या सर्व अंगांचे ज्ञान करून घेण्याच्या प्रयत्नांमध्ये तिचे रूपांतर केले. नंतर त्या ज्ञानाने ठोस शास्त्रांची शिखरे गाठली आणि सध्या हळूहळू त्याचे अंतःप्रेरणेमध्ये रूपांतर होत आहे. माणसाच्या स्पष्टोच्चारी बोलण्याप्रमाणे अथवा हसण्याप्रमाणे त्याच्या जीवशा-स्त्रीय जैविक वैशिष्टयात ज्ञानाचे रूपांतर घडत आहे.

पूर्वी म्हणत असतः "प्रेम आणि भूक जगावर सत्ता गाजवतात." "प्रेम" ह्याचा अर्थ होता प्रजोत्पादनाची धडपड; "भूक" म्हणजे शारीरिक भूक,

पण आजकाल आपल्याला तिसऱ्या अंत:प्रेरणेबाबत बोलण्याचा हक्क आहे — अभिज्ञेची अंत:प्रेरणा, बौद्धिक भूक.

आशयानुसार आणि निष्पत्तींनुसार निरीक्षण करणे हे माणसाचे सर्वप्रमुख अस्त्र. निसर्गाविरोधी संघर्षातील आत्मरक्षणाचा खात्रीशीर उपाय. त्याच्या सांस्कृतिक वाढीचा मुख्य पाया.

अग्नी ऊब देतो त्याचा उपयोग समजणे सोपे होते. पण अग्नी मिळवायचा कसा हे शिकणे त्याहून खूप अवघड. लाकडावर लाकूड घासूनसुद्धा ऊब मिळते हे ध्यानात आल्यावर अग्नी प्राप्त करायला माणूस शिकला. तेव्हा घर्षणामधून अग्नी मिळविण्यास त्याने आरंभ केला. काडी पेटवण्यासाठी अगदी आजपर्यंत तो ह्या रीतीचा वापर करीत आहे. दिव्याचा, त्यावेळी तेलाच्या दिव्याचा, शोध कसा लागला? ठार मारलेल्या जनावराची कातडी माणूस सोलून काढीत होता तेव्हा अंधार पडला. मांसात जेथे खूप चरबी होती तेथे त्याने लाकडाचा एक ढलपा खुपसला. नंतर त्याच्या ध्यानात आले की, उबदार, वितळलेली चरबी लाकडाने शोषून घेतल्यानंतर ते अधिक तेजस्वीपणे आणि मंदपणे जळते. हजारो वर्षेपर्यंत माणूस असा दिवा वापरीत होता आणि आता विजेचा वापर चालू असतानाही ह्या दिव्याचा तो उपयोग करतो.

पाण्यामध्ये फळाची कठीण कवची अथवा अंड्याचे टरफल तरंगताना पाहून पाहून माणसाने होडीचा शोध लावला. पुढे त्याने पाण्यावर संचार करणाऱ्या लोखंड आणि पोलादाच्या महाप्रचंड बोटींचा वापर सुरू केला. वादळात उन्मळून पडणाऱ्या झाडांच्या मुळांबरोबर मातीची ढेकळे आणि दगडही उखडले जातात हे पाहून त्याला तरफेचा अर्थ समजला. तरफ म्हणजे भावी यंत्रांचा आधार. कोळी जाळे विणताना पाहून माणूस विणकाम शिकला. शक्यता आहे की, काही पक्षी पानांना शिवून घरटी बांधतात ह्याचे निरीक्षण केल्यानंतर, थंडी निवारण्यासाठी प्राण्यांच्या कातड्यांची वस्त्रे शिवायला माणूस शिकला. प्रत्येक गोष्टीचा अशा पद्धतीने शोध लावून आज माणूस असा बलाढ्य शस्त्रसज्ज बनला आहे.

विज्ञान म्हणजे संस्कृतीचा पाया; "दुसरा निसर्ग" निर्माण करणारी मुख्य शक्ती — म्हणजे संस्कृती.

माझ्या मते धर्म आणि तार्किक तत्त्वज्ञान कलेच्या मालकीची असावीत; स्वत:च्या अनुभव, भावना आणि स्वप्नांना प्रतिमारूप देण्याच्या, स्वत:च्या

ठशांना विचारांमध्ये सूत्रबद्ध करण्याच्या माणसाच्या क्षमतेच्या मालकीची असावीत. स्वतःच्या सर्वोत्तम आकांक्षा, सर्वशक्तिमानतेची आणि सर्वज्ञतेची स्वतःची स्वप्ने, विरोधी नैसर्गिक पंचमहाभूतांवर मात करण्याचे स्वतःचे प्रयत्न – अशा सर्व गोष्टींना माणसाने देवामध्ये एकवटले. संस्कृतीच्या प्रभूंच्या प्रतिमांमध्ये आदिमानवांनी आपले देव निर्माण केले होते, ह्या विधानाला आपल्यापाशी भरपूर आधार आहेत: ओहार – व्हुल्कन, तोर, गृहिणी – गेबा, फ्रेया, शिकारी, खलाशी इ.

मानवी बुद्धी, कल्पना आणि निर्धार ह्यांच्या शक्तींनी जगातील प्रत्येक गोष्ट निर्माण केली आहे व संस्कृती निर्माण करणाऱ्या दुसऱ्या इतर शक्ती नाहीत, ही मनोधारणा कामगारवर्गाला अत्यंत निकटची आणि आकलनीय वाटली पाहिजे.

भाजलेल्या मातीच्या खरबरीत तुकड्यांमधून – विटांमधून – भव्य इमारतींची, "संस्कृतीच्या प्रासादांची," शहरांची कामगार उभारणी करतो. "पहिल्या निसर्गात" कधीही अस्तित्वात नसलेली प्रत्येक गोष्ट तो निर्माण करतो – घड्याळे, रेल्वे पूल, शल्यविशारदाची उपकरणे, अंतर्गत ज्वलनाची इंजिने, छपाईयंत्रे इ. गोष्टी कच्च्या धातूच्या आकारहीन तुकड्यांमधून तो निर्माण करतो. स्वतःच्या बुद्धीच्या जोरावर लोखंडाला आणि पोलादाला आत्मा प्राप्त करून देतो.

"पहिल्या निसर्गा" मध्ये अस्तित्वात असलेल्या प्रत्येक गोष्टीचे निरीक्षण आणि अभ्यास करून, पहिल्याच्या शक्तींच्या जोरावर दुसरा निसर्ग निर्माण करण्यास शास्त्रज्ञ माणसाला शिकवितो. माणसाच्या आरोग्याची तो काळजी घेतो, त्याची आयुर्मर्यादा वाढवायचा प्रयत्न करतो. माणसांच्या अंतरंगांच्या जगाचे निरीक्षण करून, त्यांच्या मनोरचनांचा अभ्यास करून, कलाकार माणसाला त्याचे भव्यपण आणि त्याची क्षुद्रता दाखवितो. माणसाच्या बुद्धीची ताकद आणि त्याच्यातील पाशवी अंतःप्रेरणांची शक्ती यांचे दर्शन घडवितो.

तीन माणसे संस्कृती घडवितात: शास्त्रज्ञ, कलाकार आणि कामगार. आपल्या सोविएत पुरोगामी कामकरी वर्गाने जाणून घेतले पाहिजे की, कोणतेही सांस्कृतिक महत्त्व नसलेले असे श्रम अस्तित्वात नाहीत; श्रमांबद्दल जेवढे अधिक प्रेम, तेवढी संस्कृती अधिक उच्च; जर विज्ञान, कला, श्रम ह्यांचे निर्णायक महत्त्व कामगारवर्गाला चांगले समजले, तर जुन्या जगावर तो संपूर्ण विजय अधिक लौकर मिळवू शकेल.

मला वाटते की, संस्कृतीकडील अशा दृष्टिकोनाच्या तळाशी नवी नीतिमत्ता सामावली आहे. कामगारामध्ये जुन्या जगाचा लाजिरवाणा वारसा म्हणून वास करणाऱ्या प्रत्येक गोष्टीविरुद्ध चिकाटीने लढायला ह्या नव्या नीतिमत्तेने कामगाराला शस्त्रसज्ज केले पाहिजे. आळशीपणा, मद्यपान, निष्ठुरता ह्यांच्याविरुद्ध लढायला शस्त्रसज्ज केले पाहिजे; त्याच्या वर्गाच्या थोर, शौर्यशाली कार्यांशी विसंगत अशा रीतीने क्षुद्रप्रवृत्तीप्रमाणे निवांत बस्तान बसविण्याच्या त्याच्या इच्छेविरुद्ध लढायला त्याला शस्त्रसज्ज केले पाहिजे.

१९२८

# नवजात साहित्य आणि त्याची कार्ये[199]

मूर्मान्स्कमध्ये कुणीतरी मला म्हणाले : "इथं जॅक लंडन वाचायला फार छान वाटतं." ह्या शब्दांनी अगदी योग्य गोष्ट व्यक्त केली आहे. हिवाळ्यात प्रदीर्घ ध्रुवीय रात्री लोकांना जेथे दाबून टाकू पाहतात अशा त्या आर्क्टिक महासागराच्या कठोर किनारी माणसाची जीवनाकांक्षा कमालीची ताणली जाते आणि जॅक लंडन असा एक लेखक होता, ज्याला अशा सृजनशील निर्धारशक्तीची गहिरी अंतर्दृष्टी व तीव्र जाणीव होती. ठाम निर्धारी माणसांच्या व्यक्तिरेखा रंगविण्यात त्यांची हातोटी होती.

सोविएत वास्तवता अशी आहे की, केवळ मूर्मान्स्कमध्येच नव्हे तर देशात सगळीकडे "नव्या जगाच्या" प्रत्येक उभारणीकाराकडून प्रत्येक नस, सर्व क्षमता कमाल मर्यादेपर्यंत ताणणे आवश्यक आहे. ठाम निर्धाराची आणि उल्हसित वृत्तीची ही गरज आपले नवजात साहित्य कोणत्या मर्यादेपर्यंत पूर्ण करू शकते? मला वाटते की, सद्य:कालीन साहित्यातील परिस्थितीचा विचार करणाऱ्या टीकाकारांनी अशा समस्येपासून पुढे जावे : हे अथवा ते पुस्तक सृजनशील सांस्कृतिक-क्रांतिकारक कार्यांच्या इच्छेची जोपासना कोणत्या मर्यादेपर्यंत करू शकेल?

"स्वतंत्र कले"ला उपदेशपर वैशिष्टये चिकटविण्याच्या व अशा रीतीने तिच्या संशयात्मक "स्वातंत्र्या"चा भंग करण्याच्या भीतीपायी हा प्रश्न जाणीवबद्धतेने आणि ठामपणे विचारण्याचे धाडस ना लेखक करतात ना टीकाकार. पण कोणतीही शिकवण न देणारे पुस्तक कधीही अस्तित्वात नव्हते.

जागतिक साहित्याच्या एकूण प्रचंड आकाराचा जर आपण विचार केला, तर आपल्याला मान्य करावे लागेल की, सर्व काळांमधील साहित्यात वास्तवाबाबत टीकात्मक, दोषारोपात्मक आणि नकारात्मक दृष्टिकोनाचे वर्चस्व होते व अलिकडील काळात ते वाढत आहे. ज्यांची पुस्तके विसरली गेली आहेत अशा केवळ क्षुद्र, दुय्यम दर्जाच्या लेखकांनी वास्तवाबाबत समाधान व्यक्त केले होते, त्याच्याशी जुळते घेतले होते, त्याची प्रशंसा केली होती. ज्या

साहित्याला सार्थपणे "महान" म्हणण्यात येते, त्या साहित्याने सामाजिक जीवनपरिस्थितीची स्तुतीपर गाणी कधीही गायलेली नाहीत. बोकाच्चिओ,[200] राब्ले,[201] स्विफ्ट, सेर्वान्तिस, लोपे दे वेगा,[202] काल्देरोन,[203] वोल्तेर, बायरन,[204] गोएथे, शेली,[205] पूष्कीन, ल्येव तल्स्तोय, फ्लॉबेर आणि तत्सम तोलामोलाचे लेखक "महान साहित्या"चे निर्माते आहेत, पण त्यांच्यापैकी कुणीही वास्तवाला संमतीदर्शक आणि उदात्त "होकार" भरला नाही.

थोर कलाप्रभूंची ही सर्वांत मोठी कामगिरी आहे. जीवनातील वाईट गोष्टींचे आणि लोकांमधील दोषांचे कठोरपणे व ठळक चित्रण करून त्यांनी लोकांमध्ये अधिक चांगल्या जीवनाची आस निर्माण केली. लोकांना त्यांनी शिकविले. बाल्झाकपासून आपण खूप शिकलो असे कार्ल मार्क्सनी कबूल केले होते. एमिल झोलाच्या कादंबऱ्यांवरून एका सबंध युगाचा अभ्यास करता येतो. भांडवलदारी समाजाचा आशय किती परस्परविरोधी, ढोंगी आणि अमानुष आहे हे दाखविण्याची एकही संधी आनातोल फ्रान्स यांनी कधी गमावली नाही. त्यांच्या दफनविधीच्या दिवशी काही साहित्यिकांनी 'मृत माणसाच्या तोंडावर चपराक' नामक एक पुस्तिका प्रकाशित केली होती. फ्रान्स यांनी नाशाची जी सुंदर कामगिरी बजावली होती, तिचा सूड घेण्याचा हा एक अगदी दुबळा आणि केविलवाणा प्रयत्न होता.

सद्य:कालीन युरोपीय व अमेरिकी साहित्य अधिकाधिक दोषारोपात्मक बनले आहे. ह्याशिवाय दुसऱ्या रीतीने ते बनू शकते का? वास्तवाला संमतीदर्शक "होकार" ते भरू शकते का? ऑस्कर वाईल्डनंतर[206] आणि बर्नार्ड शॉ[207] ह्यांच्या काळात डिकन्सच्या संतोषाला जागा नाही; गुणी विदूषक आणि गुणी, पण सामान्य समन्वयवादी ओ' हेन्री[208] यांची जागा सिंक्लेअर ल्युइस[209] यांनी घेतली आहे. ज्यूलियस श्तीन्दे[210] यांनी आपल्या 'बुखगोल्झ कुटुंब' पुस्तकात ज्या रीतीने क्षुद्रप्रवृत्तीवादाची रेवडी उडविली, तसे करण्याचे एकाही जर्मन माणसाचे आज धाडस नाही. बिस्मार्कनी[211] ह्या पुस्तकाची खूप प्रशंसा केली होती व प्रदीर्घ काळपर्यंत "मध्यमवर्गीयांचे" ते आदरणीय पुस्तक होते.

सद्य:कालीन युरोपीय आणि अमेरिकी साहित्याने असा ठसा उमटवला आहे: निकोप नसलेल्या सामग्रीवर लेखक काम करतात; एकवटलेल्या स्वरूपात अनुभव संघटित करण्यास समर्थ अशा शक्तींच्या दृष्टीने पूर्णतया

महत्त्व नाहीसे झालेल्या विचारांवर काम करतात; "सामाजिकदृष्टया समाधान देणाऱ्या परिस्थितींची संख्या आपल्या जगात वेगाने घटत आहे." अवतरणचिन्हांमधील शब्द एका पत्रकाराने मला पाठवलेल्या पत्रामधून उद्‌धृत केले आहेत. तो ज्या विषयावर लिहीत आहे, त्याच्याशी त्याचा निकट परिचय आहे. त्याच्या शब्दांना वस्तुस्थितींनी आणि आकडेवारींनी दुजोरा दिला आहे.

सोविएत संघात सर्व कामकरी लोकांना जागृत आणि संघटित करण्यात आले आहे व त्यांना गतिमान केले आहे. त्यांच्या अग्रदलाने देशाच्या औद्योगिक आणि सांस्कृतिक पुनरुज्जीवनाला आरंभ केला आहे. जीवनामध्ये लक्षणीय उत्साह भरला आहे. सुजाणरीत्या समोर ठेवलेल्या उद्दिष्टाकडील नव्या ऐतिहासिक शक्तीच्या वाटेवरील प्रत्येक अडथळयावर तो उत्साह मात करीत आहे. जर कामकरी समूहांना स्वतःच्या उत्साहाची आणि ताणलेल्या शक्तीची जाणीव झाली नसती, तर अवघ्या १२ वर्षांच्या अल्प अवधीत देशाच्या पुनरुज्जीवनाच्या क्रमात अशा निर्विवाद आणि तेजस्वी फलनिष्पत्ती प्राप्त करण्यात त्यांना यश आले नसते; बाहेरून भांडवलदारी जगाकडून आणि आतून "जुन्या जगाच्या" अवशेषांकडून द्वेषाचे वातावरण फैलावले जात असल्याच्या परिस्थितीत अशा निर्विवाद आणि तेजस्वी फलनिष्पत्ती साध्य करणे त्यांना शक्य झाले नसते.

"असंस्कृत" जनतेच्या महान देशाला पुनरुज्जीवित करण्याच्या प्रक्रियेचे – ह्या अभूतपूर्व वेगवान प्रक्रियेचे – आपल्या नवजात साहित्यात अगदी क्षीण दर्शन घडविण्यात आले होते व आताही तसेच दुबळेपणाने चित्रण घडत आहे. ह्या "असंस्कृत" जनतेची इच्छा चर्चने आणि शासनसंस्थेने शतकानुशतके निर्दयपणे दडपून टाकली होती, जीवनाकडे निष्क्रिय दृष्टिकोनामधून पाहण्याची तिला कृत्रिमरीत्या सवय लावली होती.

नव्याने जन्माला आलेल्या आणि कृतिशील बनलेल्या गोष्टींपेक्षा मरणोन्मुख गोष्टींकडे साहित्य अधिक लक्ष पुरवीत आहे, म्हणून मुख्यतः दुबळे दर्शन घडत आहे असे मला वाटते.

मरणोन्मुख भूतकाळाकडे पाहणारा लेखक म्हणजे मरणांतिक आजारी म्हाताऱ्या रुग्णाच्या शय्येपाशी पराभूत मनःस्थितीत बसून रुग्ण मरणार अथवा नाही ह्यावर चिंतन करणाऱ्या तरुण डॉक्टरसारखा आहे.

आणि कदाचित मरणोन्मुख माणसाचे सांत्वन करण्यासाठी नव्हे, तर

स्वतःची समस्या सोडविण्यासाठी त्या कमालीच्या आजारी माणसाला तो सांगतो की, रुग्ण ज्या परिस्थितींमध्ये पूर्वी रहात होता त्या अद्याप अस्तित्वात आहेत; निवांत प्रांतिक शहरे आणि बेजबाबदारपणे जगता येईल असा जुना आरामशीर काळ अद्याप अस्तित्वात आहे. प्रत्यक्षात अनेक "नकारात्मक परिस्थिती" अद्याप अस्तित्वात आहेत. विरुद्ध परिस्थितींवर त्या वर्चस्वही गाजवीत आहेत आणि नवजीवनाच्या वाटेवर विविध अडथळे ठेवीत आहेत. हे निश्चितरीत्या खरे आहे आणि सर्व प्रकारच्या तिरस्करणीय गोष्टींचे दर्शन घडविणे म्हणजे सत्याची सेवा मानली जाते.

वास्तवतेच्या कुरूपतेची चांगली जाणीव होऊनसुद्धा तिच्या दुष्ट चक्रामधून सुटण्यास लेखक जेव्हा असमर्थ होता, अशा काळात ही परिस्थिती असायची. ज्या देशांमध्ये ह्या दुष्ट चक्राला अद्याप तोडण्यात आलेले नाही, त्याठिकाणी असे आहे.

ह्या देशात क्रांतीने हे चक्र तोडून टाकले आहे आणि अशा रीतीने नव्या वास्तवाला, नव्या सत्याला, रस्ता मोकळा करून दिला आहे. हे नवे सत्य कामगारवर्गाला आणि किसानवर्गाच्या काही भागाला जीवनाकडे समाजसत्तावादी दृष्टिकोनातून पहायला शिकवत आहे.

कामगारवर्गाच्या कलेकडून कठोर आणि थेट अपेक्षा आहेत. कला म्हणजे शस्त्र असून लढ्यात त्यांच्या हितासाठी अथवा हिताविरुद्ध वापरता येईल, अशी त्याची धारणा आहे.

कामगारवर्ग कठोर असण्याची कारणे अनेक आहेत. त्यांपैकी दोन कारणे सर्वांत महत्त्वाची आहेत: ज्या उद्दिष्टाच्या प्राप्तीसाठी तो झटत आहे त्या उद्दिष्टाची भव्यता आणि त्याचा अवघडपणा; आणि मरणोन्मुख भूतकाळाचा विरोधी परिसर. ह्या भूतकाळाची संसर्गजन्य रोगाप्रमाणे लागण होते आहे ह्याची कामगारवर्गाला कल्पना आहे, तसेच भूतकाळाच्या वारसापासून अद्याप ते मुक्त झालेले नाहीत, ह्याचीही त्याला जाणीव आहे.

कामगारवर्ग म्हणतो: साहित्य आपल्या हातांमधील सांस्कृतिक शस्त्र बनले पाहिजे; त्याने आपल्या मार्गाची सेवा बजावली पाहिजे, कारण आपले कार्य हे अखिल मानवजातीचे कार्य आहे.

हा आवाज नव्या इतिहासाचा आवाज आहे. नवजात साहित्याला तो नीट ऐकू येतो का? विशेष नीटपणे ऐकू येत नाही, असे मी म्हणेन. ह्याचे कारण वास्तवतेकडील दोषारोपात्मक आणि नकारात्मक दृष्टिकोनाच्या जुन्या

परंपरेला ते निष्क्रियपणे आधीन गेल्यामुळे दुसऱ्या वास्तवाचे तेजस्वी चित्रण करण्यात त्याला अपयश येत आहे. जुन्या सत्याचे वर्णन करताना ते नव्या सत्याकडे लक्ष देत नाही. भूतकाळाच्या विध्वंसाच्या गोंधळात, माणसात एव्हाना जन्मलेल्या नव्या वैशिष्टयांकडे त्याचे लक्ष जात नाही. ही नवी वैशिष्टये चिरंतन राहतील, त्यांचा नाश कधीही होणार नाही, फक्त अधिक चांगल्या रूपात त्यांचे स्थित्यंतर घडेल.

जीवनाचे आपण मुक्त निर्माते आणि मालक आहोत असे जाणवणारे व जाणीव असलेले अद्याप काही लोक आहेत. प्रत्यक्षात त्यांच्यातील बव्हंश सोविएत संघातील आहेत आणि हे सिद्ध करण्याची जरूरी आहे असे मला वाटत नाही.

अशी माणसे आपले साहित्य अजून नीट पहात नाही, त्यांना समजून घेत नाही, असे मला वाटते. ह्या माणसांच्या सृजनशील जोमदार कार्याच्या इच्छेला पाठिंबा देण्यास आणि विकसित करण्यास आपले साहित्य मुळीच समर्थ नाही. वास्तवता शौर्यशाली आहे, पण साहित्यापाशी शौर्यशाली वृत्तीचा अभाव आहे, उल्हसित वृत्तीचा अभाव आहे.

माझ्याकडून कदाचित चूक घडत असेल, पण ह्या कथा-संग्रहामधून उल्हसित सूर स्पष्टपणे उमटत असल्याचा मला भास होत आहे. एका कथेतील नायिका स्वतःच्या उपासमारीचे वर्णन केवळ एवढयाचसाठी करते की, तिला काहीतरी खायला मिळाल्यानंतर "कित्ती कित्ती छान वाटले" हे सांगावेसे वाटले म्हणून! मला हे आवडले. कदाचित, डोळयावर काळी काच न लावताही सूर्यावरचे डाग ज्या टीकाकारांना दिसू शकतात, त्यांना ह्या नव्या लेखकांच्या कथा-संग्रहात दोष आढळणे शक्य आहे. टीकाकारांचे हे व्यावसायिक कर्तव्य आहे. स्वतःच्या कार्याचा हेतू हाच आहे अशी त्यांची खात्री आहे. पण मी मात्र प्रत्येक परिस्थितीमधील विधायक बाजूंचा आणि प्रत्येक व्यक्तीमधील गुणांचा शोध घेतोय.

१९२९

# "संस्कृतीच्या मालकांनो," तुम्ही कोणाबरोबर आहात?[212]

## अमेरिकन वार्ताहरांना उत्तर

तुम्ही लिहिता: "तुम्हाला अपरिचित अशा महासागरापलिकडील लोकांकडून हा संदेश आलेला पाहून कदाचित तुम्हाला आश्चर्य वाटेल."

नाही, तुमच्या पत्राचे मला आश्चर्य वाटले नाही. अशी पत्रे मला वारंवार मिळतात. आणि "अस्सल" म्हणून त्याचा तुम्ही संदर्भ देता तो चुकीचा आहे. गेल्या दोन-तीन वर्षांमध्ये बुद्धिजीवींकडून धोक्याबद्दलच्या आरोळ्या उमटणे सर्वसामान्य बाब बनली आहे. हे अगदी स्वाभाविक आहे: भांडवलदारवर्गाच्या अस्तित्वाला शोभा देणे, श्रीमंतांचे त्यांच्या ग्राम्य आपत्तींच्या क्षणी सांत्वन करणे, हेच बुद्धिजीवी माणसाचे प्रत्यक्षात नेहमी काम होते. बहुसंख्य बुद्धिजीवी भांडवलदारांचे नोकर होते. फार पूर्वीपासून मळलेल्या आणि लक्तरे बनलेल्या, कामकरी जनतेच्या रक्ताचे भरपूर डाग पडलेल्या, भांडवलदारवर्गाच्या तात्त्विक आणि धार्मिक वस्त्रांना पांढऱ्या दोऱ्याने ठिगळे लावण्याचे काम हे बुद्धिजीवी लोक दक्षपणे करीत होते. अगदी आजही त्यांनी हे अवघड, पण फारसे कौतुकास्पद नसलेले आणि पूर्णतया वांझ असे काम चालू ठेवले आहे. जवळजवळ भविष्यसूचक पूर्वज्ञान ते उघडकीला आणीत आहेत. उदाहरणार्थ, जपानी साम्राज्यवाद्यांनी चीनचे तुकडे तुकडे करण्याच्या खूप आधी, जर्मन श्पेंगलर[213] यांनी आपल्या 'मानव आणि तंत्र' नामक पुस्तकात विचार व्यक्त केला होता की, "वर्णीय वंशांना" आपले ज्ञान आणि तांत्रिक अनुभव यांचा लाभ देऊन १९ व्या शतकातील युरोपीय लोकांनी अत्यंत गंभीर घोटाळा केला होता. श्पेंगलरच्या ह्या दृष्टिकोनाला तुमचे अमेरिकन इतिहासकार हेन्ड्रिक व्हॅन लॉन[214] यांनी पाठिंबा दिला आहे. त्यांचे असेही मत आहे की, काळ्या आणि पिवळ्या लोकांना युरोपीय

संस्कृतीच्या अनुभवाने सुसज्ज बनविणे म्हणजे युरोपीय भांडवलदारवर्गाच्या "सात घातक ऐतिहासिक चुकां" पैकी एक चूक होती.

आणि आता ही चूक सुधारण्याची इच्छा आपल्याला दिसते. युरोपीय आणि अमेरिकन भांडवलदार जपानला व चीनला पैसे आणि शस्त्रे पुरवितात, एकमेकांचा नाश करायला त्यांना मदत करतात आणि त्याचवेळी पूर्वेला स्वतःचे काफले धाडतात. म्हणजे सोयीस्कर क्षणी जपानी साम्राज्यवादाला त्यांची बलाढ्य शस्त्रसज्ज मूठ दाखविता यावी आणि ठार मारलेल्या अस्वलाच्या कातड्याचा वाटा घेण्यासाठी शूर सशाबरोबर पुढे जाता यावे. वैयक्तिकरीत्या मला वाटते की, अस्वलाचा वध होणार नाही. याचे कारण श्पेंगलर, व्हॅन लोन मंडळी आणि युरोपीय-अमेरिकन "संस्कृतीला" धास्तावणाऱ्या धोक्यांबाबत विस्तारपूर्वक बडबड करणारे भांडवलदारवर्गाचे तत्सम समर्थक एक-दोन गोष्टी नमूद करायला विसरले आहेत. ते विसरले आहेत की, हिंदुस्थानी, चिनी, जपानी, निग्रो सामाजिकदृष्ट्या अखंड आणि एकजातीय नाहीत, तर त्यांचे वर्गांमध्ये विभाजन घडलेले आहे. ते विसरले आहेत की, युरोपीय आणि अमेरिकन क्षुद्रबद्धींच्या स्वार्थी विचारांच्या विषाविरुद्ध मार्क्स आणि लेनिन यांच्या शिकवणींचा उतारा विवेचित केलेला आहे आणि त्याचा फार निकोप परिणाम घडत आहे. मात्र अशी शक्यता आहे की, प्रत्यक्षात ते हे विसरलेले नाहीत, पण चतुराईने त्याबद्दल मौन पाळत आहेत. आणि वीष निःष्प्रभ असल्याची व उतारा प्रभावी असल्याची त्यांना जाणीव झाल्यामुळे, युरोपीय संस्कृतीच्या अधःपाताविषयीच्या धोक्याचे इशारे देणाऱ्या आरोळ्या ते ठोकत आहेत.

संस्कृती नाश पावते आहे असा आक्रोश करणाऱ्यांची संख्या सतत वाढत आहे आणि त्यांचा आक्रोश अधिक मोठ्यांदा होत आहे. सुमारे तीन महिन्यांपूर्वी, फ्रान्सचे माजी मंत्री कायो यांनी संस्कृतीच्या असुरक्षिततेबद्दल जाहीररीत्या शोक केला.

"जग" ते ओरडून म्हणाले, "विपुलतेच्या आणि अविश्वासाच्या शोकांतिका अनुभवत आहे. दशलक्षावधी लोकांना पुरेसे खायला नसताना, गहू जाळला जातो आणि कॉफीच्या पिशव्या समुद्रात फेकण्यात येतात, ही शोकांतिका नव्हे काय? आणि अविश्वासाबद्दल बोलायचे, तर त्याने एव्हाना नुकसान केले आहे. त्याने युद्ध घडवले आणि शांतता तह करायला लावले. जेव्हा अविश्वास नाहीसा होईल तेव्हाच त्या तहांना मंजुरी मिळेल. जर

विश्वासाची पुन:स्थापना झाली नाही, तर सर्व संस्कृतीला धोका उत्पन्न होईल, कारण स्वत:च्या सर्व आपत्तींना जी कारणीभूत आहे असे लोकांना वाटते, ती अर्थव्यवस्था उलथून टाकण्याचा लोकांना मोह होईल."

आज एवढ्या उघडपणे एकमेकांना नख्या काढून व सुळे विचकून दाखविणाऱ्या लुटारूंमध्ये परस्पर विश्वासाच्या शक्यतेची भाषा करणारा एक तर बिलंदर ढोंगी असला पाहिजे, अथवा कमालीचा भाबडा असला पाहिजे. आणि जर "लोकां" मार्फत ह्याचा अर्थ कामकरी लोक असा असेल, तर प्रत्येक प्रामाणिक माणसाने कबूल केले पाहिजे की, भांडवलदारी व्यवस्थेचा वेडपटपणा आपल्या आपत्तींना "जबाबदार" आहे हा कामगारांचा दावा अगदी बरोबर आहे. कारण कामगारांच्या संपत्ती निर्माण करणाऱ्या श्रमाला मोबदला म्हणून भांडवलदारी व्यवस्था कामगारांवर आपत्ती लादते. मार्क्स आणि एंगल्स यांनी आपल्या 'कम्युनिस्ट जाहीरनामा'मध्ये भांडवलदारी वास्तवताविषयी काढलेले उद्‌गार कमालीचे खरे ठरत आहेत, ह्याची कामगारवर्गीयांना अधिकाधिक स्पष्टपणे जाणीव होत आहे:

"भांडवलदारवर्ग सत्ता गाजविण्यास[215] अयोग्य आहे, कारण गुलामाला त्याच्या गुलामगिरीत अस्तित्वाची खात्री देण्यास तो असमर्थ आहे, कारण अशा राज्यात त्याला बुडू न देण्यास तो मदत करू शकत नाही, त्याच्याकडून खाऊ घातले जाण्याऐवजी त्याला त्याने खाऊ घातले पाहिजे. ह्या भांडवलदारवर्गाखाली समाज इत:पर राहू शकत नाही; दुसऱ्या शब्दात सांगायचे तर, त्याचे अस्तित्व इत:पर समाजाबरोबर सुसंगत नाही."

कायो हे शेकडो जुन्या लोकांपैकी असे एक आहेत, ज्यांचा अद्याप विश्वास आहे की, त्यांचा भांडवलदारी वेडपटपणा म्हणजे माणसाला सदैव मिळालेली शहाणपणाची देणगी आहे, अधिक चांगला शोध तो कधीही लावणार नाही, त्यापलिकडे कधीही जाणार नाही, अधिक वरच्या शिखरांवर कधीही चढणार नाही. आणि अगदी अलिकडेच, स्वत:च्या आर्थिक शहाणपणाचा व त्याच्या स्थैर्याचा पुरावा म्हणून भांडवलदारवर्गाच्या समर्थकांनी त्यांच्या शास्त्राचे उदाहरण दिले.

आता त्यांच्या दुष्ट खेळामधून ते शास्त्राला वगळतात. २३ फेब्रुवारी रोजी, ह्याच कायो महाशयांनी पॅरिसमध्ये माजी मंत्र्यांच्या श्रोतृसमुदायासमोर – ज्यात पावेल मिल्यूकोव[216] आणि एकूण "आहेरे" होते – बोलताना श्पेंगलरची री ओढत म्हटले:

"तंत्रशास्त्र अनेक बाबतीत बेकारी वाढवते, कामावरून कमी केलेल्या कामगारांच्या वेतनांचे भागधारकांच्या जादा नफ्यांमध्ये रूपांतर करते. "सदसद्विवेकबुद्धीरहित" शास्त्र, "सदसद्विवेकबुद्धी"ने ऊब न दिलेले शास्त्र, माणसाच्या विरोधी कार्य करते. माणसाने शास्त्राला वाकविले पाहिजे. सध्याचे अरिष्ट म्हणजे मानवी बुद्धीचा पराभव आहे. काहीवेळा थोर माणसा-एवढे शास्त्राच्या दृष्टीने अधिक मोठे दुर्दैव नसते. हा थोर माणूस एका विशिष्ट वेळी तात्त्विक सिद्धांत मांडतो तेव्हा त्यांना अर्थ आणि महत्त्व असते. उदाहरणार्थ, कार्ल मार्क्स. त्यांचे सिद्धांत १८४८ मध्ये अथवा १८७० मध्ये बरोबर होते, पण १९३२ मध्ये अगदी चुकीचे आहेत. जर मार्क्स आज हयात असते, तर त्यांनी जसे लिहिले होते तसे आज लिहिले नसते."

ह्या शब्दांमधून भांडवलदार कबूल करतो की, त्याच्या वर्गाची बुद्धिमत्ता कोलमडली आहे आणि तिचे दिवाळे वाजले आहे. "शास्त्राला वाकवा." अशी तो शिफारस करतो; पण ह्याच शास्त्राने त्याच्या वर्गाला श्रमिक जगावर सत्ता दृढ करण्यास केवढे सामर्थ्य दिले होते, ह्याचा त्याला विसर पडला आहे. "शास्त्राला वाकवायचे" म्हणजे काय? संशोधनाचे स्वातंत्र्य त्याला नाकारायचे? शास्त्राच्या स्वातंत्र्यावर चर्चने चढविलेल्या हल्ल्यांना एकेकाळी भांडवलदारवर्गाने अत्यंत शौर्याने व प्रभावीपणे प्रतिकार केले होते. मध्ययुगातील अत्यंत काळोख्या कालखंडाप्रमाणे आजचे भांडवलदारी तत्त्वज्ञान हळूहळू माघारी जात आहे – धर्मशास्त्राचे चाकर बनत आहे. रानटी अवस्थेकडे परत जाण्याचा युरोपला धोका निर्माण झाला आहे असे कायो म्हणतात ते अगदी बरोबर आहे. मार्क्स ह्यांची शिकवण त्यांना माहीत नाही, तरीही ह्या बाबतीत ते मार्क्स यांच्या भाकिताचा पुनरुच्चार करतात. होय, ही गोष्ट अजिबात नाकारता येत नाही की, जगाची मालकीण असलेल्या युरोपचा आणि अमेरिकेचा भांडवलदार, दर वर्षागणिक अधिक अडाणी बनतो आहे, बौद्धिकदृष्टया क्षीण होत आहे आणि रानटी बनतो आहे व ह्याची त्यांना स्वत:ला – तुमच्याप्रमाणे – जाणीव होत आहे.

रानटी अवस्थेकडे परतण्याची शक्यता ही कल्पना आजकालच्या भांडवल-दारांमध्ये सर्वांत "फॅशनेबल" समजली जाते. श्पेंगलर, कायो आणि तत्सम "तत्त्वज्ञ" हजारो क्षुद्रबुद्धींच्या मन:स्थितीचे दर्शन घडवतात. स्वत:चा वर्ग नाश पावणार आहे ह्याची त्यांना आगाऊ कल्पना आल्यामुळे ही धास्ताव-लेली मन:स्थिती निर्माण झाली आहे. सबंध जगभरच्या कामकरी समूहांमध्ये

स्वत:च्या उद्दिष्टाच्या न्याय्यपणाची क्रांतिकारक जाणीव वाढत आहे, ही वस्तुस्थिती तिला कारणीभूत आहे. कामकरी लोकांच्या क्रांतिकारक सांस्कृतिक विकासावर विश्वास न ठेवणे भांडवलदारांना इष्ट वाटेल, पण त्यांना तो विकास प्रत्यक्ष दिसतो – जाणवतो. ही सर्वस्पर्शी प्रक्रिया आहे आणि उत्कृष्टरीत्या न्याय्य ठरली आहे. मानवजातीच्या संपूर्ण श्रमिक अनुभवाचा – ज्याच्याबद्दल भांडवलदारी इतिहासकार मोठ्या बोधपर शिकवणीने सांगतात – तो तार्किक आणि अपरिहार्य विकास आहे. पण इतिहाससुद्धा एक शास्त्र आहे, म्हणून त्यालाही "वाकवले" पाहिजे. अथवा त्याहून सोपे म्हणजे त्याचे अस्तित्वच विसरून जावे. फ्रेंच कवी आणि अकादमीशिअन पॉल वालेरी[217] यांनी 'सद्य:कालीन जगाचा आढावा' नामक स्वत:च्या पुस्तकात हा सल्ला दिला आहे. त्यांना इतिहास विसरून जायची इच्छा आहे. राष्ट्रांवरील आपत्तींना इतिहास जबाबदार आहे, असे त्यांना गंभीरपणे वाटते. ते म्हणतात की, भूतकाळाची आठवण करून देऊन इतिहास निष्फळ स्वप्नांना जन्म देतो व लोकांचे मन:स्वास्थ्य नष्ट करतो. अर्थात लोक म्हणजे भांडवलदार असे त्यांना अभिप्रेत आहे. वालेरी यांना बहुधा पृथ्वीवर दुसरी कुठली माणसे दिसू शकत नाहीत. अगदी अलिकडेपर्यंत भांडवलदारांना ज्या इतिहासाचा अत्यंत अभिमान होता व ज्याला त्यांनी एवढ्या आत्मीयतेने लिहिले होते, त्या इतिहासाबद्दल वालेरी म्हणतात :

"आपल्या बुद्धिमत्तेच्या रासायनिक प्रयोगशाळेत निर्माण केलेल्या सर्व उत्पादनांमध्ये इतिहास सर्वांत धोकादायी वस्तू आहे. इतिहास स्वप्नांना उत्तेजन देतो, राष्ट्रांना झिंग आणतो, त्यांच्यात खोट्या आठवणी जाग्या करतो, त्यांच्या अंतर्मुख विचारांना अतिरेकी बनवतो, त्यांच्या जुन्या जखमांना चिघळवतो, त्यांची मन:शांती ढळवतो आणि त्यांना उन्माद चढवतो – गौरवोन्माद अथवा छळाचा उन्माद!"

समर्थक ह्या नात्याने ते खूप जहाल आहेत असे तुम्हाला दिसते. भांडवलदारवर्गाला निवांत जगण्याची इच्छा आहे आणि स्वत:ला निवांत जगता यावे म्हणून दशलक्षावधी लोकांचा नाश करण्याचा आपल्याला हक्क आहे, अशी त्याची समजूत आहे. अर्थात तो दशलक्षावधी पुस्तकांचाही नाश करू शकेल, कारण पृथ्वीवरील इतर प्रत्येक गोष्टीप्रमाणे, ग्रंथालयेसुद्धा त्याच्या ताब्यात आहेत. निवांत जगण्याला इतिहास मनाई करतो का? तर मग त्या इतिहासाचा नायनाट करा! इतिहासावरील सर्व पुस्तके प्रसारातून

काढून घ्या! शाळांमध्ये इतिहास शिकवू नका! भूतकाळाचा अभ्यास सामाजिकदृष्टया धोक्याचा आहे आणि तसा अभ्यास करणे गुन्हा आहे, असे घोषित करा! ऐतिहासिक संशोधनाकडे कल असलेल्या लोकांना अपवादक म्हणून जाहीर करा आणि निर्जन बेटांवर त्यांची रवानगी करा!

निवांतपणा मुख्य बाब आहे! आणि भांडवलदारवर्गाच्या सर्व समर्थकांची ती चिंता आहे. कायो म्हणतात त्याप्रमाणे, निवांतपणा साध्य करायचा असेल, तर भिन्न राष्ट्रजमातींच्या भांडवलदारी लुटारूंमध्ये परस्परविश्वास पाहिजे. आणि विश्वास प्रस्थापित करण्यासाठी इतर देशांची – उदाहरणार्थ, चीन – दारे सताड उघडली पाहिजेत, म्हणजे युरोपातील सगळया लुटारूंना आणि दुकानदारांना तेथे मनसोक्त लूटमार करता येईल. पण जपानच्या लुटारूंना आणि दुकानदारांना ही दारे फक्त स्वतःखेरीज इतर सर्वांसाठी बंद करून ठेवण्याची इच्छा आहे. त्याचे कारण देताना ते म्हणतात की, चीन युरोपपेक्षा त्यांना अधिक जवळचा आहे आणि हिंदुस्थानी लोकांना लुटण्यापेक्षा चिनी लोकांना लुटणे त्यांच्या दृष्टीने अधिक सोयीचे आहे. हिंदुस्थानी लोकांना लुटण्याची इंग्लंडच्या "सभ्य गृहस्थांना" सवय आहे. लुटीमधील स्पर्धा वैरांना निर्माण करते व त्यांच्यात नव्या महायुद्धाचे धोके सामावलेले आहेत. शिवाय, पॅरिसचा पत्रकार ग्रेन्गुआर म्हणतो त्याप्रमाणे, "एक सुरळीत आणि भक्कम बाजारपेठ म्हणून रशियन साम्राज्य युरोपने गमावले आहे." ह्यामध्ये ग्रेन्गुआरला "वाईटाची मुळे" दिसतात आणि इतर अनेक पत्रकार, मुत्सद्दी, पाद्री, उमराव, साहसवादी आणि सट्टेबाज यांच्याप्रमाणेच तो आग्रह धरीत आहे की, सोविएत संघामध्ये अखिल युरोपीय हस्तक्षेपाची गरज आहे. शिवाय, युरोपात सतत बेकारी वाढत आहे आणि त्याचप्रमाणे कामगारवर्गाची स्वतःच्या उद्दिष्टाच्या न्याय्यपणाची क्रांतिकारक जाणीव वाढत आहे. ह्या सगळयामधून अर्थ निघतो की, "निवांतपणा" प्रस्थापित होण्याचा संभव फारच कमी आहे, कदाचित त्याला मुळी जागाच मिळणार नाही असे भासते. पण मी आशावादी नसल्यामुळे आणि भांडवलदारांच्या दुष्टपणाला सीमा नाहीत ह्याची मला माहिती असल्यामुळे, माझी मान्य करायला तयारी आहे की, निवांत जीवन उपलब्ध करण्यासाठी भांडवलदार कदाचित एका मार्गाने प्रयत्न करतील. १९ फेब्रुवारीला कलोन येथे भाषण करताना वंशवादी प्रतिनिधी बेर्गर ह्यांनी ह्या शक्यतेची सूचना दिली. ते म्हणाले:

“जर, हिटलर सत्तेवर आल्यानंतर, जर्मन प्रदेश व्यापण्याचा फ्रेंचांनी प्रयत्न केला, तर आम्ही सगळ्या ज्यूंचे गळे कापू.”

प्रूशियाच्या सरकारला जेव्हा ह्या विधानाबद्दल समजले, तेव्हा बेर्गरना सार्वजनिक ठिकाणी भाषणे करण्यास त्याने मनाई केली. हिटलरी छावणीत त्यामुळे संतापाचे वादळ उठले. एका वंशवादी वृत्तपत्राने लिहिले आहे: “बेकायदेशीर कृतींना चेतविण्याचा आरोप बेर्गरवर करता येणार नाही. जेव्हा आम्ही सत्तेवर येऊ तेव्हा केलेल्या कायद्याच्या आधारावर आम्ही ज्यूंचे गळे कापू.”

हे विधान म्हणजे एक विनोद आहे, जर्मन «Witz» आहे, असे समजू नये. युरोपीय भांडवलदारवर्ग सध्याच्या त्याच्या मन:स्थितीत केवळ ज्यूंच्या संपूर्ण संहाराचाच नव्हे, तर त्याच्यापेक्षा वेगळ्या रीतीने विचार करणाऱ्या व त्याहूनही, त्याच्या अमानुष हितसंबंधांनुसार न वागणाऱ्या सर्वांचा संहार करण्याचा “कायदा मंजूर करण्यास” खचित समर्थ आहे.

ह्या “दुष्ट चक्रात” अडकल्यानंतर, बुद्धिजीवी समर्थक हळूहळू सांत्वनाची क्षमता गमावतात आणि शेवटी त्यांना स्वत:लाच सांत्वनाची गरज निर्माण होते. भिक्षा काढून टाकण्यास तत्त्वत: नकार देणाऱ्या लोकांकडेसुद्धा ते सांत्वनासाठी वळतात, कारण भिक्षा देण्यामुळे तसे करण्याचा हक्क मिळतो. त्यांचा मूलभूत गुण असलेला “सुंदर खोटेपणा” इत:पर भांडवलदारी वास्तवाचा कुरूप दुष्टपणा लपवू शकत नाही. जगाची लूट करण्याच्या श्रमांमुळे थकलेल्या आणि स्वत:च्या दुष्ट उद्दिष्टांना कामगारवर्गाचा वाढत्या प्रमाणात तीव्र प्रतिकार होत असल्यामुळे घाबरलेल्या, ज्यांच्या धनलालसेने वेडाचे रूप धारण केले आहे आणि सामाजिकदृष्ट्या नाशकारी प्रकारांमध्ये जे व्यक्त आहे अशा लोकांचे मनोरंजन व सांत्वन करणे हा केवळ एक निष्फळ उद्योगच आहे असे नव्हे, तर खुद्द सांत्वनाकारांनाही तो धोक्याचा आहे, असे त्यांच्यापैकी काहींना आता वाटू लागले आहे.

खिन्न दरोडेखोरांचे आणि मारेकऱ्यांचे सांत्वन करण्यातील गुन्ह्याकडेही कुणी बोट दाखवू शकेल. पण हा युक्तिवाद कुणाच्याही हृदयाच्या तारा छेडू शकणार नाही हे मला माहीत आहे, कारण ते “नीती” शिकविणे होईल आणि “नीती” शिकविणे म्हणजे अपेक्षेबाहेर कर्तव्यपूर्ती केल्यासारखे मानले जाते. सध्याच्या जगात बुद्धिजीवी सांत्वनकार असा एक “मध्यस्थ” बनतो आहे, ज्याला तर्कशास्त्र कठोरपणे अस्तित्व नाकारते.

कामगारवर्गीय सामाजिक दर्जा असलेल्या भांडवलदारवर्गीयांची प्रजा असलेल्या बुद्धिजीवी सांत्वनकाराला जाणीव होत आहे असे दिसते की, नाश होऊ घातलेल्या वर्गाचा चाकर म्हणून त्याची अपमानास्पद शोकांतिका घडणार आहे; धंदेवाईक गुंड आणि खुन्याप्रमाणे त्याचा नाश होणे अपरिहार्य आहे. त्याला ही जाणीव आता होऊ लागली आहे, कारण भांडवलदारवर्गाला त्याच्या सेवेची गरज राहिलेली नाही. भांडवलदारवर्गाची मर्जी संपादन करण्याचा प्रयत्न करणाऱ्या त्याच्या जातबांधवांकडून तो सतत ऐकत आहे की, बुद्धिजीवींचे अति-उत्पादन झाले आहे. तत्त्वज्ञांपेक्षा आणि "चिंतकां"-पेक्षा, भविष्य सांगणाऱ्या ढोंग्यांकडे "सांत्वना"साठी चटकन वळण्याचा भांडवलदाराचा कल असतो असे त्याला दिसते. हस्तसामुद्रिक, भविष्यवेत्ते, कुंडलीकर्ते, फकीर, योगी, सांकेतिक चित्रांवरून भविष्य सांगणारे, अध्यात्मवादी व इतर वैदूंच्या जाहिरातींनी युरोपीय वृत्तपत्रे गच्च भरलेली असतात. वस्तुतः खुद्द भांडवलदारांपेक्षा हे लोक जास्त अडाणी असतात. छायाचित्रकला व सिनेमा चित्रकलेला नष्ट करत आहेत आणि उपासमारीने मृत्यू येऊ नये म्हणून बटाटे, पाव आणि मध्यमवर्गीयांनी टाकून दिलेले कपडे ह्यांच्या बदल्यात चित्रकार आपली चित्रे देत आहेत. पॅरिसच्या एका वर्तमानपत्राने पुढील गंमतीदार छोटी बातमी छापली होती:

"बर्लिनच्या चित्रकारांमध्ये घनदाट निराशा पसरली आहे आणि चित्तवृत्ती बहरण्याचे कोणतेही चिन्ह दिसत नाही. चित्रकारांनी परस्परांना मदत करण्याची भाषा ऐकू येत आहे, पण ज्यांची काहीही मिळकत नाही आणि ज्यांना काही मिळकत होण्याची संभाव्यता नाही, असे लोक एकमेकांना काय मदत करणार? वस्तूंची थेट देवघेव करण्याची सूचना करणाऱ्या आन्नोत जॅकोबी नामक चित्रकर्त्रीच्या नामी कल्पनेला बर्लिनच्या कला-वर्तुळांनी उत्साहाने उचलून धरले आहे. पुतळे आणि चित्रे ह्यांच्या बदल्यात कोळसेवाल्यांनी चित्रकारांना इंधन पुरवावे. काळ पालटेल आणि कोळसेवाल्यांना ह्या देवघेवीचा पश्चात्ताप होणार नाही. दाताच्या डॉक्टरांनी चित्रकारांवर आपल्या कलेची करामत दाखवावी. दाताच्या डॉक्टरच्या प्रतीक्षा-कक्षात चांगले चित्र नेहमीच शोभून दिसेल. खाटकांनी आणि गवळ्यांनी भले काम करण्याची संधी दवडू नये व त्याचवेळी रोख पैसे खर्च न करता चांगली कला प्राप्त करून घ्यावी. आन्नोत जॅकोबीची कल्पना विकसित करण्यासाठी आणि

व्यवहारात अंमलात आणण्यासाठी बर्लिनमध्ये एक खास ब्यूरो स्थापन करण्यात आली आहे."

थेट देवघेव करण्याच्या ह्या व्यवस्थेची बातमी देणारे हे वर्तमानपत्र, पॅरिसमध्येही असेच चालू आहे, असे मात्र म्हणत नाही.

रंगभूमीची उच्च कला सिनेमा हळूहळू नष्ट करत आहे. भांडवलदारी सिनेमाच्या दूषित प्रभावाचे तपशीलवार विवेचन करण्याची गरज नाही, कारण ती उघड गोष्ट आहे. भावनाप्रधान विषयांचा चोथा करून झाल्यावर आता तो शारीरिक व्यंगांच्या प्रदर्शनावर भर देऊ लागला आहे.

"विक्षिप्त" नामक चित्रपटासाठी मेट्रो-गोल्डविन-मेयरच्या हॉलीवूडमधील स्टुडिओंनी अस्सल कलाकार गोळा केले आहेत. त्यांच्यात करकोच्याशी खूप साम्य असलेली कू-कू ही पक्षी-मुलगी आहे; सापळ्यासारखा माणूस पी. रॉबिन्सन आहे; जन्मतः एकच हात असलेली आणि पायांनी कुशलपणे लेस विणणारी मार्था आहे. "टाचणीच्या आकाराचे डोके" असलेली शील्झे नांवाची बाई स्टुडिओने पैदा केली आहे. तिचे शरीर चार-चौघींसारखेच आहे, पण डोके मात्र अगदी टाचणीसारखे छोटे आहे. पुरुषाप्रमाणे भरदार दाढी असलेली ओल्गा त्या चित्रपटात आहे; शिवाय अर्धी स्त्री-अर्धा पुरुष जोसेफाईन-जोसेफ, हिल्टन सयामी जुळे, बुटके आणि लिलीपुट यांचा समावेश आहे.

बार्नें, पोस्सार्ट, मोने-सूली आणि ह्या दर्जाचे इतर कलाकार इतःपार आवश्यक नाहीत. फेअरबँक्स, हॅरोल्ड लॉईड आणि इतर कसरतवाले त्यांची हकालपट्टी करीत आहेत. अभिजात संगीताचे जाझकडून उच्चाटन होत आहे. स्तेन्दाल, बाल्झाक, डिकन्स आणि फ्लॉबेरऐवजी, भुरट्या चोरांना व खुन्यांना पकडून मोठ्या दरोडेखोरांच्या आणि घाऊक खून पाडणाऱ्यांच्या मालमत्तेचे पोलीस डिटेक्टिव कसे रक्षण करतात, हे सांगण्याची हातोटी असलेले विविध वॉलेस[218] प्रस्थापित झाले आहेत. पोस्टाची तिकीटे आणि ट्रामची तिकीटे गोळा केली अथवा फार तर जुन्या नामांकित चित्रकारांच्या चित्रांच्या बनावट प्रती गोळा केल्या, म्हणजे कलेच्या क्षेत्रात खूप काही केले असे भांडवलदार समाधान मानून घेतो. वैज्ञानिक क्षेत्रात, कामगारवर्गाच्या शारीरिक शक्तींना अत्यंत स्वस्तात व सोयीस्कर रीतींनी शोषण्यात भांडवलदाराला स्वारस्य आहे. स्वतःची समृद्धी वाढवील, इतपतच विज्ञानाचे अस्तित्व भांडवलदाराला मान्य आहे.

हे पाहून काही बुद्धिजीवींना जाणीव होऊ लागली आहे की, "सृजनशील संस्कृती" – त्यांची पूर्वी समजूत होती की हा त्यांचा उद्योग होता, त्यांच्या "मुक्त विचारा"ची आणि "स्वतंत्र इच्छे"ची ती निर्मिती होती – इतःपर त्यांचा उद्योग राहिलेली नाही आणि संस्कृती भांडवलदारी जगाची अंगभूत गरज उरलेली नाही. चीनमधील[219] घटनांनी त्यांना १९१४ सालातील लूवेन[220] विद्यापीठाच्या आणि त्याच्या ग्रंथालयाच्या नाशाची आठवण करून दिली आहे. एके दिवशी त्यांना समजले की, शांघायमधील तुन त्सी विद्यापीठ, नौदल कॉलेज, मच्छीमार विद्यालय, राष्ट्रीय विद्यापीठ, मेडिकल कॉलेज, शेतकी आणि इंजिनिअरिंग महाविद्यालये व कामगारांचे विद्यापीठ, ह्यांचा जपानी तोफांनी विध्वंस केला. ह्या रानटी कृत्याचा कुणालाही संताप आला नाही. त्याचप्रमाणे, शस्त्रास्त्रांच्या सतत वाढीबरोबरच घडणाऱ्या सांस्कृतिक संस्थांच्या अनुदानांमधील कपातीचाही कुणाला संताप येत नाही.

पण युरोपीय आणि अमेरिकन बुद्धिजीवींच्या एका अगदी छोट्या विभागाला मात्र अर्थातच वाटते की, "वगळलेल्या मध्यस्थांच्या कायद्या"-खाली त्यांनी अपरिहार्यपणे आले पाहिजे व कुणाची बाजू घ्यायची हा प्रश्न त्यांना पडला आहे. जुन्या सवयीनुसार, कामगारवर्गाविरुद्ध भांडवलदारांचा कैवार घ्यायचा, अथवा प्रतिष्ठेनुसार, भांडवलदारवर्गाविरुद्ध कामगारवर्गाचा कैवार घ्यायचा. बुद्धिजीवीवर्गापैकी बहुसंख्यांना भांडवलशाहीची सेवा करण्यातच अद्याप समाधान वाटते आहे. पण त्यांच्या ह्या मालकाला आपल्या चाकरांच्या आणि सांत्वनकर्त्यांच्या नैतिक चांचल्याची पूर्ण जाणीव आहे व त्यांच्या समन्वयवादी कार्यातील व्यर्थता आणि षंढता पाहून आता तो उघडपणे त्यांचा तिटकारा करू लागला आहे; अशा चाकरांच्या आणि सांत्वनकर्त्यांच्या अस्तित्वाची खरेच गरज आहे काय, असा एव्हाना त्याच्या मनात संशय उत्पन्न झाला आहे.

मध्यमवर्गीय क्षुद्रबुद्धींचे सांत्वन करण्यात पटाईत असलेल्या लोकांकडून मला वारंवार पत्रे येतात. स्वेन एल्वेरस्ताद नामक नागरिकाकडून मला आलेले असे एक पत्र मी उद्धृत करतो:

"प्रिय श्री. गोर्की,

"निराशेच्या सीमेवर पोहोचलेल्या भयानक गोंधळाचे व भीतीचे साम्राज्य सबंध जगावर पसरले आहे. पृथ्वीवरील सर्व देशांना ग्रासणारे भयंकर आर्थिक अरिष्ट ह्याला कारणीभूत आहे. ह्या जागतिक शोकांतिकेमुळे «Tidens Tagn»

नामक नॉर्वेतील सर्वांत अधिक खपाच्या वर्तमानपत्रात लेखमाला लिहिण्याची प्रेरणा मला झाली. ह्या महाभयंकर संकटाचे बळी ठरलेल्या दशलक्षावधी लोकांमध्ये नवी चेतना आणि आशा निर्माण करण्याचा माझ्या लेखनामागील हेतू होता. गेल्या दोन वर्षांमधील लोकांची शोकजनक परिस्थिती ह्या विषयावर आपापली मते कळवावीत अशी लेखकांना, चित्रकारांना, शास्त्रज्ञांना आणि राजकीय मुत्सद्द्यांना मी विनंती केली. प्रत्येक देशातील प्रत्येक नागरिकासमोर पर्याय उभा आहे: क्रूर दैवाच्या जोरदार प्रहारांखाली नष्ट व्हायचे, अथवा अरिष्टावर आनंदजनक उपाय सापडेल अशा आशेने लढत रहायचे. सध्याची खिन्न परिस्थिती संपून आनंदाचे वातावरण निर्माण होईल, अशा आशेची प्रत्येकाला गरज आहे. आणि ज्याचे शब्द लक्षपूर्वक ऐकण्याची सर्वांना सवय आहे अशा माणसाचे आशावादी मत वाचून प्रत्येकाच्या अंतरात्म्यात आशेची तेजस्वी ज्योत प्रज्वलित होईल. म्हणून सद्य:परिस्थितीवर आपला दृष्टिकोन कळवावा, अशी मी आपल्याला विनंती करीत आहे. आपले मत कदाचित तीन अथवा चार ओळींपलिकडे नसेल, पण त्यामुळे नि:संशयरीत्या अनेकजण निराशेपासून बचावतील आणि भविष्यकाळाला धैर्याने तोंड देण्यास त्यांच्यात सामर्थ्य निर्माण होईल.

"आपला नम्र, स्वेन एल्वेरस्ताद."

ह्या पत्रलेखकासारखे अद्याप खूप लोक आहेत. "दोन अथवा तीन ओळींच्या" गुणकारी उपायावर, वाक्यांच्या गुणकारी उपायावर, ह्या लोकांची अद्याप भाबडी श्रद्धा आहे. ही श्रद्धा एवढी भाबडी आहे, की ती प्रांजल असूच शकणार नाही.

दोन-तीन वाक्ये अथवा दोन-तीनशे वाक्ये जराग्रस्त भांडवलदारी जगामध्ये नवजीवन आणू शकणार नाहीत. जगातील सर्व पार्लमेंटांमध्ये आणि राष्ट्रसंघामध्ये दररोज हजारो वाक्यांचा उच्चार होतो, पण त्यामुळे कुणाचेही सांत्वन होत नाही अथवा कुणाचीही खात्री पटत नाही; भांडवलदारी संस्कृतीमधील अरिष्टाची नैसर्गिक वाढ थोपविण्याची शक्यता आहे अशी आशा कुणाच्याही मनात निर्माण होत नाही. माजी मंत्री आणि इतर रिकामटेकडे शहरांमधून दौरे काढतात व विज्ञानाला "वाकवा" आणि "शिस्त लावा" अशी मध्यमवर्गीय समाजाला विनंती करतात. ह्या माणसांची

बाष्कळ बडबड पत्रकार मंडळी तावडतोब उचलतात. ह्या पत्रकारांना "सगळे सारखेच आहे, सारा कंटाळवाणा खेळ आहे" आणि खूप काळापासून त्यांना असेच वाटत आहे. 'दी डेली एक्सप्रेस' नामक गंभीर वृत्तपत्रात लेखन करणारे त्यांच्यातील एक पत्रकार, एमिल लुडविग, मानवजातीला सल्ला देतात की, "तज्ज्ञांची ब्याद नष्ट करा." हा ग्राम्य मूर्खपणा मध्यमवर्गीय ऐकतो, वाचतो आणि त्यापासून स्वतःचे निष्कर्ष काढतो. जर युरोपीय मध्यमवर्गीय सत्तेने ठरविले की, विद्यापीठे बंद करणे आवश्यक आहे, तर त्यात आश्चर्यजनक असे काहीही नसेल. जाता जाता सांगायचे तर सबळ पाठिंब्यासाठी पुढील वस्तुस्थिती ती सादर करील: जर्मनीमध्ये दरसाल विद्यापीठाची पदवी आवश्यक असणाऱ्या ६००० जागा रिकाम्या होतात, पण जर्मन विद्यापीठांमधून दरसाल सुमारे ४०००० पदवीधर निर्माण होतात.

नागरिकहो, डी. स्मिथ आणि टी. मॉरीसन, तुम्ही जेव्हा भांडवलदारी साहित्याला आणि पत्रकार व्यवसायाला "सुधारक मताच्या संघटकाची" भूमिका देता, तेव्हा चूक करता. हा "संघटक" परपुष्ट बांडगूळ आहे व वास्तवाच्या नीच गोंधळाला लपविण्याचा तो प्रयत्न करतो. पण जुन्या अवशेषांची घाण आणि गदळ आच्छादून टाकणाऱ्या लतावेलींपेक्षा आणि तणापेक्षा कमी प्रभावीपणाने त्याचे काम घडते. नागरिकहो, तुमच्या वर्तमान-पत्रांच्या सांस्कृतिक भूमिकेविषयीचे तुमचे ज्ञान अगदी कच्चे आहे. "अमेरिकन हा सर्वप्रथम अमेरिकन आहे" आणि नंतरच केवळ माणूस आहे, असे तुमची वृत्तपत्रसृष्टी एकमुखाने प्रतिपादन करते. तर जर्मन वंशवादी वृत्तपत्रे शिकवण देतात की, वंशवादी सर्वप्रथम आर्य आहे आणि नंतरच केवळ डॉक्टर, भूगर्भशास्त्रज्ञ अथवा तत्त्वज्ञ आहे. फ्रेंच पत्रकार युक्तिवाद करतात की, फ्रेंच सर्वप्रथम विजेता आहे आणि म्हणून इतरांपेक्षा तो जास्त शस्त्रसज्ज असला पाहिजे. अर्थात हा संदर्भ मेंदूच्या नव्हे, तर मुठीच्या शस्त्रसज्जतेचा आहे.

युरोपीय आणि अमेरिकन वर्तमानपत्रे आपल्या वाचकांची सांस्कृतिक पातळी खालावण्याच्या उद्योगात झटून गुंतली आहेत आणि त्यांचा जवळजवळ हाच एकमेव उद्योग आहे असे म्हणणे अतिशयोक्त ठरणार नाही. वस्तुतः त्यांच्या मदतीविना त्यांच्या वाचकांची सांस्कृतिक पातळी आधीच पुरेशी खालावलेली आहे. स्वतःच्या मालकांच्या, भांडवलदारांच्या, हितसंबंधांची सेवा बजावणारे आणि माशीला हत्तीचा आकार देण्यात वाकबगार असलेले

पत्रकार, डुकराला वठणीवर आणण्याचे उद्दिष्ट मात्र ठेवत नाहीत. खरे म्हणजे हे डुक्कर जबरदस्त पिसाळल्याचे त्यांना स्पष्ट दिसते आहे.

तुम्ही लिहिता: "आम्ही जेव्हा युरोपमध्ये होतो, तेव्हा आम्हाला कटु सत्याची जाणीव झाली की, युरोपीय माणसे आमचा तिटकारा करतात." हे विधान फारच "आत्मनिष्ठ" आहे आणि आत्मनिष्ठवादामधून तुम्हाला सत्याचा अंश काढता आला, तरी संपूर्ण सत्य त्याने तुमच्यापासून लपविले: युरोपमधील सर्व भांडवलदार परस्पर तिटकाऱ्याच्या वातावरणात राहतात हे तुमच्या ध्यानात आले नाही. लुटले गेलेले जर्मन फ्रान्सचा द्वेष करतात, तर सोन्याच्या अतिरेकापायी गुदमरलेले फ्रेंच ब्रिटिशांचा तिरस्कार करतात, त्याचप्रमाणे इटालियन फ्रेंचांचा तिटकारा करतात आणि सर्व भांडवलदार एकमुखाने सोविएत संघाचा तिटकारा करतात. इंग्रज लॉर्ड आणि दुकानदार यांच्याविषयीच्या द्वेषाने तीस कोटी हिंदुस्थानी पेटलेले आहेत; पंचेचाळीस कोटी चिनी जपान्यांचा आणि सर्व युरोपीयांचा तिरस्कार करतात. चीनला लुटण्याची सवय झालेले युरोपीय, जपान्यांचा द्वेष करायला सज्ज आहेत, कारण चिनी लोकांना लुटणे केवळ आपली मक्तेदारी आहे असे जपान्यांना वाटते. सर्वांविषयी सर्वांना वाटणारी ही तिरस्काराची भावना वाढत आहे, अधिक दाट बनत आहे, तिला अधिक दुर्गंध येत आहे. चिघळणाऱ्या जखमेप्रमाणे भांडवलदारांमध्ये ती सुजत आहे आणि मग कदाचित पृथ्वीवरील लोकांच्या सर्वोत्तम व अत्यंत निकोप रक्ताच्या परत एकदा नद्या वाहतील. दशलक्षावधी दणकट व्यक्तींचा युद्धामुळे नाश होईल. शिवाय अगणित संपत्तीचा आणि तिला बनविणाऱ्या कच्च्या मालाचा विध्वंस होईल. परिणामी, मानवजातीचे आरोग्य नष्ट होईल, तिचे धातूचे व इंधनाचे साठे रिते होतील, भांडवलदारांच्या राष्ट्रीय गटांमधील परस्परद्वेष युद्धामुळे नष्ट होणार नाही, हे सांगण्याची जरूरी नाही.

"वैश्विक मानवी संस्कृतीची सेवा करण्यास समर्थ आहोत" असे तुम्हाला वाटते आणि "रानटी अवस्थेच्या गर्तेत पडण्यापासून तिला वाचविणे तुमचे कर्तव्य आहे" अशी तुमची भावना आहे. फार छान. पण स्वत:ला एक साधा प्रश्न विचारा: ह्या संस्कृतीला वाचविण्यासाठी तुम्ही आज अथवा उद्या काय करू शकता? जाता जाता सांगायचे म्हणजे ही संस्कृती "वैश्विक-रीत्या मानवी" कधीच नव्हती आणि कामकरी लोकांनां अजिबात जबाबदार नसलेल्या व एका राष्ट्रजमातीविरुद्ध दुसऱ्या राष्ट्रजमातीला बिथरवणाऱ्या

राष्ट्रीय-भांडवलदारी सरकारी संघटना अस्तित्वात असताना तशी ती राहूच शकत नाही.

उदाहरणार्थ तुम्ही स्वत:ला प्रश्न विचारा : बेकारी नाहीशी करण्यासाठी, अथवा कामगारवर्गाच्या आरोग्यावर उपासमारीमुळे होणारा खंगण्याचा परिणाम टाळण्यासाठी, अथवा बालवेश्याव्यवसायाच्या प्रसाराला आळा घालण्यासाठी तुम्ही काय करू शकता? जनसमूहांचे खंगणे म्हणजे संस्कृती जिच्यातून उद्भवते त्या मातीचे खंगणे, हे तुम्हाला समजते काय? कदाचित तुम्हाला जाणीव आहे की, तथाकथित "सुसंस्कृत स्तर" नेहमीच जनसमूहांची निर्मिती होता. तुम्हाला हे उत्तम माहीत असले पाहिजे, कारण अमेरिकेमध्ये वर्तमानपत्रे विकणारी पोरे प्रेसिडेंटांच्या प्रतिष्ठेला वर पोहोचू शकतात, अशी प्रौढी मिरविण्याची तुम्हा अमेरिकनांना सवय आहे.

प्रेसिडेंटांच्या गुणांची नव्हे, तर पोरांच्या धूर्तपणाची नोंद करण्यासाठी केवळ मी हा उल्लेख केला. प्रेसिडेंटांच्या गुणांविषयी मला काहीही माहिती नाही.

आणखी एका प्रश्नावर तुम्ही चिंतन करू शकाल : ब्रिटनचे गुलाम म्हणून राहण्याची भूमिका देवाने देऊ केलेली नाही ह्याची तीस कोटी हिंदुस्थानींना जाणीव होऊ लागली असताना, पंचेचाळीस कोटी चिनी लोकांना युरोपीय व अमेरिकन भांडवलाचे गुलाम करणे शक्य आहे, ह्यावर तुमचा विश्वास बसतो का? जरा विचार करा : अब्जावधी कष्टकऱ्यांच्या शक्तींच्या आधारे हजारो लुटारू आणि साहसवादी कायमचे निवांत राहू इच्छितात! ही सामान्य स्थिती आहे असे तुम्ही म्हणता! तशी ती होती आणि आहेसुद्धा, पण तशी ती असलीच पाहिजे असे म्हणण्याची तुमची हिंमत आहे का? कोणे एके काळी, मध्ययुगात, प्लेगसुद्धा सामान्य समजला जात होता, पण आता प्लेग जवळजवळ नाहीसा झाला आहे आणि पृथ्वीवरील त्याची भूमिका भांडवलदारवर्ग वठवीत आहे. सबंध वर्णीय जगताला तो दूषित करीत आहे, श्वेतवंशाबद्दल अत्यंत घृणेची आणि चिडीची बाधा त्याला करीत आहे. भांडवलशाही वंशीय युद्धांना भडकवत आहे असे तुम्हाला, संस्कृतीच्या रक्षणकर्त्यांना, भासत नाही काय?

तुम्ही माझ्यावर आरोप करता की, मी "द्वेषाची शिकवण" देतो आणि त्याऐवजी मी "प्रेमाचा प्रचार" करावा असा मला सल्ला देता. कामगारांना शपथ घालण्यास मी समर्थ आहे अशी बहुधा तुमची समजूत झालेली दिसते :

भांडवलदारांवर प्रेम करा, कारण तुमची ताकद ते फस्त करतात; त्यांच्यावर प्रेम करा, कारण तुमच्या पृथ्वीच्या खजिन्यांची ते निष्फळ उधळपट्टी करतात; तुम्हाला नष्ट करणाऱ्या तोफा बनविण्यासाठी तुमच्या लोखंडाची ते उधळण करतात म्हणून ह्या माणसांवर प्रेम करा; ह्या हरामखोरांवर प्रेम करा, कारण त्यांच्यामुळे तुमची मुले उपाशीपोटी मरताहेत; ते स्वतः आरामात आणि तृप्त रहावेत म्हणून तुम्हाला नष्ट करणाऱ्यांवर प्रेम करा; भांडवल-दारावर प्रेम करा, कारण त्याचे चर्च तुम्हाला अज्ञानाच्या अंधकारात ठेवते.

बायबल अशाच धर्तीची काहीशी शिकवण देत आहे आणि ही आठवण ठेवून "ख्रिश्चन धर्माचा" तुम्ही "संस्कृतीप्रेमी" म्हणून संदर्भ देता. काळाच्या तुम्ही फार फार मागे आहात. "प्रेमाच्या आणि नम्रतेच्या तत्त्वा"च्या सांस्कृतिक प्रभावाबद्दल बोलण्याचे प्रामाणिक लोकांनी केव्हाच बंद केले आहे. आपल्या काळात ह्या प्रभावासंबंधी बोलणे अयोग्य आणि अशक्य आहे. ख्रिश्चन भांडवलदारांनी मायदेशी आणि वसाहतींमध्ये अशा दोन्ही ठिकाणी लीनता बिंबवली आहे व "जाळपोळ आणि तलवार" ह्यांच्या मदतीने स्वतःच्या गुलामांना लीनतेवर प्रेम करण्याची सक्ती केली आहे. "जाळपोळ आणि तलवार" ह्यांचा अवलंब ते कधी नव्हते एवढ्या मोठ्या प्रमाणात करू लागले आहेत. तुम्हाला माहीतच आहे की, आजकाल तलवारीची जागा मशिनगन आणि बाँबनी घेतली आहे व "वरच्या देवाच्या आवाजाने" सुद्धा घेतली आहे. पॅरिसचे एक वर्तमानपत्र बातमी देते:

"आफ्रिडींविरुद्धच्या युद्धात ब्रिटिशांनी एक धाडस केले आहे आणि त्याचा त्यांना उत्तम उपयोग होत आहे. अगम्य पर्वतांवरील पठारावर बंडखोरांच्या एका गटाने आश्रय घेतला आहे. अचानक त्यांच्या माथ्यावर खूप उंचावरून उडणारे एक विमान अवतरते. आफ्रिडी स्वतःची शस्त्रे घ्यायला धावतात. पण बाँब पडत नाहीत. त्याऐवजी, विमानामधून शब्द ओघळू लागतात. स्वर्गामधील एक आवाज त्यांच्या भाषेत आर्जवपूर्वक बोलू लागतो, त्यांनी शस्त्रे खाली ठेवावीत व ब्रिटिश साम्राज्याविरुद्धची निरर्थक स्पर्धा थांबवावी, अशी त्यांना विनंती करतो. आकाशवाणी ऐकून दचकलेल्या अनेक बंडखोरांनी खरोखरीच लढणे सोडून दिल्याचे प्रसंग घडले आहेत.

"फॅसिस्ट मिलिशियाच्या स्थापनेचा वर्धापनदिन साजरा करताना देवा-च्या आवाजाची युक्ती मिलानमध्ये परत वापरण्यात आली. फॅसिझमच्या कौतुकाचे काही मोजके शब्द दैवी वाणीमधून उच्चारलेले सबंध शहराने

ऐकले. जनरल बाल्बो यांचे बोलणे ऐकण्याचा योग आलेल्या मिलानवासींना आकाशवाणीमध्ये त्यांचा खर्ज आवाज ओळखू आला."

अशा रीतीने देवाचे अस्तित्व सिद्ध करण्यासाठी एक साधी युक्ती शोधण्यात आली आणि रानटी लोकांना शरण आणण्यासाठी देवाचा आवाज वापरण्यात आला. एक दिवस सानफ्रान्सिस्को अथवा वॉशिंग्टनच्या डोक्यावर देव अवतरेल आणि जपानी हेलात इंग्लिशमधून बोलेल, अशी अपेक्षा करायला हरकत नाही.

"थोर माणसांचे, चर्चच्या उपदेशकांचे" उदाहरण तुम्ही माझ्यासमोर धरता आहात. तुम्ही गंभीरपणे असे बोलत आहात ही खरेच गंमतीची गोष्ट आहे. चर्चची थोर माणसे कशाची आणि कशी बनली, हे आपण विचारायला नको. पण आधारासाठी त्यांच्यावर टेकताना, प्रथम त्यांच्या भक्कमपणाची आणि स्थैर्याची तुम्ही आधी खात्री करून घेणे इष्ट ठरेल. "चर्च" वरील तुमच्या विवेचनांमध्ये तुम्ही तो "अमेरिकन कल्पनावाद" दाखवता, जो केवळ प्रगाढ अज्ञानामधूनच उत्पन्न होऊ शकतो. प्रस्तुत बाबतीत, ख्रिश्चन चर्चच्या इतिहासाबद्दलच्या तुमच्या अज्ञानाचा एकच खुलासा असू शकतो की, माणसाच्या मनावर आणि सदसद्विवेकबुद्धीवर बळजबरी करणारी चर्च ही संघटना आहे, असे अमेरिकेतील रहिवाशांना स्वतःच्या कटु अनुभवांद्वारे माहीत होण्याचा कधी प्रसंगच आलेला नाही व युरोपातील रहिवाशांप्रमाणे ह्याचा गहिरा अनुभव त्यांना कधीच आलेला नाही. अखिल ख्रिस्ती धर्ममंडळांमध्ये "चर्चच्या थोर शिक्षकांचे" ज्या क्रूरतेने, महत्त्वाकांक्षेने आणि स्वार्थाने रक्तपाती दंगे घडतात, त्यांची तुम्ही ओळख करून घेतली पाहिजे. विशेषतः इफेससच्या मंडळातील भोंदूगिरीच्या कहाणीपासून तुम्हाला बरेच काही ऐकायला मिळेल. पाखंडीपणांच्या इतिहासाचे तुम्ही थोडे वाचन केले पाहिजे, ख्रिश्चन धर्माच्या आरंभीच्या शतकांमधील "पाखंड्यां"च्या उच्चाटनांशी, ज्यूंच्या हत्याकांडांशी, आल्बीगेनीज आणि ताबोराइटांच्या कत्तलींशी, ख्रिस्ताच्या चर्चच्या एकूण रक्तपाती धोरणाशी, तुम्ही परिचय करून घेतला पाहिजे. धर्मविचारिणी सभेचा इतिहास कमी-शिक्षितांना स्वारस्यपूर्ण आहे, पण तुमचा देशबांधव वॉशिंग्टन ली याने सांगितलेल्या हकीकतीनुसार मात्र अर्थातच नव्हे. धर्मविचारिणी सभेच्या स्थापनेत पुढाकार घेणाऱ्या व्हॅटिकनच्या नियंत्रण मंडळाने ली यांच्या लेखनाला मंजुरी दिलेली आहे. ह्या सर्व गोष्टींचा जर तुम्ही परिचय करून घेतलात, तर अगदी सहज शक्य आहे

की, अल्पसंख्यांची बहुसंख्यांवर सत्ता दृढ करण्यासाठी चर्चच्या पाद्र्यांनी अत्यंत उत्साहाने कार्य केले होते, अशा निष्कर्षाला तुम्ही याल. त्यांनी पाखंडीपणांविरुद्ध लढे दिले, कारण चर्चच्या माणसांच्या लबाडीचा कामकरी जनसमूहांना अंत:प्रेरणेने सुगावा लागल्यामुळे त्यांच्यातच पाखंडी विचारांचा जन्म झाला होता. चर्चच्या माणसांनी गुलामांच्या धर्माचा पुरस्कार केला. मालकांनी हा धर्म केवळ गैरसमजुतींपायी अथवा गुलामांच्या भीतीपायी स्वीकारला होता. तुमचे इतिहासकार व्हॅन लोन 'महान ऐतिहासिक घोटाळे' ह्या लेखात दावा करतात की, 'शुभ वर्तमाना' मधील शिकवणींसाठी नव्हे, तर त्यांच्या विरुद्ध चर्चला लढावे लागले होते. ते म्हणतात की, जेरूसलेम नष्ट करण्यात टीटसने[221] ब्रह्मघोटाळा केला. कारण पॅलेस्टाईनमधून हकालपट्टी झालेले ज्यू सगळया जगभर विखुरले आणि त्यांनी स्थपन केलेल्या समाजांमध्येच ख्रिश्चन धर्म परिपक्व झाला व वाढला. आणि भांडवलदारी राज्यांना मार्क्स व लेनिन यांचे विचार जेवढे घातक आहेत, तेवढाच ख्रिश्चन धर्म रोमन साम्राज्याला घातक होता.

तर प्रत्यक्षात हे असे होते आणि हे असे आहे: 'शुभ वर्तमाना' मधील भाबड्या कम्युनिझमविरुद्ध ख्रिश्चन चर्च लढले. त्याच्या संपूर्ण "इतिहासा"चा हा आशय आहे.

सध्याच्या दिवसात चर्च काय करते आहे? अर्थात सर्वप्रथम ते प्रार्थना करते. यॉर्कचे आर्चबिशप आणि कँटरबरीचे आर्चबिशप – ज्या माणसाने सोविएत संघाविरुद्ध "धर्मयुद्ध" करा अशी काहीशी शिकवण दिली – अशा ह्या दोन आर्चबिशपनी एक नवी प्रार्थना रचली आहे. तिच्यात इंग्लिश ढोंगाचा बेमालूमरीत्या इंग्लिश विनोदाशी मेळ घातलाय. "आमचे फादर" ह्या प्रार्थनेच्या धर्तीवर ही काहीशी प्रदीर्घ रचना आहे. पुढील शब्दांमध्ये आर्चबिशप देवाला आवाहन करतात:

"कर्ज आणि समृद्धीची पुन:स्थापना करण्याच्या आमच्या सरकारच्या धोरणासंबंधात, तुझ्या इच्छेप्रमाणे होवो. हिंदुस्थानच्या भावी राज्यघटनेसाठी जे काही हाती घेण्यात येत आहे त्या सर्व गोष्टींसंबंधात, तुझ्या इच्छेप्रमाणे होवो. आगामी नि:शस्त्रीकरण परिषदेसंबंधात आणि पृथ्वीवर शांतता प्रस्थापित करण्यासाठी हाती घेण्यात येणाऱ्या सर्व गोष्टींसंबंधात, तुझ्या इच्छेप्रमाणे होवो. व्यापार, कर्ज आणि परस्पर सख्य यांच्या पुन:स्थापनेसंबंधात, आम्हाला आमची रोजची भाकर दे. सामायिक कल्याणासाठी सर्व वर्गांचे सहकार्य

घडवण्यासंबंधात, आम्हाला आमची रोजची भाकर दे. राष्ट्रीय गर्व बाळगल्याचा अपराध जर आमच्याकडून घडला असेल आणि आमच्यापरीने सर्वोत्तमरीत्या इतरांना मदत करण्याऐवजी, इतरांवर सत्ता गाजवण्यात जर आम्हाला अधिक मोठे समाधान लाभले असेल, तर आमच्या पापांची आम्हाला क्षमा कर. आमच्या घडामोडींबाबत आम्ही स्वार्थी वर्तन केले आहे आणि इतरांच्या हिताऐवजी आमच्या हिताला व आमच्या वर्गाच्या हिताला आम्ही प्राधान्य दिले आहे, आमच्या पापांना क्षमा कर."

भेदरलेल्या दुकानदारांची ठरीव प्रार्थना! ह्या प्रार्थनेदरम्यान, त्यांच्या "पापांना" देवाने "क्षमा" करावी म्हणून सुमारे डझनभर वेळा ते देवाची आळवणी करतात, पण ती पापे इतःपर करणार नाही असे एकदाही कबूल करण्याची भाषा त्यांच्या तोंडून निघत नाही. आणि फक्त एका बाबतीत देवाच्या "क्षमेची" ते मागणी करतात:

"राष्ट्रीय उर्मटपणाच्या आम्ही आहारी गेलो आहोत, इतरांना मदत करण्यात नव्हे तर इतरांवर सत्ता गाजवण्यात आम्हाला समाधान लाभले आहे, हे देवा, आम्हाला क्षमा कर!"

ह्या पापाबद्दल आम्हाला क्षमा कर, पण पापाचरण थांबविणे आम्हाला शक्य नाही, असे ते म्हणतात. बहुसंख्य इंग्लिश धर्मगुरुंनी ही क्षमायाचनेची प्रार्थना नाकारली. तिचे वाचन करणे विचित्र आणि अपमानास्पद ठरेल, असे कदाचित त्यांचे मत पडले असेल.

लंडन येथे सेंट पॉल कॅथेड्रलमध्ये २ जानेवारी रोजी ब्रिटिश देवाच्या सिंहासनासमोर ही प्रार्थना "सादर करण्यात" येणार होती. ज्या धर्मगुरुंना ही प्रार्थना आवडली नाही, त्यांना ती न वाचण्याची परवानगी कॅंटरबरीच्या आर्चबिशपनी दिली.

ख्रिश्चन चर्च किती मूर्ख आणि ग्राम्य बाष्कळपणा करू शकते हे तुम्ही पाहता. धर्मगुरुंनी स्वतःच्या देवाला वरिष्ठ दुकानदाराच्या पातळीला मनोरंजकरीत्या खाली कसे आणले आहे व युरोपातील सर्वोत्तम दुकानदारांच्या व्यापारी उलाढालींमध्ये कसे गोवले आहे पहा. पण फक्त इंग्लिश धर्मगुरुंबद्दल बोलणे अन्यायाचे ठरेल. इटालियनांनी पवित्र भुताची बँक स्थापन केली आहे हे विसरणे योग्य ठरणार नाही. रशियन स्थलांतरितांचे पॅरिसमधील वृत्तपत्र बातमी देते की, १५ फेब्रुवारीला फ्रान्समध्ये म्यूलूएझे येथे:

"अ‍ॅबे एजी यांच्या निर्देशनाखालील कॅथलिक 'युनियन' पब्लिशिंग

हाऊसतर्फे चालवण्यात येणाऱ्या पुस्तकभांडाराच्या मॅनेजरला आणि विक्रेत्याला पोलीस अधिकाऱ्यांनी अटक करण्याचा हुकूम दिला. जर्मनीहून आयात केलेली संभोग छायाचित्रे व लैंगिक विषयांवरची पुस्तके पुस्तकभांडारात विकली जात होती. "माल" जप्त करण्यात आला आहे. काही पुस्तके केवळ संभोगविषयक नाहीत, तर धर्माची निंदा आणि कुटाळी करणारी आहेत."

अशा प्रकारच्या शेकडो वस्तुस्थिती दाखविता येतील आणि त्या एकच गोष्ट सूचित करतात: चर्च भांडवलशाहीचे आश्रित आणि नोकर आहे व भांडवलशाहीला नष्ट करणाऱ्या रोगांचीच चर्चला बाधा झाली आहे. "चर्चच्या नैतिक अधिकाराला" भांडवलदारांनी मान्य करण्याचा एक काळ होता असे गृहीत धरायचे ठरविले, तर हा "मनाच्या पोलीसाच्या" अधिकार होता असे मान्य केले पाहिजे. कामकरी जनतेला दडपून टाकण्यात मदत करणाऱ्या एका संघटनेचा हा अधिकार होता. चर्चने "सांत्वना केली" असे तुम्ही म्हणता? मी हे नाकारत नाही. पण बुद्धीला नष्ट करणाऱ्या पद्धतींपैकी ही एक सांत्वना-पद्धत आहे.

छे: छे:, श्रीमंतावर प्रेम कर असा गरीबाला उपदेश करण्याचा, मालकावर प्रेम कर असा कामगाराला उपदेश करण्याचा, माझा व्यवसाय नाही. सांत्वना करण्यास मी समर्थ नाही. मला फार उत्तम माहीत आहे आणि फार पूर्वीपासून माहीत आहे की, सबंध जग द्वेषाच्या वातावरणाने कोंदून गेलेले आहे. आता ते अधिक दाट बनत असल्याचे, अधिकाधिक क्रियाशील व परोपकारी बनत असल्याचे मला आढळत आहे.

"व्यावहारिक माणसे होऊ इच्छिणाऱ्या तुम्हा मानवतावाद्यांना" आता जाणीव होण्याची वेळ येऊन ठेपली आहे की, जगामध्ये दोन द्वेष कार्यान्वित आहेत. एक द्वेष लुटारूंमध्ये निर्माण झाला आहे. त्यांच्यातील परस्परस्पर्धा आणि भविष्याविषयीची त्यांची भीती यांच्यापायी तो उत्पन्न झाला आहे. भविष्यकाळात लुटारूंचा नाश घडणे अपरिहार्य आहे. दुसरा द्वेष कामगारवर्गीयांमध्ये निर्माण झाला आहे. आयुष्य जसे आहे त्याबद्दलच्या तिटकाऱ्यापायी तो उत्पन्न झाला आहे आणि कामगारवर्गाच्या सत्ता गाजविण्याच्या हक्काच्या जाणीवेने तो अधिकाधिक तेजस्वीपणे उजळून उठत आहे. ह्या दोन्ही द्वेषभावना अशा तीव्रतेला पोहोचल्या आहेत की, काहीही व कुणीही त्यांच्यात समन्वय घडवू शकणार नाही. त्यांचे शारीरिक द्योतक असलेल्या वर्गांमध्ये

लढाई होणे अटळ आहे आणि कामगारवर्गीयांच्या विजयानेच केवळ जगाची द्वेषापासून मुक्तता घडेल.

तुम्ही लिहिता: "इतर अनेकांप्रमाणे आम्हालाही असे वाटते की, तुमच्या देशातील कामगारवर्गाच्या हुकूमशाहीमुळे शेतकऱ्यांवर अत्याचार घडत आहेत." सामाजिक परिस्थितीचा प्रामाणिकपणे अभ्यास करणाऱ्या वैज्ञानिक विचाराने साध्य केलेले शिखर म्हणजे मार्क्स आणि लेनिन यांच्या शिकवणी आहेत व सामाजिक न्यायाकडे, संस्कृतीच्या नव्या प्रकारांकडे, थेट जाण्याचा रस्ता केवळ ह्या शिकवणींच्या शिखरावरूनच स्पष्टपणे दिसतो, अशी एव्हाना जाणीव होऊ लागलेल्या काही अत्यंत थोड्या बुद्धिजीवींप्रमाणे तुम्ही जीवनाचा विचार करा, असा मी सल्ला देईन. ज्या वर्गाचा संपूर्ण इतिहास म्हणजे श्रमिक मानवजातीच्या समूहावरील –कामगारांच्या आणि शेतकऱ्यांच्या– शारीरिक व मानसिक अत्याचारांची एक प्रदीर्घ कहाणी आहे, त्या वर्गाशी असलेले तुमचे जवळचे नाते निदान काही काळापुरते थोडा प्रयत्न करून विसरा. असा प्रयत्न करा आणि तुम्हाला समजेल की, तुमचा वर्ग हाच तुमचा शत्रू आहे. कार्ल मार्क्स खूप शहाणा माणूस होता आणि मिनर्व्हा देवतेप्रमाणे तो ज्युपिटरच्या मस्तकामधून जगात अवतीर्ण झाला असे मानणे चुकीचे ठरेल. तसे नाही. न्यूटन आणि डार्विन यांच्या सिद्धांतांप्रमाणेच, शास्त्रीय अनुभवाच्या आधारावर प्रतिभावंताने रचलेल्या वरवंडीप्रमाणे त्यांची शिकवण आहे. लेनिन मार्क्सपेक्षा अधिक सोपे आहेत आणि शिक्षक म्हणून तेवढेच शहाणे आहेत. तुम्ही ज्याची सेवा बजावता त्या वर्गाचे प्रथम सत्ता आणि वैभव-काळातील दर्शन तुम्हाला ते घडवतील. रक्तपात, धार्मिक कपटभाषा आणि खोटेपणा यांच्यामधून, अमानुष अत्याचारांमधून, त्याने स्वतःला अनुरूप "संस्कृती" कशी उभारली, ह्याचे दर्शन तुम्हाला ते घडवतील. मग ह्या संस्कृतीच्या ऱ्हासाची प्रक्रिया तुम्हाला ते दाखवतील. तिचा पुढील, सद्यः-कालीन, भ्रष्टाचार तुम्ही स्वतःच पाहू शकता. नेमक्या ह्या प्रक्रियेमधूनच धास्ती उद्‌भवते व तुम्ही मला लिहिलेल्या पत्राद्वारे तिला अभिव्यक्ती लाभली आहे.

"अत्याचारा" बद्दल बोलू या. कामगारवर्गीय अधिसत्ता तात्पुरती बाब आहे. निसर्गाच्या आणि भांडवलदारी राज्याच्या कोटयवधी माजी गुलामांना पुनर्शिक्षित करून त्यांचे त्यांच्या देशाच्या व त्याच्या सर्व संपदेच्या एकच एक मालकात रूपांतर घडविणे आवश्यक आहे. जेव्हा सर्व कामकरी लोक,

सर्व शेतकरीवर्ग, समान सामाजिक आणि आर्थिक परिस्थितींमध्ये राहू लागेल, स्वतःच्या कुवतीनुसार काम करणे आणि स्वतःच्या गरजांनुसार मोबदला प्राप्त करणे जेव्हा प्रत्येक व्यक्तीला शक्य होईल, तेव्हा कामगारवर्गीय अधिसत्ता गरज म्हणून अस्तित्वात राहणार नाही. तुमच्या आणि "इतर अनेकांच्या" मनातील "अत्याचारा"ची कल्पना म्हणजे गैरसमजूत आहे. पण अनेकदा, सोविएत संघाच्या कामकरी वर्गाविषयीचे आणि त्याच्या पक्षा-विषयीचे ते कुभांड आहे; त्यांच्याविषयीची निष्कारण नालस्ती आहे. सोविएत संघातील कामगारवर्गाच्या सांस्कृतिक कार्याला – देशाचे पुनरुज्जीवन करण्याच्या आणि नवे आर्थिक प्रकार संघटित करण्याच्या कार्याला – बदनाम करण्याच्या उद्दिष्टाने, सोविएत संघातील चालू असलेल्या सामाजिक प्रक्रियेला "अत्याचार" असा शब्दप्रयोग सोविएत कामगारवर्गाच्या शत्रूंनी वापरला आहे.

सक्तीबद्दल बोलणे योग्य ठरेल असे मला ह्याबाबत वाटते. अत्याचारा-पेक्षा ही बाब अगदी वेगळी आहे. तुम्ही मुलांना साक्षर बनायला शिकवता तेव्हा त्यांच्यावर अत्याचार करत असता का? सोविएत संघाचा कामगारवर्ग आणि त्याचा पक्ष किसानवर्गाला सामाजिकदृष्ट्या व राजकीयदृष्ट्या साक्षर व्हायला शिकवत आहे. त्याचप्रमाणे तुम्हा लोकांना, बुद्धिजीवींना, कुणाचीतरी सक्ती जाणवत आहे अथवा "घण आणि ऐरण यांच्यादरम्यान" सापडल्याची शोककारक भावना जाणवत आहे. तुम्हालासुद्धा सामाजिक आणि राजकीय साक्षरतेचे मूळ धडे कुणीतरी शिकवत आहे, पण अर्थात तो कुणीतरी म्हणजे मी नव्हे.

सर्व देशांमध्ये किसानवर्गामधून – दशलक्षावधी छोटे मालक – लुटारू व परपुष्ट निर्माण होतात. ह्याच मातीतून राक्षसी कुरूपतेसह भांडवलशाही निर्माण झाली. शेतकऱ्याच्या सर्व शक्ती, क्षमता आणि गुणवत्ता स्वतःच्या दरिद्री मालमत्तेच्या चिंतेत गुरफटलेल्या असतात. छोट्या मालकाचा सांस्कृ-तिक वेडपटपणा कोट्याधीशाच्या सांस्कृतिक वेडपटपणाशी पूर्णतः समान असतो. तुम्हा बुद्धिजीवींनी हे नीट पाहिले पाहिजे आणि जाणून घेतले पाहिजे. रशियामध्ये ऑक्टोबर क्रांती होण्यापूर्वी शेतकरी सतराव्या शतकातील परिस्थितींमध्ये रहात होते आणि रशियन स्थलांतरितसुद्धा ही वस्तुस्थिती नाकारण्याचे धाडस करणार नाहीत. सोविएत राजवटीविरुद्धचा त्यांचा राग पराकोटीच्या मूर्खतेपर्यंत पोहोचला असला तरीसुद्धा.

शेतकरी चतुर्थ दर्जाचे, अर्धरानटी लोक राहू नयेत. धूर्त शेतमजूर, जमीनदार आणि भांडवलदार यांचे ते भक्ष्य बनू नयेत. कस निघून गेलेल्या जमिनीच्या अगदी छोटचा छोटचा तुकडचांवर गुन्हेगारांप्रमाणे त्यांना राबावे लागू नये. स्वतःच्या जमिनीला खतपाणी घालण्यास असमर्थ असलेल्या, मशागतीला यंत्रांचा वापर करू न शकणाऱ्या अथवा शेतकीशास्त्राचा विकास करू न शकणाऱ्या दरिद्री, निरक्षर मालकाला खाऊ घालण्यास असमर्थ असणाऱ्या ओसाड जमिनीवर त्यांना राबावे लागू नये. भयाण माल्थस[222] सिद्धांतांचे समर्थन शेतकऱ्यांनी करू नये. माझ्या मते त्या सिद्धांतामागे धार्मिक विचाराचा कपटीपणा दडलेला आहे. स्वतःच्या स्थानाची वास्तवता व अपमानास्पदता जाणून घेण्यास शेतकरीसमूह जर अद्याप असमर्थ असतील, तर सक्तीचा वापर करूनसुद्धा त्यांच्यात ही जाणीव बिंबवणे कामगारवर्गाचे कर्तव्य आहे. अर्थात अशा सक्तीची गरज नाही, कारण १९१४-१८ च्या कत्तलींच्या यातना भोगलेला आणि ऑक्टोबर क्रांतीने जागृत झालेला सोविएत संघामधला शेतकरी इतःपर आंधळा नाही व व्यवहारी विचार करण्यास तो समर्थ आहे. त्याला यंत्रांचा आणि खतांचा पुरवठा करण्यात येत आहे, सर्व शाळांचे रस्ते त्याला मोकळे आहेत. दरसाल हजारो शेतकरी मुले अभियंत्यांचे, कृषितज्ज्ञांचे आणि वैद्यकशास्त्राचे अभ्यासक्रम पत्करत आहेत. कामगारवर्गाचे प्रतिनिधित्व करणारा पक्ष सोविएत संघात एकच एक मालक निर्माण करण्याचा प्रयत्न करीत आहे, १६०,०००,००० डोक्यांचा व ३२०,०००,००० हातांचा एकच एक मालक निर्माण करण्याचा प्रयत्न करीत आहे, ह्याची शेतकऱ्याला समज येऊ लागली आहे आणि हीच प्रमुख गोष्ट त्याने समजून घेणे आवश्यक आहे. आपल्या देशात करण्यात येणारी प्रत्येक गोष्ट सर्वांसाठी आहे आणि केवळ श्रीमंतांच्या एका छोटचा गटासाठी नाही, हे शेतकरी पाहतो आहे. सोविएत संघात त्याच्यासाठी फक्त उपयुक्त गोष्टी घडत आहेत, हे शेतकऱ्याला दिसत आहे. त्याच्या जमिनीची सुपिकता वाढविण्यासाठी आणि त्याचे श्रम हलके करण्यासाठी देशातील सव्वीस शेतकी संशोधन संस्था काम करीत आहेत, हे तो पाहतो आहे.

शतकानुशतकांप्रमाणे कंगाल खेडचांमध्ये राहण्याची शेतकऱ्याची इच्छा नाही, तर शेतकी शहरांमध्ये त्याला रहायचे आहे. तेथे त्याच्या मुलांसाठी चांगल्या शाळा आणि चांगली पाळणाघरे असतील; खुद्द त्याच्यासाठी नाटचगृहे, क्लब, ग्रंथालये आणि सिनेमागृहे असतील. शेतकऱ्याला वाढत्या

प्रमाणात ज्ञानपिपासा निर्माण होत आहे. सुसंस्कृत राहण्याची त्याची आवड वाढत आहे. जर शेतकऱ्याने हे सर्व समजून घेतले नसते, तर कामगारांच्या आणि शेतकऱ्यांच्या संयुक्त शक्तींमधून गेल्या पंधरा वर्षांत सोविएत संघात भव्य फलश्रुती साध्य करता आल्या नसत्या.

भांडवलदारी देशांमध्ये कामकरी लोक म्हणजे यंत्रशक्ती आहेत आणि त्यांच्या समूहात स्वतःच्या श्रमाचे सांस्कृतिक महत्त्व न जाणणारे अडाणी आहेत. तुमच्या देशांमध्ये राष्ट्रीय शक्तींच्या लुटारूंच्या, कामकरी जनतेवर परपुष्ट होणाऱ्यांच्या संघटना, ट्रस्ट ह्या मालक आहेत. त्या एकमेकींमध्ये झगडे करतात, पैशामार्फत कार्य करतात, एकमेकींना नष्ट करण्याचा प्रयत्न करतात. सट्टेबाजारात भयानक उलथापालथी घडवून आणतात. आणि आता सरतेशेवटी, त्यांच्या अराजकवादामुळे देशावर अभूतपूर्व अरिष्ट कोसळले आहे. कोटचवधी कामगार उपासमारीमुळे मरत आहेत. राष्ट्राचे आरोग्य निष्फळरीत्या नष्ट होत आहे. बालमृत्यूंचे प्रमाण भयानकपणे वाढत आहे, आत्महत्या वाढल्या आहेत आणि संस्कृतीच्या मूळ मातीचा – तिच्या सजीव मानवी शक्तीचा – क्षय होत आहे. तरीसुद्धा, बेकारांच्या तातडीच्या मदतीसाठी ३७.५ कोटी डॉलर मंजूर करण्याचा लाफोल्लेत्त – कास्टीगन कायदा तुमच्या सेनेटने फेटाळून लावला. 'न्यूयॉर्क अमेरिकन'मध्ये प्रकाशित झालेली आकडेवारी दाखविते की, न्यूयॉर्कमध्ये १९३० मध्ये १५३७३१ बेकार होते आणि घरभाडे न भरल्याबद्दल त्यांच्या कुटुंबियांना घरांमधून बाहेर काढण्यात आले, तर बाहेर काढण्यात आलेल्यांचा १९३१ चा आकडा १९८७३८ होता. यंदाच्या जानेवारीत, न्यूयॉर्कमध्ये दररोज शेकडो बेकारांना त्यांच्या घरांमधून हाकलून लावण्यात येत होते.

सोविएत संघामध्ये राज्यकारभार करण्याचे आणि कायदे बनवण्याचे काम कामगार व शेतकऱ्यांचा एक सुजाण विभाग करतात. ह्या शेतकऱ्यांच्या विभागाला आता समजले आहे की, जमिनीची खाजगी मालकी नष्ट केली पाहिजे, शेतांचे सामाजिकीकरण केले पाहिजे, यांत्रिक पद्धतीने मशागत केली पाहिजे; त्यांना समज आली आहे की, गिरण्या व कारखान्यांमध्ये काम करणाऱ्या कामगारांप्रमाणेच आपणही कामगार आहोत अशी स्वतःची मानसशास्त्रीय पुनर्घडण त्यांनी केली पाहिजे. दुसऱ्या शब्दांमध्ये सांगायचे तर, त्यांनी देशाचे अस्सल आणि एकमेव मालक बनले पाहिजे. शेतकरी सामुदायिकवाद्यांची आणि कम्युनिस्टांची संख्या सतत वाढत आहे. भूदासपद्धतीच्या

वारशामधून नवी पिढी स्वतःला जेव्हा मुक्त करील, शतकानुशतकांच्या गुलामी अस्तित्वामधून जन्माला आलेल्या भोळया समजुतींपासून नवी पिढी स्वतःला जेव्हा मुक्त करील, तेव्हा ही संख्या अधिक वेगाने वाढेल.

सोविएत संघात खालून कायदे तयार होतात, कामकरी समूहांमध्ये त्यांचा उद्भव होतो व त्यांच्या महत्त्वाच्या कार्यांमधून ते प्रवाहित होतात. कामगारांच्या आणि शेतकऱ्यांच्या श्रमप्रक्रियांमधून जे परिपक्व बनते – समानांचा समाज निर्माण करणे हे त्या श्रमाचे मुख्य उद्दिष्ट आहे – तेवढेच फक्त सोविएत सरकार व पक्ष सूत्रबद्ध करतात आणि कायदेशीररीत्या त्याची अंमलबजावणी करतात. पक्ष एवढ्याच मर्यादेपर्यंत हुकूमशहा आहे की, कामकरी समूहांच्या मज्जा-मेंदू व्यवस्थेचे तो संयोजन केंद्र आहे. प्रत्येक व्यक्तीच्या आणि लोकसंख्येतील संपूर्ण समूहाच्या गुणांच्या व क्षमतांच्या विकासाला स्वातंत्र्य आणि संधी उपलब्ध करून देता याव्यात म्हणून शारीरिक शक्तीच्या जास्तीत जास्त भागाचे शक्य त्या वेगाने बौद्धिक शक्तीमध्ये रूपांतर घडविणे, हे पक्षाचे उद्दिष्ट आहे.

व्यक्तिवादाचा स्वीकार केलेले भांडवलदारी राज्य स्वतःच्या हितसंबंधांना आणि परंपरांना अनुसरून युवकांना दक्षपणे शिक्षित करते. अर्थात असे घडणे स्वाभाविक आहे. पण आम्हाला असे आढळते की, नेमके भांडवलदारी समाजातील युवकांमध्येच बव्हंशरीत्या अराजकी विचार व सिद्धांत निर्माण झाले होते व निर्माण होत आहेत. हे अस्वाभाविक आहे. लोक ज्यामध्ये घुसमटत आहेत त्या वातावरणाच्या विचित्र आणि रोगट अवस्थेचे हे निदर्शक आहे. परिणामी, व्यक्तीला अमर्याद स्वातंत्र्य साध्य व्हावे म्हणून समाजाचा नाश करण्याची स्वप्ने ते पाहू लागतात. तुम्हाला कल्पना आहेच की, तुमचे युवक केवळ अशी स्वप्ने पहात नाहीत, तर त्यांच्यानुसार वागतात. युरोपीय वर्तमानपत्रांमध्ये तुमच्या आणि युरोपीय भांडवलदारी युवकांच्या "चेष्टां"च्या बातम्या – गुन्हेगारी स्वरूपाच्या चाळयांच्या – वारंवार प्रसिद्ध होत असलेल्या आमच्या दृष्टोत्पत्तीस येत आहे. हे गुन्हे भौतिक गरजांपायी घडत नाहीत, तर "कंटाळवाण्या जीवना"पायी, कुतूहलापायी, "थरारकते"च्या इच्छेपायी घडतात आणि ह्या सर्व गुन्ह्यांच्या तळाशी व्यक्ती व तिचे जीवन यांच्याबद्दलचे अत्यंत कनिष्ठ मत असते. कामगारांच्या आणि शेतकऱ्यांच्या अत्यंत गुणी प्रजेला स्वतःमध्ये सामावून घेऊन व स्वतःच्या हितसंबंधांसाठी तिला सक्तीने राबवून, "विशिष्ट वैयक्तिक समृद्धी", एक आरामशीर गुंफा,

एक सोयीस्कर बीळ साध्य करण्याच्या व्यक्तीच्या "स्वातंत्र्या"ची भांडवलदारवर्ग बढाई मारतो. अर्थात तुम्ही नाकारणार नाही की, ग्राम्य समृद्धीच्या वाटेवर, भांडवलदारी आयुष्यातील परिस्थितींनी वाटेत ठेवलेल्या अडथळयांना ओलांडून जाण्यास असमर्थ ठरल्यामुळे, तुमच्या समाजातील हजारो गुणी माणसे नष्ट होत आहेत. निष्फळ अंत घडलेल्या गुणी माणसांच्या वर्णनांनी युरोप व अमेरिकेतील साहित्य गच्च भरलेले आहे. भांडवलदारवर्गाचा इतिहास हा त्याच्या मानसिक दारिद्र्याचा इतिहास आहे. आपल्या काळात कोणत्या गुणांची तो प्रौढी मिरवू शकेल? विविध हिटलरांविना, गौरवोन्मादाची बाधा झालेल्या खुज्या माणसांविना, प्रौढी मिरविण्यास त्याच्यापाशी दुसरे काहीही नाही.

सोविएत संघातील लोक पुनरुत्थानाच्या युगात प्रवेश करीत आहेत. ऑक्टोबर क्रांतीने लक्षावधी गुणी लोकांना महत्त्वाच्या कार्यांना प्रवृत्त केले आहे, पण कामगारवर्गाने स्वतःसमोर धरलेल्या महान ध्येयांच्या पूर्तीसाठी त्या सर्वांची संख्या अद्याप फारच तोकडी आहे. सोविएत संघात एकही बेकार नाही. आणि मानवी प्रयत्नांच्या सर्व क्षेत्रांमध्ये जरी कधीही व कुठेही नव्हत्या एवढ्या वाढत्या वेगाने काम चालू असले, तरी शक्ती अद्याप अपुऱ्या पडत आहेत.

तुम्हा बुद्धिजीवींनी, "संस्कृताच्या मालकांनी," समजून घेतले तर बरे होईल की, कामगारवर्गाने एकदा स्वतःच्या हाती राजकीय सत्ता घेतली, म्हणजे सृजनशील सांस्कृतिक प्रयत्नांना विशाल संधी तुम्हाला उपलब्ध होतील.

भांडवलदारवर्ग संस्कृतीचा कट्टर वैरी आहे आणि इतःपर वैराशिवाय दुसरी कोणतीही भावना त्याच्यात असणे शक्य नाही. भांडवलदारी वास्तवतेने, भांडवलदारी राज्यांच्या संपूर्ण व्यवहाराने, ह्या सत्याला दुजोरा दिलेला आहे. सार्वत्रिक निःशस्त्रीकरणाचा सोविएत संघाचा प्रकल्प भांडवलदारांनी नाकारला. एवढी एकच गोष्ट आम्ही असे विधान करण्यास पुरेशी समर्थनीय आहे की, भांडवलदार सामाजिकदृष्ट्या धोकेबाज लोक आहेत, नव्या महायुद्धाची तयारी ते करत आहेत. तीव्र संरक्षणसिद्धतेच्या परिस्थितीत ते सोविएत संघाला ठेवत आहेत; सोविएत संघावर हल्ला करण्याची तयारी करणाऱ्या आणि ह्या महाप्रचंड देशाला स्वतःची वसाहत, स्वतःची बाजारपेठ बनवू पाहणाऱ्या भांडवलदारांविरुद्ध, संरक्षणअस्त्रे उत्पादन करण्यासाठी

कामगारवर्गाला प्रचंड मौलिक वेळ आणि साधनसामग्री खर्च करायला भाग पाडत आहेत. भांडवलदारांविरुद्ध स्वत:चे रक्षण करण्यासाठी सोविएत संघातील लोकांना प्रचंड प्रमाणात शक्ती व साधने खर्च करावी लागत आहेत. वस्तुत: त्यांचा वापर मानवजातीच्या सांस्कृतिक पुनरुज्जीवनाला चालना देण्यासाठी केल्यास निर्विवाद हितकर ठरेल, कारण सोविएत संघातील उभारणी प्रक्रिया अखिल मानवजातीच्या दृष्टीने महत्त्वाची आहे.

द्वेषामुळे आणि भविष्यकाळाच्या भीतीने वेडपट बनलेला भांडवलदारांचा दुर्गंधमय परिसर वाढत्या संख्येने वेडे निर्माण करीत आहे. आपण कोणत्या आरोळ्या ठोकत आहोत ह्याची त्या वेड्यांना अजिबात जाण नाही. त्यांच्या-तील एकजण "युरोपातील सभ्य सत्ताधारी आणि मुत्सद्दी" यांना आवाहन करतो: "तिसरी इंटरनॅशनल[223] चिरडून टाकण्यासाठी युरोपने पिवळ्या वंशाचा वापर करण्याची वेळ येऊन ठेपली आहे." ह्या वेड्याने स्वत:च्याच जातीच्या "सभ्य मुत्सद्दी व सत्ताधारी" यांची स्वप्ने आणि इरादे बरळले असणे अगदी सहज शक्य आहे. हा वेडा जे मोठ्यांदा ओरडला, ते करण्याचा गंभीरपणे विचार करणारे "सभ्य गृहस्थ" अस्तित्वात असणे अगदी सहज शक्य आहे. युरोप आणि अमेरिकेवर अदम्य "सभ्य गृहस्थ" सत्ता गाजवतात. हिंदुस्थान, चीन, इंडोचीन येथील घडामोडी युरोपीय लोकांविषयी व एकूण "गोऱ्यां"विषयी वांशिक द्वेष भडकवण्यास कारणीभूत ठरतील. हा तिसरा द्वेष असेल. तुम्ही, मानवतावाद्यांनो, ह्यावर चिंतन केलेत तर बरे होईल की, तुम्हाला अथवा तुमच्या मुलांना ह्या द्वेषाची गरज आहे काय? आणि जर्मनीतील "वांशिक शुद्धते"च्या शिकवणीमधून, म्हणजे परत एकदा वांशिक द्वेषामधून, तुम्हाला कोणत्या चांगल्या गोष्टीचा लाभ होणार आहे? हा एक नमुना:

"गोएथेच्या आगामी शंभराव्या पुण्यतिथीनिमित्त वायमार येथे येणाऱ्या गेरहार्ट हॉप्टमान्न[224], थॉमस मान्न,[225] वॉस्टर व्हॉन मोलो आणि सोरबोन्नचे प्राध्यापक हेन्री लीख्तेनबेर्जे ह्यांच्या आगमनाचा निषेध करण्याचा हुकूम थूरींगियामध्ये नात्सी पुढारी झौकेल यांनी नॅशनल-सोशिलिस्ट वायमार गटाला दिला आहे. हे लोक बिगर-आर्य वंशाचे आहेत असा झौकेल यांचा आरोप आहे."

त्याचप्रमाणे, एका साध्या प्रश्नाचा तुम्ही निर्णय घेण्याची वेळ येऊन ठेपली आहे: "संस्कृतीच्या मालकांनो," तुम्ही कोणाबरोबर आहात?

संस्कृतीच्या हातकामगारांच्या बाजूने तुम्ही आहात का आणि जीवनाचे नवीन प्रकार निर्माण करण्याची तुमची तयारी आहे का? अथवा तुम्ही त्यांच्या विरुद्ध आहात आणि बेजबाबदार लुटारूंच्या जातीची, डोक्यापासून पायांपर्यंत सडलेल्या जातीची, केवळ सुस्तीमधून कार्य करणाऱ्या जातीची, परंपरा पुढे राखण्याचा तुमचा इरादा आहे?

१९३२

# नाटके[226]

साध्या विचारांवर प्रभुत्व मिळविणे सर्वांत अवघड असते, उदाहरणार्थ, शंभर वर्षांपूर्वी गोएथे म्हणाला होता : "कृती म्हणजे अस्तित्वाचा आरंभ."[227]

विचार अगदी साधा आणि सार्वत्रिक आहे. त्याच्यापासून काढलेला निष्कर्षसुद्धा तेवढाच साधा आहे: केवळ कृतीमार्फतच निसर्गाची अभिज्ञा करणे, सामाजिक परिस्थिती बदलणे शक्य आहे. त्यानुसार कार्ल मार्क्स म्हणाले होते: "तत्त्वज्ञानी लोकांनी जगाचा फक्त भिन्न तऱ्हांनी खुलासा केला, पण मुद्दा आहे ते बदलण्याचा."[228]

साध्या विचारांचे वाईट रीतींनी आकलन करण्यात येते, कारण भुलविणाऱ्या आणि धूर्त शहाणपणाच्या धुक्यात मानवजात शतकानुशतके राहिलेली आहे. जीवनावर सत्ता गाजविणाऱ्यांना अशा शहाणपणाची नितांत आवश्यकता होती, कारण सामाजिक-वर्गीय विसंगतींची लज्जास्पदता, भयानकता आणि दुराराध्यता त्यांना झाकून टाकावी लागत होती. पण आजकाल ह्या गोष्टी एवढ्या पराकोटीला पोहोचल्या आहेत, की कोणत्याही प्रकारच्या पोकळ तत्त्वज्ञानाने अथवा धूर्त खोटेपणाने त्यांच्यावर पांघरूण घालणे अशक्य ठरले आहे. पण तात्त्विक रूप देण्याची प्राचीन सवय अजून अस्तित्वात आहे आणि जीवनातील घाणेरड्या सवयींबद्दल स्वतःला जबाबदार न धरणाऱ्या लोकांच्या मनांमध्ये ही सवय अगदी चिवट मूळ धरून बसली आहे. ह्या लोकांच्या मनांना साधे सत्य जणू रासायनिकदृष्ट्या आत्मसातच होत नाही.

तत्त्वज्ञानी लोकांचा धंदा कोणता होता आणि आहे याबद्दल दंतकथाकार इवान खेम्नीत्सेर[229] यांनी 'तत्त्वज्ञानवेत्ता' ह्या दंतकथेत अगदी थोडक्यात, पण चतुरपणे सांगितले आहे. दंतकथेचा आशय असा आहे: "सर्व आरंभांच्या आरंभा" विषयी चिंतन करीत एक तरुण माणूस मैदानात फिरत होता आणि अचानक तो एका खड्ड्यात पडला. त्यातून बाहेर येणे त्याला काहीकेल्या जमेना. त्याच्यासाठी एक दोर टाकण्यात आला आणि त्याने ताबडतोब विचारले: "दोर म्हणजे काय?" त्याला सांगण्यात आले की, दोर म्हणजे

"स्वयंपूर्ण वस्तुसिद्धांत" समजून त्यावर तात्त्विक काथ्याकूट करण्यास ती योग्य वेळ नाही आणि त्याने खड्ड्यातून लौकर बाहेर यावे. पण त्याने परत विचारले : "वेळ म्हणजे काय?" तेव्हा त्याला खड्ड्यात एकट्यालाच सोडून देण्यात आले आणि तेथे तो अजूनही युक्तिवाद लढवीत बसला आहे की, विश्वाची आवश्यकता आहे अथवा नाही आणि जर असेलच, तर ती कशा-साठी?

तत्त्वज्ञानवेत्ते विचाराला कृतीपासून तोडून वेगळे काढतात, त्यांचे केवळ शाब्दिक, तार्किक रचनेच्या ओसाड भूमीत रूपांतर करतात. याउलट काळ म्हणजे गतीचा—म्हणजेच कृतीचा—आधार म्हणून पाहिला जातो.

जागतिक सत्ता हस्तगत करू पाहणारा कामगारवर्ग आता नव्या समा-जाचा आणि जगाविषयीचा पूर्णतया नव्या दृष्टिकोनाचा पूर्वज आहे. स्वतःच्या कामाने तो काळाला भरून टाकतो आणि सबंध जगाला स्वतःचे क्षेत्र समजतो.

शब्दाच्या कलाकाराला कामगारवर्गाचे वर्णन करताना ऐतिहासिक, जागतिक मानवाच्या प्रतिमेत सादर करण्याचा हक्क आहे; कामगारवर्ग म्हणजे अत्यंत प्रभावी, अखिलविजिगिषु शक्तीचा उगम म्हणून, भौतिक आणि "आत्मिक" संस्कृतीचा, म्हणजे "दुसऱ्या निसर्गा"चा निर्माता म्हणून सादर करण्याचा हक्क आहे.

काम विचारशक्तीला चालना देते, विचारशक्ती कामाच्या अनुभवाला शब्दरूप देते, विचारांमध्ये, गृहीतांमध्ये, सिद्धांतांमध्ये त्याला कोंबते—तात्कालिक कामकरी सत्यामध्ये रूपांतर करते.

कृतीचे शब्दामध्ये रूपांतर करण्यापेक्षा शब्दाचे कृतीमध्ये रूपांतर करणे खूपच अवघड आहे हे प्रत्येकाला ठाऊक आहे.

लेखक काम करीत असताना कृतीचे शब्दात आणि शब्दाचे कृतीत अशी दोन्ही रूपांतरे करतो. लेखक काम करतो तेव्हा शब्द त्याचे मुख्य साधन असते.

शब्दाचा अर्थ अत्यंत अचूकपणे आणि योग्यपणे कोड्याच्या रूपात लोकांनी मांडला आहे: "ओळखा पाहू : मध नाही, पण सर्व गोष्टींना चिकटतो?"

नाव नसलेली एकही गोष्ट जगात नाही. शब्दरूपात बंदिस्त न केलेले असे काहीही नाही. हे सर्व अगदी अत्यंत साधे आहे, पण शब्दाचा अर्थ तरुण नाटककारांना पुरेसा आकलन झाला नाही असे मला वाटते.

मी पुढे केलेले निवेदन एक नाटककार म्हणून नव्हे, तर एक सर्वसाधारण

लेखक आणि नाट्यप्रेक्षक ह्या भूमिकेतून केलेले आहे, असा इशारा देणे मला आवश्यक वाटते. दुर्दैवाने आपल्यात अशी प्रथा पडलीय की, एक अथवा दोन नाटके लिहिलेला तरुण माणूस स्वतःला "नाट्यप्रभू" समजतो, स्वतःच्या सृजनशील पद्धतींबद्दल "शहराला आणि जगाला" सांगण्यासाठी वर्तमानपत्रांमधून लेख लिहू लागतो आणि भाषणे करू लागतो, एवढेच नव्हे तर "नाट्यसिद्धांता"समान काहीतरी निर्माण करण्याचाही प्रयत्न करतो. तर्कशक्तीच्या बळावर – ज्याचे आकलन नंतर योग्यरीत्या होईल अशी मला आशा आहे – मी असे समजतो की, वाईटाचे अनुकरण करण्याचा मला हक्क आहे. मी दोन नव्हे, पाच नव्हे, तर सुमारे वीस वाईट नाटके लिहिली आणि एक वृद्ध लेखक म्हणून माझा अनुभव मी तरुण लोकांना सांगितला पाहिजे.

नाटक – गंभीर अगर विनोदी – अत्यंत अवघड साहित्यप्रकार आहे. तो अवघड आहे कारण नाटकातील प्रत्येक पात्राचे वैशिष्टय लेखकाच्या सूचनेविना फक्त शब्द आणि कृतीमधून व्यक्त झाले पाहिजे. कादंबरीत किंवा कथेत लेखकाने वर्णिलेली माणसे त्याच्या मदतीने कृती करतात. त्या व्यक्तिरेखांना कसे समजून घ्यायचे ह्याबद्दल लेखक वाचकाला सूचना करतो, स्वतःचे गुप्त विचार सांगतो, वर्णिलेल्या व्यक्तिरेखांच्या कृतींमागील सुप्त हेतू सांगतो, निसर्ग आणि भोवतालच्या परिसराच्या वर्णनांसह त्यांच्या मनःस्थितींना विविध छटांचे रंग देतो. वाचकासाठी तो आपल्या व्यक्तिरेखांना प्रत्यक्षात स्वतःच्या उद्दिष्टांच्या धाग्यांवर मुक्तपणे आणि अनेकदा नकळतपणे धरून ठेवीत असतो; त्या व्यक्तिरेखांच्या कृतींवर, शब्दांवर, कार्यांवर, संबंधांवर अगदी योग्यरीत्या, पण लहरीपणाने नियंत्रण ठेवीत असतो. स्वतःच्या व्यक्तिरेखांना कलात्मकरीत्या अधिक स्पष्ट आणि खात्रीलायक बनविण्याचा लेखक हरतऱ्हेने प्रयत्न करीत असतो.

नाटक मात्र लेखकाला एवढ्या मुक्तपणे ढवळाढवळ करू देत नाही. प्रेक्षकांना त्याने पडद्यामागून सूचना देणे वगळलेले असते. नाटकातील पात्रे अपवादात्मकरीत्या आणि केवळ त्यांच्या भाषेद्वारा निर्माण केलेली असतात व ही भाषा वर्णनात्मक नव्हे तर बोली भाषा असते. हा मुद्दा समजणे फार महत्त्वाचे आहे, कारण नटांच्या रंगभूमीवर सादर होणाऱ्या नाटकातील पात्रांना जर कलात्मक मूल्य आणि सामाजिक खात्रीशीरपणा लाभायला हवा असेल, तर प्रत्येक पात्राची भाषा काटेकोररीत्या वैशिष्टयपूर्ण व कमाल अभिव्यक्तीची असणे आवश्यक आहे. केवळ ह्याच परिस्थितीत प्रेक्षकाला

समजेल की, लेखकाच्या मतानुसार आणि नटाच्या सादर करण्यानुसारच केवळ नाटकातील प्रत्येक पात्र बोलू आणि वागू शकेल. आपल्या उत्तम विनोदी नाटकांमधील पात्रांचे उदाहरण घेऊ: फामूसोव, स्कालोझूब, मोलचालिन, रेपेतीलोव, [230] ख्लेस्ताकोव, नगराध्यक्ष, [231] रास्पल्यूयेव [232] इ. प्रत्येक व्यक्तिरेखा कमीत कमी शब्दांमध्ये निर्माण केलेली आहे, पण प्रत्येक व्यक्तिरेखा स्वतःच्या वर्गाची आणि काळाची अगदी योग्य कल्पना देते. ह्या पात्रांच्या सूत्रबद्ध व्याख्या आपल्या दैनंदिन भाषेत प्रविष्ट झाल्या आहेत, कारण एखाद्या निर्विवाद, वैशिष्टचपूर्ण गोष्टीला सूत्रबद्ध व्याख्येत अगदी अचूकपणे व्यक्त करता येते.

बोली भाषेचे नाटकाच्या दृष्टीने किती मोठे आणि निर्णायक महत्त्व आहे व बोलभाषेचा अभ्यास करून स्वतःला संपन्न बनविणे तरुण लेखकांच्या दृष्टीने किती तातडीचे आवश्यक आहे, याची आता स्पष्ट कल्पना आली असावी असे मला वाटते.

आपल्या नव्या नाटकांमधील एक सार्वत्रिक आणि दुर्दैवी उणीव म्हणजे सर्वप्रथम लेखकांचे भाषादारिद्रच. ती भाषा शुष्क, रक्तहीन आणि व्यक्तित्वहीन आहे. नाटकांमधील सर्व पात्रे एकाच धाटणीची भाषा बोलतात. त्यांचे शब्द एकसुरी, जीर्ण वाटतात. आपल्या वादळी वास्तवाशी ते मुळीच सुसंगत नाहीत. आपला देश सृजनशील शक्तींच्या जबरदस्त ताणात जगतो आहे आणि साहित्यात त्याचे पडसाद उमटलेच पाहिजेत. एक दुष्ट आणि अपायकारक अथवा प्रामाणिक आणि सामाजिकदृष्टचा मौल्यवान घटना आपल्या रंगभूमीवर रंगहीन, निष्काळजीपणे गुंफलेल्या शब्दांच्या नीरस कोलाहलात सादर होते.

युरोपच्या रानटी लोकांच्या – भांडवलदारांच्या – दुष्टाव्याने भरलेल्या वातावरणात आपण रहात आहोत. आपणही द्वेष करायला शिकले पाहिजे आणि रंगभूमीच्या कलेने ह्या कामी मदत केली पाहिजे. पिसाळलेला क्षुद्रप्रवृत्तीवाद आपल्याभोवती आणि आपल्यामध्ये फूत्कारतो आहे. रंगभूमीने क्षुद्रप्रवृत्तीचा वाईट स्वभाव प्रेक्षकांसमोर उघडकीस आणला पाहिजे, त्याच्याबद्दल तिरस्कार आणि किळस निर्माण केला पाहिजे. अभिमान वाटावा, आनंद वाटावा, असे आपल्यापाशी खूप काही आहे. पण हे सर्व योग्य ताकदीने कलात्मकरीत्या सादर होत नाही. आपली नवी नाटके आपल्या शौर्यशाली वास्तवापेक्षा खूप खालच्या पातळीवर आहेत. वस्तुतः वास्तवाच्या

वर जाणे कलेचे मुख्य उद्दिष्ट असते. कामगारवर्गाने — मानवतेच्या नव्या पित्याने — समोर धरलेल्या त्या सुंदर उद्दिष्टांच्या उत्तुंग शिखरावरून दैनंदिन क्रमाकडे पाहणे, कलेचे मुख्य ध्येय आहे. प्रस्तुतीकरणाच्या अचूकतेबाबत आम्हाला स्वारस्य आहे. तसेच कोणत्या उणीवा आपण नाहीशा केल्या पाहिजेत आणि कोणत्या विधायक गोष्टी निर्माण केल्या पाहिजेत ह्याचे अधिक सखोल व स्पष्ट आकलन होणे आवश्यक आहे. शौर्यशाली कार्याला शौर्य-शाली शब्दाची गरज आहे.

कला कधीही "अंतिम" नव्हती आणि तशी ती असू शकत नाही हे आता अगदी स्पष्ट झाले आहे, कारण तिचा जुना ग्राहक असलेल्या वर्गा-च्या वार्धक्याबरोबरच तिची ताकद शोकपूर्णरीत्या नष्ट झाली आहे. आता कामगारवर्गाच्या सांस्कृतिक क्रांतिकारक वाढीबरोबर ती वेगाने वाढत आहे. भांडवलदारी समाजात धर्माप्रमाणे कलेने विशिष्ट वर्गीय उद्दिष्टांची सेवा केली. धर्माप्रमाणे कलेमध्येही काही पाखंडी होते. वर्गीय हिंसेच्या बंदिवासातून सुटण्याचा त्यांनी अयशस्वी प्रयत्न केला आणि ऐतिहासिक मानवाच्या असीम सृजनशील शक्तीबाबत, नष्ट करण्याच्या आणि निर्माण करण्याच्या त्याच्या निर्विवाद हक्काबाबत शिणवणाऱ्या धास्तीसह अविश्वास बाळगून क्षुद्रप्रवृत्ती-वादाच्या "अचल सत्या"वरील आंधळ्या श्रद्धेसाठी किंमत मोजली.

माझ्या मते अशा अविश्वासाचे कारण आहे अभिज्ञेच्या इच्छेचा अभाव आणि ज्ञानाची उणीव. अभिज्ञेसाठी तिच्यावर विश्वास असावा लागतो ह्याला मी खरे तर दुजोरा देणार नाही. अभिज्ञा म्हणजे अभ्यासाची, संशोधनाची सतत क्रिया. ज्या क्षणी ती श्रद्धा बनते त्या क्षणी ती थांबते.

ह्या देशात अभिज्ञेची इच्छा अधिकाधिक कळकळीने प्रज्वलित होत आहे. विशेषत: विज्ञान आणि तंत्रशास्त्राच्या क्षेत्रांमध्ये ती प्रबळ व उत्पादक आहे. तरुण वैज्ञानिकांची आणि तंत्रज्ञांची परिपक्वता, ज्ञानपिपासा, यशांची विपुलता आणि हेतूंचा धाडसीपणा पाहून आम्ही चकित होत आहोत. तरुण लेखक मात्र ठळकरीत्या ज्ञानाच्या महत्त्वाचे अधोमापन करीत आहेत. "स्फूर्ती"वर ते जणू फार आशा लावून बसतात, पण "स्फूर्ती"ला कामासाठी उत्तेजना मानणे चुकीचे आहे असे मला वाटते. यशस्वी कार्याच्या प्रक्रियेत परिणाम म्हणून, आनंदाची भावना म्हणून, कदाचित ती अवतीर्ण होऊ शकेल. नवे लेखक "निर्मिती" हा भडक आणि संदिग्ध असा चर्च-मधला शब्द अनेकदा व फारसा योग्यपणे वापरत नाहीत. कादंबऱ्या, नाटके

इत्यादी रचण्याचे काम अत्यंत कष्टाचे, श्रमदायक आणि क्षुल्लक काम आहे. त्याच्या आधी जोवनपरिस्थितीच्या प्रदीर्घ निरीक्षणाचो, वस्तुस्थिती गोळा करण्याची, भाषेचा अभ्यास करण्याची आवश्यकता असते.

आमच्या बहुतेक नाटककारांचे "सृजन" यांत्रिक असते, "आधीच बनविलेल्या हेतूंच्या" चौकटीमधील वस्तुस्थितींचे अतार्किक व लहरी मिश्रण असते, कृत्रिमरीत्या घातलेली "वर्गीय भर" असते, वाईटरीत्या विचार केलेला "हेतू" असतो. असा वाईटरीत्या धरलेला हेतू वस्तुस्थितींची तोडमोड करतो, त्यांचा अर्थ उघड करण्यात अपयशी ठरतो. त्यात भर घालण्यात येते "वर्गीय तत्त्वा"नुसार लोकांचे चित्रण करण्याच्या ओबडधोबड जुनाट-पणाची. "वर्गीय तत्त्व" "मानसशास्त्रा"चे मुख्य आणि निर्णायक संघटक आहे ही गोष्ट निर्विवाद आहे. मानवी शब्दांना आणि कृतींना रंगांच्या विविध छटा ते कायम देत असते. भांडवलशाहीच्या असह्य, बळजबरीच्या परिस्थितीत माणसाला स्वत:च्या वारूळात नम्र मुंगी बनून रहावे लागते. कुटुंब, शाळा, चर्च आणि मालक ह्यांच्याकडून येणाऱ्या सतत दबावामुळे त्याला ही भूमिका पत्करावी लागते. आत्मरक्षणाची त्याची भावना त्याला कायद्याशी आणि दैनंदिन जीवनाशी आज्ञाधारक बनायला भाग पाडते. हे सर्व खरे आहे. पण वारूळाच्या आतमध्ये स्पर्धा एवढी जबरदस्त आहे, भांडवलदारी समाजामधील सामाजिक गोंधळ एवढ्या ठळकपणे वाढत आहे, की माणसाला भांडवलदाराचा नम्र गुलाम बनविणारी ती आत्मरक्षणाची भावनाच आता त्याची "वर्गीय निशाणी" घेऊन नाट्यपूर्ण संघर्षात दाखल होते.

आजकाल युरोपीय बुद्धिमंतांच्या सामाजिक परिसरात असे "संघर्ष" नित्याचे बनले आहेत. सामाजिक गोंधळाच्या वाढीनुसार त्यांची संख्या अपरिहार्यपणे वाढेल आणि स्वाभाविकच ते गोंधळ वाढवतील. अशा अनेक वस्तुस्थिती मुळीच सिद्ध करीत नाहीत की, "वर्गीय निशाणी" मृतवत होत आहेत अथवा दुबळ्या बनत आहेत, सखोल सैद्धांतिक पुनरुत्थानाचे अस्तित्व आहे; नाही; अनेकदा खुलासा सोपा आहे: म्हातारा मालक जर्जर झालाय, त्याने स्वत:चा नाश करून घेतलाय, सेवक नव्या मालकाचा शोध घेत आहेत; त्याच्याशी काम करण्याचाच त्यांचा नेहमी इरादा असतो असे नाही, तर केवळ त्याचे गुण जाणून घेण्यासाठी. शिवाय, काही प्राण्यांमध्ये "नक्कल" करण्याची क्षमता असते हे विसरू नये. आत्मरक्षणासाठी परिस-

राशी मिसळून घेण्याची, भोवतालच्या वातावरणाची नक्कल करण्याची क्षमता. सर्वसाधारणपणे हे मिसळून घेणे सखोल नसते. धोका नाहीसा होताच ते अदृश्य होते.

अशा नकलेचा खासा नमुना म्हणजे रशियन "क्रांतिकारक" बुद्धिजीवींचे १९०४-१९०८ मधील वर्तन. मग माहीत असणे आणि आठवणे आवश्यक आहे की, काही वर्गीय क्षुद्रप्रवृत्ती गुणांचा व्यापक प्रसार झाला आहे, अखिल मानवजातीच्या पातळीवर ते चढले आहेत, कामगारवर्गीयांमध्येसुद्धा हे गुण उपस्थित आहेत आणि विचार व गुण यांच्यात जमीन-अस्मानाची तफावत पडली आहे.

ऐतिहासिक मानवाने ५ अथवा ६ हजार वर्षांच्या काळात निर्माण केलेल्या सर्व गोष्टींना आपण संस्कृती म्हणतो. तिच्यात त्याच्या शक्तीचे प्रचंड प्रमाण सामावलेले आहे व ती निसर्गावरील एक अत्यंत भव्य इमारत आहे. निसर्गाशी मैत्रीपेक्षा तिचे शत्रुत्वच अधिक आहे. कलात्मक प्रतिमा म्हणून हा मानव अत्युत्तम प्राणी आहे. पण सद्य:कालीन लेखक अथवा नाटककार रोजच्या घडीच्या सर्वसामान्य माणसाचा परामर्श घेतात. हा माणूस वर्गलढ्याच्या परिस्थितीत शतकानुशतके वाढला आहे, प्राणीशास्त्रीय व्यक्तिवादाची त्याला सखोल बाधा झाली आहे व अत्यंत विविधांगी, गुंता-गुंतीची आणि विसंगत अशी ही आकृती आहे. म्हणून त्याचा उद्धार करण्याची आपली जर इच्छा असेल–आणि आपली तशी इच्छा आहे–तर आजचा सर्वसामान्य माणूस साधा बनवू नये, उलट त्याच्या अंतर्गत भेदरटपणा आणि उध्वस्ततेसकट, त्याच्या "काळीज व मनामधील सर्व विसंगतींसकट" आपण त्याचे स्वत:लाच दर्शन घडविले पाहिजे. सादर केलेल्या प्रत्येक माणसात त्याच्या सामायिक वर्गीय वैशिष्टयांव्यतिरिक्त त्याचे खासेपण दाखविणारा व शेवटी त्याचे सामाजिक वर्तन निर्णित करणारा व्यक्तिगत कणा शोधला पाहिजे.

आमच्यात जशी प्रथा आहे त्याप्रमाणे "वर्गनिशाणय" माणसाच्या चेहऱ्या-वर बाहेरून चिकटवू नये. वर्गनिशाणी म्हणजे चामखीळ नव्हे. ती खूप आतील, मज्जातंतूमधील, मेंदूमधील, जीवशास्त्रीय अशी गोष्ट आहे. कला-त्मकरीत्या पटणाऱ्या व्यक्तिरेखांच्या मदतीने नाटक रचणे, प्रेक्षकाचे मन हेलावून टाकेल आणि त्याला सुधारेल असे "कलेचे सत्य" साध्य करणे खऱ्या लेखकाचे काम आहे. विन्स्टन चर्चिल[233] यांचे उदाहरण घ्या. त्यांच्या

पुराणमतवादाच्या रूपाने आणि सोविएत संघातील कामकरी लोकांबद्दल त्यांना वाटणाऱ्या प्राणीसदृश तिटकाऱ्याने त्यांची वर्गनिशाणी पूर्णतया व्यक्त होते. पण जर एखाद्या नाटककाराने त्यांना केवळ ह्याच दृष्टिकोनामधून पाहिले, एक द्वेष्टा माणूस म्हणून पाहिले, तर ती चर्चिलची योग्य व्यक्तिरेखा ठरणार नाही, ते जिवंत चर्चिल ठरणार नाहीत.

माणसे भिन्न प्रवृत्तीची असतात हे आपल्याला माहीत आहे: कुणी बडबड्या असतो, कुणी मितभाषी; कुणी चेंगट आणि स्वतःवर प्रेम करणारा, कुणी लाजाळू आणि पराभूत वृत्तीचा. कवडीचुंबक, ग्राम्य, महत्त्वाकांक्षी, स्वप्नाळू, उल्हासी आणि दुर्मुखले, उद्योगी आणि आळशी, प्रेमळ मनाचे, तिरस्करणीय, बेफिकीर अशा लोकांच्या वर्तुळात लेखक जणू रहात असतो. पण ह्यांपैकी प्रत्येक गुण नेहमी स्वभाव निर्णित करीत नाही. अनेकदा असे घडते की, जोडीच्या इतर गुणांपेक्षा तो कमी चपखलपणे आणि योग्यपणे झाकला गेल्याने व ते इतर गुण त्याच्याशी सुसंवादी नसल्यामुळे तो ठळकपणे उठून दिसतो. त्यामुळे माणसाचा दुतोंडीपणा, "दुटप्पीपणा" फार स्पष्टपणे उघडकीला येतो.

ह्यांपैकी कोणत्याही एका गुणाला घेऊन त्याला अधिक सखोल करण्याचा, विस्तारण्याचा, त्याला अधिक धारदार आणि तेजस्वी बनविण्याचा, या ना त्या पात्राचा स्वभाव बनवून त्या पात्राला नाटकातील मुख्य आणि निर्णायक व्यक्तिरेखा बनविण्याचा नाटककाराला हक्क आहे. अशाच रीतीने व्यक्तिरेखेला आकार येत असतो आणि केवळ भाषेच्या आधाराने, अत्यंत सामर्थ्यवान आणि नेमक्या शब्दांच्या काळजीपूर्वक निवडीच्या साह्याने ते साध्य करता येते हे स्पष्ट आहे. युरोपच्या सर्वांत थोर नाटककारांनी तसे केले. ग्रीबोयेदोव यांचे आनंददायी आणि अत्यंत परिपूर्ण विनोदी नाटक बोधप्रदतेचा आदर्श नमुना आहे असे आम्हाला वाटते. फामूसोव, स्कालोझूब, मोलचालिन, रेपेतीलोव ह्यासारख्या व्यक्तिरेखा अत्यंत काटकसरीने, कमीत कमी वाक्यांचा वापर करून निर्माण करणे लेखकाला शक्य झाले आहे. पण तरीही, ह्या व्यक्तिरेखा काळाचे प्रतिबिंब ऐतिहासिक अचूकतेने घडविण्यास समर्थ ठरल्या आहेत. प्रत्येक व्यक्तिरेखेचा स्वतःचा वर्ग आहे आणि "व्यावसायिक" निशाणी आहे. त्या सर्व व्यक्तिरेखांनी स्वतःच्या काळाच्या मर्यादा केव्हाच ओलांडल्या आहेत आणि अद्यापही त्या जिवंत आहेत. म्हणजे इतःपर ती पात्रे नव्हेत, तर वैशिष्ट्यपूर्ण नमुने बनल्या आहेत. शेक्सपी-

यरचा फाल्स्टाफ,[234] मोलीएरचा मिसअँन्थ्रोप[235] व तार्तूफ आणि तत्सम प्रकारच्या नमुन्यांप्रमाणे. लेखकाने स्वतःच्या नाटकातील पात्र अशा रीतीने बनवावे की, त्याच्या प्रत्येक वाक्याचा आणि कृतीचा अर्थ पूर्णतया स्पष्ट व्हावा; जणू ते जिवंत व्यक्ती आहे अशा रीतीने त्याच्याबद्दल तिटकारा, द्वेष अथवा प्रेम ह्या भावना वाटाव्यात. असे कसब साध्य करण्यासाठी वाचन केले पाहिजे, अभ्यास केला पाहिजे. पुस्तकांचे वाचन करून अभ्यास करतात, तसा लोकांचा अभ्यास केला पाहिजे. लोकांबद्दल लिहिलेल्या पुस्तकांचा अभ्यास करण्यापेक्षा लोकांचा अभ्यास करणे फार फार अवघड आहे ह्याची जाणीव असली पाहिजे. कच्च्या लोखंडापेक्षा लोखंडाची बनविलेली वस्तू आपल्याला चुकीने अधिक आकलनीय भासते.

माणसे खूप गुंतागुंतीची असतात आणि दुर्दैवाने आपल्यापैकी अनेकांची खात्री आहे की, ही वस्तुस्थिती त्यांना अधिक सुंदरता आणते. पण गुंतागुंत म्हणजे विभिन्नता आणि दिलेल्या प्रत्येक घटनेशी जुळवून घ्यायला, "नक्कल" करायला ती निश्चितच खूप सोयीस्कर ठरते.

गुंतागुंत म्हणजे क्षुद्रप्रवृत्ती समाजातील दैनंदिन परिस्थितीपायी, जीवनात फायदेशीर आणि निवांत स्थान मिळविण्याच्या सतत, क्षुल्लक लढ्यापायी "आत्मा" आत्यंतिक उध्वस्त झाल्याची दुःखद व विद्रुप फलश्रुती. ही "गुंतागुंत" ह्या वस्तुस्थितीचा खुलासा करते की, कोटयवधी लोकांमध्ये प्रमुख, ठळक विशिष्ट स्वभावाची, एकाच एका ध्येयाने भारलेली अशी थोर माणसे आपल्याला अगदी मोजकी आढळतात. आणि आपल्याला असे दिसते की, कोटयवधी कामकरी माणसांवर इंग्लिश टोरींप्रमाणे दुष्ट प्रवृत्तीची अथवा अमेरिकन वृत्तपत्रांनीही ज्याला उघड उघड "मूर्ख" म्हणून संबोधले अशा माजी अमेरिकन प्रेसिडेंट हूवरसारखी माणसे सत्ता गाजवितात; अथवा हिटलरसारखे कस्पटासमान साहसवादी किंवा गोळी झाडून आत्महत्त्या करणाऱ्या "काडयापेटयांचा राजा" क्रैगरसारखे लुच्चे नियंत्रण ठेवतात. सरतेशेवटी, अशा "नायकां"ना आंतरराष्ट्रीयदृष्टया परस्परसाहाय्यकारी आणि दुराराध्यदृष्टया अपायकारक अशा भांडवलदारांच्या संख्येने छोटया गटाचा, हास्यजनक उदास गटाचा, पाठिंबा मिळतो.

भांडवलदारी जगात जे घडायचे होते ते घडले आहे. संस्कृतीच्या कष्टकऱ्यांच्या शक्तीमार्फत निसर्गातील संपदांचा आणि ताकदींचा कबजा करण्यात आल्यामुळे लोक अधिकच बलहीन व वर्गीय राज्याच्या सामाजिक

परिस्थितींचे बापुडवाणे गुलाम बनले आहेत. अशा प्रकारच्या गुलामगिरीचे संयोजन करणाऱ्या संघटकांनासुद्धा – भांडवलदारांना – ह्याची जाणीव होऊ लागली आहे. परत जाण्याच्या परिस्थितीपर्यंत एव्हाना ते येऊ पहात आहेत. ते घाबरले आहेत. त्यांच्या भावनांचे आणि विचारांचे भाडोत्री प्रवक्ते किंचाळत आहेत : विज्ञान पुरे झाले, तंत्रशास्त्राच्या वाढीला आळा घाला.

त्यांच्यापैकी काहीजण प्रतिपादन करतात की, यंत्रांपासून मानवी श्रमाकडे परत आल्यासच केवळ आर्थिक अरिष्टावर व बेकारीवर मात करणे शक्य आहे. पण ह्याबरोबरच ते सगळेजण शस्त्रसज्ज होत आहेत. लॉईड जॉर्जनी[236] नुकतीच घोषणा केली : "जग नव्या युद्धाच्या उंबरठ्याशी येऊन ठेपले आहे." लोकांच्या सार्वत्रिक संहाराच्या संयोजनाशिवाय ते जगू शकत नाहीत. कामकरी समूहांचे ते धंदेवाईक मारेकरी आहेत. आम्ही सोविएत संघातील लोक जागतिक दरोडेखोरांच्या आणि खुन्यांच्या गटाच्या अस्तित्वात अडथळा आणतो व आमचा एक भाग नष्ट करण्यास आणि दुसरा दास बनविण्यास ते उत्सुक आहेत, हे सर्वांना माहीत आहे.

आम्ही अशा देशात राहतो जेथे कामगारवर्गाने एक अत्यंत अवघड, पण सुंदर उद्दिष्ट समोर ठेवले आहे : बालपणापासून लोकांना विकृत बनविणाऱ्या परिस्थितींना नाहीसे करायचे. आम्ही खऱ्या स्वातंत्र्यासाठी लढत आहोत आणि मत्सर, लोभ, वैरभावना ह्यांची कारणे नाहीशी झाल्यावरच ते स्वातंत्र्य लाभणे शक्य आहे. ही कारणे नाहीशी करणे शक्य आहे आणि त्याप्रमाणे ती नाहीशी करण्यात येतील ह्याची आम्हाला खात्री आहे. सोविएत संघातील समाजसत्तावाद्यांच्या राजकीय आणि सांस्कृतिक कार्यामागील मूलभूत विचार माणसाविरुद्ध लढण्याचा नाही, तर अधःपतित, मानसिकदृष्टया विकृत भांडवलदारवर्गाने त्याला बाधा घडविलेल्या व सध्या बाधा घडवीत असलेल्या दुष्ट गुणांपासून, चालीरीती आणि दूषित पूर्वग्रहांपासून माणसाला मुक्त करण्यासाठी लढण्याचा आहे. तेजस्वी व्यक्तिमत्त्वांचा मुक्त विकास घडविण्यास पूर्वतयारी करण्यासाठी, सर्व क्षेत्रांमध्ये सृजनाच्या पूर्ण स्वातंत्र्याची सगळ्या लोकांना हमी देण्यासाठी आम्ही क्षुद्रप्रवृत्तींच्या प्राणीशास्त्रीय कल्पनावादाविरुद्ध लढत आहोत.

माणसाचा कायापालट घडविता येईल, शतकानुशतकांच्या हिंसेच्या धुळीतून आणि घाणीतून त्याला मुक्त करता येईल, ह्यावर विश्वास न ठेवणारे लोक आहेत. त्यांचा विश्वास नाही, कारण ते स्वतः ह्या धुळीने

एवढे माखलेले आहेत की, जीवनाला जाणून घेण्यास, त्याचा अभ्यास करण्यास ते असमर्थ आहेत; जीवनाची घाणेरडी लज्जास्पद भयानकता पाहण्यास आणि ह्या भयानकतेला निर्माण करणाऱ्यांविरुद्ध सक्रिय संतापाने बेभान होऊन लढण्यास असमर्थ आहेत. ही माणसे आळशी आणि बेफिकीर प्रवृत्तीची आहेत. केवळ निवांत जगावे एवढी एकच त्यांची इच्छा. त्यांच्यापैकी काही-जण मृत्यूविषयीच्या प्राथमिक विचारांमागे जीवनापासून लपतात. उदाहर-णार्थ असे प्रतिपादन करतात की, "मृत्यू हा जीवनातील सर्वांत महत्त्वाचा क्षण आहे" आणि "मानवी जीवनाच्या उत्तरार्धाचे सर्वसामान्य मानसशास्त्र म्हणजे मृत्यूची मानसिक तयारी करणे." हे खरे असणे शक्य आहे, कारण विचाराधीन मानसशास्त्र हे क्षुद्रप्रवृत्ती, जीर्ण, मरणोन्मुख समाजाचे मानस-शास्त्र आहे. मृत्युविषयी चिंतन करायला आमच्यापाशी सवड नाही. जीवनाला आम्ही आमच्या ताब्यात घेतले आहे आणि आम्ही त्याची फेरउभा-रणी करीत आहोत. हे अत्यंत अवघड कार्य आहे व त्यासाठी निर्धाराच्या आणि मनाच्या सर्व शक्तींचे सतत शौर्यशाली बळ लावणे आवश्यक आहे.

सोविएत समाजसत्तावादी संघात नव्या प्रकारची मानवजात जन्माला येत आहे.

जेव्हा एखादी नवी इमारत उभारली जात असते तेव्हा तिला नष्ट करू शकणाऱ्या भूकंपाबद्दल कुणी विचार करीत नाही. अस्मानी उत्पातांबद्दल आणि आपला सूर्य दहा लाख वर्षांनी नाहीसा होईल ह्याबद्दल निष्फळ व हास्यास्पद चिंतने करून जीवनापासून लपण्याची आमची मुळीच इच्छा नाही. स्वयं-शिक्षणाच्या कडक पठडीमधून आम्ही पार पडत आहोत. आमच्या श्रमाच्या निष्पत्ती आम्हाला विचार करायला शिकवीत आहेत. ह्या निष्पत्तींद्वारा आम्ही जगाची रहस्ये उलगडणार आहोत आणि आम्ही खरो-खरीच जीवनात स्थित्यंतर घडवीत आहोत. अर्थात काही बाबतींमध्ये आमचे बरोबर नाही, पण फक्त मृत माणसेच नेहमी बरोबर असू शकतात, कारण ती कृती करू शकत नाहीत.

आमच्यामध्ये दफन न झालेले मृत आहेत. ते अद्याप खातात-पितात, रस्त्यांवरून फिरतात आणि श्वासोच्छ्वास करतात, पण भोवतालचे सर्व काही कुजलेल्या उग्र दर्पाने विषारी बनलेले असते. पण लौकरच ते नाहीसे होतील. ज्या वस्तुमात्रामुळे ते घडले आहेत व त्यांच्या भोवतालच्या लोकांना

आणि स्वत:ला ज्याचा ते अपायकारकरीत्या वापर करतात, त्या मौल्यवान वस्तुमात्राला लौकरच ते निसर्गाला परत करतील.

कदाचित उपरोक्तापैकी बरेचसे केवळ काहीतरी ज्ञाताची आठवण करून देण्यासाठी सांगण्याची गरज नाही: आपण एका अत्यंत सखोल, अभूतपूर्व, सर्वसमावेशी नाट्यमय युगात रहात आहोत; संहार आणि निर्मिती ह्यांच्या तणावपूर्ण नाट्यमय क्रमांचे हे युग आहे. पण जे कृती करतात त्यांनाच फक्त ह्याची समज आहे आणि आळशीपणाच्या अतिसामान्यतेत गुरफटलेल्या बहुसंख्य लोकांमध्ये अद्याप आपण जगत व कृती करीत आहोत; स्वत:च्या निष्क्रियतेचे केवळ समर्थन करण्यासाठी कृतीच्या चुकांचा आधार घ्यायला जे चिंतन आणि निरीक्षण करीत आहेत अशा प्रेक्षकांमध्ये आपण जगत आहोत. सुरक्षितपणे आणि जबाबदार न राहता जवळच्या माणसाच्या पायात पाय घालून पाडायची अथवा वाटेत धोंडा ठेवायची संधी मिळेपर्यंत असे लोक कुणालाही धक्का लावीत नाहीत.

आजकाल माणसाला खळबळजनक वेगवान वास्तवतेच्या विविध प्रभावांना तोंड द्यावे लागते. व्यक्तिवादी आणि समाजवादी यांच्यातील अंतर्गत संघर्ष तो अनुभवतो. दुराराध्य विसंगतींमधील हा संघर्ष आहे. क्षुद्रप्रवृत्तीवादाच्या शतकानुशतकांच्या हिंसेच्या जोखडाखाली वारसाने त्याला लाभलेल्या गोष्टींची कामगारवर्गाच्या पक्षाने केलेल्या निर्णायक व कठोर ऐतिहासिक मागणीशी टक्कर होत आहे. नव्या मानवतेच्या जनकत्वाला स्वीकारण्याचे आवाहन इतिहासाने कामगारवर्गाला केले आहे. असे काही लोक आहेत ज्यांच्या वर्गीय, क्रांतिकारक जाणीवेचे एव्हाना एका भावनेत, एका अजिंक्य निर्धारात रूपांतर झाले आहे; भूक अथवा प्रेमाप्रमाणे ती एक अंत:प्रेरणा बनली आहे. पण असेही काही लोक आहेत ज्यांच्या जणू बुद्धीच्या पृष्ठभागावर आत्मजाणीव पसरलेली आहे, लढाऊ वास्तवाचे प्रहार तिच्यावर सहज बसू शकतात, तिचे डावीकडून उजवीकडे आणि उजवीकडून डावीकडे सतत हेलकावे चालू असतात.

लोकांच्या जगाविषयीच्या दृष्टिकोनाचे विभाजन चार प्रकारांमध्ये करणे सोयीचे असले, तरी ते काहीसे धसमुसळेपणाचे आहे: जगाची संवेदना — म्हणजे वास्तवाची निष्क्रिय जाणीव, माणसाच्या वाढीला आणि हालचालीला विरोध करणाऱ्या भिन्न व काढता न येणाऱ्या गोष्टींची मालिका; जगाचे चिंतन — बेफिकीर आणि "वस्तुनिष्ठ" मन:स्थिती, ज्यांना अद्याप तृप्ती,

शांती आणि सुरक्षितता लाभत आहे व त्यांच्या जीवनाच्या अखेरीपर्यंत हे सर्व टिकणार आहे अशी खात्री असलेल्या माणसांनाच केवळ प्राप्य; जागतिक दृष्टिकोन – घरी आणि शाळेत प्राप्त केलेली व विविध पुस्तकांच्या वाचनामुळे पूरकता लाभलेली "तार्किक" विचारांची पद्धती; ज्या माणसापाशी असे सार्वत्रिक लवचिक विचार आहेत त्याच्याबद्दल पूर्णतया व्यवस्थितपणे म्हटले जाते :

"शेवटचं पुस्तक त्याला जे सांगेल
आत्म्यावर त्याच्या ठसा त्याचा उमटेल." [237]

सद्यःकाळातील सर्वांत नाट्यमय नायक म्हणजे विचार करणारा माणूस. जगावर प्रभुत्व मिळविण्याच्या इराद्याने जगाचा अभ्यास करून त्याला समजून घ्यायला तो उत्सुक आहे. नव्या मानवजातीचा तो महान, धीट, सामर्थ्यवान माणूस आहे. म्हणून जुन्या जगाचे प्रतिनिधी त्याचा एवढ्या जोरदारपणे तिटकारा करतात.

आमच्या तरुण नाटककारांना मोठी सुदैवी परिस्थिती लाभली आहे. त्यांच्यासमोरील नायक पूर्वी कधीच अस्तित्वात नव्हता. तो जेवढा थोर आहे, तेवढाच साधा आणि स्पष्ट आहे. पूर्वीच्या सर्व डॉन क्विक्झोटांपेक्षा व फाऊस्टांपेक्षा तो खूपच दुराराध्य आणि बंडखोर आहे, यातच त्याचे थोरपण सामावलेले आहे. त्याला अशा रीतीने वाटण्यास मदत व्हावी म्हणून नाटककाराने त्याला ह्याच रीतीने पाहिले पाहिजे.

आपली कला वास्तवापेक्षा वरच्या पातळीला गेली पाहिजे आणि माणसाला वास्तवापासून न तोडता तिने त्याला वर उचलले पाहिजे. रोमांचवादाचा पुरस्कार केल्यासारखे वाटते ना? होय, तसेच वाटते : सामाजिक शौर्य, जीवनाच्या नव्या परिस्थितींमध्ये सृजनाचा सांस्कृतिक क्रांतिकारक उत्साह – ह्या देशात हा उत्साह ज्या प्रकारांमार्फत व्यक्त होत आहे – ह्यांना जर रोमांचवाद म्हणता येत असेल तर. अर्थातच ह्या रोमांचवादाची शिल्लेर, ह्यूगो आणि सिम्बॉलिस्टांच्या* रोमांचवादाशी गल्लत करू नये.

---

* सिम्बॉलिझम – युरोपीय आणि रशियन कलेतील १८७०-१९१० दरम्यानची एक प्रवृत्ती. "स्वयंपूर्ण वस्तुसिद्धांता"ला आणि अनाकलनीय विचाराला प्रतीकामार्फत कलात्मक अभिव्यक्ती देण्यावर तिचा भर होता.

शिवाय आमचे लेखक सुदैवी आहेत, कारण कोणत्याही "दंडका"च्या आणि "परंपरांच्या" मर्यादा न पाळता ते नाटके लिहू शकतात. याचे कारण रशियन नाट्यशास्त्रात अशा काटेकोर प्रवृत्ती नव्हत्या आणि युरोपप्रमाणे नाट्यप्रकार इथे नव्हताच असे मला वाटते. 'अकलेचे दुःख', 'अंमलदार', 'शिक्षणाची फळे',[238] ही आमची विनोदी नाटके मोलीएर आणि बोमार्शे[239] ह्यांच्या प्रहसनांपेक्षा अधिक वाईट नाहीत. पण आमच्याकडे शेक्सपीयर, काल्देरॉन, लोपे दे वेगा, शिल्लेर, क्लेईस्त[240] आणि ह्यूगो नव्हते. इतकेच नव्हे तर स्क्रिब, ओझये, पार्लेरोन, सार्दू इत्यादींप्रमाणे कसबी आणि चतुर नाट्यरचना करणारेही नव्हते. पाश्चात्य नाट्याप्रमाणे आमच्या नाटकांनी तेवढी उंची गाठली नव्हती हे मान्य करण्यात आले आहे व ते स्पष्ट आहे. विशेषतः स्पेन आणि इंग्लंडमध्ये मध्ययुगातच नाट्य हा प्रकार विकसित झाला होता. याचे कारण पाश्चात्य नाटक "लोकसाहित्या"च्या आधारावर फुलत होते. ख्रिस्तोफर मार्लो ह्याच्या खूप आधी आणि गोएथेच्या आधी सुमारे दोनशे वर्षे इंग्लिश व जर्मन हस्तकारागीर आपल्या कामगारसंघाच्या सणांच्या दिवशी 'डॉक्टर फाऊस्टबद्दलचे प्रहसन' ह्या हौशी नाटकाचा प्रयोग करीत होते. खुद्द गोएथे याने 'फाऊस्ट' लिहिताना १६ व्या शतकात होऊन गेलेल्या हान्स साक्स नामक न्युरेम्बर्गच्या चांभाराने रचलेल्या कविता वापरल्या होत्या.

युरोपीय नाटककारांनी लोककथांचा, कामकरी लोकांच्या मौखिक कवितेचा वापर करणे कमीपणाचे मानले नाही. त्रूबादूरांच्या[241] मेस्तेरझिंगेरांच्या[242] गाण्यांचा त्यांनी वापर केला. १७ व्या शतकाच्या आरंभापर्यंत आमच्याकडेसुद्धा हौशी कलावंत होते – विदूषक, गायक होते. "महान आरिष्टा"च्या प्रसंगांबद्दलची, इवान बोलोत्निकोवबद्दलची[243], स्तेपान राझिनच्या[244] लढायांबद्दलची, विजयांबद्दलची आणि त्याच्या मृत्यूबद्दलची कवने त्यांनी देशभर प्रसारीत केली.

पण रोमानोव[245] घराण्याचा पहिला पुरुष आणि विशेषतः त्याच्या मुलगा अलेक्सेई[246] सिंहासनावर आरूढ झाला, तेव्हा धर्मगुरूंनी आणि उमरावांनी विदूषकांचे व भटक्या गायकांचे निर्मूलन केले. ज्या भूदासांना विदूषकांची गाणी ठाऊक होती व जे ती म्हणत, त्यांना "निर्दयपणे चाबकाने फोडून काढण्यात येई." लोककाव्याविषयीचा असा सरकारी दृष्टिकोन भक्कम रुजला व प्रदीर्घ काळपर्यंत एक भयप्रद रशियन वास्तवता बनला. अगदी

१९ व्या शतकाच्या चौथ्या दशकात, "बोनापार्टबद्दलची विदूषकी गाणी म्हटल्याबद्दल गावचा लोहार सेम्योन नेचेसू" ह्याला नीझ्नी-नवगोरदमध्ये फटक्यांची शिक्षा झाल्याचा दाखला आहे.

सर्वसाक्षी अलेक्सांद्र पूष्कीन यांचा अपवाद वगळता एकाही रशियन उमराव लेखकाने नाट्याने शीगोशीग भरलेल्या लोकसाहित्याकडे ध्यान दिले नाही. इतकेच नव्हे तर त्यांनी ऐतिहासिक साहित्यालाही हात लावला नाही. कदाचित त्यांच्या पूर्वजांनी इतिहास वाईट करून ठेवला हे कारण असावे. उदाहरणार्थ, त्रूबेत्स्कोय घराण्यातील एखाद्या सरदाराने "सात बायारांच्या सरकार"[247]मधील एक नायक – प्रिन्स त्रूबेत्स्कोय – ह्याच्या वर्तनाबद्दल एक वास्तव कादंबरी अथवा नाटक १९ व्या शतकात लिहिण्याचे धाडस केले असते, ह्यावर विश्वास ठेवणे कठीण आहे.

नाटकात पुढील गोष्टी आवश्यक आहेत: ते तातडीचे हवे, त्याला कथानक पाहिजे आणि त्यात भरपूर घडामोडी पाहिजेत. भाषेचे उत्तम जाणकार आणि रशियन, विशेषत: मॉस्कोतील व्यापाऱ्यांच्या दैनंदिन जीवनाची माहिती असलेले अस्त्रोवस्की यांना रशियन नाट्यकलेचे जनक मानले जाते. त्यांच्या नाटकांना नेहमी कथानक आहे; ह्याबद्दल खात्री करून घ्यायची असली तर नुसती त्यांच्या नाटकांची शीर्षके आठवा: 'दुसऱ्या कुणाच्या घसरगाडीत बसू नका,' 'तुम्हाला आवडेल तसे जगू नका,' 'सत्य चांगले, सुख – त्याहून चांगले,' 'स्वत:ची कुत्री भांडू देत, परक्याच्या कुत्र्याला, तोंड खुपसायला देऊ नको,' 'एक पै नव्हती, अचानक रास पडलीय,' 'प्रत्येक अलौकिक बुद्धिमंताला पुरेसा साधेपणा' आणि इतर. ही सर्व दैनंदिन जीवनावरील विनोदी नाटके आहेत. ठळक अज्ञान, क्षुद्र जुलूम, अतितृप्त आणि झिंगलेल्या जंगली माणसांची अज्ञानप्रियता उघड करण्यासाठी त्यांचे लेखन घडले आहे. पण विनोदी नाटकाला उपहास, खवचटपणा आवश्यक असतो आणि अस्त्रोवस्कीपाशी केवळ सद्भावी विनोद होता.

त्यांची नाटके निर्विवादरीत्या गुणी आहेत, पण त्यांच्यात आरोप ठेवण्याचा जोष नाही. आरोपी प्रेक्षकांना लेखकाचा सद्भावी स्वभाव आवडल्याचेच भासेल. लांब कोटांमधील आणि रेशमी पोषाखांमधील घरच्या पाळीव प्राण्यांच्या स्वरूपात स्वत:ला रंगभूमीवर पाहून कदाचित त्यांना मन:पूर्वक गंमत वाटली असेल, पण असे स्वत:ला पहात असताना,

परोपकारबुद्धी गमावल्याची खंत त्यांना कधीही जाणवली नाही. ही हानी त्यांना कधी भासलीच नाही.

अस्त्रोवस्कींपासून तरुण सद्य:कालीन नाटककार काही शिकू शकेल ह्याबद्दल मी कल्पनाच करू शकत नाही. आमचे दुसरे नामवंत नाटककार आ. चेखोव हे माझ्या मते पूर्णतया अस्सल जातीच्या नाटकाचे – भावमधुर विनोदी नाटकाचे – लेखक आहेत. त्यांची डौलदार काव्यात्म नाटके जेव्हा गंभीर स्वरूपात सादर केली जातात, तेव्हा ती अवजड बनतात आणि बिघडतात. त्यांच्या नाटकांचे नायक म्हणजे स्वत:च्या जीवनक्रमात सदैव समजून घेण्याच्या प्रयत्नातील बुद्धिमंत आहेत: 'एकाच वेळी दोन खुर्च्यांवर बसणे एवढे गैरसोयीचे का होते?' भावात्मकतेची आम्हाला सध्या मुळीच गरज नाही.

लेओनिद आन्द्रेयेव यांच्या नाटकांचाही निर्देश केला पाहिजे. त्यांच्याबद्दल दुष्टपणे, पण सार्थपणे म्हटले जात असे: "दररोज फक्त मेंदू खाऊ घालणे शक्य नाही, शिवाय ते नेहमी अर्धवट भाजलेले असतात!"

सरतेशेवटी स्वत:बद्दल काही शब्द बोलणे मला भाग आहे, कारण माझ्या नाटकांची सध्या भरमसाट स्तुती चालू असल्यामुळे एक धोका आहे की, तरुण नाटककारांना त्यांचा व्यर्थ अभ्यास करण्याचा आणि त्याहून वाईट म्हणजे त्यांची नक्कल करायचा मोह होईल. आमचे टीकाकार नेहमी फार घाईत असतात – एक तर कौतुक करतात अथवा दोषाचा ठपका ठेवतात, पण पुरेशी नीटपणे आणि लक्षपूर्वकपणे वाचत नाहीत.

उदाहरणार्थ, 'येगोर बुलीच्योव'च्या प्रसंगी एक टीकाकार म्हणतो:

"इथं आम्ही नव्या नाट्यतंत्राविषयी बोलावं हे अगदी पूर्णतया स्पष्ट आहे, कारण निर्णायक कसोटी ही व्यावहारिक कसोटी आहे आणि व्यवहारात दिसून आले आहे की, नाटककार गोर्की यांचा प्रभाव महाप्रचंड आहे, गोर्कींच्या रंगभूमीची ताकद जबरदस्त आहे. ह्या रंगभूमीचा अभ्यास केला पाहिजे."

नाही, तिचा अभ्यास करण्याची गरज नाही, कारण अभ्यास करण्यासारखे फारसे काही त्यात नाही. मी सुमारे वीस नाटके लिहिली, पण त्या सर्वांचे स्वरूप कमी-अधिक दुबळेपणाने गुंफलेले प्रसंग एवढेच आहे. त्यात कथानकाचा धागा नीट नाही, व्यक्तिरेखन पुरेसे ठसठशीत नाही, ती फिकट आहेत, अयशस्वी आहेत. नाटक काटेकोरपणे आणि संपूर्णरीत्या प्रभावी असले पाहिजे.

तसे ते असले तरच भावनांचा उमाळा ते निर्माण करू शकते. आमच्या आत्म्यांवरील क्षुद्रप्रवृत्तीचा गंज जाळून काढण्यासाठी लढाऊ, जळत्या शब्दाची गरज असतानाच्या आजच्या काळात भावनांचा तात्काळ उमाळा आणणाऱ्या प्रभावी नाटकांची नितांत आवश्यकता आहे.

माझे एक नाटक तीस वर्षे रंगभूमीवर चालू आहे[248], पण हे फार विचित्र आहे, कारण ते कालबाह्य बनले आहे. मला वाटते, मी ह्या नाटकाचे कथानक सांगावे. तथाकथित "पूर्वीच्या लोकांच्या" जगाच्या सुमारे वीस वर्षांच्या माझ्या निरीक्षणाची ती निष्पत्ती होती. त्या लोकांमध्ये केवळ भटके, गरीब-घरांमध्ये निजणारे आणि एकूण "चोर-भिकारी" यांचाच समावेश नव्हता, तर अपयशांमुळे "चुंबकत्व नाहीसा झालेला," भ्रमनिरास झालेला, संतापलेला व अपमानीत झालेला असा बुद्धिजीवींचा एक विशिष्ट भागही समाविष्ट होता. अशी माणसे सुधारण्यापलिकडील आहेत असे मला फार लौकर जाणवले व समजले होते. कोनोवालोव[249]मंडळी शौर्याचे कौतुक करू शकतात, पण ते स्वत: शूर नव्हेत, फक्त काहीवेळा ते "औटघटकेचे राजे" बनतात.

बुद्धिमंतांमध्येही मला कोनोवालोव भेटले. बूब्नोव[250] ही व्यक्तिरेखा निर्माण करताना माझ्या नजरेसमोर मला परिचित असलेला एक "भटक्याच" नव्हता; तर एक बुद्धिजीवीही होता — माझे मास्तर. टपाल-तार कचेरीत अधिकारी म्हणून काम करणाऱ्या सातिन ह्या उच्चकुलीन माणसाने खुनाबद्दल चार वर्षे तुरुंगवास भोगला होता. दारूबाज आणि भांडखोरालासुद्धा "तत्सम" होता — एका नामवंत क्रांतिकारकाचा भाऊ, ज्याने तुरुंगात आत्महत्या केली. त्वेर आणि सिम्बिर्स्क ह्या वसाहतींना भेट दिली तेव्हा कूवाल्दाच्या "गरीब-घरा"शी त्यांचे साम्य असल्याचे मला आढळले.

गेल्या शतकाच्या नवव्या दशकाचा अखेरचा काळ व शेवटच्या दशकाचा आरंभीचा काळ हा मृत्यूच्या दारी असलेल्यांच्या दुबळेपणाला क्षमा करण्याचा आणि त्यांचे सांत्वन करण्याचा काळ म्हणावा लागेल. साहित्याने स्वत:चा नायक म्हणून "न-नायक" निवडला होता. त्या काळातील एका कथेचे शीर्षकसुद्धा होते: 'न-नायक[251]'. ह्या कथेला लोक मोठ्या उत्साहाने वाचत. त्या काळाची घोषणा अशी होती: "आपला काळ हा महान कार्यांचा काळ नाही" आणि "न-नायक" एकमेकांना ह्या घोषणेची सार्थता पटवून देत होते.

सांत्वनकाराच्या भूमिकेत मिखाईल मेन्शिकोव यांना विशेष यश लाभले होते. उदारमतवाद्यांच्या 'नेदेल्या'मध्ये प्रथम ते लिहीत. नंतर 'नोवोये व्रेम्या'चे ते एक आधारस्तंभ बनले. साल्तीकोव-श्चेद्रिन यांनी ह्या वर्तमानपत्राला खुनशीपणे सार्थ नांव दिले होते : "तुम्हाला काय आवडेल?" मेन्शिकोव यांची 'प्रेमाविषयी' आणि 'लेखनाविषयी' यांसारखी सामान्य पुस्तके किरकोळ बुद्धिवादी कर्मचारी – विशेषत: खेड्यातील शिक्षक – मोठ्या उत्सुकतेने वाचत होते. ही माणसे त्या काळातील प्रमुख सांस्कृतिक शक्ती होती. अनेकानेक शिक्षकांनी आणि तरुणांनी ह्या पुस्तकांमुळे स्वत:चे मेंदू खराब करून घेतले.

पण प्रचलित ढोंगी मेन्शिकोवव्यतिरिक्त आणखी अनेक सांत्वनकार, तडजोडकार व उपदेशक होते. ज्यांचा विषय होता : "यातना भोगणाऱ्या आणि ओझ्याखाली दबलेल्या सर्वांनी माझ्याकडे यावे, मी तुमचे सांत्वन करीन." 'कबुलीजबाब', 'माझा धर्म कोणता?' 'देवाचे राज्य आपल्या अंतरंगात आहे' ह्या पुस्तकांच्या लेखकासारखे [252] मोठे धेंडही ह्याच विषयावरील तात्त्विक जाळे विणत होते.

मानवजातीच्या प्रेमाचा पुरस्कार सर्वत्र केला जातो. तात्त्विकदृष्टचा त्याचा प्रसार कोणत्याही वर्गीय विभागणीविना सर्व लोकांपर्यंत होतो, पण व्यवहारात काही वासिलियेवना वासिली संबोधण्यात आले, तर बहुतेकांना – वास्का ; काही मारीयांना मार्या, तर बाकीच्या सगळ्या – माश्का.

माझी पूर्ण खात्री आहे की, "उल्हसित व्हा" अशी वरून केलेली आवाहने वास्का आणि माश्का यांच्या कानांपर्यंत कधी पोहोचलीच नाहीत. आणि दैनंदिन जीवनाच्या विषारी कर्दमात आत्मे रुतून पडण्याची प्रक्रिया नेहमीप्रमाणे अखंड व विविधपणे चालू राहिली.

जीवनातील वरच्या मजल्यांवरील सांत्वनकारांना कामकरी समूहांमधील खालच्या वर्गांमध्ये मोठ्या संख्येने समानशील भेटले. मी त्यांचे खूप जवळून निरीक्षण केले व अत्यंत लक्षपूर्वक त्यांचे बोलणे ऐकले. वरच्या मजल्यांवरील लोकांपेक्षा ते तात्त्विक काथ्याकूटात धूर्तपणे तेवढे अडकलेले नव्हते आणि पोकळ बडबडीमागे लपले नव्हते. ताबडतोब स्पष्ट झाले की, हा माणूस मनापासून सांत्वना करीत आहे; स्वत:च्या "अंत:करणातील दातदुखी" वर भूल टाकीत आहे आणि लोकांना किती पीडा होते ह्याची त्याला जाणीव आहे. पण अशा प्रकारचा सांत्वनकार फार दुर्मिळ होता. भटक्या आणि

उनाड लोकांमध्ये बहुतेकदा एक व्यावसायिक सांत्वनकार भेटतो. हा कारागीर सांत्वन करतो, कारण त्यासाठी त्याला खाऊ घालतात. आधुनिक युरोपीय पत्रकारांमधील जे लोक "वेदनाग्रस्त आणि ओझ्याखाली दबलेल्या" भांडवलदारांचे सांत्वन करणाऱ्यांच्यात मोडतात, त्यांची सार्थपणे अशा सांत्वनकारांशी तुलना करता येईल.

लोकांच्या वेदनांवर खेळून स्वतःच्या नजरेत स्वतःला थोर समजणारा, इतरांचे लक्ष वेधून घेण्याची आणि केवळ आदरप्राप्तीची नव्हे तर प्रेमप्राप्तीचीही इच्छा बाळगणारा नगण्य, महत्त्वाकांक्षी माणूस हा सर्वांत तिरस्करणीय प्रकारचा सांत्वनकार आहे. अशी माणसे काही कमी नाहीत.

आणि सरतेशेवटी आणखी एका प्रकारच्या सांत्वनकारांची संख्या फार मोठी आहे, जे लोकांच्या तक्रारी ऐकण्याचा त्रास नको म्हणून केवळ सांत्वन करतात. सर्व गोष्टींची सवय झालेल्या थंड आत्म्याची नेहमीची विश्रांती लोकांनी बिघडवू नये म्हणून केवळ सांत्वन करतात.

ही विश्रांती, त्यांच्या भावनांचा आणि विचारांचा हा समतोल, ह्या लोकांच्या दृष्टीने अत्यंत मौल्यवान असतो. मग त्यांची स्वतःची पडशी, किटली, जेवणाचे भांडे ह्या वस्तू त्यांना फार प्रिय असतात. त्यांना तांब्याचे भांडे आणि तांब्याची किटली अधिक आवडतात. अशा प्रकारचा सांत्वनकार सर्वांत हुषार, कसबी आणि भाषणचतुर असतो. म्हणून तो सर्वांत जास्त अपायकारक. 'तळागाळातील माणसे' ह्या माझ्या नाटकातील लूका अशा प्रकारचा घडायला पाहिजे होता, पण त्याला तसा बनविण्यात मला यश आले नाही.

मला वाटते, ह्या नाटकाबाबत सांगितलेल्या सर्व गोष्टींवरून सिद्ध होते की, हे नाटक किती अयशस्वी आहे, उपरोक्तनिर्दिष्ट निरीक्षणांचे त्यात किती वाईटपणे दर्शन घडले आहे आणि कथानकाच्या दृष्टीने ते किती दुबळे आहे. 'तळागाळातील माणसे' नाटक कालबाह्य बनले आहे आणि आता ते अपायकारक ठरणेही शक्य आहे.

ही "आत्मटीका"जरी उशिरा झाली असली, तरी ती आत्ता, १९३२ मध्ये नव्हे, तर फार पूर्वी, ऑक्टोबर क्रांतीआधी, अवतरली होती. स्वतःच्या निरीक्षणांमधून मिळालेल्या साहित्यावर अतिघाईने आणि अविचाराने प्रक्रिया घडविणाऱ्या तरुण मित्रांना ह्याचा उपयोग होईल असे मला वाटते.

आता केवळ नकारात्मक अथवा विदूषकी पात्रामार्फतच रंगभूमीवर सांत्वनकार आणणे शक्य आहे.

एका ऐतिहासिक; पण असाधारण माणसाने, व्लादीमिर लेनिन नामक ठळक अक्षरातील माणसाने, निर्णायकपणे आणि कायमसाठी जीवनामधून सांत्वनकार हा प्रकार पुसून टाकला आणि त्याच्या जागी कामगारवर्गाच्या क्रांतिकारक हक्कासाठी शिक्षकाची प्रस्थापना केली. असा शिक्षक, अशी सार्वजनिक व्यक्ती, नव्या जगाचा असा उभारणीकार, आधुनिक नाटकाचा नायक बनला पाहिजे. असा नायक योग्य ताकदीने आणि तेजस्वी शब्दांनी मूर्त करण्यासाठी ह्या साहित्यिक प्रकाराच्या जुन्या, अलंघ्य प्रभूंकडून व सर्वप्रथम शेक्सपीयरकडून नाटचलेखनाचे धडे घेतले पाहिजेत.

१९३३

# तरुण लेखकांबरोबर वार्तालाप

253

बहुतेक माणसे चिंतन आणि युक्तिवाद करतात ते जीवनाच्या परिस्थितीचे अवगाहन करण्याची त्यांची इच्छा असते म्हणून नव्हे, तर त्यांच्या विचाराला सुरक्षित निवारा शोधण्याचा आणि विविध "निर्विवाद सत्यांना" चटकन प्रस्थापित करण्याचा त्यांचा इरादा असतो. निर्विवाद सत्यांचे हे असे थोतांड रचणे टीकाकारांमध्ये अगदी प्रचलित आहे आणि लेखकांच्या कामावर त्याचा अत्यंत अपायकारक परिणाम घडतो. लेखकांच्या अत्यंत जबाबदार कार्यावर सिद्धतत्त्वे, प्रमाणवचने अथवा कोणतीही "घरगुती" बनावटीची निर्विवाद सत्ये लादल्यास प्रत्येक आणि वेगाने बदलणाऱ्या वास्तवाच्या अर्थावर अटळपणे मर्यादा पडतात, त्यांचे विपरीत अर्थ बनतात. फ्रेड्रिक एंगल्ससारख्या शहाण्या माणसाने म्हटले होते की, "आमची शिकवण म्हणजे प्रमाणवचन नव्हे, तर कृतीची मार्गदर्शक आहे" आणि एकत्र केलेल्या आमच्या सर्व कृतींचा रोख "जुने जग बदलून" नवे निर्माण करण्याकडे असतो. "जुन्या जगाची" व्यवस्था कमालीच्या वेगाने कोसळून पडत असलेल्या युगात आपण जगत आहोत आणि काम करीत आहोत. ह्या कोसळण्याची कारणे पूर्णतया अभ्यासण्यात आली आहेत व त्यांचे भाकीत करण्यात आले होते. वर्गीय समाज कालबाह्य झाल्यामुळे विघटित होत आहेत. स्वतःच्या पोलादी कणखरपणाची शेखी ते अगदी परवा परवापर्यंत मिरवीत होते, सामाजिक दुर्गुणांच्या विपुलतेला सृजनशील सामर्थ्याचे अस्तित्व समजण्याची चूक करीत होते. आजच्या काळात सबंध जगभरचा भांडवलदारवर्ग ठळकपणे स्वतःची अगतिकता आणि नपुंसकता व्यक्त करीत आहे. त्याच्यापाशी असलेल्या एकमेव सामर्थ्याचे प्रदर्शन करीत आहे–राजकीय दुष्टपणाचे. सर्व देशांमधील दुकानदार राजकीय साहसवाद्यांना नेतृत्व देत आहेत, स्व-संरक्षणाचे त्यांचे एकमेव तंत्र असलेल्या दहशतवादाचा ते आश्रय घेत आहेत. फॅसिझम हा त्यांच्या मुक्तीचा एकमेव मार्ग असल्याचे ते घोषित करीत आहेत. म्हणजे समाजातील गाळाला (कपटी, वेडे, अधःपतित आणि स्वतः-

च्या उपासमारीच्या भीतीने अंध झालेले लोक) अट्टल मारेकऱ्यांच्या सेनेत एकवटायचे, त्यांचे नेतृत्व पोलीसांना द्यायचे व सामाजिक सृजनाला कार्यक्षम असलेल्या क्रांतिकारक कामगारवर्गाची निकोप शक्ती निपटून काढायची. भांडवलदारवर्गाच्या शक्तींच्या विघटनाच्या प्रक्रियांच्या अर्थाची व महत्त्वाची संकल्पना आम्हा सोविएत लेखकांना पुरेशा स्पष्ट प्रमाणात नाही. विघटना-मधून निर्माण झालेल्या गोष्टींच्या साहाय्याने स्व-संरक्षणाची उभारणी करण्याचे भांडवलदारवर्गाचे प्रयत्न आम्हाला नीटसे आकलन झालेले नाहीत. सोविएत कामगारवर्गीयांच्या शौर्यशाली श्रमाच्या ह्या सोळा वर्षांनी आणि साध्य केले-ल्या अफाट यश:सिद्धींनी, कामगारवर्गाच्या टिकाऊपणाची आणि बुद्धिमानतेची, त्याच्या सृजनशील सामर्थ्याच्या अफाट संचयांची जगाला साक्ष पटली आहे. ह्या श्रमाच्या महाप्रचंड क्षमतेची आम्हा सोविएत लेखकांना अद्याप कल्पनाच नाही अथवा त्या श्रमाच्या यश:सिद्धींच्या विविधतेची आणि विपुलतेची आम्हाला कल्पना नाही. वस्तुत: ह्या गोष्टी आपल्याला माहीत असणे आवश्यक आहे. अगदी आत्ता आत्तापर्यंत आपला देश रानटीरीत्या अशिक्षित होता, सर्व प्रकारच्या भोळ्या समजुतींचे आणि दूषित पूर्वग्रहांचे विष आप-ल्यात खोलवर भिनलेले होते व स्वत:च्या प्राचीन छंदीपणाविषयीचा चिवटपणा हे त्याचे एक ठळक वैशिष्टच आहे, ह्या गोष्टी विसरण्याकडे आपला कल असतो.

ललित साहित्याला घडविणारे घटक कोणते? म्हणजे प्रतिमांना, नमुन्यांना आणि व्यक्तिरेखांना शब्दांच्या साहाय्याने निर्माण करणारे. शब्दांच्या साहा-य्याने प्रत्यक्ष घटनांचे, दृश्यांचे आणि विचारप्रक्रियांचे वर्णन करणारे घटक कोणते?

मूलभूत घटक आहे भाषा. हे मुख्य उपकरण आणि वस्तुस्थिती व जीवनातील परिस्थिती मिळून साहित्याचा मसाला बनतो. एका चतुर लोक-कोड्याचे उत्तर, भाषा असे आहे: "काय असेल? मध नाही, पण प्रत्येक गोष्टीला चिकटते!" दुसऱ्या शब्दांमध्ये सांगायचे तर नांव प्राप्त न झालेली एकही गोष्ट जगात नाही. सर्व वस्तुस्थितींची, सर्व विचारांची वस्त्रे म्हणजे शब्द. पण वस्तुस्थितींचे गर्भित सामाजिक अर्थही असतात आणि प्रत्येक विचारामागे त्याचे गर्भित कारण असते. सामाजिक जीवनातील लपलेल्या वस्तुस्थितींचा अर्थ पूर्ण महत्त्वासह, पूर्णत्वाने आणि स्पष्टपणे उघड करण्याच्या हेतूने रचलेले ललित साहित्य मुद्देसूद, नि:संदिग्ध भाषेत आणि काळजीपूर्वक

निवडलेल्या शब्दांमध्ये लिहिले पाहिजे. "अभिजात" ग्रंथ असे लिहिले गेले. शतकानुशतकांच्या क्रमात साणेवर भाषेला कष्टपूर्वक धार लावून. त्यांची खरी साहित्यिक भाषा आहे. जरी ती भाषा कष्टकरी जनसमूहांच्या बोली भाषेतून घेतलेली असली, तरी मूळ उगमापासून ती अगदी वेगळी भासते, कारण वर्णनात्मक शैलीमध्ये ती बोली भाषेतील सर्व प्रासंगिक, तात्पुरत्या आणि अस्थिर गोष्टी वगळून टाकते; चंचल आणि ध्वनीदृष्ट्या विपरीत बनलेल्या गोष्टी वगळून टाकते; राष्ट्रीय भाषेच्या मुख्य "वृत्तीशी", अथवा धाटणीशी विविध कारणांनी विसंगत ठरणाऱ्या सर्व गोष्टी वगळून टाकते. रेखाटलेल्या पात्रांच्या थेट भाषणात बोली भाषा वापरली जाते हे सांगणे न लगे, पण हा वापर असतो केवळ त्या पात्रांना सजीव करण्यापुरता आणि त्यांचा ठळकपणा प्रतीत करण्यापुरता.

मी खूप लहान होतो तेव्हा नवे शब्द रचण्याचा प्रयत्न केला होता. बचावाच्या वकीलांची आणि फिर्यादी वकीलांची भाषणे ऐकून मला तशी भाबडी स्फूर्ती येत असे. "चांगले" आणि "वाईट" यांना अवगुंठन घालण्यासाठी सुंदर शब्दांचा वापर होत असलेला पाहून मला आश्चर्य वाटायचे. बचावाचा आणि फिर्यादी असे दोन्ही पक्ष सारख्याच चातुर्याने सारखीच शब्दसंपदा वापरत हे पाहून मला आश्चर्य वाटायचे. म्हणून "स्वतःचे शब्द" तयार करण्यासाठी मी हास्यास्पदरीतीने खटपट करीत होतो, वहीमागून वही भरून काढीत होतो. तो आणखी एक "बालरोग" होता. मला सांगायला आनंद वाटतो की, वास्तवता सर्वोत्तम गुणकारी उपाय आहे आणि ह्या उपायाने लौकरच मी बरा झालो.

ज्या युगांमध्ये अत्यंत जोमदार सार्वजनिक कार्ये, विविध नवीन श्रमतंत्रे ह्यांचा मिलाफ झाला व वर्गविग्रह तीव्र बनले, त्या युगांमध्ये भाषा अत्यंत वेगाने समृद्ध बनली, असे संस्कृतीचा इतिहास आपल्याला शिकवतो.

लोककथांमध्ये, म्हणींमध्ये, वाक्प्रचारांमध्ये, गाण्यांमध्ये आपल्याला ह्याचा दुजोरा मिळतो. बोली भाषेच्या स्वाभाविक विकासाचा पुरावा मिळतो. ज्यांचा अर्थ एव्हाना कायमचा पुसून टाकलेला आहे अशा कालबाह्य शब्दांचा पुराणमतवादी बचाव जेवढा व्यर्थ, तेवढेच कृत्रिम, योजलेले "पालट" व्यर्थ आहेत. पूष्कीन स्वतःची म्हातारी दाई, आरीना रोदीओनोवना, हिच्याकडून खूप काही शिकला होता ह्याची आठवण करू या. त्याचप्रमाणे, बोली भाषेचे अत्युत्तम ज्ञान असलेला लेस्कोवसुद्धा स्वतःच्या दाईकडून, एका

सैनिकाच्या बायकोकडून, शिकला होता. एकूण असे म्हटले पाहिजे की, आपल्या दाया, आपले गाडीवान, मच्छीमार, खेड्यातील शिकारी आणि इतर कष्टकरी माणसे–अशा ह्या सर्वसामान्य जनांनी आपल्या साहित्यिक भाषेच्या विकासावर निर्विवाद प्रभाव पाडलेला आहे. पण मग लेखकांनी धान्यातील भूस काळजीपूर्वक पाखडून अत्यंत अचूक, योग्य व अर्थपूर्ण शब्द निवडले. आपल्या सद्य:कालीन लेखकांना अशा निवडीच्या गरजेचे मुळीच महत्त्व वाटत नाही व त्याचा त्यांच्या लेखनांवर प्रतिकूल परिणाम घडलेला दिसतो. ह्या अभावापायी गुणवत्तेच्या चर्चेमध्ये विसंवाद निर्माण होतो आणि आळशी व दुतोंडी चलाख लोकांना चर्चा दाबून टाकण्याची संधी मिळते. केवळ व्याकरणविषयक प्रश्नांपर्यंत त्या चर्चेला ते संकुचित बनवून टाकतात. उलट, दर्जाच्या समस्येला आपल्या देशात ठाम आणि प्रगाढ सामाजिक आशय आहे.

साहित्याचा दुसरा घटक म्हणजे विषय. लेखकाने वैयक्तिक अनुभवाच्या दरम्यान मनात आकारलेली कल्पना. ही कल्पना आपोआप त्याला स्फुरलेली असते, पण अद्याप तिला पुरते पंख फुटलेले नसतात व प्रतिमांच्या रूपाने, शब्दांच्या आकारात तिला रूप मिळावे म्हणून ती लेखकाला प्रेरणा देत असते.

तथाकथित "चिरंतन" विषय आहेत: मृत्यू, प्रेम आणि व्यक्तिवादावर आधारलेल्या समाजाने निर्माण केलेले इतर विषय: मत्सर, सूड, कृपणता इ. एक पुरातन म्हण आहे की, "प्रत्येक गोष्ट बदलते" आणि त्या दृष्टीने "चंद्राखालचे" आणि सूर्याखालचे "काहीही चिरंतन नाही." आपल्या जगावर क्रांतीचा तेजस्वी सूर्य उगवत आहे आणि आपल्याला दाखवत आहे की, वर्गांमधील तीव्र संघर्षावर आधारलेल्या, भाकरीसाठी आणि सत्तेसाठी प्रत्येकजण प्रत्येकाविरुद्ध लढत असलेल्या, समाजामधील व्यक्तीच्या शोकदायी एकाकीपणाच्या व अगतिकपणाच्या जाणीवेमधून हे "चिरंतन" विषय नेहमी उगम पावले आहेत. केवळ प्राथमिक हातातोंडाचा मेळ घालता येईल एवढ्या अस्तित्वासाठी बहुसंख्य समाजघटकांना स्वत:ची सर्व ताकद खर्च करावी लागणे, हे भांडवलदारवर्गीय समाजाचे ठळक आणि सुधारता न येण्याजोगे वैशिष्ट्य असल्याचे प्रत्येकाला ठाऊक आहे. लोकांना त्यांच्या अस्तित्वाच्या तिरस्करणीय आणि अपमानास्पद "वैशिष्ट्या"ची सवय झाली आहे. जरी प्रत्येकाला केवळ स्वत:चीच चिंता करणे भाग पडत आहे, "स्वत:च्याच प्रयत्नांवर लक्ष एकवटावे लागत आहे" तरी समाजव्यवस्थेच्या कुरूपतेची जाण फारच

कमी लोकांना आहे. एकूण पाहता, माणसे ज्या परिस्थितीत राहतात आणि जे काही पाहतात, त्यातील अत्यल्प भागच तेवढा त्यांना समजतो. जे काही ती पाहतात, त्याच्या अर्थाचे चिंतन करायला त्यांच्यापाशी वेळ नाही. स्वत:विषयीच्या क्षुल्लक चिंतांच्या दास्यात ती तडफडत राहतात. स्वत:च्या शारीरिक गरजा भागविण्याच्या, स्वत:च्या अहंकाराला तृप्त करण्याच्या आणि जीवनात अधिक मुलायम जागेला प्राप्त करण्याची महत्त्वाकांक्षा पूर्ण करण्याच्या धडपडीत ही माणसे गुंतलेली असतात. अर्थात जगण्यासाठी त्यांना असे करावे लागते. जे काही दिसते त्यावर विचार न करण्याची सवय अंगी बाणविल्यामुळे अनेकांना आत्मसंरक्षणाचे चांगले साधन लाभते. आत्मसंरक्षणासाठी आणि अत्यंत क्षुल्लक गोष्टींसाठी आपण किती शक्ती वाया घालवितो ह्याची जर भांडवलदारी समाजातील लोकांनी गोळाबेरीज केली, तर त्यांच्या आत्महत्यांचे प्रमाण कदाचित दहा पटींनी वाढेल.

पण दिसलेल्या गोष्टींवर जरी माणसाने चिंतन केले नाही, तरी तो जे काही पाहतो ते कोणत्याही परिस्थितीत त्याच्या स्मृतींच्या भांडारात साठविले जाते, त्याला ते टोचत राहते, जीवनाच्या निरर्थकपणाची निराशाजनक भावना त्याच्या मनात निर्माण करते," कोण कसा जगतो" ह्याला काहीही महत्त्व नाही अशा हीन निष्कर्षाला त्याला आणते. सरतेशेवटी त्याला गूढवादाकडे, अराजकवादाकडे आणि दुष्टतेकडे नेते. अशा रीतीने भांडवलदारी समाज स्वत:ची विषे स्वत:च उत्पन्न करतो व ती विषे आपले नाशकारी कार्य सतत करीत राहतात. भांडवलदारी समाजाचे कुजणे आणि विघटन होणे थांबविण्याचे सामर्थ्य धार्मिक, नीतीपर आणि कायदेविषयक प्रमाणवचनांमध्ये नाही असे आपण पाहतो. वर्गविहीन समाजसत्तावादी समाजामार्फत निर्माण होत असलेल्या परिस्थितींमध्ये "चिरंतन" विषय अंशत: पूर्णतया नष्ट होतील आणि अंशत: त्यांना वेगळा अर्थ प्राप्त होईल. कोणतेही सामाजिक मूल्य असलेल्या कुणा व्यक्तीच्या मृत्यूपेक्षा अतुलनीयरीत्या फार महत्त्वाचे आणि लोकांतिक विषय आपले युग आपल्यासमोर सादर करीत आहे. व्यक्तिवाद्यांना हे आवडणार नाही, पण व्यक्तिवादाला इतिहासाने मरणाची शिक्षा फर्मावली आहे.

साहित्याचा तिसरा घटक म्हणजे कथानक दुसऱ्या शब्दांमध्ये सांगायचे तर ही ना ती व्यक्तिरेखा अथवा नमूना आकार घेत असतानाच्या क्रमातील संगती, विसंगती, सहानुभूती, वैमनस्ये आणि एकूण लोकांमधील संबंध.

**साहित्य** म्हणजे "काल्पनिक" – नाटक, कादंबरी, कथा – असे जर आपल्याला अभिप्रेत असेल, तर साहित्याच्या संकल्पनेला हे तीन घटक पुरेसे आहेत असे मला वाटते. तंत्रे आणि "शैली"बद्दल आपण बोलू शकू, पण तो एव्हाना लेखकाच्या आत्मगत क्षमतांचा प्रश्न आहे. अर्थातच त्यांच्या मागेही त्यांच्या उगमाची आणि विकासाची वस्तुनिष्ठ निर्देशके लपलेली असतात :

१९ व्या शतकातील साहित्याची मुख्य, विस्तृततम आणि अत्यंत फलदायी प्रवृत्ती असलेल्या वास्तववादाबद्दल आता चार शब्द. ही प्रवृत्ती २० व्या शतकात पसरली आहे. धारदार बुद्धिप्रामाण्यवाद आणि टीका तिची वैशिष्टचे आहेत. भोवतालच्या माणसांपेक्षा बौद्धिकरीत्या अधिक पक्व बनलेल्या, आणि रांगड्या, शारीरिक सामर्थ्यामधून स्वतःच्या वर्गाचे सामाजिकदृष्टया सृजनाचे नपुंसकत्व स्पष्ट पाहू शकणाऱ्या लोकांनी ही प्रवृत्ती प्रामुख्याने सुरू केली. ह्या लोकांना भांडवलदारवर्गाचे "उधळे पुत्र" म्हणता येईल. बायबलमधील उधळया पुत्राच्या कथेप्रमाणे, त्यांनी आपल्या वाडवडिलांच्या बंधनापासून, प्रमाणवचनांच्या आणि परंपरांच्या बंधनापासून, दूर पळ काढला. ह्या फुटीरांपैकी फारच थोडे लोक चरबीयुक्त कोकरू खायला त्यांच्या वर्गात परतले, ही गोष्ट त्यांना स्पृहणीय आहे. त्यांची भाषा, शैली व त्यांचे कथानक ह्यांच्या गुणावगुणांची भांडवलदारी टीकाकारांनी चर्चा केली; पण त्यांच्या पुस्तकांमधील मजकुरातील वस्तुस्थितींचा सामाजिक अर्थ उघड करण्याचा मात्र त्या टीकाकारांचा मुळीच इरादा नव्हता आणि १९ व्या शतकातील ह्या युरोपीय वास्तववादी लेखकांबद्दल आपला स्वतःचा दृष्टिकोन घडविण्यात त्यांनी नकळतपणे काहीशी महत्त्वाची कामगिरी बजावली. बाल्झाकच्या कार्याचे सामाजिक महत्त्व फक्त एंगल्स आणि मार्क्स[254] यांनी जाणले. स्तेन्दालना टीकाकार केवळ "टाळून गेले." आपल्या देशात परकी साहित्य मूळ स्वरूपात फार कमी प्रमाणात वाचले जाते आणि पश्चिमी लेखकांच्या जीवनचरित्रांबद्दल, त्यांच्या व्यावसायिक कारकीर्दीबद्दल, तंत्रांबद्दल आणि तत्सम गोष्टींबद्दल माणसांना त्याहूनही कमी माहिती असते.

वास्तवाबद्दलच्या टीकात्मक दृष्टिकोनासाठी भांडवलदारांच्या "उधळया पुत्रां"चे साहित्य अत्यंत मौल्यवान होते. पण शिष्ट आणि तृप्त वर्गाने निर्माण केलेल्या व राखून ठेवलेल्या गलिच्छ गोंधळातून बाहेर मार्ग कसा काढायचा

हे मात्र ह्या लेखकांनी सांगितले नाही. काही थोडे आणि मुख्यत: दुय्यम दर्जाचे लेखक सवंग तत्त्वज्ञानाला आणि प्रभावी टीकेला बळी पडले. त्यांनी दुराराध्य विरोधांचा समन्वय घडवून काही विशिष्ट पोथीनिष्ठ सत्यांना स्थापन करण्याचा प्रयत्न केला. भांडवलदारी समाजव्यवस्थेमधील ठळक आणि कुप्रसिद्ध खोटेपणाला झाकण्याचा त्यामागे इरादा होता. १९ व्या शतकामध्ये विज्ञान आणि अभियांत्रिकी अत्यंत यशस्वीरीत्या भांडवलदारी राज्यांचा भौतिक पाया विस्तृत व बळकट करीत होते, पण युरोपच्या मध्यमवर्गीयांच्या ह्या "यांत्रिक" कार्याबद्दल अथवा त्यांच्या "यांत्रिक" प्रगतीबद्दल फ्रान्सच्या साहित्याने – युरोपातील अग्रणी साहित्याने – क्वचितच आनंद व्यक्त केला होता.

स्वत:च्या सामाजिक अस्तित्वाच्या असुरक्षिततेची व्यक्तीची निराशावादी जाणीव, हा १९ व्या शतकातील साहित्याचा मुख्य विषय होता. शॉपेन-हॉवर, हार्टमान,[255] लेओपार्दी,[256] श्तीर्नेर[257] आणि इतर अनेक तत्त्व-चिंतकांनी जीवनाच्या वैश्विक अर्थहीनतेचा प्रचार करून ही जाणीव दृढ केली. अर्थात ह्या शिकवणीचे मूळही व्यक्तीच्या सामाजिक संरक्षणहीनतेच्या आणि सामाजिक एकाकीपणाच्या त्याच जाणीवेत होते. सोविएत संघात कामगारवर्गीय अधिसत्तेने निर्माण केलेल्या नव्या वास्तवतेमध्ये, एखादी व्यक्ती जरी उत्तर ध्रुवावरील बर्फखंडांमध्ये अडकली असली आणि कोण-त्याही क्षणी स्वत:चा नाश होऊ शकेल हे तिला माहीत असले, तरी तिला एकाकी वाटत नाही अथवा अगतिक वाटत नाही.

१९ वे शतक मुख्यत: निराशावादी शिकवणीचा कालखंड होता. २० व्या शतकात त्या शिकवणीचे स्वाभाविकच सामाजिक दुष्टाव्याच्या प्रचारात अध:पतन घडले. "परोपकारी वृत्तीचे" पूर्णत: आणि ठामपणे खंडन करण्यात आले. त्या परोपकारी वृत्तीचा क्षुद्रबुद्धीच्या लोकांनी सर्वत्र चातुर्याने गाजा-वाजा केला व अक्षरश: फुशारकी मिरवली. अनेकांनी स्वीकारलेल्या शॉपेन-हॉवरच्या धार्मिक, दयेच्या आणि करुणेच्या ढोंगी नीतीमत्तेचा नीत्शेने त्वेषाने त्याग केला आणि त्याहीपेक्षा अधिक ठामपणे व सध्या प्रत्यक्षरीत्या फॅसिझम तिचा धिक्कार करीत आहे. हिटलरचा फॅसिझम म्हणजे स्वत:च्या दुबळ्या बनलेल्या, पण अजूनही चिवट पकड असलेल्या निसटणाऱ्या सत्तेसाठी चाललेल्या मध्यमवर्गीयांच्या वर्गीय लढ्यातील निराशावादाची अभिव्यक्ती होय.

आणखी असेही सांगितले पाहिजे की, व्यक्तीच्या सामाजिक अस्तित्वाच्या आत्यंतिक अस्थिरतेची आणि असुरक्षिततेची भांडवलाच्या अधिक गुणी सेवकांना जाणीव नव्हती आणि प्रत्यक्ष समज नव्हती असे नाही. १९ व्या शतकातील जवळजवळ सर्व "थोर" आणि "प्रसिद्ध" माणसे त्यांच्या एव्हाना प्रकाशित झालेल्या आठवणींमधून, रोजनिशींमधून आणि पत्रांमधून म्हणतात की, भांडवलदारी समाज किती वाईटरीत्या संघटित केलेला होता.

सोविएत संघातील कामगारवर्गीय अधिसत्तेने बजावलेल्या कामगिरींची यादी करताना तिच्यात एक वस्तुस्थिती समाविष्ट करणे अत्यावश्यक आहे की, आश्चर्यकारक शौर्यशाली कार्याद्वारे ती जगावरील निराशावादाची बुरशी व गंज खरवडून स्वच्छ करीत आहे.

भांडवलदारवर्गाच्या "उधळ्या पुत्रां"चा वास्तववाद टीकात्मक वास्तववाद होता. समाजातील कीड उघडकीस आणत असताना, कौटुंबिक परंपरांच्या, धार्मिक प्रमाणवचनांच्या आणि कायदेशीर दंडकांच्या पापामधील व्यक्तीच्या "जीवनाचे" चित्रण करीत असताना, त्या दास्यातून बाहेर कसे पडायचे तो मार्ग टीकात्मक वास्तववाद लोकांना दाखवू शकला नाही. प्रत्येक गोष्टीवर टीका करणे सोपे होते, पण अशा सामाजिक अस्तित्वातील आणि "एकूण आयुष्यातील" उघड निरर्थकतेशिवाय प्रतिपादन करण्यासारखे दुसरे काहीच नव्हते. अनेक मोठ्या आवाजांमध्ये हे प्रतिपादन घडले. बहुधा बायरनपासून त्याचा आरंभ झाला आणि १९३२ मध्ये वारलेल्या थॉमस हार्डीपर्यंत[258] त्याची परंपरा चालू होती. शातोब्रियानच्या[259] 'थडग्यातील टिपणे' आणि इतरांपासून ते ज्यांचा संशयवाद निराशावादाच्या अगदी जवळ येऊन ठेपला होता त्या बॉदलेअर आणि आनातोल फ्रान्सपर्यंत. काही लेखकांनी निराशावादाऐवजी कॅथलिक धर्म स्वीकारला. पण दोन्ही तेवढेच वाईट होते, कारण सर्व चर्चनी सारख्याच आग्रहपूर्वक लोकांमध्ये त्यांच्या अस्तित्वाच्या संघर्षाची अगतिकता बिंबविण्याचा प्रयत्न केला होता. चर्चच्या राजांच्या भौतिक आणि स्वार्थी हितसंबंधांना पूरक न ठरणाऱ्या व इतरत्र रोख असलेल्या कोणत्याही शक्तीला दडपून टाकण्याचा धर्माने जो प्रयत्न केला, त्यातून धर्माची अपायकारकता अत्यंत ठळकपणे व्यक्त झाली आहे. एका धर्मगुरूने अगदी योग्यपणे म्हटले होते की, "ख्रिश्चन धर्म हा उपाध्येपणाचा सर्वांत नफादायी धंदा होता."

आपल्या देशात समाजसत्तावादी वास्तववादाबद्दल खूप काही लिहिण्यात

येते आणि गोगोलवर नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या एका लेखात लेखकाने अत्यंत कुतूहलजनक शोध लावला आहे: तो म्हणजे, गोगोल समाजसत्तावादी वास्तववादी होता. अत्यंत ओबडधोबडरीत्या तयार केलेली साहित्यिक-टीकात्मक सत्ये कोणत्या मूर्खपणाच्या थरापर्यंत जाऊ शकतात ह्याचे ह्या "शोधा" वरून दर्शन घडते. तसेच, हा मूर्खपणा करणाऱ्या लेखकाला स्वत:च्या शब्दांच्या जबाबदारीची अगदी थोडी अथवा मुळीच जाणीव नसल्याचे दिसून येते.

साहित्यामधील वास्तववाद जीवनातील सत्य वस्तुस्थितींचा परामर्श घेतो. 'अंमलदार' आणि 'मृतात्मे' लिहिण्यात आली, त्या काळात रशिया-मध्ये समाजसत्तावादी वस्तुस्थितींचे कुणीही पालन करीत नव्हता. म्हणून ख्लेस्ताकोव, चिचिकोव, सबाकेविच, नझ्द्रेव, प्ल्यूश्कीन[260] आणि आपल्या इतर पात्रांच्या सामाजिक कार्यात अशा वस्तुस्थितींचे गोगोलने दर्शन घडविणे शक्य नव्हते. ह्याचा अर्थ गोगोलवर समाजसत्तावादी वास्तववाद्याचा शिक्का चुकीने मारण्यात आला आहे. तो टीकात्मक वास्तववादी होता आणि एवढा प्रभावी होता की, स्वत:च्या टीकेच्या सामर्थ्याला पाहून खुद्द त्याचीच भीतीने दातखीळ बसली होती. वेडेपणाला प्रगाढ प्रबोधनपर सामाजिक-तत्त्वज्ञानविषयक महत्त्व प्राप्त झाल्याचा त्याचा काही एकमेव प्रसंग नव्हता. उलट अर्धवट शहाणपणाला एवढे महत्त्व कधीच नव्हते आणि तसे ते कधीच असू शकले नसते. काही लेखक ह्या गोष्टीला समजू शकले नाहीत याचे मला आश्चर्य वाटते.

साहित्यामधील समाजसत्तावादी वास्तववाद म्हणजे व्यवहारातील समाज-सत्तावादी सृजनाच्या वस्तुस्थितींचे केवळ प्रतिबिंब असू शकतो. अशा प्रकारचा वास्तववाद आपल्या साहित्यात असू शकेल का? अर्थातच असू शकेल आणि तसा तो असणे अपरिहार्य आहे, कारण क्रांतिकारक समाजसत्तावादी सृजनाच्या वस्तुस्थिती एव्हाना आपल्यापाशी आहेत आणि त्यांची संख्या वेगाने वाढत आहे. आपण अशा देशात रहात आणि काम करीत आहोत, जेथे "गौर-वास्पद आणि सन्मानास्पद" पराक्रम नित्याचे बनले आहेत व त्या सर्वांचा उल्लेख करण्याची तसदीसुद्धा इत:पर वर्तमानपत्रे घेत नाहीत. आपले कादं-बरीलेखकही त्यांचा उल्लेख करीत नाहीत ह्याचे साधे कारण म्हणजे "जीव-नाच्या नकारात्मक बाजू" वर स्वाभाविकपणे आणि यथार्थपणे "पारंगतता" मिळविलेल्या टीकात्मक वास्तववादाच्या जुन्या मार्गानुसार त्यांचे अवधान

अद्याप एकवटलेले आहे. ह्या क्षणी लेखकांना आठवण करून देणे इष्ट ठरेल की, मठ्ठपणा, लबाडी, ढोंग आणि तत्सम विक्षिप्तपणे ह्यांसारख्या दोषां-मागेही स्वाभाविक कारणे आहेत आणि ती कारणे नाहीशी करण्याजोगी आहेत.

टीकात्मक वास्तववादाच्या सनातनी कणखरपणाचे एक प्रमुख कारण म्हणजे व्यावसायिक तांत्रिक कसबाचा लेखकांमधील अभाव. अथवा साध्या शब्दांमध्ये सांगायचे, तर त्यांचे अज्ञान, निरीक्षणाची आणि "अभिज्ञे"ची त्यांची असमर्थता. अनेकदा ह्या कारणाचा संयोग होतो भूतकालाशी भाव-निक आकर्षण असण्याशी. स्वतःची उत्तरक्रिया उत्तम कशी पार पडेल एवढी एकच "जीवनाकांक्षा" धरलेल्या आजोबांशी झालेली मनाची गुंत-वणूक. ह्याच्या जोडीला कमीत कमी प्रतिकाराच्या धोरणाची जोड द्या: दगडापेक्षा लाकडावर काम करणे अधिक सोपे, लोखंडापेक्षा दगड सोपा, पोलादापेक्षा लोखंड सोपे आणि दगडापासून अथवा ओतीव काँक्रीटपासून बांधलेल्या अनेकमजली गाळयांच्या इमारतीमधील जीवनाचे चित्रण करण्या-पेक्षा छोटया लाकडी खोपटामधील कौटुंबिक प्रसंग चितारणे अधिक सोपे.

क्षुल्लक प्रश्नांवर काम करण्याच्या सवयीमुळे मोठा विषय हाताळण्याचे सामर्थ्य रहात नाही. उदाहरणार्थ, औद्योगिक कारखान्याची उभारणी. मुख्य विषयावर, सैद्धांतिक संदेशावर, असंख्य बारीक तपशीलांच्या वर्णनाचा बोजा लेखक रचतो आणि स्वतःच्या वक्तृत्वशक्तीमधून उमललेल्या कागदी फुलांना – बहुधा ती फारशी तेजस्वी नसतात – त्या महाप्रचंड ढिगाखाली गाडून टाकतो. तपशीलांचे वर्चस्व अत्यंत योग्य स्थळी असले तरी ते हानी-कारक आहे. उदाहरणार्थ, सामुदायिक शेतीच्या विकासाची कहाणी सांगताना व्यक्तिवाद्याचे सामुदायिकवाद्यात हळूहळू रूपांतर कसे घडले ह्याचा मागोवा घेत असताना. माझ्या मते, तपशीलांच्या ह्या छंदापायी आणखी एक खेद-जनक सवय आपल्यात मुरली आहे: लेखक आपल्या पुस्तकाचा पहिला भाग प्रकाशनासाठी सुपूर्द करतो, पण दुसऱ्या भागाच्या लेखनाला त्याने अद्याप आरंभही केलेला नसतो, कारण त्याने गोळा केलेला सर्व तपशील एव्हाना वापरलेला असतो व अधिक सांगण्यासारखे त्याच्यापाशी काहीही नसते.

नवोदित लेखकाने मोठ्या कादंबरीने आरंभ करणे अगदी वाईट आहे आणि केवळ ह्यापायी आपल्या देशात प्रचंड शाब्दिक कचरा प्रकाशित होतो.

कसे लिहावे हे शिकण्यासाठी लघुकथा उत्तम माध्यम आहे. सर्व प्रमुख परकी आणि रशियन लेखकांनी ह्याच मार्गाचा अवलंब केला होता. नवशिक्या लेखकाने शब्द काटकसरीने कसे वापरावेत, स्वतःच्या साहित्याचे वाटप तार्किकरीत्या कसे करावे आणि मूळ विषय स्पष्टपणे व प्रभावीपणे कसा मांडावा ह्याचे प्रशिक्षण लघुकथालेखनात मिळते. असे असले तरीही, एका प्रतिभाशाली लेखकाला एकदा मी सल्ला दिला की, जाडजूड कादंबऱ्यांचे लेखन करण्यापासून त्याने विश्रांती घ्यावी आणि बदल म्हणून लघुकथा लिहाव्यात. त्यावर तो लेखक उत्तरला : "छे: छे: लघुकथा हा फार अवघड लेखनप्रकार आहे." असे दिसते की, पिस्तूल बनविण्यापेक्षा तोफ तयार करणे अधिक सोपे आहे. नव्या लेखकांना त्यांच्या कारकीर्दीसमोर उभ्या राहणाऱ्या अडचणींची माहिती असली पाहिजे; युगाने त्यांच्यापासून ठेवलेल्या अपेक्षांची त्यांना जाणीव असली पाहिजे व वाचकाबद्दलच्या त्यांच्या थोर जबाबदारीची त्यांना माहिती पाहिजे. आपल्या सोविएत वाचकाला लेखकांचे जेवढे प्रेम आणि आदर यांचा लाभ झाला आहे, तसे आजवर जगातल्या एकाही वाचकाबाबत कधीही घडले नव्हते.

सत्ये ज्ञानाची उपकरणे असतात, लोकांनी त्यांचा पायऱ्यांसारखा वापर करून वर चढायचे असते. मानवी प्रयत्नांमधून सत्यांची निर्मिती होते आणि मानवजातीच्या सांस्कृतिक विकासाच्या संपूर्ण इतिहासाने हे सत्य अत्यंत ठामपणे स्थापन केले आहे.

माणसाचे उद्दिष्ट जेवढे अधिक वरचे, तेवढी त्याच्या क्षमतांच्या आणि गुणांच्या विकासाची सामाजिकदृष्टया उत्पादकता अधिक, असे मी वारंवार म्हटले आहे. माझ्या एकूण आयुष्यातील अनुभवाच्या जोरावर, जे काही मी निरीक्षण केले, वाचले, ज्या काही तुलना केल्या व जे चिंतन केले, त्याच्या बळावर, हे आणखी एक सत्य मी प्रतिपादन करत आहे. अर्थात त्याला अत्यंत खात्रीलायकरीत्या आणि भक्कमरीत्या दुजोरा मिळतो आपल्या सोविएत वास्तवाचा.

व्लादीमिर लेनिन ह्यांच्या क्रांतिकारक बुद्धिमत्तेने सोविएत संघातील कामगारवर्गापुढे सर्वोच्च ध्येय ठेवले आणि आता सोविएत संघातील दशलक्षावधी कामगारवर्गीय ह्या उत्तुंग ध्येयाच्या प्राप्तीसाठी प्रभावी संघटन करून वाटचाल करीत आहेत, सर्व देशांमधील कामगारवर्गाच्या क्रांतिकारक शक्तीला

अधिकाधिक ठळकरीत्या उत्तेजित बनवीत आहेत, प्रामाणिक लोकांच्या आदरणीय आश्चर्याला व हरामखोरांच्या दुष्ट द्वेषाला जाग आणत आहेत.

"विपुल सर्वसामान्य अक्कल" असलेले लोक, म्हणजे उदासीन राहणे शहाणपणाचे असे मानणारे लोक, वस्तुस्थितींच्या, परंपरांच्या, प्रमाणवचनांच्या आणि नियमांच्या सत्तेपुढे शांतपणे नतमस्तक होणे सर्वोत्तम समजतात. कामगारवर्गाच्या ह्या ध्येयाला ते अवास्तव आणि तऱ्हेवाईक समजतात. लढायांमध्ये ते भाग घेत नाहीत, पण विजयांची फळे मात्र चतुराईने चाखतात. दान्तेच्या 'नरक'[261] वर्तुळांमध्ये अशा माणसांसाठी एक खास जागा राखलेली आहे व त्या स्थानाला हे लोक अगदी सुपात्र आहेत.

सोविएत संघामध्ये आमच्या "तऱ्हेवाईक" ध्येयाच्या सिद्धीपायी विलक्षण पराक्रम घडतात, शौर्यशाली प्रयत्न होतात आणि अत्यंत धाडसी इरादे स्फुरतात. ह्यासाठी मी त्यांची जंत्री देणार नाही, पण **इरादे साध्य होण्यापूर्वीच वस्तुस्थिती कसे बनतात**, ह्याची आपल्या लेखकांना माहिती असली पाहिजे. भाकर खाणे चांगले, पण दरसाल शेतांना नांगरण्यासाठी खर्च होणारी प्रचंड शक्ती दुसरीकडे वापरता यावी म्हणून गव्हाला बारमाही पीक बनविण्यासाठी कोणते प्रयत्न चालू आहेत हे माहीत असणेही चांगले.

अशा रीतीने वर्गविहीन समाजसत्तावादी समाज उभारण्याच्या सर्वोच्च उद्दिष्टाने सामाजिकदृष्टचा उपयुक्त श्रमाद्वारे सत्यांची निर्मिती करण्यात येत आहे. माणसाकडून व्यर्थरीत्या खर्च होणाऱ्या शारीरिक शक्तीचे ह्या समाजात बौद्धिक शक्तीमध्ये रूपांतर करण्यात येईल. व्यक्तीच्या क्षमतांच्या आणि गुणांच्या विकासासाठी ह्या समाजात अमर्याद संधी देण्यात येतील.

ह्या कामकरी जीवनाचे चित्रण करणे आणि पात्रांच्या व नमुन्यांच्या रूपाने सत्यांचे प्रतिमांमध्ये रूपांतर घडविणे, हे साहित्याचे कार्य आहे. एक म्हण आहे: "जेवढचा जास्त उंचीवर उभे रहाल, तेवढा जास्त दूरचा पल्ला दिसेल." तर मग ह्या ध्येयाच्या उंचीवर उभे राहून पाहू या आणि क्रांतीने चालना दिलेल्या सृजनशक्तीच्या मुख्य महत्त्वाकांक्षेशी तुमच्या पुस्तकांच्या विषयांचा व कथानकांचा सुसंवाद कितपत जमतो, ह्या जबरदस्त उत्तेजनाचा प्रभाव तुम्ही स्वतः कितपत अनुभवत आहात, त्याचा अंदाज घेऊ या.

१९३४

[262]

# सोविएत साहित्य

## सोविएत लेखकांच्या पहिल्या अखिल-संघ काँग्रेसमधील भाषण, १७ ऑगस्ट, १९३४

ताठ उभे राहणाऱ्या प्राण्याचे मानवात रूपांतर घडविणाऱ्या आणि संस्कृतीची अधिष्ठाने घालणाऱ्या श्रमप्रक्रियांच्या भूमिकेचा सार्थरीत्या संपूर्ण-पणे व सखोलपणे कधीच अभ्यास झालेला नाही. हे अगदी स्वाभाविक आहे, कारण जनसमूहांची शक्ती नामक कच्च्या मालाचे पैशामध्ये स्थित्यंतर घडविणाऱ्या श्रमाच्या शोषकांना अशा प्रकारचे संशोधन हितावह नाही. आणि अर्थातच त्या कच्च्या मालाचे मूल्य वाढविण्यात त्यांना मुळीच स्वारस्य नाही. अगदी प्राचीन काळापासून, गुलामांचे मालक आणि गुलाम अशी माणसांमध्ये विभागणी झाल्याच्या काळापासून, कष्टकरी जनसमूहांच्या स्नायूंचा सध्या आपण नद्यांच्या यांत्रिक शक्तीचा वापर करतो तशा पद्धतीने वापर करण्यात येत होता व अद्यापही तसा वापर करण्यात येत आहे. आदिमानव तत्त्वज्ञानपर कल्पनावादी आणि गूढवादी होते, देवांचे निर्माते होते आणि "जीवनाच्या अर्था"चा शोध घेणारे होते, असे संस्कृतीच्या इतिहासकारांनी वर्णन केलेले आहे. १६ व्या शतकाच्या अखेरीस आणि १७ व्या शतकाच्या आरंभी राहणाऱ्या जेकब ब्योम नामक चांभाराच्या मनोवृत्तीची वैशिष्टये आदिमानवाला चिकटविण्यात आलेली आहेत. हा जेकब ब्योम इतर अनेक गोष्टींबरोबर, भांडवलदारी गूढवाद्यांना प्रिय अस-लेल्या तत्त्वज्ञानातही रमत होता. ह्या माणसाने शिकवण दिली की, "स्वर्ग, तारे, पंचमहाभूते आणि त्यांच्यापासून निर्माण झालेले प्राणी ह्यांच्याबद्दल मानवाने चिंतन करावे; तसेच पवित्र देवदूत, सैतान, स्वर्ग आणि नरक ह्यांच्याविषयी चिंतन करावे."

पुरातनवस्तुशास्त्राने पुरविलेला तपशील आणि प्राचीन धर्मांचा प्रभाव ह्यांचा आद्य संस्कृतीच्या इतिहासाने आधार घेतल्याचे तुम्हाला माहीतच आहे. प्राचीन धर्मांच्या प्रभावाला ख्रिश्चन तात्त्विक पोथीनिष्ठेच्या दृष्टिको-नातून मापण्यात येत होते. हा दृष्टिकोन नास्तिक इतिहासकारांनाही परका नव्हता. स्पेन्सरच्या[263] अतींद्रिय विकासाच्या सिद्धांतात हा प्रभाव दिसून

येतो. एवढेच नव्हे तर फ्रेझर[264] आणि इतरांनाही त्याची बाधा झाली होती. मात्र, आद्य आणि प्राचीन संस्कृतीच्या एकाही इतिहासकाराने लोक-कथांच्या तपशीलाचा, लोकांच्या मौखिक कलेचा, अथवा पुराणशास्त्राने दिलेल्या पुराव्यांचा वापर केलेला नाही. वस्तुत: त्यांमधून एकूण नैसर्गिक परिस्थितीचे, निसर्गाविरुद्धच्या संघर्षाचे प्रतिबिंब घडते. व्यापक कलात्मक निष्कर्षांच्या रूपाने सामाजिक जीवनाचे प्रतिबिंब घडते.

जीवनसंघर्षामध्ये आपले सर्व प्रयत्न कारणी लावणारा द्विपाद प्राणी श्रम-प्रक्रियांपासून आणि कुळाच्या व टोळीच्या समस्यांपासून वंचित अशा विचारांमध्ये गुंतून राहील, अशी कल्पना करणे अवघड ठरेल. तसेच, अनवाणी आणि प्राण्यांची कातडी पांघरून "स्वयंपूर्ण वस्तुसिद्धांता"च्या विचारात गुरफटलेल्या इम्मान्युएल कांटची[265] कल्पना करणेसुद्धा अवघड ठरेल. नंतरच्या काळातील माणसाने अमूर्त विचार केला होता. त्या एकाकी माणसाविषयी ॲरीस्टॉटलने[266] स्वत:च्या 'पोलीतिका' मध्ये म्हटले होते: "समाजाच्या बंधनांविना राहणारा माणूस एकतर देव असला पाहिजे अथवा पशू." पशू ह्या नात्याने काहीवेळा त्याने इतरांकडून बळजबरीने स्वत:ला देव म्हणवून घेतले होते, पण प्राण्यासमान पुरुषांबद्दलच्या असंख्य दंतकथां-नाही तो स्वत: विषय ठरला होता. घोड्याला माणसाळवून त्याच्यावर स्वार होणाऱ्या पहिल्या पुरुषांनी ज्याप्रमाणे अर्ध अश्व-अर्ध पुरुष अशा राक्ष-साच्या दंतकथेला जन्म घातला त्याप्रमाणे.

श्रम-प्रक्रियांमधून आणि प्राचीन मानवाच्या सामाजिक जीवनाच्या वस्तु-स्थितींच्या गोळाबेरजेतून अपरिहार्यपणे निवळून निघालेल्या भौतिकवादी धाटणीच्या विचाराच्या अचूक खुणांबाबत आद्य संस्कृतीचे इतिहासकार पूर्णत: गप्प आहेत. जंगली जनावरांना माणसाळविण्याच्या, औषधी मुळ्या शोध-ण्याच्या आणि हत्यारे शोधून काढण्याच्या आठवणींना सामावणाऱ्या परीकथां-च्या आणि दंतकथांच्या रूपाने ह्या खुणा आपल्यापर्यंत येऊन पोहोचल्या आहेत. प्राचीन काळातही पुरुषांना अंतरिक्ष-उड्डाणाची स्वप्ने पडत. फेटन, देदॉलस आणि त्याचा मुलगा इकारूस ह्यांच्याविषयीच्या दंतकथांमध्ये व "उडत्या गालीचा"च्या कथेत ह्याचा पुरावा आढळतो. वेगवान प्रवासाचीही पुरुषांना स्वप्ने पडत. म्हणूनच "साडेदहा कोस बूटां" विषयीची परीकथा निर्माण झाली व घोड्याला पाळीव प्राणी बनविण्यात आले. नद्यांच्या प्रवाहांच्या वेगांपेक्षा अधिक गतीने प्रवास करण्याच्या इच्छेमधून वल्ह्याचा

आणि शिडाचा शोध लागला, तर दूर अंतरावरून शत्रूंचा आणि पशूंचा निःपात घडविण्याच्या प्रयत्नांमधून गोफणीचा व धनुष्य-बाणांचा शोध लागला. एका रात्रीत सूत कातून प्रचंड प्रमाणात कापड विणण्याची स्वप्ने माणसे पहात होती. एका रात्रीत "प्रासाद" बांधण्याची, म्हणजे कोणत्याही शत्रू-पासून बचाव होईल असे तटबंदीचे घर बांधण्याची, स्वप्ने पहात होती. सूत काढण्याचा चरखा हे एक अत्यंत प्राचीन उपकरण आणि आद्य हातमाग जसे अस्तित्वात आले, तसेच शहाण्या वासिलिसाबद्दलची[267] रशियन परीकथा जन्माला आली. प्राचीन परीकथा आणि दंतकथा प्रत्यक्ष जीवनातील गोष्टीं-वरून जन्माला आल्या ह्याचे असे कित्येक दाखले देता येतील. आदिमानव प्रतिमांच्या आणि गृहीतांच्या भाषेत विचार करीत होता, ह्याबद्दल त्याच्या दूरदर्शित्वाची डझनावारी उदाहरणे देता येतील. त्याचे विचार करणे एव्हाना तंत्रशास्त्रीय धर्तीवर चालले होते. पृथ्वीच्या स्वतःच्या अक्षाभोवती फिरण्या-मधून निर्माण होणाऱ्या शक्तीचा वापर अथवा ध्रुवीय बर्फाचा नाश, ह्या-सारखी वर्तमानकालीन अनुमाने त्यातूनच जन्माला आली. गळ्यापर्यंत पाण्यात असलेला टॅन्टालस तहानेने तडफडतो, ही दंतकथा म्हणजे प्राचीन काळातील सर्व दंतकथांचा आणि गोष्टींचा कळस होय. अद्याप आकलन न झालेल्या सभोवतालच्या बाह्य जगातील परिस्थितीने वेढलेल्या प्राचीन मानवाची ती प्रतिमा आहे.

ह्या प्राचीन कथा, दंतकथा आणि पुराणकथा तुम्हाला माहीत आहेत ह्याबद्दल मला संदेह नाही, पण त्यांचा मूलभूत अर्थ अधिक सखोलपणे समजून घेतला जावा अशी माझी इच्छा आहे. प्राचीन काळातील कामकरी माणसांची स्वतःचे श्रम हलके करण्याची धडपड, उत्पादकता वाढविण्याचे त्यांचे प्रयत्न, द्विपाद आणि चतुष्पाद अशा दोन्ही शत्रूंविरुद्ध शस्त्रसज्ज राह-ण्याचे त्यांचे प्रयत्न व शब्दोच्चारांच्या साह्याने, "मंत्र" आणि "प्रार्थना" ह्यांच्या साह्याने, विरोधी नैसर्गिक शक्तींवर स्वतःचा प्रभाव पाडण्याचे त्यांचे प्रयत्न मला अभिप्रेत आहेत. उच्चारीत शब्दाच्या शक्तीवर माणसांचा गाढ विश्वास होता ही वस्तुस्थिती विशेष महत्त्वाची आहे. लोकांचे सामाजिक जीवन आणि श्रम-प्रक्रिया यांचे संयोजन करणाऱ्या मानवी बोलण्याच्या ठळक आणि दृश्य फायद्यांमधून ही श्रद्धा निर्माण झाली होती. "प्रार्थनां" मार्फत देवांवर प्रभाव पाडण्याचेही त्यांनी प्रयत्न केले. हे अगदी स्वाभाविक होते, कारण प्राचीन काळातील सर्व देव पृथ्वीवर रहात होते, मानवी रूपे धारण

करीत होते आणि मानवासारखेच वागत होते. ते आज्ञाधारकांवर अनुग्रह करीत आणि आज्ञाभंग करणाऱ्यांवर डोळे वटारीत. माणसांप्रमाणेच ते मत्सरी, सूडवादी आणि महत्त्वाकांक्षी होते. देव सगुणरूप होते ह्यावरून सिद्ध होते की, नैसर्गिक परिस्थितीच्या चिंतनामधून धार्मिक विचारसरणी उद्‌भवली नाही, तर सामाजिक संघर्षामधून ती निर्माण झाली आहे. प्राचीन काळातील "नामवंत" लोकांनी देवांच्या शोधाला कच्चा माल पुरविला असणे अगदी सहज शक्य आहे. "श्रमवीर" आणि "कसबी" हर्क्यूलसला कालांतराने उच्च पातळीवर चढवून ऑलीम्पसवरील देवांच्या मालिकेत बसविण्यात आले. आदिमानवांच्या कल्पनाशक्तीमध्ये देव म्हणजे एक अमूर्त संकल्पना अथवा अचाट व्यक्ती नव्हता; उलट हाती एखादे श्रमसाधन घेतलेला, या ना त्या व्यवसायात निपुण असा आणि मानवाचा शिक्षक व साथी होता. देव पूर्णतः वास्तव व्यक्ती होता. श्रमातील यशांचे कलात्मक रूप म्हणजे देव होता. म्हणून कष्टकरी जनसमूहांची "धार्मिक" विचार-सरणी अवतरण चिन्हांमध्ये मांडली पाहिजे, कारण ती विशुद्ध कलात्मक निर्मिती होती. माणसाच्या क्षमतांना जरी तिच्यात आदर्श रूप दिले होते आणि त्यांच्या प्रभावी विकासाची ती अग्रदूत होती, तरी पुराणकथांची निर्मिती मूलतः वास्तववादी होती. प्राचीन अद्भुताच्या प्रत्येक भरारीत उत्तेजना सहज आढळून येते. स्वतःचे श्रम हलके करण्याचे माणसाचे प्रयत्न म्हणजे ही उत्तेजना आहे. शारीरिक श्रमांमध्ये गुंतलेल्या माणसांमध्ये हे प्रयत्न निर्माण झाले होते हे अगदी स्पष्ट आहे. शिवाय, पृथ्वीच्या मालकांना जर एवढा उपयुक्त नसता, श्रमाचे शोषण करणाऱ्यांना जर उपयुक्त नसता, तर एकही देव कामकरी लोकांच्या दैनंदिन जीवनात उदयाला आला नसता आणि एवढ्या प्रदीर्घ काळपर्यंत अस्तित्वात राहिला नसता. आपल्या देशात अत्यंत वेगाने आणि सहजपणे देव निरुपयोगी बनत चालला आहे त्याचे नेमके कारण त्याच्या अस्तित्वाची गरजच नाहीशी झालीय. म्हणजे माणसाने माणसावर सत्ता गाजविण्यासाठी समर्थन करण्याची गरज नाहीशी झालीय. ह्याचे कारण आपल्या देशात कुणीही माणूस दुसऱ्या माणसांचा साथी आहे, त्यांचा मित्र आणि सहकारी आहे, त्यांचा शिक्षक आहे. पण त्यांच्या मनांवर आणि इच्छांवर मात्र त्याचे कधीही प्रभुत्व असत नाही.

गुलामांचा मालक जेवढा अधिक सामर्थ्यवान आणि सत्ताप्रेमी बनला, तेवढे देवांचे अधिक उंचीवर स्वर्गारोहण घडले. जनसमूहांमध्ये देवांचा

संघर्ष सुरू झाला. प्रॉमीथस, एस्तोनियन कालेवी[268] आणि इतर वीरांच्या रूपाने ह्या संघर्षाला मूर्त रूप लाभले. त्यांच्याशी वैर धरणाऱ्या कुणाही देवाला ते मालकांचा मालक मानीत.

ख्रिश्चनपूर्व मूर्तिपूजकांच्या लोककथांमध्ये "वस्तुमात्रा"संबंधी, "कोणत्याही परिस्थितीच्या मूळ कारणा"संबंधी, कोणत्याही "स्वयंपूर्ण वस्तू सिद्धांता"संबंधी विचाराचे सुस्पष्ट अवशेष राखण्यात आले नव्हते. ख्रि. पू. चौथ्या शतकातील "ॲटिकाचा भविष्यवेत्ता", **श्रम-प्रक्रिया आणि दैनंदिन जीवनातील स्थिती व परिस्थितींपासून फारकत असलेल्या जगाविषयीच्या कल्पनेचा संस्थापक, प्लेटो,**[269] ह्याच्या विचारसरणीचे अवशेषही त्यांच्यात नव्हते. तुम्हाला माहीतच आहे की, चर्चने प्लेटोला ख्रिश्चन धर्माचा अग्रदूत मानले होते आणि श्रमात मूळ असलेल्या "मूर्तिपूजकांच्या अवशेषां"विरुद्ध –जगाविषयीच्या भौतिकवादी विचारांविरुद्ध–स्वतःच्या संस्थापनेपासूनच कडवा संघर्ष केला होता. सर्वांना विदित आहे की, सरंजामदारांना भांडवलदारवर्गाची सत्ता जाणवू लागताच, बिशप बर्कले ह्यांच्या कल्पनावादी तत्त्वज्ञानाचा उदय झाला. त्या तत्त्वज्ञानाचे प्रतिगामी स्वरूप लेनिन यांनी कल्पनावादाविरुद्धच्या आपल्या लढाऊ पुस्तकात[270] उघड केले. १८ व्या शतकाच्या अखेरी, फ्रेंच क्रांतीच्या वेधकाळी, सरंजामशाही आणि त्याची प्रेरक शक्ती असलेला धर्म यांच्याविरुद्ध लढा देण्यासाठी भांडवलदारवर्गाने भौतिकवादी विचाराचा वापर केला. भांडवलदारवर्गाने वर्गीय शत्रूवर विजय मिळविल्यानंतर, नव्या शत्रूची–कामगारवर्गाची–धास्ती बाळगून, तात्काळ कल्पनावादी तत्त्वज्ञानाकडे माघार व चर्चचा आसरा घेतला. कष्टकरी जनसमूहांवरील स्वतःच्या सत्तेच्या बेकायदेशीर आणि अनिश्चित स्वरूपाची थोडी-फार अस्वस्थ जाणीव असलेल्या भांडवलदारवर्गाने टीकावादाच्या तत्त्वज्ञानाचा, प्रत्यक्षज्ञानवादाच्या, बुद्धिप्रामाण्यवादाचा, पुराणमतवादाचा आधार घेऊन सबंध १९ व्या शतकभर स्वतःच्या अस्तित्वाचे समर्थन करण्याचे प्रयत्न केले. तसेच, श्रम-प्रक्रियांमध्ये मूळ असलेल्या विशुद्ध भौतिकवादी विचाराला विपर्यस्त रूप देण्याचे प्रयत्न केले. जगाचा "खुलासा" करण्यास हे प्रयत्न पूर्णतया अक्षम ठरल्याचे कालांतराने उलट सिद्ध झाले आणि २० व्या शतकात, बेर्गसन[271] नामक कल्पनावादी तत्त्वज्ञानपर विचाराचा नेता म्हणून पुन्हा एकदा स्वीकारण्यात आला. जाता जाता सांगायचे म्हणजे त्याची शिकवण "कॅथलिक धर्माला अनुकूल" होती. माघारीची गरज

असल्याची ही उघड कबुली आणि भांडवलदारांना अकथित संपत्तीचा लाभ करून देणाऱ्या तंत्रशास्त्राच्या जलद प्रगतीच्या नाशदायी ध्वन्यर्थासंबंधीच्या भांडवलदारवर्गाच्या आजच्या तक्रारी, यांचा एकत्र विचार केल्यास भांडवल-दारांच्या बुद्धिदारिद्र्याची आपल्याला स्पष्ट कल्पना येते. जगाला स्वतःच्या दुर्गंधांनी विषारी बनविणाऱ्या, ऐतिहासिक अवशेष ठरलेल्या, भांडवलदारांना नष्ट करण्याची गरज असल्याचे आपल्याला पटते. जीवनाच्या मूलभूत परि-स्थितीच्या अभिज्ञेपासून फारकत घेण्यापायी नेहमी बुद्धिदारिद्र्यता आलेली आहे. जीवनाबद्दलच्या भीतीपोटी घडणाऱ्या पलायनवादापायी अथवा स्वस्थ राहण्याच्या स्वार्थी इच्छेपायी, किंवा भांडवलदारी शासनाच्या ग्राम्य व तिरस्करणीय अराजकवादामधून जन्मलेल्या सामाजिक अनास्थेपायी बौद्धिक दारिद्र्य निर्माण झालेले आहे.

जेव्हा संस्कृतीचा इतिहास मार्क्सवाद्यांकडून लिहिला जाईल, तेव्हा आशा करण्यास पुरेसे कारण आहे की, **सांस्कृतिक सृजनशीलतेच्या प्रक्रियेत भांडवलदारवर्गाच्या भूमिकेला अतिरेकी महत्त्व देण्यात आल्याचे** आपल्याला आढळून येईल. साहित्यामध्ये विशेष अधिक आणि त्याहीपेक्षा चित्रकलेमध्ये त्याचे अधिक स्तोम आढळेल, कारण तेथे भांडवलदार नेहमी मालक होते व परिणामी कायद्यांचे निर्माते होते. बाह्य आणि भौतिक जीवनसुखांचा सतत विकास व चैनीचा विकास, ह्यापेक्षा सांस्कृतिक सृजनशीलता अधिक काही आहे असे जर समजून घेतले, तर आढळून येते की भांडवलदारवर्गाने सांस्कृतिक सृजनाची कधीही इच्छा धरलेली नाही. भांडवलशाहीची संस्कृती म्हणजे दुसरेतिसरे काहीही नाही; तर जगावर, स्त्री-पुरुषांवर, पृथ्वीवरील भांडारांवर आणि निसर्गाच्या शक्तींवर भांडवलदारांची शारीरिक व नैतिक सत्ता व्यापक आणि दृढ करण्याच्या उद्दिष्टांना बाळगणारी पद्धतींची व्यवस्था. **सांस्कृतिक विकास मानवजातीच्या अखिल समहाच्या प्रगतीची गरज आहे, हे भांडवलदारांना कधी समजलेलेच नाही.** भांडवलदारी आर्थिक धोरणाच्या परिणामी, राज्य म्हणून संघटित झालेले कोणतेही शेजारी राष्ट्र शत्रू मानले जात होते आणि विस्कळीत असलेल्या टोळ्या, विशेषतः वर्णीय टोळ्या, भांडवलदारांच्या गुलाम म्हणून राबल्या व भांडवलदारांच्या स्वतःच्या पांढऱ्या गुलामांपेक्षा त्यांच्यावर जास्त दडपशाही गाजविण्यात आली, हे सर्वांना माहीतच आहे.

शिक्षण घेण्याच्या, स्वतःच्या मनांचा विकास घडविण्याच्या हक्कापासून

शेतकऱ्यांना व कामगारांना वंचित ठेवण्यात आले होते. जीवनाची अभिज्ञा करून घेण्याची, त्याला नवा आकार देण्याची आणि कामाच्या परिस्थितीं-मध्ये सुधारणा करण्याची त्यांची इच्छा दडपून टाकण्यात आली होती. भांडवलशाहीचे आज्ञाधारक सेवक प्रशिक्षित करण्याच्या उद्दिष्टानेच केवळ, भांडवलशाही कायम टिकणार आहे आणि ती कायदेशीर आहे असा विश्वास बाळगणाऱ्या लोकांनाच केवळ प्रशिक्षित करण्याच्या दृष्टीने शालेय शिक्षण आखण्यात आले होते. "लोकांच्या शिक्षणा" बाबत खूप काही लिहिण्यात आणि बोलण्यात आले आहे, साक्षरता प्रसाराच्या यशांबद्दल बऱ्याच बढाया मारण्यात आल्या आहेत, पण प्रत्यक्षात कामकरी लोकांमध्ये फूट पाडण्यात आली. वंश, राष्ट्रे आणि धर्म ह्यांबद्दलच्या दुराराध्य मतभेदांना त्यांच्या मनांमध्ये रुजविण्यात आले. संपत्ती गोळा करण्याच्या मूर्ख इच्छेला, दुकान-दारांच्या वेडपट लोभाला अधिकाधिक संधी उपलब्ध करून देणाऱ्या अमानुष वासाहतिक धोरणाच्या समर्थनार्थ हे प्रचारी प्रयत्न आहेत. भांडवलदारी शास्त्राने ह्या प्रचाराला साह्य केले आहे आणि आर्यांचा इतर सर्व वंशांसंबंधी-चा नकारात्मक दृष्टिकोन "अखिल लोकांच्या आध्यात्मिक कार्यांमधून जैव-रीत्या निर्माण झाला" असे प्रतिपादन करण्यास त्या शास्त्राला किंचितही रूखरूख वाटत नाही. जर "सबंध लोक" वर्णीय वंशांबद्दलच्या अथवा यहुद्यांबद्दलच्या लाजिरवाण्या आणि रानटी द्वेषाने ग्रासले गेले, तर भांडवल-दारांच्या अत्यंत खऱ्या आणि अत्यंत निंद्य अशा "जाळपोळीच्या आणि खून-कत्तलीच्या" कारवायांमार्फत ही बाधा घडविण्यात आली आहे असे स्पष्ट होईल. ख्रिश्चन चर्चने ह्या सर्व कारवायांना देवाच्या लाडक्या पुत्राच्या आवेगाचे रूप दिले होते ह्याची जर आठवण केली, तर ह्यातील दुष्ट विनोद त्याच्या पूर्ण नागड्याउघड्या स्वरूपात दृग्गोचर होतो. जाता जाता सांगायचे म्हणजे ख्रिस्त, "देवाचा पुत्र", एवढी एकच "विधायक" स्वभा-वाची व्यक्तिरेखा चर्चच्या साहित्याने निर्माण केलेली आहे. जीवनातील सर्व विसंगतींची तडजोड घडवू पाहणाऱ्या ह्या हतभाग्यामध्ये त्या साहित्याची सृजनाविषयीची नपुंसकता ठळकपणे दिसून येते.

तांत्रिक आणि वैज्ञानिक शोधांच्या इतिहासामध्ये तंत्रांच्या विकासालाही भांडवलदारांनी विरोध केल्याचे भरपूर दाखले उपलब्ध आहेत. हे दाखले सर्वांना माहीत आहेत आणि त्यांचे कारणसुद्धा – जिवंत श्रमशक्तीची स्वस्ताई. असे म्हटले जाईल की, तरीसुद्धा तंत्रशास्त्राची वाढ झाली व त्याचा लक्षणीय

विकास घडला. ही निर्विवाद गोष्ट आहे, पण असे होण्याचे कारण खुद्द तंत्रशास्त्रच स्वतःच्या वाढीच्या गरजेची आणि स्वतःमधील सामावलेल्या संधींची माणसाला जाणीव करून देते.

अर्थात मी नाकारणार नाही की, स्वतःच्या काळात भांडवलदार एक क्रांतिकारक शक्ती होते. उदा. सरंजामशाहीच्या संदर्भात. आणि त्यांनी भौतिक संस्कृतीची जोपासना केली. ह्या प्रगतीसाठी कामकरी समूहांच्या हितसंबंधांचा आणि शक्तींचा अपरिहार्यपणे बळी देऊन. पण फूल्टनचे[272] उदाहरण दाखविते की, फ्रेंच भांडवलदारांनी स्वतःचा विजय घडल्यानंतर-सुद्धा, व्यापाराच्या विकासासाठी व आत्मरक्षणासाठी आगबोटींचे महत्त्व तात्काळ मान्य केले नाही. क्षुद्र प्रवृत्तींच्या सनातनवादाचे हे काही एकमेव उदाहरण नव्हे. पण जगावरील स्वतःची सत्ता बळकट करण्याची आणि तिचे रक्षण करण्याची भांडवलदारांची आस्था लपविणाऱ्या ह्या सनातन-वादाने हरतऱ्हेने कष्टकरी लोकांच्या बौद्धिक विकासाच्या संधींना अडथळा केला आहे, ह्याची आपल्याला जाणीव असणे महत्त्वाचे आहे. पण सरते-शेवटी त्यामुळेच जगात एका नव्या शक्तीचा उदय झाला – कामगारवर्गाचा. त्याचे एव्हाना असे एक राज्य निर्माण केले आहे, ज्यात जनसमूहांच्या बौद्धिक वाढीला मर्यादा घातली जात नाही. फक्त एकाच क्षेत्रात भांडवल-दारांनी तांत्रिक शोधांना विनाविलंब स्वीकारले आहे – लोकांचा संहार करणाऱ्या शस्त्रांच्या उत्पादनात. धातूकाम उद्योगाच्या तंत्रशास्त्रातील एकूण प्रगतीवर भांडवलदारांच्या आत्मरक्षणाच्या शस्त्र-उत्पादनाने घडविलेल्या प्रभावाची अद्याप कुणी नोंद घेतली आहे, असे मला वाटत नाही.

सर्वसाधारणपणे जेव्हा हात डोक्याला शिकवितात, नंतर डोके ते नवे ज्ञान हातांना देते व नंतर ते हात मेंदूच्या अधिक मोठ्या विकासात काम-गिरी बजावतात, तेव्हाच फक्त लोकांच्या सामाजिक आणि सांस्कृतिक विकासाची प्रगती होते. तुम्हाला माहीत असलेल्या कारणांनी प्राचीन काळी कामकरी लोकांच्या सांस्कृतिक विकासाच्या सुरळीत प्रक्रियेमध्ये अडथळे आणले होते. बौद्धिक आणि शारीरिक कामामध्ये तफावत निर्माण झाली व मानवी विचाराची मातीपासून फारकत घडली. व्यावहारिक कार्यात गुंतलेल्या जनसमूहांमध्ये चिंतकांचा उदय झाला. मानवांच्या हितांनुसार आणि त्यांच्या उद्दिष्टांसाठी जगाचे स्थित्यंतर घडविणाऱ्या श्रम-प्रक्रियांचा अजिबात संदर्भ न देता ह्या चिंतकांनी अमूर्त रीतीने जगाचा आणि विचाराच्या विका-

साचा खुलासा केला. आरंभी ते कदाचित श्रमाच्या अनुभवाचे संयोजक होते. आज आपल्या देशात ज्यांना आपण पाहतो त्या श्रमवीरांसारखे ते होते. नंतर अशा लोकांमध्ये इतरांवर सत्ता गाजविण्याचा मोह निर्माण झाला. सर्व सामाजिक वाईटांचा तो उगम आहे. इतरांच्या जीवावर ऐषआरामी जीवन जगण्याची इच्छा त्यांच्यात निर्माण झाली व स्वतःच्या वैयक्तिक ताकदीबद्दल अतिरेकी कल्पना बनली. विशिष्ट व्यक्तीमध्ये असाधारण क्षमता असण्याच्या मान्यतेमुळे हा विचार अधिक बळकट बनला. वस्तुतः कामकरी समूहाच्या – कुळाच्या अथवा टोळीच्या – श्रमसिद्धींचे त्या क्षमता म्हणजे एकवटलेले स्वरूप होते, दर्शन होते. संस्कृतीच्या इतिहासकारांनी श्रम आणि विचार ह्यांच्यामधील ही फारकत संपूर्ण आदिमानवांना लागू केली. व्यक्तिवाद्यांचे शिक्षण म्हणजे जनसमूहांमध्ये गुणाची बाब होती असे हे इतिहासकार मानीत होते. साहित्याच्या इतिहासाने व्यक्तिवादाचा इतिहास पूर्णपणे आणि स्पष्टपणे पुरविला आहे. कॉम्रेडहो, मी परत एकदा ह्या वस्तुस्थितीकडे तुमचे लक्ष वेधवू इच्छितो की, अत्यंत सखोल, ठळक आणि कलात्मकदृष्टचा निर्दोष स्वरूपाचे नायक लोककथांनी निर्माण केले आहेत. कामकरी लोकांची ही मौखिक निर्मिती आहे. हर्क्यूलस, प्रॉमीथस, मिकूला सेल्यानीनोविच,[273] स्व्यातोगोर,[274] डॉक्टर फाऊस्ट, शहाणी वासिलिसा, उपरोधिक आणि सुदैवी भाबडा इवान[275] आणि पेत्रूश्का[276] – अशा सर्व व्यक्तिरेखांमध्ये बुद्धिप्रामाण्य आणि अंतर्ज्ञान, विचार आणि भावना ह्यांचा सुसंवादी मिलाफ आढळतो. असा मिलाफ तेव्हाच शक्य होतो, जेव्हा त्याचा निर्माता जीवनाच्या सृजनशील कामात, जीवनाला नव्याने आकार देण्याच्या लढ्यात, थेटपणे भाग घेत असतो.

लोककथांमध्ये निराशावादाचा लवलेशही नव्हता ही नोंद घेतली पाहिजे. वस्तुतः लोककथांच्या निर्मात्यांना खडतर आणि छळवादी आयुष्ये कंठावी लागली होती, कारण त्यांच्या गुलामी श्रमांना शोषक निरर्थकपणे वापरीत होते व त्यांची वैयक्तिक आयुष्ये रक्षणहीन होती, त्यांच्या मालकांच्या लहरींवर अवलंबून होती. असे होते तरीसुद्धा सामुदायिकाला स्वतःच्या अमरत्वाची जाणीव होती व विरोधी शक्तीवर ते अंतिम मात करू शकेल असा त्याला विश्वास वाटत होता. लोककथांमधील "मूर्ख" अथवा साधा-बागडा माणूस त्याच्या बापाकडून आणि भावांकडून हेटाळला जात असला तरी नेहमीच तो त्यांच्यापेक्षा जास्त शहाणा ठरत होता व शहाण्या वासि-

लिसाप्रमाणे दैनंदिन जीवनातील सगळ्या अडचणींवर नेहमी मात करीत होता.

जर लोककथांमध्ये निराशेचे आणि ऐहिक जीवनाच्या अर्थाबद्दल शंका व्यक्त करणारे सूर काहीवेळा उमटत असले, तर ख्रिश्चन चर्चमार्फत दोन हजार वर्षे घडणाऱ्या निराशावादाच्या प्रचाराचा तो परिणाम मानला पाहिजे. त्याचप्रमाणे, भांडवलाचा घण आणि कष्टकरी लोकांची ऐरण ह्यांच्या दरम्यान सापडलेल्या परपुष्ट मध्यमवर्गाच्या अज्ञानाच्या संशयवादाचा तो परिपाक मानला पाहिजे. श्रमाच्या सिद्धींमधून निर्माण होणाऱ्या तऱ्हेवाईक कल्पनेच्या लोककथांमधील भराऱ्या आणि "संतांच्या जीवना" संबंधीची धार्मिक साहित्यामधील नीटस हास्यास्पदता व शिलेदारांच्या काळातील अद्भुत कथांमधील क्षीण कल्पनारंजन, ह्यांची तुलना करता लोककथांचे महत्त्व अत्यंत ठळकपणे जाणवते.

सरंजामदारी उमराववर्गाने निर्माण केलेल्या महाकाव्यांमधील आणि शिलेदारी कादंबरीमधील[277] नायक जगज्जेता दाखविलेला असे. सरंजामदारी साहित्याचा प्रभाव कधीच विशेष महत्त्वाचा नव्हता हे सर्वांना माहीत आहे.

भांडवलदारी साहित्याचा जन्म प्राचीन काळी इजिप्ती "चोराच्या गोष्टी" पासून झाला. त्या साहित्याची ग्रीक आणि रोमन लोकांनी परंपरा चालू ठेवली. स्त्रीदाक्षिण्यवादी सरदारांचा जेव्हा ऱ्हास सुरू झाला तेव्हा शौर्यकथांची जागा घेण्यासाठी भांडवलदारी साहित्य परत अवतरले. हे खरोखर भांडवलदारी साहित्य आणि त्यातील मुख्य नायक म्हणजे लबाड आणि चोर आहे, मग गुप्तहेर आणि पुन्हा चोर आहे. पण ह्यावेळी "सभ्य चोर" आहे.

१५ व्या शतकाच्या अखेरीच्या थील यूलेनश्पीगेलच्या[278] व्यक्तिरेखेपासून आरंभ करता, १७ व्या शतकातील सिम्प्लीत्सीस्सीमूस,[279] मग तोर्म्सचा लाझारील्लो,[280] झील ब्लाझ,[281] स्मोलेत आणि फील्डींगचे नायक ते मोपासाँचे 'लाडका मित्र', आर्सेन ल्यूपेन[282] व आजच्या युरोपीय "गुप्तहेर" साहित्यातील नायकांपर्यंत आपण अशी हजारो पुस्तके दाखवू शकू, ज्यांचे नायक लबाड आहेत, चोर आहेत, खुनी आहेत आणि गुप्तहेर आहेत. हे खरोखरीच अस्सल भांडवलदारी साहित्य आहे आणि ते ज्यांची सेवा बजाविते त्या लोकांच्या मूळ आवडीनिवडी, त्यांची स्वारस्ये आणि व्यावहारिक "नीतीतत्त्वे" ह्यांचे दर्शन त्यातून घडते. तरीही त्यातून काही

भले निर्माण झाले आहे. क्षुद्रप्रवृत्ती "अकलेच्या" उष्टचा-खरकटचासकट सर्व प्रकारच्या ग्राम्यतेचा भपकेबाज थाटमाट असलेल्या ह्या साहित्यामधूनच सान्चो पान्झा,[283] दे कोस्तरचा यूलेनश्पीगेल आणि तत्सम अनेक कलात्मक निष्कर्ष देणाऱ्या व्यक्तिरेखा निर्माण झाल्या. पोन्सोन दू तेरेलचा सुप्रसिद्ध खटला म्हणजे गुन्ह्याच्या वर्णनाबाबत भांडवलदारांना वाटणाऱ्या प्रगाढ वर्गीय स्वारस्याचा वजनदार पुरावा. ह्या लेखकाने रोकॅम्बोलविषयीची आपली अनेक खंडांची कादंबरी जेव्हा नायकाच्या मृत्यूने संपविली, तेव्हा त्याच्या वाचकांनी त्याच्या घरासमोर धरणे धरले व कादंबरी पुढे चालू ठेवण्याचा आग्रह धरला. युरोपातील कुणाही अत्यंत श्रेष्ठ लेखकालाही पूर्वी असे यश कधी लाभले नव्हते. केवळ शारीरिकदृष्टचाच नव्हे, तर नैतिकदृष्टचाही पुनरुज्जीवित करण्यात आलेल्या 'रोकॅम्बोलचे'[284] आणखी अनेक खंड वाचकांना मिळाले. खुनी आणि घरफोडचा माणसाचे चांगल्या भांडवल-दारवर्गीयामध्ये रूपांतर घडण्याचे हे ओबडधोबड उदाहरण सर्व भांडवलदारी साहित्यात अगदी नित्याचे आहे. भांडवलदारवर्गीयांना गुप्तहेराचा धूर्तपणा जेवढा आवडतो, तेवढचाच चवीने ते चोराच्या चलाखीचे आणि खुन्याच्या दुष्टाव्याचे कौतुक करतात. गुप्तहेर कादंबरीवाचन युरोपातील तृप्त लोकांचे आजही आवडते मनोरंजन आहे. अर्धउपाशी कामकरी लोकांमध्ये ह्या साहि-त्याचा शिरकाव झाला आहे व त्यांची वर्गजाणीव एवढचा मंदगतीने विकसित होत असल्याचे ते एक कारण आहे. चलाख ठकांबद्दल हे साहित्य आवड निर्माण करते आणि चोरी करण्यास उत्तेजन देते. भांडवलदारी मालमत्ते-विरुद्ध एकेकटचा व्यक्तींनी उभारलेले हे गनिमी युद्ध. भांडवलदारवर्गीय कामगारवर्गाचे जीवन क:पदार्थ मानतात असे ह्या साहित्यात वर्णन केलेले असते. खून आणि इतर गुन्ह्यांच्या प्रसाराला हे साहित्य मदत करते. गुप्तहेर कादंबऱ्यांच्या लेखकांची प्रचंड संख्या व अशा पुस्तकांचा महाप्रचंड खप, ह्यावरून युरोपीय क्षुद्रप्रवृत्तीची अशा साहित्याविषयीची आत्यंतिक आवड ठळकपणे प्रतीत होते.

स्वारस्याची वस्तुस्थिती म्हणजे १९ व्या शतकात जेव्हा सट्टा-बाजारां-मध्ये, पार्लमेंटात आणि वृत्तपत्रांमध्ये कायदेशीर लबाडीला शौर्याचे व मानाचे स्थान प्राप्त झाले, तेव्हा साहित्यामधील कपटी माणसाचे गौरवस्थान गुप्तहेराला मिळाले. ह्या जगात कामकरी लोकांविरुद्ध उघड उघड गुन्हे घडत असताना हा गुप्तहेर मात्र केवळ कल्पनेतच अस्तित्वात असू शकतील

असे अत्यंत गूढ गुन्हे चातुर्याने उघडकीस आणू लागला. इंग्लंडमध्ये विख्यात शेरलॉक होम्सचा[285] उदय घडला हा काही दैवयोग नव्हे. आणि ह्या निष्णात गुप्तहेराच्या जोडीनेच, सर्वोत्तम गुप्तहेराला चकविणारा "सभ्य चोर" उदयाला आला हा तर त्याहून कमी दैवयोग. नायकांचा बदल म्हणजे "कल्पनेचा खेळ" समजणारे चूक करीत आहेत. वास्तवातून प्रेरणा घेऊनच कल्पनाशक्ती सृजन करते. कल्पनेच्या खोटया भराऱ्यांचा नव्हे, तर अगदी खऱ्या कारणांचा त्या सृजनावर परिणाम घडत असतो. उदाहरणार्थ, सामना "अनिर्णित" ठेवण्याच्या प्रयत्नात, "सभ्य चोर" स्ताविस्कीच्या प्रेताबरोबर पिच्छकंदुकाचा खेळ खेळणे "उजव्या" आणि "डाव्या" फ्रेंच राजनीतीज्ञांना त्यामुळे भाग पडले.

रंगभूमीवरील कृतींच्या मार्फत आपल्या पात्रांच्या भावनांना व विचारांना व्यक्त करणारे नाटक आणि उपहासिकासारखे मौखिक सृजनाचे सर्व प्रकार लोकांवर खूप मोठा प्रभाव पाडण्यासाठी वापरतात, हे मान्य झालेले आहे. शेक्सपीयरपासून युरोपीयन नाटकाच्या प्रगतीचा आलेख जर आपण पाहिला, तर कोत्झेबू, नेस्तर कूकोल्नीक[286] सार्दूपर्यंत तो खाली घसरलेला दिसतो, त्याहूनही खाली गेलेला आढळतो. आणि मोलीएरची उपहासिका स्क्राईब व पोलीरानपर्यंत ऱ्हास पावली व आपल्या देशात तर ग्रिबोयेदोव आणि गोगोलनंतर जवळजवळ नाहीशीच झाली. कलेमध्ये लोकांचे दर्शन घडत असल्यामुळे असे भासेल की, नाटकाच्या ऱ्हासामुळे बलिष्ठ व सुस्पष्ट व्यक्तिरेखांचा अधःपात घडल्याचे आणि "थोर माणसे" नाहीशी झाल्याचे सूचित झाले.

आजही असे नमुने अस्तित्वात आहेत आणि त्यांची भरभराट घडत आहे. उदाहरणार्थ, भांडवलदारी वृत्तपत्रव्यवसायातील तिरस्करणीय तेर्सितिस;[287] साहित्यामधील अनुदार अथेन्सचा टायमन;[288] राजकारणामधील व्याजखाऊ शायलॉक;[289] कामगारवर्गाचा विश्वासघात करणारा ज्यूडा व पूर्वी रेखाटलेल्या इतर अनेक व्यक्तिरेखा. १७ व्या शतकापासून अशा व्यक्ती संख्येने वाढल्या आहेत आणि गुणवत्तेच्या दृष्टीने अधिकच निंद्य बनल्या आहेत. तेल, पोलाद आणि इतर उद्यमपती ११ व्या लुईपेक्षा अगर महाभयंकर इवानपेक्षा[290] कितीतरी जास्त पटींनी दुष्ट व गुन्हेगारी आहेत. दक्षिण अमेरिकेतील छोटया छोटया प्रजासत्ताकांमधील क्रियाशील माणसे १४ व्या आणि १५ व्या शतकातील इटलीच्या कोन्दोत्येरीसारखीच[291]

ठळक जाणवतात. रॉबर्ट ओवेनचे[292] फोर्ड[293] हे काही एकमेव हास्यचित्र नव्हे. घशाखाली ओतीव सोने ओतून दिलेल्या प्राचीन काळातील कुणा एका राजाचा उल्लेख टाळला, तर पीरपोन्त मॉर्गनची[294] भयानक व्यक्तिरेखा भूतकाळात अतुलनीय होती.

अर्थात भांडवलदारवर्गाच्या १९ व्या आणि २० व्या शतकांमधील व्यवहारिक उद्योगांमुळे अधिकच "थोर" माणसांची परंपरा निर्माण झाली. ही माणसे खंबीर होती, पैसा गोळा करण्याचे आणि जगाची लूट करण्याचे कसब त्यांना अवगत होते. वैयक्तिक श्रीमंती वाढविण्यासाठी आंतरराष्ट्रीय रक्तपात ते घडवून आणत होते. त्यांच्या अघोरी कार्यांमधील आश्चर्यकारक निर्लज्जता आणि अमानुषताही नाकारता येणार नाही. टीकात्म वास्तववादी आणि कलात्मक अशा युरोपीय साहित्याने अशा लोकांची मात्र दखल घेतली नाही. जणू काही ह्या लोकांचे अस्तित्व त्याला ठाऊकच नव्हते.

सामाजिकदृष्टया "अनावश्यक" माणसांचे साहित्यामध्ये ज्या कलात्मक ताकदीने चित्रण झाले, त्या ताकदीने नाटकात अगर कादंबरीत बँकर, उद्योगपती आणि राजकारणी नमुने सादर झाल्याचे आढळत नाही. भांडवलदारी संस्कृतीच्या पुढाऱ्यांच्या आणि निर्मात्यांच्या शोकांतिक व अत्यंत समान विधिलिखिताचे दर्शन साहित्यात घडलेले नाही. शास्त्रज्ञ, कलाकार आणि तंत्रशास्त्रीय क्षेत्रातील संशोधक ह्यांच्या जीवनाचे दर्शन साहित्यात घडलेले नाही. परकी वर्चस्वापासून राष्ट्रांना मुक्त करण्यासाठी लढणाऱ्या एकाही वीराचे अथवा थॉमस मोर,[295] काम्पानेल्ला,[296] फूरये[297] आणि सेंट सायमन[298] यांच्यासारख्या अखिल जनतेच्या बांधिलकीचे स्वप्न पाहणाऱ्या माणसांचे साहित्याने चित्रण केले नाही. केवळ दूषणे देण्यासाठी हे सर्व म्हटले नाही. भूतकाळ अनिंद्य नाही. पण निंदा व्यक्त करणे निरर्थक ठरेल. भूतकाळाचा अभ्यास केला पाहिजे.

२० व्या शतकाच्या युरोपीय साहित्यात सृजनाची नपुंसकता कशामुळे निर्माण झाली? कलात्मक स्वातंत्र्याचे आणि सृजनशील विचाराच्या स्वेच्छेचे मोठ्या तावातावाने व पाल्हाळिकपणे समर्थन करण्यात आले होते. वर्गातीत साहित्य अस्तित्वात असण्याची व विकसित होण्याची शक्यता आणि सामाजिक राजकारणापासून ते स्वतंत्र असण्याची शक्यता आग्रहपूर्वक प्रतिपादन करण्यात आली होती. हा राजकारणाच्या दारिद्र्याचा दावा होता, कारण त्यामुळे अनेक लेखकांनी पुढे प्रत्यक्ष जीवनाबद्दलच्या आपल्या निरीक्षणांची

व्याप्ती संकुचित केली, त्या जीवनाच्या विस्तृत आणि सर्वसमावेशी अभ्यासाल' नकार दिला, "आत्म्याच्या एकाकीपणात" स्वत:ला कोंडून घेतले आणि अंतर्मुखतेद्वारे व जीवनापासून फारकत असलेल्या स्वेच्छाधारी विचाराद्वारे "आत्मअभिज्ञा" करण्यावर भर दिला. राजकारणाने वेढलेल्या वास्तव जीवनाच्या सीमांपलिकडे मानवी जीव अज्ञेय ठरला. स्वत:साठी त्याने कितीही गुंतागुंतीची रचना शोधून काढली असली तरी तो सामाजिक घटक ठरला. ग्रहांप्रमाणे अंतराळघटक ठरला नाही. व्यक्तिवादाची परिणती अहंकारात घडल्यामुळे "अनावश्यक माणसे' निर्माण झाली असे आढळून आले. वारंवार निदर्शनास आणण्यात आले आहे की, "अनावश्यक व्यक्ती"-च्या नमुन्याचे चित्रण १९ व्या शतकातील युरोपीय साहित्यात अत्यंत कुशलतेने आणि खात्रीलायकपणे करण्यात आले होते. तंत्रदृष्ट्या सुसज्ज नसतानाही स्वत:मधील विजयी सामर्थ्याची जाणीव असलेल्या श्रमवीर नायका-पासून साहित्य ह्या टप्प्यापर्यंत येऊन थडकले होते. निर्मितीपेक्षा लूट करणे अधिक सोपे अशी जाणीव झालेल्या सरंजामदारी जेत्यापासून, भांडवलदार-वर्गाला अत्यंत प्रिय असलेल्या आणि त्याच्या "जीवनाचा शिक्षक" असलेल्या कपटी माणसापासून साहित्य ह्या टप्प्याला येऊन पोहोचले होते. काम करण्यापेक्षा फसविणे आणि चोरणे अधिक सोपे आहे अशी जाणीव झालेल्या माणसापासून ते ह्या टप्प्याला येऊन पोहोचले होते. भांडवलशाहीची स्थापना करणाऱ्या आणि मानवजातीला दडपणाऱ्या ठळक व्यक्तींना टाळून, सरं-जामदार, पाद्री, राजे व झार ह्यांच्यापेक्षा खूपच अधिक अमानुष असलेल्या माणसांना टाळून, साहित्य ह्या टप्प्यापाशी येऊन ठेपले होते.

पश्चिमेतील भांडवलदारी साहित्यामधील लेखकांच्या दोन गटांमधील भेदही स्पष्ट केला पाहिजे; त्यांपैकी एका गटाने स्वत:च्या वर्गाचा गौरव केला आहे आणि त्याचे मनोरंजन केले आहे. हे सगळे जातिवंत "चांगले भांडवलदार" आहेत. दुसऱ्या गटात अनेक डझन नांवांचा समावेश होतो. टीकात्म वास्तववादाच्या आणि क्रांतिकारक रोमांचवादाच्या अत्यंत श्रेष्ठ निर्मात्यांचा त्यात समावेश आहे. हे सगळे स्वधर्मत्यागी होते, स्वत:च्या वर्गाच्या घडीपासून दूर भरकटत गेलेले होते, भांडवलदारवर्गाने उध्वस्त बनविलेले उमराव होते, अथवा स्वत:च्या वर्गाच्या घुसमटल्या वातावरणा-पासून पळून गेलेली मध्यमवर्गीयांची ही मुले होती. युरोपीय लेखकांच्या ह्या गटातील सदस्यांची पुस्तके आम्हाला दुहेरी दृष्टचा आणि निर्विवादपणे

मोलाची आहेत. पहिले मूल्य म्हणजे तंत्रदृष्टचा ती पुस्तके साहित्यनिर्मितीचे आदर्श आहेत आणि दुसरे म्हणजे भांडवलदारवर्गाच्या उदयाचा व ऱ्हासाचा खुलासा देणारी दस्तऐवज आहेत. ह्या वर्गाच्या पतितांनी निर्माण केलेले ते दस्तऐवज आहेत आणि टीकात्मक दृष्टिकोनामधून त्यांनी ह्या वर्गाच्या जीवनपद्धतीचे, परंपरांचे आणि कृतींचे वर्णन केलेले आहे.

१९ व्या शतकातील युरोपीय साहित्यात टीकात्म वास्तववादाने बजाविलेल्या भूमिकेचे तपशीलवार विश्लेषण माझ्या भाषणाच्या कक्षेत येत नाही. त्याचे सार म्हणजे मोठ्या उद्योगपतींनी पुनरुज्जीवित केलेल्या सरंजामदारी पुराणमतवादाविरुद्धचा लढा. उदारमतवादी आणि मानवतावादी विचारांवर आधारीत, लोकशाही संघटित करून, म्हणजे मध्यमवर्गीयांना संघटित करून, दिलेला लढा. मोठे भांडवलदार आणि कामगारवर्गाकडून सतत वाढणारा दबाव, अशा दोन्हींपासून रक्षण करण्यासाठी लोकशाहीचे संघटन आवश्यक आहे अशी अनेक लेखकांची व बव्हंश वाचकांची समजूत आहे.

तुम्हा सर्वांना माहीत आहे की, १९ व्या शतकामधील रशियन साहित्याच्या असाधारण आणि अभूतपूर्व विकासात – विशिष्ट काळाचे अंतर सोडून – पश्चिमी साहित्यातील सर्व भावनांची आणि धारणांची पुनरुक्ती घडली व कालांतराने रशियन साहित्याचाही पश्चिमी साहित्यावर प्रभाव पडला. रशियन भांडवलदारी साहित्याचे खास वैशिष्टय म्हणजे "अनावश्यक लोकांचे" भरपूर नमुने त्याने निर्माण केले. युरोपला अज्ञात असलेला "खोडसाळ" अस्सल नमुना वासिली बूस्लायेवनी लोककथांमधून सादर केला. फ्योदर तल्स्तोय,[299] मिखाईल बाकूनिन[300] आणि तत्सम मंडळींनी इतिहासामधून असे नमुने सादर केले. त्याचप्रमाणे, साहित्यात "पश्चात्तापदग्ध उमराव" आणि प्रत्यक्ष जीवनात चक्रम व "क्षुद्र जुलमी" असा नमुनाही सादर करण्यात आला.

आमच्या साहित्याचाही पश्चिमेतील साहित्याप्रमाणे दोन वाटांनी विकास घडलेला आहे. एक वाट टीकात्म वास्तववादाची – फोन्विझिन,[301] ग्रीबोयेदोव, गोगोल इत्यादींपासून चेखोव आणि बूनिनपर्यंतचे लेखक ह्या गटात सामावतात. दुसरा प्रवाह आहे पूर्णतया मध्यमवर्गीय साहित्याचा – बूल्गारीन,[302] मसाल्स्की,[303] झोतोव[304] पासून ओवेरचेन्को[305] आणि तत्समांपर्यंत.

सरंजामदारी जेत्याच्या जोडीने यशस्वी आणि श्रीमंत लुच्चाची व्यक्तिरेखा जेव्हा उदयाला आली, तेव्हा आमच्या लोककथांनी श्रीमंत माणसाचा

सोबती म्हणून भाबडा इवान निर्माण केला. हा उपहासात्मक नमुना शौर्याच्या अद्भुत कथांमध्ये भला देवदूत ठरलेल्या कुबडचा घोडचाच्या मदतीने संपत्ती मिळवितो आणि झारसुद्धा बनतो. गरीब गुलामांना भिक्षा वाटून श्रीमंत माणसाने शूर कीर्ती विकत घेतली आणि त्या आंधळया ताकदीमुळे जेता व श्रीमंत माणूस असे दोघेही त्यांना लुटू शकले.

गुलामाने स्वतःच्या नशीबाशी तडजोड करून घ्यावी आणि त्याचा त्याच्या मनावर पगडा बसावा म्हणून सहनशीलतेचे आणि नम्रतेचे आदर्श, व "ख्रिस्ताच्या कीर्तीसाठी" हुतात्मा बनलेल्यांचे आदर्श, चर्चने सांत्वनार्थ निर्माण केले; त्याचप्रमाणे संन्यासी निर्माण केले व चर्चला उपयुक्त नसलेल्या लोकांना वाळवंटांमध्ये, जंगलांमध्ये आणि मठांमध्ये पिटाळले.

सत्ताधारी वर्गाची छोटचा विभागांमध्ये जेवढी अधिक विभागणी झाली, तेवढी क्षुद्र नायकांची निर्मिती जास्त होत गेली. अशी एक वेळ आली जेव्हा लोककथांमधील "मूर्ख" सान्चो पान्झाचे, सिम्प्लीत्सीसीमूसांचे, यूलेनश्पीगेलांचे रूप घेऊन सरंजामदार धन्यांवर चातुर्यात मात करू लागले; स्वतःच्या धन्यांची टवाळी करण्यापर्यंत त्यांची मजल गेली आणि १६ व्या शतकाच्या पूर्वार्धात ताबोरीतांच्या[306] विचारांमधून व सरदारांविरुद्धच्या किसानयुद्धांमधून व्यक्त झालेल्या धारणांच्या वाढीला त्यांनी निःसंशयरीत्या खतपाणी घातले.

कष्टकरी जनतेचा खरा इतिहास लोककथा माहीत झाल्याशिवाय समजू शकणार नाही. 'फाऊस्ट,' 'बॅरन म्यूनहाऊझेनची साहसे',[307] 'गार्गान्टयूआ आणि पान्ताग्रूएल'[308], दे कोस्तरचे 'थील यूलेनश्पीगेल' आणि शेलेचे 'प्रॉमीथस अनबाऊन्ड' ह्यासारख्या श्रेष्ठ साहित्यकृतींच्या निर्मितींवर लोककथांचा सतत व निश्चितरीत्या प्रभाव पडला होता. अगदी पुरातन काळापासून लोककथांनी इतिहासाची अविचलपणे व स्वतःच्या तऱ्हेने साथ केलेली आहे. अकरावा लुई आणि महाभयंकर इवान यांच्या कामगिरींबाबत लोककथांनी स्वतःची वेगळी मते बनविली होती. इतिहासातील मूल्यमापनांपेक्षा ही मते अगदी भिन्न आहेत, कारण राजे आणि सरंजामदार ह्यांच्यामधील संघर्षामुळे कष्टकरी लोकांच्या जीवनावर नेमके कोणते परिणाम घडले ह्याच्याशी काडीमात्र कर्तव्य न राखणाऱ्या तज्ज्ञांनी इतिहासातील मूल्यमापने केली होती.

कोणतीही पुराणकथा कल्पनाविलासाचा एक तुकडा असते. दिलेल्या

विशिष्ट वास्तवतेच्या एकूण गोळाबेरजेमागील मूलभूत विचाराला संक्षिप्त रूप देणे व त्याला प्रतिमेचा साज चढविणे म्हणजे कल्पना करणे. त्यातून आपल्याला वास्तववाद मिळतो. पण जर वास्तवातून जे काही संक्षेपाने काढले आहे त्याच्या अर्थाला अपेक्षित व शक्यतेची भर घालून विस्तारीत केले, जर त्यात गृहीततत्त्वाच्या तर्कशास्त्रामार्फत आपण त्यात भर घातली, ह्या सगळ्यामधून जर एक प्रतिमा बनविली, तर पुराणकथा तळाशी असलेला रोमांचवादाचा प्रकार प्राप्त होतो. वास्तवतेकडे क्रांतिकारक दृष्टिकोनातून पाहण्यास तो अत्यंत हितकारकतेने चालना देतो. प्रत्यक्ष व्यवहारात हा दृष्टिकोन जगाला नवे रूप देतो.

आपण पाहिले आहे त्याप्रमाणे कल्पनाविलासाची क्षमता भांडवलदारी समाजाने पुरती घालवून टाकली आहे. प्रयोगांमध्ये गुंतलेल्या शास्त्रांमध्येच केवळ अनुमानाचे तर्कशास्त्र शिल्लक उरले आहे व ते चालना देऊ शकते. अद्भुताची आणि गूढतेची चटक असलेला भांडवलदारी व्यक्तिनिष्ठ रोमांचवाद कल्पनाविलासाला चालना देत नाही अथवा विचाराला उत्तेजना देत नाही. वास्तवापासून त्याची पूर्ण फारकत असते. प्रतिमेच्या खात्रीशीरपणावर तो आधारलेला नसतो, तर केवळ "शब्दांच्या जादूवर" जवळजवळ पूर्णपणे आधारलेला असतो. मार्सेल प्रूस्ट आणि त्यांच्या अनुयायांमध्ये ह्याचा दाखला मिळतो. "स्वतःची सावली हरवलेल्या माणसाच्या", पीटर श्लेमीलच्या,[309] धर्तीची नोव्हालीस भांडवलदारी रोमांचवादी मंडळी आहेत. शामिस्सो ह्या फ्रेंच स्थलांतरिताने ही व्यक्तिरेखा निर्माण केली होती. तो जर्मनीत जर्मन भाषेत लिहीत होता. सद्यःकालीन पाश्चात्य लेखकही स्वतःच्या सावल्या हरवून बसले आहेत. वास्तवामधून निराशेच्या शून्यवादात त्यांनी स्थलांतर केले आहे. लुई सेलीनच्या 'रात्रीच्या टोकापर्यंतचा प्रवास' मध्ये ह्याचे दर्शन घडते. ह्या पुस्तकाचा नायक, बार्दामू, मायदेशापासून दूर अज्ञातवासात आहे. त्याला लोकांचा तिटकारा वाटतो. गुन्ह्याबाबत तो कोडगा असल्यामुळे आणि क्रांतिकारक कामगारवर्गाला "चिकटून" राहण्यात आवश्यक त्या गुणांचा त्याच्याठायी अभाव असल्यामुळे, फॅसिझमचा स्वीकार करण्यास तो पक्व बनला आहे.

तुर्गेनेव यांचा स्कॅन्डिनेव्हियातील लेखकांवर खूप प्रभाव आहे हे प्रस्थापित सत्य आहे. तसेच तल्स्तोय यांचा काऊंट पोलेन्झ, रेने बाझेन, एस्तोन्ये थॉमस हार्डी ('टेस' मध्ये) आणि इतर अनेक युरोपीय लेखकांवर प्रभाव

आहे. दस्तोयेवस्कींचा प्रभाव तर विशेषत्वाने जाणवतो. 'भूमीगत टिपणे' चा[310] नायक निर्माण करणाऱ्या दस्तोयेवस्कींना अहंकारी स्वभावाची, सामाजिक-दृष्टया अध:पतित अशी अत्यंत प्रभावी साहित्यिक व्यक्तिरेखा दिल्याचे श्रेय मिळते. स्वत:च्या दुर्दैवांवर, हालअपेष्टांवर आणि खच्ची झालेल्या यौवनातील आशांवर सूड घेण्याच्या अतृप्त इच्छेपायी प्रेरीत होऊन दस्तोयेवस्कींनी स्वत:च्या नायकामार्फत, जीवनापासून पूर्णतया एकाकी पडलेल्या १९ व्या आणि २० व्या शतकातील व्यक्तिवादी युवक-प्रतिनिधीच्या नीच आरोळ्या उमटविल्या आहेत. दस्तोयेवस्कींच्या ह्या प्राण्यामध्ये फ्रीड्रिख नीत्शे आणि ह्यूस्मान्सच्या 'उलट'चा नायक मार्क्विस दे झेस्सेन्तेस यांची खास वैशिष्टये आढळतात; बूर्जेच्या 'शिष्य' आणि बरीस साविन्कोवची[311] वैशिष्टये आढळतात. ऑस्कर वाईल्ड, सानिन आर्त्सीबाशेव[312] तसेच भांडवलदारी राज्यातील अमानुष परिस्थितींच्या अराजकवादी प्रभावामधून निर्माण झालेल्या इतर अनेक सामाजिक अध:पतितांची वैशिष्टये आढळतात.

वेरा फिग्नेर[313] यांच्या मते साविन्कोव यांचा युक्तिवाद थेट अध:-पतितांप्रमाणे असायचा.

"नीतीमत्ता मुळीच नाही, फक्त सौंदर्य आहे. सौंदर्य म्हणजे व्यक्तिमत्वाचा मुक्त विकास, आत्म्यात सामावलेल्या सर्व गोष्टींची विनाअडथळा क्रीडा."

भांडवलदारी व्यक्तिमत्वाच्या आत्म्याला भरून टाकणाऱ्या कुचकेपणाची आपल्याला उत्तम माहिती आहे.

पूष्कीन यांच्यावर दस्तोयेवस्कींनी भाषण केल्यानंतर[314] आणि राजसत्तेला उलथून पाडण्याचा प्रयत्न करणाऱ्या नरोदनाया वोल्या (लोकमत–अनु.) पक्षाचा पाडाव झाल्यानंतर लगेचच दस्तोयेवस्कींचे विचार लोकप्रिय बनले. लेनिन यांच्या थोर आणि साध्या सत्याला समजून घेतल्यानंतर १९०५ मध्ये कामगारवर्गाने स्वत:चे पाणी दाखविण्यापूर्वीच, सावध प्योत्र स्त्रूवे[315] यांनी बुद्धिजीवींचे मनपरिवर्तन घडविण्याची मोहीम सुरू केली होती. एखाद्या तरुणीने चुकीने स्वत:चे कौमार्य गमावल्यानंतर, वयस्क भांडवलदाराशी तिने कायदेशीर विवाहसंबंध जोडावा म्हणून जशी तिची मनधरणी करण्यात येते, तशातलाच हा प्रकार होता. व्यवसायाने सोयरीक जुळवून देणारा आणि अस्सल विचारांचा पूर्ण अभाव असलेला पुस्तकी किडा, अशा ह्या स्त्रूवेने "फिख्तेकडे[316] परत" ही घोषणा १९०१ मध्ये पुढे आणली. दुकान-

दार आणि जमीनदार यांच्या रूपात उभ्या असलेल्या राष्ट्राच्या इच्छेपुढे नतमस्तक होण्याचा विचार मांडला. १९०७ मध्ये 'वेखी'[317] ('ठळक टप्पे') शीर्षकाचे एक पंचांग प्रसिद्ध झाले होते. त्याचे त्यांनी संपादन केले होते व चक्क पुढील ओळी लिहिल्या होत्या :

लोकांच्या क्रोधापासून आमचे रक्षण करण्यासाठी बागनेटांचा वापर केल्याबद्दल आपण सत्ताधाऱ्यांचे आभार मानले पाहिजेत.

जमीनदारांचा सेवक समजला जाणारा तो मंत्री स्तोलीपिन[318] जेव्हा डझनावारी कामगारांना आणि शेतकऱ्यांना दररोज फासावर चढवीत होता, तेव्हा लोकशाहीवादी बुद्धिजीवींच्या दिशेने असले निंद्य शब्द उमटत होते. "रशियाला गोठवून टाकण्याची गरज आहे," म्हणजे सामाजिक क्रांतीच्या सर्व ठिणग्या टाचांखाली विझवून टाकल्या पाहिजेत, असे म्हणणाऱ्या कट्टर पुराणमतवादी कॉन्स्तन्तिन लेओन्त्येव[319] यांच्या आठव्या दशकातील अत्यंत दुष्ट विधानाचाच 'वेखी' ने पुढे मांडलेल्या मूलभूत विचारात पुनरुच्चार होता. "सनदशीर-लोकशाहीवाद्यांच्या" विश्वासघातकी कारवाईतून जन्माला आलेल्या 'वेखी'ला जुने तत्त्वच्युत ल्येव तीखोमीरोव[320] ह्यांची मान्यता लाभली होती. 'वेखी' म्हणजे "रशियन वृत्ती भानावर आल्याचे आणि सदसद्विवेकबुद्धीचे पुनरुज्जीवन झाल्याचे द्योतक" असे त्यांनी म्हटले होते.

१९०७ ते १९१७ या दरम्यानचा कालखंड रशियन लेखकांच्या दृष्टीने संपूर्ण "सृजनशील स्वातंत्र्याचा" कालखंड होता. बेजबाबदार विचाराचे बेबंद वर्चस्व ह्या कालखंडात होते. ह्या स्वातंत्र्याला सर्व पश्चिमी भांडवलदारी सनातनी विचारांच्या प्रचारात अभिव्यक्ती लाभली. हे विचार १८ व्या शतकाच्या अखेरी (फ्रेंच क्रांतीपाठोपाठ) प्रसारात आले होते व १८४८ आणि १८७१ नंतर[321] त्यांचा नियमित भडका उडत होता. "बेर्गसोनचे तत्त्वज्ञान म्हणजे मानवी विचाराच्या इतिहासात साध्य केलेल्या प्रचंड प्रगतीचा टप्पा," असे प्रतिपादन करण्यात येत होते. बेर्गसोन यांनी "बर्कले[322] यांच्या तत्त्वप्रणालीचा विस्तार घडवून तिला सखोल बनविले," "कांट, लीबनीत्झ,[323] देकार्त[324] आणि हेगेल[325] यांच्या विचारसरणी मृत आहेत व प्लेटोचे ग्रंथ त्यांच्यावर सूर्याप्रमाणे चिरंतन सौंदर्याने तळपत आहेत," असेही प्रतिपादन होत होते. सर्व वास्तवापासून पूर्णतः फारकत असलेले, श्रम आणि सृजनशीलता ह्यांच्या प्रक्रियांमध्ये सततरीत्या व सार्वत्रिकरीत्या विकसित होणाऱ्या

वास्तवतेपासून पूर्णत: फारकत असलेले, कल्पनावादी तत्त्वज्ञान ह्याच प्लेटोने स्थापित केले होते.

बॉदलेअरच्या तथाकथित "बहिष्कृत"च्या प्रभावाखाली आणि शॉपेन-हॉअरच्या पावलांवर पाऊल ठेवून, सोलोगूबने[326] अत्यंत ठळकपणे "व्यक्तिमत्वाच्या अस्तित्वातील वैश्विक हास्यास्पदतेचे" वर्णन केले आणि जरी त्यांच्या कवितांनी ह्याबाबत शोक केला असला, तरी ते स्वत: मात्र समृद्ध क्षुद्रबुद्धी माणसाचे जीवन जगले. १९१४ मध्ये ह्या माणसाने जर्मनांना धमकी घातली की, "खोऱ्यांमधील बर्फ वितळताच" बर्लिनचा नाश होणार. "राजकारणातील कामदेव" आणि "गूढ अराजकवाद" अशा विचारांचा प्रचार त्यावेळी करण्यात येत होता. अत्यंत धूर्त वासिली रोझानोव लिंगवादाचा पुरस्कार करीत होते. लेओनिद आन्द्रेयेवनी अमंगळ कथा व नाटके लिहिली. एकूण पाहता, १९०७ ते १९१७ हा कालखंड रशियन बुद्धिजीवीवर्गाच्या इतिहासातील एक अत्यंत लाजिरवाणे दशक म्हणून नमूद करण्यास मुळीच हरकत नाही.

आमच्या लोकशाहीवादी बुद्धिमंतांना त्यांच्या पश्चिमी सहकाऱ्यांपेक्षा कमी ऐतिहासिक प्रशिक्षण असल्यामुळे त्यांचा "नैतिक" अध:पात व बौद्धिक दिवाळखोरपणा अधिक वेगाने घडले. अर्थात ही प्रक्रिया सर्व देशांमधील मध्यमवर्गीयांमध्ये अगदी प्रचलित आहे आणि कामगारवर्गाशी ठामरीत्या निष्ठा राखण्याची ताकद नसलेल्या कोणत्याही बुद्धिमंताच्या बाबतीत असे घडणे अटळ आहे. प्रामाणिकपणे श्रमणाऱ्या सर्व लोकांचे कल्याण करण्यासाठी जगाचे नूतनीकरण घडविण्याची ऐतिहासिक जबाबदारी कामगारवर्गावर पडली आहे.

आणखी सांगितले पाहिजे की, पश्चिमी साहित्याप्रमाणे रशियन साहित्यातही क्रांतिपूर्व काळातील जमीनदारांचा, उद्योगपतींचा आणि सावकारांचा परामर्श घेण्यात आला नव्हता. वस्तुत: आमच्या देशात पश्चिमेपेक्षा अशी खूपच अस्सल आणि रंगीबेरंगी माणसे अस्तित्वात होती. उदाहरणार्थ, कुप्रसिद्ध साल्तीचिखा,[327] जनरल इझ्माईलोव[328] व तत्सम शेकडो भयानक प्रकारच्या जमीनदारांचे चित्रण रशियन साहित्यात घडले नव्हते. गोगोलच्या 'मृतात्मे'मधली उपहासचित्रे आणि वेडयाविद्रचा व्यक्ती जमीनदारी व सरंजामी रशियाचे फारसे वैशिष्टय दाखविणाऱ्या नाहीत. कोरोबोचका, मानीलोव, पेतूख, सोबाकेविच आणि नोझ्द्रचोव[329] ह्यांसारख्या गोगोलनी

चित्रित केलेल्या व्यक्तिरेखा शेतकरीवर्गाचे रक्तशोषण करणाऱ्या लोकांचे वैशिष्टय दाखविणाऱ्या नव्हेत. त्यांनी केवळ स्वतःच्या अस्तित्वाच्या निष्क्रिय वस्तुस्थितीद्वारे झारच्या धोरणांवर प्रभाव पाडला. पण रक्तशोषणाच्या कलेत अत्यंत तरबेज असलेली, सफाईदार क्रौर्यकर्मांमध्ये मनस्वी आनंद लुटणारी, भयानक नीतीमत्तेची माणसेही अस्तित्वात होती. त्यांच्या दुष्ट कृत्यांची वर्णने लेखकांनी केली नाहीत. अगदी मोठ्यातल्या मोठ्या अथवा शेतगड्यांच्या प्रेमात असलेल्या लेखकांनीसुद्धा केली नाहीत. पश्चिमी उच्च भांडवलदारवर्गीयांपेक्षा आमच्या उच्च भांडवलदारवर्गीयांचे वेगळेपण दाखविणारी वैशिष्टये अगदी ठळक आणि असंख्य आहेत. त्याचे कारण आमच्या ऐतिहासिकदृष्टया तरुण भांडवलदारवर्गाचा मुख्यतः शेतकरीवर्गामधून उदय घडला व त्याच्या पश्चिमी ज्येष्ठ नातेवाईकांपेक्षा अधिक वेगाने आणि जास्त सराईतपणे त्याने संपत्ती गोळा केली. पश्चिमेत प्रचलित असलेल्या जीवघेण्या स्पर्धेचा वारा न लागलेल्या आमच्या उद्योगपतींनी थेट २० व्या शतकापर्यंत स्वतःच्या लहरींनुसार आणि छंदांनुसार कारभार हाकला. ह्याचे कारण कदाचित ज्या अतिसहजतेने ते संपत्तीसंचय करीत होते, त्याचे त्यांनाच स्वतःला आश्चर्य वाटत असावे. 'रशियन लोकांचे शहाणपण' नांवाची एक पुस्तिका १९१७ मध्ये प्यो. बदमायेव यांनी प्रसिद्ध केली होती. तिबेटी वैद्यकशास्त्राचे ते प्रसिद्ध पुरस्कर्ते होते. त्यांनी त्या पुस्तिकेत प्योत्र गूबिनिन नामक एका श्रीमंत कारखानदाराचे वर्णन केले होते. "स्वातंत्र्य, समता, बंधुता ह्यासारख्या पोकळ शब्दांनी" आकर्षित करणाऱ्या "सैतानी लेखनां-पासून दूर राहण्याचा" तरुणांना आदेश देणाऱ्या ह्या मजेदार पुस्तिकेत एके काळी स्वतः बांधकाम कामगार असलेल्या आणि बांधकाम कामगाराचा मुलगा असलेल्या एका रेल्वे-उद्योगपतीचे वर्णन केलेले होते.

भूदासपद्धती रद्द झाली त्या काळातील वयस्क अंमलदार अजूनही जेव्हा गूबोनिनचे दिवस आठवतात, तेव्हा त्याच्याबद्दलची पुढील गोष्ट सांगतात. चांदीच्या नाण्यांनी पिशवी भरून घेऊन दणदणीत उंच बुटांमध्ये आणि शेतकरी-कोटामध्ये त्याची स्वारी मंत्रालयात येई. दरवानांना आणि वाट पाहणाऱ्या निरोप्यांना अभिवादन करून पिशवीतील काही चांदीची नाणी बाहेर काढी व प्रत्येकाला भरघोस बक्षिसी देई. अत्यंत लवून नमस्कार करी आणि त्या सर्वांनी आठवण ठेवावी असे सांगे. मग वेगवेगळ्या विभा-गांना आणि कचेऱ्यांना तो भेट देई. तेथे प्रत्येक अंमलदारांच्या दर्जानुसार,

प्रत्येकाचे नांव घेऊन व लवून नमस्कार करून एकेक सीलबंद लखोटा देई. उच्च अधिकाऱ्यांशी अभिवादन करताना चुंबनांची जोड देई आणि त्यांना तो लोकांचे हितकर्ते म्हणे. त्यामुळे त्याला प्रत्यक्ष सर्वोच्च साहेबमजकुरांना भेटता येई. जेव्हा प्योत्र इओनोविच निघून जाई, तेव्हा सर्वजण समाधानात असत, कारण सर्वत्र सणाचे वातावरण निर्माण झालेले असे व ह्या दिवसाची तुलना केवळ नाताळ अगर ईस्टरच्या सणाशीच करता येई. प्रत्येकजण आपली बक्षिशी मोजून स्मित करी व दुसऱ्या दिवशी सकाळपर्यंत कशी मौज करावी ह्याचा विचार करी. देवडीवाल्यांच्या देवडीवर लोकांना गूबोनिनचा अभिमान वाटायचा, कारण तो त्यांच्यामधूनच एवढ्या उच्च-पदाला चढला होता. त्याला ते दयाळू आणि हुशार म्हणत, एकमेकांना किती रक्कम मिळाली ते विचारीत; पण आपल्या हितकर्त्याला नाराज न करण्याच्या इराद्याने प्रत्येकजण गुप्तता पाळत असे. छोटे अधिकारी एकमेकांमध्ये कृतज्ञतेने कुजबुजत की, भला प्योत्र इओनोविच त्यांनासुद्धा विसरला नव्हता आणि तो किती हुशार, दयाळू व प्रामाणिक होता. वरच्या अंमलदारांपासून तहत सर्वोच्च साहेबमजकुरांपर्यंत सर्वजण मोठमोठ्या सुरांमध्ये त्याच्या मुत्सद्दी मनाविषयी बोलत, लोकांचे आणि देशाचे तो फार मोठे हित करील असे ठामपणे प्रतिपादन करीत; रेलउभारणी प्रकल्पांच्या परि-षदांमध्ये त्याचा सत्कार केला पाहिजे आणि त्याला आमंत्रण केले पाहिजे, कारण त्या व्यवसायात तो केवळ एकच बुद्धिमान माणूस होता, असे म्हणत. खरोखरीच त्याला अत्यंत महत्त्वाच्या परिषदांना आमंत्रित करीत, ज्या परिषदांना केवळ उच्च अधिकारी व इंजिनिअर हजर असत. अशा परिषदां-मध्ये गुबोनिनचे मत निर्णायक मानले जाई.

ह्या कथेला उपहासाचा वास मारतो, पण प्रत्यक्षात वस्तुस्थितीचे हे अत्यंत प्रामाणिक गुणगान आहे, जेथे भांडवलदारांच्या "स्वातंत्र्य, समता, बंधुते"च्या मोठमोठ्या घोषणा पोकळ शब्द ठरल्या होत्या.

भांडवलदारांच्या साहित्यात प्रतिबिंबित होणाऱ्या त्यांच्या सृजनाच्या नपुंसकतेबाबत जे काही सांगण्यात आले आहे ते अतिनिराश भासण्याची शक्यता आहे आणि मी सहेतुक अतिशयोक्ती केल्याचा ठपका माझ्यावर ठेवला जाणे शक्य आहे. पण गोष्टी जशा आहेत तशाच आहेत आणि मी त्यांना सत्य स्वरूपात पाहतो.

शत्रूच्या शक्तींचे अधोमापन करणे मूर्खपणाचे आहे, एवढेच नव्हे तर तो

अपराध आहे. त्याच्या औद्योगिक तंत्रांच्या, विशेषत: त्याच्या युद्धसाहित्याच्या उद्यमाच्या, उच्च पातळीची आम्हाला पूर्ण जाणीव आहे. आज ना उद्या ह्या लष्करी उद्यमाचे उत्पादन आमच्याविरुद्ध रोखले जाणार. पश्चिमेतील लष्करी तज्ज्ञ मोठमोठ्यांदा इशारे देत आहेत की, युद्धामध्ये संपूर्ण पिछाडी गुंतून पडणार, युद्धमान राष्ट्रांची संपूर्ण लोकसंख्या त्यात अडकणार. असे गृहीत धरता येईल की, १९१४-१९१८ च्या नरसंहाराच्या भयानकता अद्याप पूर्णत: न विसरलेल्या व नव्या आणि अधिक भयानक युद्धाच्या धोक्याने धास्तावलेल्या युरोपातील असंख्य मध्यमवर्गीयांना सरतेशेवटी समजून येईल की, आगामी सामाजिक अरिष्ट कोणाच्या फायद्याचे आहे आणि स्वत:च्या कुप्रसिद्ध नफ्यांसाठी नियमितपणाने लक्षावधी लोकांचा संहार करणारा गुन्हेगार कोण आहे; वस्तुस्थितीची त्यांना जाणीव होईल आणि भांडवलशाहीचा कणा मोडून टाकण्यास कामगारवर्गाला ते मदत करतील. कामगारवर्गीयाच्या क्रांतिकारक जाणीवबुद्धीच्या वाढीवर आपण विसंबले पाहिजे, पण स्वत:च्या सामर्थ्यावर विसंबणे आपल्या दृष्टीने अधिक योग्य ठरेल आणि त्या सामर्थ्याचा विकास सतत घडविला पाहिजे. कामगारवर्गाच्या क्रांतिकारक जाणीवबुद्धीची आणि त्याने निर्माण केलेल्या पितृभूमीबद्दलच्या त्याच्या प्रेमाची जोपासना करणे, त्या पितृभूमीचे रक्षण करणे—आपल्या साहित्याचे हे आद्यकर्तव्य आहे.

पुरातनकाली अशी एक वेळ होती जेव्हा कष्टकऱ्यांचे मौखिक ज्ञान त्यांच्या अनुभवाचे एकमेव संघटक होते; प्रतिमांच्या स्वरूपात त्यांचे विचार अनुवादित करीत होते आणि सामुदायिकाच्या श्रम-शक्तीला चालना देत होते. ह्या गोष्टीची आपल्याला जाणीव झाली पाहिजे. सर्वांना समान शैक्षणिक संधी उपलब्ध करून देण्याचे उद्दिष्ट आपल्या देशात ठेवण्यात आलेले आहे. मानवी श्रमाचे नैसर्गिक शक्तींना नियंत्रित करण्याच्या कलेमध्ये स्थित्यंतर घडवीत असताना प्राप्त झालेल्या श्रमाच्या यशांची आणि यश:सिद्धींची आपल्या समाजातील सर्व घटकांना समानरीत्या ओळख घडवायची आहे. लोकांच्या आर्थिक—त्यामुळे राजकीय—विभागणीच्या प्रक्रियेचे, त्याचप्रमाणे कामकरी लोकांच्या मनाचा विकास करण्याच्या हक्काला बळकावणाऱ्या प्रक्रियेचे, आपल्याला थोडे-अधिक भक्कम ज्ञान आहे. धर्मगुरुंनी जेव्हा जगाच्या अभिज्ञेचा व्यवसाय पत्करला, तेव्हा परिस्थितीचे अध्यात्मविद्यावादी खुलासे आणि निसर्गातील पंचमहाभूतांचा प्रतिकार व कामकरी लोकांची

शक्ती ह्यांचा केवळ वापर करून त्यांनी मक्तेदारी मिळविली. अनादी काळापासून अगदी आजतागायत दशलक्षावधी लोकांना जगाच्या अभिज्ञेचा व्यवसाय वंचित करण्यात आला आहे. त्यामुळे वंश, राष्ट्र आणि धर्म यांच्या विचारांपायी विभक्त बनलेल्या अब्जावधी लोकांना आत्यंतिक अज्ञानात व भयानक बौद्धिक आंधळेपणात रहावे लागले आहे. हरतऱ्हेच्या भोळसट समजुतींच्या आणि पूर्वग्रहांच्या अंधारात खितपत पडावे लागले आहे. झारच्या सर्व रशियामधील भांडवलशाहीचा नाश केल्यानंतर आणि कामगारांच्या व शेतकऱ्यांच्या हाती राजकीय सत्ता सोपविल्यानंतर, मुक्त आणि वर्गविहीन समाज संघटित करणाऱ्या लेनिनवादी कम्युनिस्टांच्या पक्षाने व सोविएत समाजसत्तावादी प्रजासत्ताक संघाच्या कामगारांच्या आणि शेतकऱ्यांच्या सरकारने धाडसी, शहाण्या आणि अथक कार्यामार्फत कामकरी जनसमूहांना जुन्या आणि ऐतिहासिकदृष्टचा कालबाह्य बनलेल्या भांडवलदारी सांस्कृतिक विकासाच्या प्राचीन जोखडातून मुक्त करण्याचे उद्दिष्ट बाळगले आहे. ही भांडवलदारी संस्कृती आता स्वतःचे सर्व अवगुण आणि स्वतःची सृजनाची नपुंसकता ठळकपणे उघड करीत आहे. आपण, सोविएत संघातील नेक लेखकांनी, ह्या उद्दिष्टाच्या उंचीवरून आपल्या कार्यांचा विचार केला पाहिजे, त्यांचे मूल्यमापन करून संघटन केले पाहिजे.

जनसमूहांचे श्रम हेच संस्कृतीचे मुख्य संघटक आहेत आणि सर्व विचारांचे निर्माते आहेत; ह्याची जाणीव आपल्याला झाली पाहिजे. श्रमाच्या निर्णायक महत्त्वापासून हे विचार वर्षानुवर्षे दूर भरकटले होते. आपल्या सर्व ज्ञानाचा उगम, तसेच सगळ्या देशांमधल्या व आपल्या देशामधल्या कामगारवर्गीयांमध्ये त्यांच्या हक्कांची क्रांतिकारक जाणीव बिंबविणारे मार्क्स, लेनिन यांचे विचार, श्रमाला अशा एका पातळीपर्यंत वर चढवीत आहेत की, विज्ञान आणि कलेच्या सृजनशीलतेचा श्रम हा आधार बनत आहे. यश साध्य करण्याच्या आपल्या कामी आपण ह्या वस्तुस्थितीची जाणीव करून घेतली पाहिजे की, आता समाजसत्तावादी तत्त्वांवर संघटित केलेल्या आपल्या देशामधील अर्ध-साक्षर कामगारांच्या व प्राथमिक अवस्थेतील शेतकऱ्यांच्या श्रमाने १६ वर्षांच्या अत्यंत छोटचा अवधीत महाप्रचंड मूल्ये निर्माण केली आहेत आणि शत्रूच्या हल्ल्यापासून उत्तम संरक्षण करता येईल अशा तऱ्हेने देशाला शस्त्रसज्ज बनविले आहे. ह्या वस्तुस्थितीचे योग्य मूल्यमापन सबंध जगातील

कामगारवर्गाला एकत्रित करणाऱ्या शिकवणीची सांस्कृतिक आणि क्रांतिकारक ताकद आपल्याला दाखवील.

आपण सगळेजण — लेखक, कारखान्यातील कामगार, वा सामुदायिक शेतकरी — अद्याप नीटसे चांगले काम करीत नाही आणि आपण व आपल्यासाठी निर्माण केलेल्या सर्व गोष्टींचा पूर्ण उपयोग करू शकत नाही. आपले कामकरी जनसमुदाय अद्याप योग्यपणे समजू शकत नाहीत, की ते स्वतःसाठीच काम करीत आहेत. सर्व बाजूंनी सुप्त जाणीव आहे, पण तिच्यामधून अजून तेजस्वी आणि आनंदी ज्योत उजळलेली नाही. अर्थात विशिष्ट तपमान चढेपर्यंत कुठलीही गोष्ट पेट घेऊ शकत नाही आणि व्लादीमिर लेनिन यांच्या बुद्धिमत्तेमधून निर्माण झालेल्या पक्षाप्रमाणे श्रमाच्या शक्तीचे तपमान यशस्वीपणे उंचावणे इतर कुणाला अद्याप शक्य झालेले नाही.

श्रमाला आपण आपल्या पुस्तकांचा मुख्य नायक बनविले पाहिजे. म्हणजे श्रम-प्रक्रियांनी संघटित केलेल्या माणसाला, आधुनिक तंत्रांच्या सामर्थ्याने सज्ज केलेल्या आपल्या देशातील माणसाला, श्रमाला अधिक सुलभ व अधिक उत्पादक बनवून त्याला कलेच्या पातळीला वर चढविणाऱ्या माणसाला, आपल्या पुस्तकांचा मुख्य नायक बनविले पाहिजे. श्रम म्हणजे सृजनशील क्रिया आहे हे समजून घ्यायला आपण शिकले पाहिजे. सृजनशीलतेची संकल्पना आपण लेखक वारंवार वापरतो, पण प्रत्यक्षात तसे करण्याचा आपल्याला मुळीच हक्क नाही. सृजनशीलता ही स्मरणशक्तीच्या कार्यातील तीव्रतेचे असे एक परिमाण आहे, ज्यात ज्ञानाच्या आणि प्रतिमांच्या भांडारातून अत्यंत वेगाने सर्वांत श्रेष्ठ व वैशिष्टयपूर्ण वस्तुस्थिती, चित्रे आणि तपशील निर्माण होतात. व सर्वांना समजतील अशा अत्यंत नेमक्या आणि ठाशीव शब्दांमध्ये त्यांना मांडले जाते. आपल्या नवजात साहित्याला अद्याप ह्या गुणाची प्रौढी मिरविता येणार नाही. आपल्या लेखकांच्या अनुभवांचे आणि ज्ञानाचे भांडार विस्तृत नाही व त्या भांडाराला बांधून, त्याचा विस्तार करून, त्याला गहिरे बनविण्याचा निर्णय अद्याप कुणी घेत नाही.

समाज, शासनसंस्था आणि निसर्ग ह्यांना विरोध करणारी व्यक्ती, हा १९ व्या शतकातील युरोपीय आणि रशियन साहित्याचा मुख्य विषय होता. स्वतःच्या वर्गीय विचारांच्या आणि जीवनपरंपरांच्या विरोधी अशा नकारात्मक विचारांना विपुल प्रमाणात संचित करण्याची इच्छा, हे भांडवल-

दारी समाजाला व्यक्तीने विरोध करण्याचे प्रमुख कारण होते. ही मते आपल्या वाढीच्या प्रक्रियेला अडथळा करीत आहेत आणि चिरडून टाकीत आहेत अशी व्यक्तीला तीव्रतेने जाणीव झाली; पण भांडवलदारी समाजाच्या अधिष्ठानांच्या ग्राम्यतेला, नीचतेला आणि गुन्हेगारी स्वरूपाला ती स्वतः जबाबदार होती, ह्याबद्दलचे आकलन तिला नीटसे झालेले नव्हते. जोनाथन स्विफ्टनी सबंध युरोपवर कोरडे ओढले, पण युरोपातील भांडवलदारवर्गाची धारणा होती की, फक्त ब्रिटनविरोधीच त्यांच्या उपहासाचा रोख होता. एकूण पाहता, स्वतःच्या समाजजीवनावर टीका करणाऱ्या बंडखोर व्यक्तीला समाजातील लाजिरवाण्या व्यवहारांबाबतच्या स्वतःच्या जबाबदारीची क्वचितच आणि अत्यंत कमी जाणीव होती. प्रस्थापित व्यवस्थेविरुद्धच्या तिच्या टीकेमध्ये सामाजिक आणि आर्थिक कारणांचे सखोल व योग्य आकलन तर अगदीच क्वचित असे. भांडवलशाहीच्या लोखंडी पिंजऱ्यामधील स्वतःच्या अस्तित्वाच्या निरर्थकपणाची जाणीव, अथवा जीवनामधील स्वतःच्या अपयशांचा व अपमानांचा सूड घेण्याचा प्रयत्न, यांपैकी एका कारणामधून बहुतेक वेळा तिच्या टीकेचा उद्भव होई. असे म्हणता येईल की, जेव्हा एखादी व्यक्ती कामकरी जनसमूहांकडे वळत असे, तेव्हा तिच्या मनात कामकरी जनसमूहांच्या हिताचा विचार नसे, तर भांडवलदारी समाजाचा नाश झाल्यावर कामकरी वर्ग आपल्याला विचारस्वातंत्र्य आणि आचारस्वातंत्र्य देईल, अशा आशेने ती हे कृत्य करीत असे. मी पुन्हा सांगतो: ज्या व्यक्तीचे जीवन जखडून गेल्यासारखे भासत आहे, जिला समाजात उपरेपणाची जाणीव होत आहे आणि स्वतःसाठी जी सोयीस्कर जागा शोधीत आहे, अशा व्यक्तीचे नाट्य क्रांतिपूर्व साहित्यामधील मूलभूत व मुख्य विषय होता. पण असे स्थान त्या व्यक्तीला न सापडल्यामुळे तिला यातना भोगाव्या लागत आणि ती नष्ट होई; एक तर तिच्याशी वैर धरणाऱ्या समाजाशी तिने समझोता केल्यानंतर, अथवा मद्यपानाच्या आहारी जाऊन शेवटी आत्महत्येचा मार्ग स्वीकारून.

आपल्या देशात, सोविएत समाजसत्तावादी प्रजासत्ताक संघात, कुठलीही उपरी माणसे असू नयेत आणि तशी ती असणे शक्य नाही. प्रत्येक नागरिकाला स्वतःच्या क्षमता, देणग्या आणि गुण ह्यांचा विकास घडविण्याचे पूर्ण स्वातंत्र्य आहे. व्यक्तीकडून एकच अपेक्षा आहे: वर्गविहीन समाज निर्माण करण्याच्या शौर्यशाली कार्याकडे तिचा प्रामाणिक दृष्टिकोन असावा.

नव्या संस्कृतीच्या उभारणीत सहभागी व्हा, असे सोविएत संघातील संपूर्ण जनतेला कामगारांच्या आणि शेतकऱ्यांच्या सरकारने आवाहन केले आहे. म्हणून, उत्पादनातील चुकांना, उणीवांना, नासधुशीला आणि क्षुद्र-प्रवृत्तीच्या, हीणतेच्या, दुटप्पीपणाच्या व निष्ठुरतेच्या सर्व अभिव्यक्तींना आपल्यापैकी प्रत्येकजण जबाबदार आहे. ह्याचा अर्थ आपली टीका खरोखरीच आत्मटीका असली पाहिजे. आपले काम आणि परस्परसंबंध ह्यांना नियंत्रित करणारी समाजसत्तावादी आचारसंहिता आपण निर्माण केली पाहिजे.

कामगारांच्या बौद्धिक विकासाला उघड करणाऱ्या वस्तुस्थितींचे वर्णन करताना आणि सनातन छोट्या मालकाचे सामुदायिक शेतकऱ्यामध्ये घडत असलेले स्थित्यंतर दाखविताना, आपण लेखक केवळ बातमीदारीपुरते स्वत:ला मर्यादित ठेवतो. त्यामुळे ह्या स्थित्यंतरांमागील भावनिक प्रक्रियांचे वर्णन करण्यात अगदी थिटे पडतो.

वास्तवाच्या सत्यपरिस्थितींचे अद्याप आपल्याला पुरेसे अंतर्ज्ञान नाही. देशाचे बाह्य स्वरूपही ठळकपणे बदलून गेले आहे आणि भूमीचे दारिद्र्याने गांजलेले ठिगळाचे स्वरूप नाहीसे झाले आहे. ओटची पेरणी केलेला फिकट निळसर जमीनपट्टा, त्याच्यापुढे सोनेरी रायचे झुबके, गव्हाचा हिरवट पट्टा, लव्हाळ्यांचे रान माजलेले पट्टे आणि एकूण ठायी ठायी विभागलेल्या विस्तीर्ण भूमीचे केविलवाणे दृश्य – असा प्रकार इत:पर दिसत नाही. आज जमिनीचे अफाट विस्तार एकसंध आणि एकरंगी दिसतात. खेड्यांमध्ये आणि गावां-मध्ये चर्चचे नव्हे, तर मोठ्या सार्वजनिक संस्थांच्या इमारतींचे प्राबल्य जाणवते. महाप्रचंड कारखान्यांच्या प्रचंड काचांवर सूर्याचे प्रतिबिंब तळपत असते, तर खेळण्यांसारखी भासणारी आणि चित्रविचित्र विभिन्नतेमुळे खिश्चनधर्मी न वाटणारी प्राचीन प्रार्थनामंदिरे आपल्या लोकांच्या गुणांची साक्ष देतात. प्रार्थनामंदिरांच्या वास्तुशिल्पामध्ये त्यांच्या अंगच्या गुणांना अभि-व्यक्ती मिळत असे. पण आपल्या साहित्यात मात्र आपल्या देशाच्या नव्या चेहऱ्याचे आणि त्यात घडलेल्या ठळक बदलांचे दर्शन होत नाही.

आपण अशा काळात रहात आहोत, जेव्हा जुन्या जीवनपद्धतीमध्ये फार मोठे बदल एकदम घडवून आणले जात आहेत आणि आपण स्वत:च जगाचा बदल घडवून आणणारी प्रत्यक्ष शक्ती आहोत अशी जाणीव झालेल्या माणसाच्या प्रतिष्ठेच्या संवेदनेला जाग येत आहे.

लहान मुलांमध्ये नव्या मानवी गुणांचा उदय अगदी सहजरीत्या ठळ-

कपणे दिसून येतो. पण ही मुले आमच्या साहित्याच्या दृष्टीपथापलिकडे आहेत. मुलांसाठी आणि मुलांबद्दल लिहिणे आमच्या लेखकांना प्रतिष्ठेला कमीपणा आणणारे वाटत असावे असे भासते.

बाप आपल्या मुलांना अधिकाधिक काळजीपूर्वक आणि प्रेमळपणाने वागवू लागले आहेत असे ठासून सांगताना माझ्याकडून काही चूक घडत आहे असे मला वाटत नाही. तसे वागणे माझ्या मते अगदी स्वाभाविक आहे. मानवी इतिहासात प्रथमच मुले म्हणजे आपल्या आई-बापांच्या पैशाची, घराची आणि सामानसुमानाची वारस नाहीत, तर त्याहून मोठ्या आणि खरे मूल्य असलेल्या अशा, त्यांच्या माता-पित्यांच्या श्रमांमधून निर्माण झालेल्या, समाजसत्तावादी राज्याची वारस आहेत.

कलात्मक निष्कर्षासाठी आपल्या भोवतालचे जीवन अधिकाधिक प्रमाणात आपल्याला "कच्चा माल" पुरवीत आहे. समाजसत्तावादी उभारणीच्या सर्व क्षेत्रांमध्ये महत्त्वाची कामगिरी बजाविणाऱ्या सोविएत स्त्रीचे पुरेसे ठळक चित्रण अद्याप ना नाटकात झाले आहे ना कादंबरीत. नाटककारांनी कमीत कमी स्त्री-पात्रे निर्माण करण्याचा का प्रयत्न केला आहे ह्याचा खुलासा करणेही अवघड आहे. आपल्या देशात स्त्रीचा सामाजिक दर्जा जरी पुरुषा-समान असला आणि महिलांनी आपल्या बहुविध गुणांचा व कार्यक्षमतेचा पूर्ण पुरावा दिला असला, तरी ही समता अनेकदा आणि अनेक बाबतीत औपचारिक व बाह्य असते. लैंगिक सुख देण्यासाठी आणि "घर राखण्याचे" काम करणारे पाळीव प्राणी म्हणूनच शतकानुशतके स्त्रियांना प्रशिक्षित करण्यात येत होते हे पुरुष अद्याप विसरलेले नाहीत. अथवा ते फार लौकर विसरून गेले आहेत. जगाच्या निम्म्या लोकसंख्येचे हे जुनेपुराणे आणि लाजिरवाणे ऐतिहासिक कर्ज सर्वप्रथम आपल्या देशातील पुरुषांनी फेडून टाकले पाहिजे, म्हणजे जगातील इतर सर्व पुरुषांना त्यांनी आदर्श घालून दिल्या-सारखे होईल. येथेही साहित्याने महिलांचे काम आणि त्यांचा स्वभाव यांचे वर्णन करण्याचा प्रयत्न केला पाहिजे, म्हणजे अधिक कनिष्ठ प्राण्यांपासून उसना घेतलेल्या प्रचलित क्षुद्रप्रवृत्ती दृष्टिकोनाहून अधिक वरच्या पातळीवरून महिलांकडे पाहिले जाईल.

मला आणखी एका गोष्टीचा निर्देश करावासा वाटतो की, सोविएत साहित्य म्हणजे केवळ रशियन भाषेतील साहित्य नव्हे, तर अखिल-संघ साहित्य आहे. आपल्यापासून केवळ भाषेच्या दृष्टीने भिन्न असलेले बांधव

प्रजासत्ताकांमधील लेखक भांडवलशाहीने विभागलेल्या कामकरी लोकांच्या सबंध जगाला एकत्र आणणाऱ्या विचाराच्या वर्चस्वाखाली व हितकर प्रभावाखाली रहात आहेत आणि काम करीत आहेत. त्यामुळे स्पष्ट आहे की, केवळ आपण संख्येने अधिक आहोत म्हणून राष्ट्रीय अल्पसंख्यांच्या साहित्याकडे दुर्लक्ष करण्याचा आपल्याला मुळीच हक्क नाही. कलेचे मूल्य संख्येने नव्हे, तर गुणवत्तेने मापले जाते. आपल्या भूतकाळात पुष्कीनसारख्या अत्यंत श्रेष्ठ साहित्यिक होऊन गेला हे खरे असले, तरी त्याचा अर्थ असा नव्हे की, आर्मेनियन, जॉर्जियन, युक्रेनी आणि इतर राष्ट्रजमाती साहित्याच्या, संगीताच्या, चित्रकलेच्या आणि वास्तुशिल्पाच्या क्षेत्रांमध्ये थोर प्रतिभावंत निर्माण करण्यास असमर्थ आहेत. "प्रामाणिक आणि मानवी जीवनाच्या दिशेने," नवा इतिहास मुक्तपणे निर्माण करण्याच्या आणि समाजसत्तावादी संस्कृती निर्माण करण्याच्या दिशेने, सबंध समाजसत्तावादी प्रजासत्ताकांच्या संघात अखिल कामकरी जनतेच्या जलद पुनरुत्थानाची प्रक्रिया प्रगतीपथावर आहे, हे विसरू नये. एव्हानाच आपल्याला दिसत आहे की, जेवढी तिची अधिक प्रगती, तेवढ्या अधिक प्रभावीपणे ही प्रक्रिया १७ कोटी स्त्री-पुरुषांमधील सुप्त गुणांना उघडकीस आणत आहे.

एका तातार लेखकाकडून मला आलेले पत्र येथे वाचून दाखविणे प्रस्तुत ठरेल असे वाटते.

पूर्वी दलित आणि मागास असलेल्या राष्ट्रजमातींच्या आम्हा लेखकांना महान ऑक्टोबर क्रांतीने असीम संधी उपलब्ध करून दिल्या आहेत. आमच्या स्वतःच्या लेखनासह रशियन साहित्यामध्ये प्रवेश करण्याच्या संधीचाही त्यांच्यात समावेश आहे. अर्थात आमचे साहित्य अद्याप निर्दोषतेपासून खूप दूर आहे. तुम्हाला जाणीव आहे की, एव्हाना काही शेकडा राष्ट्रीय-अल्पसंख्यांक लेखकांचे साहित्य रशियन भाषेत प्रकाशित होत आहे. याउलट, सोविएत रशियन साहित्य केवळ रशियन जनसमूह वाचतात असे नव्हे, तर आपल्या सोविएत संघातील सर्व राष्ट्रजमातींचे कामकरी लोकही वाचतात. सर्व राष्ट्रजमातींच्या नव्या पिढ्यांच्या दशलक्षावधी प्रजेचे ह्या साहित्यावर संगोपन होत आहे. अशा रीतीने रशियन भाषेतील सोविएत-कामगारवर्गीय अक्षरे इतःपर केवळ रशियन बोलणाऱ्या आणि रशियन कुळात जन्मलेल्या लोकांचीच सेवा करीत नाहीत; हळूहळू त्यांना आकारदृष्ट्याही आंतरराष्ट्रीय स्वरूप प्राप्त होत आहे. ही महत्त्वाची ऐतिहासिक प्रक्रिया

अगदी नव्या व अनपेक्षित कार्यांना आणि नव्या मागण्यांना पुढे आणत आहे.

सर्व लेखक, टीकाकार आणि संपादक हे समजून घेत नाहीत ही खेदाची बाब आहे. पुस्तक जेव्हा प्रसिद्ध होते तेव्हा टीकाकार फार तर पुस्तकाबद्दल आणि लेखकाबद्दल चार "जिव्हाळ्याचे शब्द" उच्चारील. स्वाभाविकपणे आम्हाला आमच्या यश:सिद्धींविषयी ऐकायला आवडेल — जर त्या अस्तित्वात असल्या तर — आणि आमच्या उणीवांबद्दल व चुकांबद्दल ऐकायलाही आवडेल, — ज्या इतर लेखकांपेक्षा असंख्य प्रमाणात जास्त आहेत — म्हणजे भावी काळात त्या नाहीशा करणे शक्य होईल. आम वाचकाला आम्ही उपलब्ध होणे आम्हाला आवडेल.

ह्या पत्रावर आपल्या सह्यांची पुस्ती जोडण्यास सर्व संघ-प्रजासत्ताकांमधील आणि स्वायत्त प्रजासत्ताकांमधील साहित्यिक प्रतिनिधी कदाचित तयार होतील. आपल्या साहित्यिक इतिहासकारांनी आणि टीकाकारांनी ह्या पत्राची दखल घ्यावी व आपल्या देशातील लोकांना समजावून सांगण्याचे काम हाती घ्यावे की, ते जरी भिन्न राष्ट्रजमातींचे लोक असले आणि भिन्न भाषा बोलत असले, तरी त्यांच्यापैकी प्रत्येकजण हा जगातील पहिल्या समाजसत्तावादी देशाचा नागरिक आहे. आमच्या टीकाकारांना मारलेली ही कोपरखळी अगदी योग्य आहे. आपली साहित्यिक टीका — विशेषत: वर्तमानपत्रांमध्ये छापली जाणारी — लेखकांकडून फार मोठ्या प्रमाणावर वाचली जाते, पण ती अत्यंत नीरस, बोजड आणि वर्तमान जीवनाशी अनभ्यस्त असते. जीवनातील वेगवान बदल घडत असल्याच्या आणि सर्व प्रकारच्या कार्यांची विपुल रेलचेल असल्याच्या आपल्या काळात; वर्तमानपत्रांचे पुस्तकांविषयीचे ज्ञानदारिद्र्य विशेष ठळकपणे उठून दिसते. एकही मार्गदर्शक टीकात्मक-तत्त्वज्ञानपर विचार जवळ न बाळगता अथवा निर्माण न करता आणि मार्क्स, एंगल्स व लेनिन यांच्या अविचल वचनांचा आधार घेऊन, आमची साहित्यिक टीका जेव्हा विषयांचे; व्यक्तिरेखांचे आणि मानवी संबंधांचे मूल्यमापन करते; तेव्हा वेगवान वाटचाल करणाऱ्या जीवनाच्या ताबडतोबीच्या निरीक्षणाने उपलब्ध करून दिलेल्या वस्तुस्थितींचा अनुमानासाठी क्वचितच वापर करते. अर्थात, मार्क्स आणि एंगल्स यांना आधी दिसू न शकलेल्या अशा खूप काही गोष्टी आपल्या देशात आणि आपल्या कार्यात आहेत. टीकाकार लेखकाला म्हणेल : "तें चूक आहे, कारण ह्या विषयावर आपल्या शिक्षकांनी इथे असे म्हटले आहे." ते असे म्हणू

शकत नाहीत : "ते चूक आहे, कारण जीवनातील वस्तुस्थिती लेखकाच्या विरुद्ध साक्ष देतात." सर्व उसने विचार घेणाऱ्या टीकाकारांना एंगल्स ह्यांच्या एका अत्यंत मौल्यवान विधानाचा संपूर्ण विसर पडलेला भासतो : "आमची विचारप्रणाली म्हणजे संप्रदाय नव्हे, तर कृतीची मार्गदर्शक आहे." आपली साहित्यिक टीका पुरेशी प्रभावी आणि लवचिक नाही. शिवाय साध्या, स्पष्ट आणि मोजक्या भाषेत लेखकाला लिहायला शिकविण्यास टीकाकार असमर्थ आहे, कारण त्याची स्वतःची शैली रटाळ; सपाट आहे. त्याहूनही वाईट बाब म्हणजे ती थंड असते किंवा भावनातिरेकाने ओथंबलेली असते. टीकाकार जेव्हा लेखकाशी मैत्रीच्या धाग्यांनी बांधला गेलेला असतो, अथवा "नेतावादा"च्या सांसर्गिक क्षुद्रबुद्धी रोगाची बाधा झालेल्या लोकांच्या छोटया गटाशी अनुबंधित असतो, तेव्हा ह्या ओथंबलेल्या भावना विशेष ठळकपणे दृष्टीस पडतात.

"नेतावाद" हा काळाचा रोग आहे आणि मध्यमवर्गीयाची जगण्याची क्षमता कमी झाल्याच्या परिणामी; भांडवलदार आणि कामगारवर्गीय ह्यांच्यामधील संघर्षात आपला अपरिहार्यपणे नाश होणार ह्याची त्याला जाणीव झाल्याच्या परिणामी आणि त्या नाशाच्या भीतीपायी, ह्या रोगाचा उद्‌भव होतो. ह्या भीतीपायी तो फार पूर्वीपासून ज्याला शारीरिकदृष्टया अधिक सामर्थ्यवान समजत होता अशा मालकाकडे, इतरांच्या श्रमांचे शोषण करणाऱ्या आणि जगाची लूट करणाऱ्या मालकाकडे आकर्षित होतो. मानसशास्त्रीयदृष्टया व्यक्तिवादाच्या कालबाह्यतेमधून, नपुंसकतेमधून आणि दारिद्र्यामधून "नेतावाद" निर्माण होतो. भौतिकदृष्टया तो एबेर्त,[330] नोस्के,[331] हिटलर आणि भांडवलदारी वास्तवाच्या तत्सम नायकांच्या पिकलेल्या गळवांचे रूप घेतो. समाजसत्तावादी जीवनाची निर्मिती होत असलेल्या आपल्या देशात अर्थातच असली बांडगूळे वाढणे शक्य नाही. मात्र, क्षुद्रबुद्धीवादाचा वारसा अद्याप उरला असल्यामुळे, "नेतावाद" आणि नेतृत्व यांच्यामधील मूलभूत फरक समजण्यास असमर्थ असलेल्या काही पुटकुळया अद्याप अस्तित्वात आहेत. वस्तुतः हा फरक अगदी स्पष्ट आहे. मानवी शक्तीला अत्यंत मौल्यवान मानणारे नेतृत्व त्या शक्तीचा कमीत कमी व्यय घडवून सर्वोत्तम व्यावहारिक निष्पत्ती साध्य करण्याचे मार्ग दाखविते; तर "नेतावाद" म्हणजे स्वतःच्या साथीदारांपेक्षा डोकेभर अधिक उंच उभे राहण्याची क्षुद्रप्रवृत्ती व्यक्तिनिष्ठवादी धडपड. ज्याच्यापाशी यांत्रिक

चापल्य, रिकामे डोके आणि रिकामे अंतःकरण आहे, त्याला हा "नेतावाद" सहज साध्य होतो.

साहित्यिक टीका समालोचकांना खूप जागा देते. हे लोक लेखकांना गोंधळात टाकतात आणि त्यांचा अपमान करतात, पण त्यांना काहीही शिकविण्यास मात्र असमर्थ असतात. नरोदवादी साहित्यामधील काही विचारांचे पुनरुज्जीवन घडविण्याच्या प्रयत्नांची अशी टीका दखल घेत नाही आणि अत्यंत महत्त्वाचे म्हणजे, स्थानिक लेखनाच्या विकासात तिला स्वतःला मुळीच स्वारस्य वाटत नाही. मग सोविएत संघातील साहित्याबद्दल तर काही बोलणेच नको. आणखी सांगायचे म्हणजे लेखक जेव्हा स्वतःच्या "साहित्यिक-तंत्रांबाबत" जाहीर व्याख्याने देतात, तेव्हा साहित्यिक टीका त्यांची दखल घेत नाही. वस्तुतः त्या व्याख्यानांकडे टीकाकारांनी ध्यान दिले पाहिजे.

कॉम्रेडहो, आत्मटीकेची गरज आहे. आपण कामगारवर्गासाठी काम करीत आहोत. हा वर्ग अधिकाधिक साक्षर बनत आहे, आपल्या कलेकडून त्याच्या अपेक्षा सतत वाढत आहेत, त्याचवेळी आपल्या सामाजिक वर्तनाबाबतच्या अपेक्षाही वाढत आहेत.

आपल्या कृतींचे स्वरूप आणि आपल्या अंतर्गत परस्परसंबंधांचे स्वरूप कम्युनिझमच्या विचारप्रणालीशी सुसंगत नाही. ह्या संबंधांमध्ये क्षुद्रप्रवृत्तीवाद फार मोठी भूमिका बजावीत आहे. मत्सर, लोभ, ग्राम्य कुचाळक्या आणि एकमेकांविषयीची तुच्छता, ह्यांच्याद्वारे हा क्षुद्रप्रवृत्तीवाद व्यक्त होतो.

क्षुद्रप्रवृत्तीवादासंबंधी आपण खूप लिहीत आहोत, पण एकच एक साहित्यिक व्यक्तिरेखेमध्ये अगर प्रतिमेमध्ये त्याचे उदाहरण अद्याप देण्यात आलेले नाही. फाऊस्ट, हॅम्लेट आणि तत्सम जागतिक नमुन्यांप्रमाणे जोरदाररीत्या एकच एक व्यक्तीमध्ये क्षुद्रप्रवृत्तीवादाचे चित्रण अद्याप व्हावयाचे आहे.

मी तुम्हाला आठवण करून देतो की, क्षुद्रप्रवृत्तीवादामध्ये परपुष्टांचे असंख्य वर्ग समाविष्ट असतात आणि जरी ते काहीही उत्पादन करीत नसले, तरी जास्तीत जास्त उपभोग घेण्याचा ते प्रयत्न करतात व तसा ते जास्तीत जास्त उपभोग खरोखरीच घेतात. किसानवर्गावर आणि कामगारवर्गावर ते परपुष्ट होतात, त्यांचा नेहमी मोठ्या भांडवलदार वर्गाकडे अनुकूल कल असतो; पण काही वेळा बाह्य दबावामुळे त्यांना कामगार-

वर्गाचा कैवार घ्यावा लागतो व अशावेळी ते स्वतःबरोबर अराजकवाद, अहंकारवाद आणि क्षुद्रप्रवृत्तीमध्ये ऐतिहासिकदृष्टचा अंगभूत असलेली सर्व ग्राम्यता आणतात. श्रमामधून स्फुरलेल्या नव्हे, तर दैनंदिन अस्तित्वातील वस्तुस्थितींवर पूर्णतया पोसलेल्या विचारांची ही दुष्ट ग्राम्यता असते. स्वतःच्या विचारक्षमतेच्या मर्यादांमध्ये क्षुद्रप्रवृत्तीवादाने नेहमीच व्यक्तिगत विकासाच्या तत्त्वज्ञानाचे आवाहन केले आहे व त्याचा कैवार घेतला आहे. कमीत कमी प्रतिकाराचा मार्ग अनुसरून त्याने नेहमीच उभय शक्तींचा कमी-अधिक स्थिर प्रमाणात समतोल राखला आहे. जमिनीच्या अत्यंत निकृष्ट तुकडयाची मालकी असलेला एक दरिद्री शेतकरी, ज्याची स्वतःच्या हातां-शिवाय दुसरी काहीही मालमत्ता नव्हती अशा कारखाना-कामगाराचा तिरस्कार करायचा, ही वस्तुस्थिती क्षुद्रप्रवृत्तीवादाची कामगारवर्गाविषयीच्या दृष्टिकोनाचे ठळक उदाहरण आहे. कारखान्याबाहेर कामगारवर्गीयाच्या हातांनी जेव्हा क्रांतिकारक कृती घडविली, तेव्हा कुठे क्षुद्रप्रवृत्तीच्या ध्यानात आले की, कामगारवर्गीयाला डोकेसुद्धा आहे.

सगळेच रानगवत अपायकारक अगर निरुपयोगी असत नाही. त्यातील अनेक जातीच्या गवतांपासून गुणकारी औषधे तयार करतात. पण क्षुद्रप्रवृत्ती-वादामधून मात्र फक्त घातक विषद्रव्ये मिळतात. भांडवलदारी यंत्रणेचा आपण एक अत्यंत नगण्य भाग आहोत असे जर क्षुद्रप्रवृत्ती माणसाला जाणवले नसते, तर स्वतःचे महत्त्व, स्वतःचे विचार आणि आचार–स्वातंत्र्य, स्वतःचा जगण्याचा हक्क, सिद्ध करण्याचा त्याने एवढचा सातत्याने आणि एवढचा निष्फळतेने प्रयत्न केला नसता; १९ व्या आणि २० व्या शतकांच्या दरम्यान "अनावश्यक माणसे", "पश्चात्तापदग्ध उमराव", "सामाजिक कोंडीच्या काळांमधील नायक" आणि "ना मोर ना चिमण्या" अशी माणसे मोठ्या संख्येने त्याने निर्माण केली नसती.

साहित्याच्या पक्षीय नेतृत्वाचे सर्व क्षुद्रप्रवृत्ती प्रभावांपासून कडकरीत्या शुद्धीकरण घडविण्यात आले पाहिजे. स्वातंत्र्याच्या अंतिम लढाईसाठी सर्व देशांच्या कामगारांना संघटित करणाऱ्या विचारप्रणालीचे केवळ शिक्षक म्हणून साहित्यक्षेत्रातील पक्ष-सदस्यांनी काम करून भागणार नाही; पक्षीय नेतृत्वाने संपूर्ण वर्तनात नैतिक अधिकारी शक्ती राहिले पाहिजे. लेखकांमध्ये घडणाऱ्या प्रत्येक गोष्टीबाबत सामूहिक जबाबदारीची भावना ह्या शक्तीने सर्वप्रथम लेखकांमध्ये रुजविली पाहिजे. गुणांची वैविध्यता असलेल्या आणि नव्या व

प्रतिभाशाली लेखकांच्या संख्येत भर पडत असलेल्या सोविएत साहित्याने एक अखंड संयुक्त आणि सामूहिक संघटना म्हणून, समाजसत्तावादी संस्कृतीचे बलाढ्य शस्त्र म्हणून, संघटित झाले पाहिजे.

लेखकांना केवळ शारीरिकदृष्टचा एकत्र आणण्याच्या हेतूने संघ स्थापन करण्यात येत नाही, तर व्यावसायिक साहचर्याद्वारे त्यांची सामुदायिक शक्ती जाणून घेणे त्यांना शक्य व्हावे, त्या शक्तीच्या सृजनशील सामर्थ्यांमधील विभिन्नता आणि तिचे उद्देश अत्यंत स्पष्टपणे त्यांना सांगता यावेत व देशाच्या श्रम-निर्माणशील ताकदीचे मार्गदर्शन करणाऱ्या ऐक्यामध्ये त्या सर्व उद्देशांचा सुसंवादी मेळ घालता यावा, हासुद्धा हेतू आहे.

अर्थात व्यक्तिगत सृजनाला पायबंद घालणे हे कार्य नव्हे, तर त्या सृजनासाठी अडथळाविहीन विकासाच्या जास्तीत जास्त संधी उपलब्ध करून देणे हे कार्य आहे.

जीवनासाठी संघर्ष करण्यास असमर्थ ठरलेल्या, त्या जीवनामधून उचकटलेल्या आणि केवळ स्वतःच्या अस्तित्वासाठी जगणे निरर्थक असल्याची थोडीफार स्पष्ट जाणीव झालेल्या, ती निरर्थकता म्हणजे सर्व सामाजिक परिस्थितीची आणि संपूर्ण ऐतिहासिक क्रमाची केवळ अयुक्तिक गोष्ट असल्याची जाणीव झालेल्या "अनावश्यक लोकां"च्या वैयक्तिक सृजनामधून टीकात्मक वास्तववाद निर्माण झाला हे शिकले पाहिजे.

टीकात्मक वास्तववादाने केलेले महाप्रचंड कार्य कोणत्याही तऱ्हेने न नाकारता आणि शब्द-प्रतिमांच्या कलेत त्याने प्राप्त केलेल्या तांत्रिक सिद्धींचे पूर्ण मूल्यमापन करूनही आपण हे जाणले पाहिजे की, भूतकाळातील अवशेषांवर प्रकाश टाकण्यापुरतीच त्या वास्तववादाची आपल्याला गरज आहे व ते अवशेष नष्ट करण्यासाठी आपण लढा उभारला पाहिजे.

मात्र, वास्तववादाच्या ह्या प्रकाराने समाजसत्तावादी व्यक्तिमत्व शिक्षित करण्यास मदत केली नाही आणि तशी मदत तो करू शकत नाही, कारण सर्व गोष्टींवर टीका करीत असताना त्याने काहीही स्थापित केले नाही अथवा वाईटात वाईट म्हणजे त्याने स्वतःच नाकारलेल्या गोष्टी परत स्वीकारल्या आहेत.

कामकरी समूहातील शेलके समजल्या जाणाऱ्या आपल्या श्रमवीरांच्या उदाहरणावरून असे आढळते की, सामुदायिक श्रमाच्या परिस्थितींमध्येच केवळ समाजसत्तावादी व्यक्तिमत्व विकसित होऊ शकते. माणसाला विकृत

करणाऱ्या भांडवलशाहीच्या सत्तेपासून सर्व जगभरच्या कष्टकऱ्यांना मुक्त करण्याचे उदात्त आणि शहाणे उद्दिष्ट सामुदायिक श्रमाने स्वत:पुढे ठेवलेले आहे.

जीवन म्हणजे कृती, सृजनशीलता असे समाजसत्तावादी वास्तववाद घोषित करतो. निसर्गातील शक्तींवर मानवाने विजय मिळवावा, त्याला आरोग्य आणि दीर्घायुष्य लाभावे, पृथ्वीवर राहताना सर्वोत्तम सुख मिळावे, म्हणून त्याच्या अत्यंत मौल्यवान व्यक्तिगत क्षमतांचा अनिर्बंध विकास घडविणे हे समाजसत्तावादी वास्तववादाचे ध्येय आहे. स्वत:च्या गरजांच्या सतत वाढीला अनुसरून ह्या पृथ्वीला एक कुटुंबात एकवटलेल्या मानवजातीचे वैभवशाली वसतीस्थान बनविण्याची माणसाची इच्छा आहे.

आपल्या साहित्यातील उणीवांबद्दल खूप काही सांगितल्यानंतर, आता त्यातील जमेच्या बाजूंचा आणि त्याच्या यश:सिद्धींचा निर्देश करणेही आवश्यक आहे. पश्चिमी साहित्य आणि आपले स्वत:चे साहित्य यांच्यामधील ठळक भेदाची चर्चा करण्यास माझ्यापाशी पुरेसा वेळ नाही. तरीही, मी असे म्हणेन की, विषयाच्या वैविध्यात आमच्या साहित्याने पश्चिमी साहित्यावर मात केली आहे हे कुणाही पूर्वग्रहविरहित परीक्षकाला स्पष्ट समजते. आणि मी तुम्हाला आठवण करून देईन की, आपल्यातील अनेक लेखकांना स्वदेशापेक्षा पश्चिमेत अधिक वाहवा लाभली आहे. 'साहित्याविषयी' ह्या संग्रहात १९३० साली मी आपल्या साहित्याच्या यश:सिद्धींबद्दल उघड आणि स्पष्टपणे बोललो होतो. तेव्हापासून तीव्र कामाची चार वर्षे उलटली आहेत. आपल्या साहित्याच्या यश:सिद्धींबद्दलचे माझे मूल्यमापन वर उंचावण्याचा त्या कामामुळे मला अधिकार मिळतो का? होय, आमच्या मुख्य वाचकांकडून — कामगार आणि सामुदायिक शेतकरी यांच्याकडून – आलेल्या अनेक रसग्रहणांमुळे मला तसे करण्याचा अधिकार प्राप्त झाला आहे. मी फक्त एवढेच म्हणेन की, आमच्या साहित्याच्या विकासाचे पुढारी म्हणून मान्यता पावतील अशा चांगल्या लेखकांचा एक गट आमच्यापाशी एव्हाना आहे.

ह्या गटाने अत्यंत प्रतिभाशाली अशा पक्षीय आणि बिगर-पक्षीय लेखकांना एकत्र आणले आहे. त्यामुळे बिगर-पक्षीय केवळ नांवापुरते "सोविएत" नाहीत, तर प्रत्यक्षात तसे बनले आहेत. कारण पक्षाच्या व कामगारांच्या आणि शेतकऱ्यांच्या सोविएत सत्तेच्या शौर्यशाली कार्याचा सर्वसाधारण आणि सार्वत्रिक अर्थ त्यांनी अधिकाधिक जाणून घेतला आहे. एक लक्षात

घेतले पाहिजे की, १८ व्या शतकानंतर, रशियन भांडवलदारी साहित्याला जीवनामध्ये बळजबरीने प्रवेश मिळविण्यास व त्यावर ठाम प्रभाव पाडण्यास सुमारे शंभर वर्षांचा काळ लागला. सोविएत क्रांतिकारक साहित्याने पंधरा वर्षांच्या काळात हा प्रभाव पाडला.

वेगाने विकसित होत जाणाऱ्या आमच्या जीवनाने साहित्याकडून ठेवले-ल्या उच्च अपेक्षा आणि लेनिन यांच्या पक्षाने चालविलेले सांस्कृतिक व क्रांतिकारक कार्य, ह्यांचा उगम लेखनकलेला पक्षाने दिलेल्या फार मोठ्या महत्त्वामध्ये आहे. जगामधील इतर कोणत्याही भूतकालीन वा वर्तमानकालीन देशात विज्ञानाला आणि साहित्याला एवढे बांधव-साहाय्य लाभलेले नाही, अथवा कलेच्या आणि विज्ञानाच्या क्षेत्रात काम करणाऱ्या माणसांच्या व्याव-सायिक पात्रता वाढविण्यासाठी एवढी आस्था दाखविण्यात आलेली नाही.

कामगारवर्गीय राज्याने प्रथम दर्जाचे हजारो "संस्कृतीप्रभू" आणि "आत्म्याचे अभियंते" शिकवून तयार केले पाहिजेत. सबंध जगभरच्या कामकरी लोकांच्या संपूर्ण समूहाला आजवर वंचित झालेला त्यांची मने, त्यांचे गुण व त्यांच्या क्षमता विकसित करण्याचा हक्क परत मिळावा म्हणून हे आवश्यक आहे. व्यवहारत: साध्य करता येण्याजोग्या ह्या उद्दिष्टाने आम्हा लेखकांवर आमच्या कार्याविषयक आणि सामाजिक वर्तनाविषयक कडक जबाबदारी टाकली आहे. त्यामुळे "सबंध जगाचे आणि लोकांचे न्यायाधीश" होण्याची आणि "जीवनाचे टीकाकार" होण्याची वास्तववादी साहित्याची पारंपारिक जबाबदारी तर आपल्यावर पडतेच, शिवाय नवजीवनाच्या उभार-णीत आणि "जग बदलण्याच्या" प्रक्रियेत थेट सहभागी होण्याचा हक्कही आपल्याला लाभतो.

ह्या हक्कप्राप्तीमुळे प्रत्येक लेखकामध्ये सबंध साहित्याबद्दलची त्याच्या कर्तव्याची व जबाबदारीची जाणीव बिंबवावी आणि साहित्यात आढळू नयेत अशा गोष्टींचीही त्याला जाणीव रहावी.

सोविएत लेखकांच्या संघात १५०० सदस्य आहेत. म्हणजे दर १०० ००० वाचकांना एक लेखक असे प्रमाण पडते. ह्या शतकाच्या आरंभी स्कॅन्डिने-व्हियाच्या द्वीपकल्पात दर २३० वाचकांना एक लेखक होता हे ध्यानात घेतल्यास हे प्रमाण फार नव्हे. सोविएत संघातील लोक सातत्याने आणि जवळ जवळ दररोज स्वत:च्या गुणांना प्रकट करीत आहेत. मात्र ह्याचा अर्थ असा नव्हे की, लौकरच आपल्याकडे १५०० प्रतिभाशाली लेखक होतील.

आपण फक्त पन्नासचे स्वप्न बाळगू. आत्मवंचना टाळण्यासाठी फक्त पाच प्रतिभावंत आणि पंचेचाळीस गुणी लेखक, अशी योजना करू. आरंभी एवढे पुरेसे होईल असे मला वाटते. जीवनातील वास्तवतांबद्दल अद्याप जे पुरेसे ध्यान देत नाहीत, स्वतःचे साहित्य गबाळेपणाने जे गोळा करतात आणि त्याच्यावर निष्काळजीपणे संस्करण करतात, अशा लोकांचा बाकीच्यांमध्ये समावेश असेल. सर्व प्रजासत्ताकांमधील आणि प्रदेशांमधील शेकडो "नव-शिक्यांची" व सदस्यत्वासाठीच्या शेकडो उमेदवारांची ह्या संख्येत आपण भर घातली पाहिजे. त्यांच्यातील शेकडो लेखनात गुंतले आहेत आणि डझनावारी एव्हाना छाप्यात आले आहेत. खाबारोवस्क आणि कम्सामोल्स्क-पासून ते रोस्तोव, स्तालीनग्राद, ताश्कंद, वारोनेझ, काबार्दिनो-बाल्कारिया, तिफ्लिस इत्यादींपर्यंत विविध स्थळी स्थानिक नवशिक्यांचे साहित्य सामावलेले सुमारे ३० संग्रह आणि साहित्यिक वार्षिक १९३३-३४ ह्या काळात प्रसिद्ध झाली आहेत.

ह्या कामाचे मूल्यमापन करणे आपल्या टीकाकारांचे कर्तव्य आहे. पण काळ परिपक्व झाला असूनही ते तिकडे लक्ष देत नाहीत. हे काम जसे आहे त्या अवस्थेतही जनसमूहांमध्ये सांस्कृतिक क्रम सखोल झाल्याचे दर्शविते. साहित्यक्षेत्रात काम करायला उत्सुक असे किमान १० ००० तरुण आपल्या देशात आहेत असा माझा अंदाज आहे. अर्थात ह्या प्रचंड संख्येतील एक-दशांश लोकांनाही भावी साहित्य शिक्षण संस्था सामावू शकणार नाही.

आता मी एक प्रश्न विचारतो: ही लेखकांची काँग्रेस का भरविण्यात आली आहे आणि भावी संघ स्वतःसमोर कोणती उद्दिष्टे ठेवणार आहे? जर ह्या उद्दिष्टांचा रोख केवळ साहित्यिकांच्या व्यावसायिक कल्याणापुरता असेल, तर ह्या खेळाला कवडीचेही मोल नाही. केवळ लेखकांच्या व्याव-सायिक हिताचा विचार न करता, त्याच्या जोडीला एकूण साहित्याच्या हिताचाही संघाने विचार करावा, असे मला वाटते. संघाने काही मर्यादे-पर्यंत नवशिक्यांच्या झुंडीचे नेतृत्व करावे, त्यांना संघटित करावे, भिन्न कामांवर त्यांच्या शक्तींचे वाटप करावे आणि भूत व वर्तमानकालातील, अशा दोन्ही कालांमधील साहित्याचा कसा वापर करावा ह्याचे त्यांना शिक्षण द्यावे.

आपल्या भूतकाळाचा इतिहास आपल्याला ठाऊक नाही. एकेकाळी स्वतंत्र प्रिन्सची सत्ता असलेल्या अथवा जुन्या सीमांवर उभ्या असलेल्या शहरांचा

त्यांच्या स्थापनेपासून ते सद्य:काळापर्यंतचा इतिहास लिहिण्याच्या कामाची योजना झालेली आहे व काही अंशी काम पारही पडलेले आहे. सरंजामशाहीकालीन रशिया, मॉस्कोच्या ग्रॅन्ड ड्यूकांचे आणि झारांचे वसाहतवादी धोरण, व्यापार आणि उद्यमांचा विकास, प्रिन्स, वोयेवोदा (प्रांतिक गव्हर्नर – अनु.), व्यापारी, मध्यमवर्गीय आणि चर्च ह्यांनी शेतकरीवर्गाचे केलेले शोषण, ह्यांचे वर्णन शब्दचित्रांच्या व कथांच्या रूपाने ह्या पुस्तकात झाले पाहिजे. "मातीच्या सत्ते"पासून आणि मालमत्तेच्या जोखडापासून शेतकरीवर्गाची अस्सलरीत्या आणि संपूर्ण मुक्तता करणाऱ्या सामुदायिक शेतांच्या स्थापनेचे वर्णन करून ह्या पुस्तकाचा समारोप करायला पाहिजे.

आपल्या संघ प्रजासत्ताकांचा भूतकालीन इतिहास आपल्याला ठाऊक असला पाहिजे. शेकडो नवशिक्या लेखकांना ह्या कामात समाविष्ट करता येईल. त्यामुळे त्यांना स्वयंशिक्षणाच्या विस्तृत संधी उपलब्ध होतील व कच्च्या टाचणांवरील सामुदायिक संस्करण आणि परस्पर टीका, ह्यांच्यामार्फत स्वत:च्या पात्रतेत सुधारणा घडवून आणता येतील.

आत्तापर्यंत ज्या रीतीने भूतकालीन घडामोडी आपल्यापुढे सादर केल्या जात होत्या त्या रीतीने नव्हे, तर मार्क्स आणि लेनिन ह्यांच्या शिकवणींमध्ये दाखविल्यानुसार त्या घडामोडींचे ज्ञान आपल्याला झाले पाहिजे. आणि नव्या ऐतिहासिक शक्तीमार्फत – समाजसत्तावादी प्रजासत्ताकांच्या संघाच्या कामगारवर्गाच्या निर्धारामार्फत आणि युक्तिवादामार्फत – कारखान्यांमध्ये व शेतांमध्ये श्रमाद्वारे ते ज्ञान अंमलात आणले पाहिजे.

माझ्या मते लेखक संघापुढे ही समस्या उभी आहे. आपली काँग्रेस म्हणजे वाचकांना दिलेला एक अहवाल अथवा आपल्या गुणांच्या प्रदर्शनाची कवायत, एवढेच तिचे स्वरूप असू नये. साहित्याचे संघटन करण्याचे, अखिलसंघ महत्त्वाच्या कामी तरुण लेखकांना शिक्षित करण्याचे, आपल्या देशाच्या भूत आणि वर्तमानाचे सर्वांगीण अभिज्ञान त्यांना घडविण्याचे कार्य तिने हाती घेतले पाहिजे.

१९३४

# कामगारवर्गीय मानवतावाद

332

"जग आजारी आहे"—केवळ बोल्शेविकांनी असे प्रतिपादन केले नाही, तर काव्यात्म प्रवृत्तीच्या मानवतावाद्यांनीही असे प्रतिपादन केले. अखेरीस त्यांनाही समजून चुकले की, स्वतःचा लांडग्यासमान "स्वभाव", "मानवप्रेम", "दया", "औदार्य" आणि इतर भावनांखाली लपविण्याचा प्रयत्न करणारे द्विपाद हिंस्र पशू व्यावहारिक उपयोगात आणता येत नाहीत, त्यांचे क्रयवस्तूत रूपांतर करता येत नाही आणि त्यांना ग्राहक मिळत नाहीत. उलट व्यापारी आणि औद्योगिक नफ्यांवर त्यांचा अपायकारक परिणाम घडतो.

"जग वेडं बनलंय"—श्रमजीवींच्या जगावर भांडवलाच्या बेजबाबदार आणि अमानुष सत्तेचे रक्षण व समर्थन करण्याचा, तसेच, कामगारांच्या शक्तीचे मालकांनी चालविलेल्या अनिर्बंध आणि एव्हाना निरर्थक अशा शोषणाचे समर्थन करण्याचा ज्यांनी व्यापार बनविला आहे असे लोक जास्त मोठ्यांदा ओरडत आहेत.

भांडवलदारवर्गाने सरंजामदारांच्या दुबळ्या हातांमधून सत्ता खेचून घेतल्यानंतर जवळजवळ ताबडतोबच भांडवलशाहीचे "आजारपण" सुरू झाले. ह्या आजाराची सर्वप्रथम दखल घेतली आणि त्याबाबत आकांताने ओरड केली फ्रीड्रिख नीत्शे ह्या कार्ल मार्क्स यांच्या समकालीनाने. योगायोग नामक गोष्ट अस्तित्वात नाही. जीवनातील प्रत्येक घटनेला तिचे कारण असते. आणि हा योगायोग नव्हे की, मार्क्स जेव्हा शास्त्रशुद्धरीत्या व निर्विवादरीत्या भांडवलशाहीच्या अधःपाताची अटळता आणि कामगारवर्गाच्या सत्तेची अपरिहार्यता दाखवीत होते, त्याच वेळी "सोनेरी पशू"च्या अनिर्बंध सत्तेच्या कायदेशीरपणाचा विकृत आणि भेदरलेल्या माथेफिरूच्या बेभानतेने नीत्शे पुरस्कार करीत होते. नीत्शेपूर्वी भांडवलदारी शासनसंस्था, धर्म आणि नीतीमत्ता ह्यांना मॅक्स श्टर्नरनी दूषणे दिली होती. व्यक्तीच्या अनिर्बंध अहंकारवादाच्या हक्काचा त्यांनी पुरस्कार केला होता. ही अराजकवादी

निंदा निश्चितरीत्या "मानवतावादा"ची निंदा आहे. सरंजामशाही व सरंजामदारांचे सैद्धांतिक पुढारी चर्च, यांच्याविरुद्ध मध्य युगात भांडवलदारवर्गाने संघर्ष सुरू केला तेव्हापासूनच त्याने मानवतावादाला उत्क्रांत करण्यास आरंभ केला होता. ल्यूथर,[333] काल्विन[334] इत्यादींच्या चर्चमधील सुधारणांमधून निर्माण झालेल्या ह्या "मानवतावादा"मधील अडचणींची आणि आत्मविसंगतींची भांडवलदारांना स्वतःच्या व्यावहारिक जीवनात फार लौकरच जाणीव झाली होती. ह्या सुधारणांनी "मानवतावादी" तत्त्वांची जागा बायबलने घेतली असून त्याच्यानुसार भांडवलदारी राज्य ज्याविना अस्तित्वातच राहू शकणार नाही अशा टोळी-वैमनस्याला, कत्तलीला, दरोडेखोरीला, फसवणुकीला व बाकीच्या सर्व गोष्टींना अगदी स्वाभाविकच नव्हे तर कौतुकास्पदही मानले होते. ल्यूथरपूर्वी चर्चने संस्कृतीच्या कारागीरांना ख्रिस्तासाठी धीराने यातना सोसण्याची शपथ घातली होती. पण धर्मगुरुंना न शोभणाऱ्या सडेतोडपणे सोळाव्या शतकात किसान-कारागीरांच्या क्रांतिकारक उठावावेळी त्याने शिकविले: "अशा रीतीनं जगा आणि काम करा ज्यायोगे राजांना आणि सरदारांना तुमच्यावर नियंत्रण राखणं सोपं व सुखाचं होईल. संयम राखा, आधीन व्हा, देह आणि मालमत्ता शरण करा, तुमच्या वरिष्ठांविरुद्ध आणि जुलूमशहांविरुद्ध उठाव करू नका!"

आपल्या काळातील भांडवलदारी "मानवतावादा"चा खोटेपणा आणि ढोंगीपणा दाखविण्याची गरज नाही. भांडवलदार फॅसिझमला चालना देत आहेत आणि हिंस्र पशूचे सुळे इतःपर झाकू न शकणारा जुनाट बुरखा फेकून द्यावा, त्याप्रमाणे स्वतःच्या मानवतावादाचा त्याग करीत आहेत. असा त्याग करण्याचे कारण म्हणजे त्यांना समजून चुकले आहे की, त्यांच्या विभक्त व्यक्तिमत्वाला आणि ऱ्हासाला कारणीभूत ठरलेल्या अनेक गोष्टींमध्ये मानवतावादाचाही समावेश आहे. उपरीनिर्दिष्ट वस्तुस्थिती दाखवितात की, जगातील दुष्टाव्यांना पाहून जेव्हा संवेदनाशील माणसे अस्वस्थ होतात आणि ह्या दुष्टाव्यांना कमी करण्याच्या उद्देशाने मानवी प्रेमाचा पुरस्कार करण्याचा भाबडा यत्न करतात, अथवा भाषणबाजीच्या बुरख्याखाली त्या दुष्टाव्यांना लपवू पाहतात, तेव्हा जीवनाचे मालक – दुकानदार – जी माणसे दारिद्रयाने, जुलुमाने, दडपशाहीने व दुकानदारांच्या जगव्यापी "सांस्कृतिक" कारवायांच्या अटळ इतर परिणामांपायी संत्रस्त बनली आहेत, त्या माणसांना शांत

करण्याचा प्रयत्न म्हणूनच केवळ अशा शिकवणीला परवानगी देतात. पण कामकरी जनसमूहांच्या ह्या संत्रस्ततेने ज्या क्षणी सामाजिक-क्रांतिकारक रूपे धारण केली, त्याच क्षणी भांडवलदारांनी "कृती"ला "प्रतिगामित्वा"चा टोला दिला.

आमच्या उदारमतवादी भांडवलदारवर्गाने ह्या कायद्याला आनंदाने मान्य केले. १९०५-०६ च्या घटनांनंतर[335], 'वेखी' ह्या पश्चातापदग्ध पुस्तकात त्यांनी जाहीरपणे घोषित केले. "लोकांच्या संतापापासून बागनेटांनी आमचे रक्षण केल्याबद्दल आम्ही सरकारचे कृतज्ञ राहिले पाहिजे." सरकार त्यावेळी स्तोलीपिन नामक मंत्र्याच्या हाती होते. त्याने हुकूमशाही गाजवून पाच हजारांहून अधिक कामगार-किसानांना फासावर चढविले.

आपल्या आजच्या काळात सरकारला ऐतिहासिक आणि शास्त्रशुद्ध पाया असलेल्या, अस्सल वैश्विकरीत्या मानवी अशा मार्क्स-लेनिन ह्यांच्या कामगारवर्गीय मानवतावादाला भयानकरीत्या तोंड द्यावे लागते. भांडवलाच्या लोखंडी नख्यांमधून सर्व वंशांच्या आणि राष्ट्रांच्या कामकरी लोकांची संपूर्ण मुक्ती करणे हे त्या मानवतावादाचे ध्येय आहे. मानवी प्रेमाच्या ह्या अस्सल तत्त्वप्रणालीने निर्विवादरीत्या सिद्ध केले आहे की, भांडवलाच्या लोखंडी नख्या कामगार बनवतात आणि कामगारवर्गीय भांडवलशाहीसाठी "सुरेख जीवन" निर्माण करतात, पण स्वतः मात्र पददलित कंगाल राहतात.

हा क्रांतिकारक मानवतावाद कामगारवर्गाला भांडवलशाहीविरुद्ध कठोर युद्ध करण्याचा ऐतिहासिकरीत्या समर्थनीय हक्क देतो; भांडवलशाही जगताच्या सर्व राक्षसी अधिष्ठानांना नष्ट करण्याचा आणि त्यांचा संहार करण्याचा हक्क देतो. मानवजातीच्या इतिहासात प्रथमच अस्सल मानवी प्रेमाला सृजनशील शक्ती म्हणून संघटित करण्यात येत आहे. अत्यंत नगण्य अल्पसंख्यांच्या अमानुष आणि अर्थहीन सत्तेमधून शेकडो दशलक्षावधी कष्टकऱ्यांना मुक्त करण्याचे ध्येय त्याने स्वतःसमोर ठेवले आहे. शरीरश्रम करणाऱ्या शेकडो दशलक्षावधी मजूरांना ते सांगते आहे की, त्यांच्याच श्रमांमधून संस्कृतीची सर्व भांडारे निर्माण झाली आहेत आणि ह्या भांडारांचा वापर करून कामगारवर्गीयांनी एक नवी, सार्वत्रिकरीत्या मानवी, समाजसत्तावादी संस्कृती निर्माण केली पाहिजे व जगातील कामकरी लोकांमध्ये ती बांधिलकी आणि समता ठामपणे स्थापन करील.

हा कामगारवर्गीय मानवतावाद म्हणजे केवळ कल्पनारंजन नव्हे, अथवा

तत्त्वप्रणाली नव्हे. समाजसत्तावादी सोविएत संघाचा कामगारवर्ग त्याला लढाऊरीत्या, धीटपणे आणि शौर्याने आचरणात आणीत आहे व त्याने एव्हाना दाखवून दिले आहे की, असंख्य राष्ट्रीय आणि वांशिक घटकांच्या पूर्वीच्या भांडवलदारी, शेतगडयांच्या "रानटी" रशियामध्ये राष्ट्रजमातींची बांधिलकी व समता खरोखरीच साध्य करण्यात आली आहे; शारीरिक शक्तीच्या अफाट साठ्यांना बौद्धिक शक्तीमध्ये रूपांतरीत करण्याची प्रक्रिया खरोखरीच आणि निर्विवादपणे विकसित होत आहे.

कामगारवर्गाच्या क्रांतिकारक जाणीवेच्या वाढीला तोंड देण्यासाठी सर्व देशांचे भांडवलदार काय करीत आहेत?

अब्जावधी कामकरी लोकांवर स्वतःची सत्ता कायम राखण्यासाठी आणि अर्थहीनरीत्या श्रमाचे शोषण करण्याच्या स्वतःच्या स्वातंत्र्याचे रक्षण करण्यासाठी भांडवलदार आपल्या शक्तीचा प्रत्येक औंस खर्च करीत आहेत व फॅसिझम संघटित करीत आहेत. फॅसिझम म्हणजे भांडवलदारी समाजातील निःशक्त अशा शरीरदृष्टया व नैतिकदृष्टया रोगट स्तराचे भांडवलाने केलेले एकत्रीकरण आणि संघटन. १९१४-१८ च्या युद्धाचे परिणाम घडलेल्या वेडसर मुलांचे एकत्रीकरण. मध्यमवर्गाच्या, पराभवाचा आणि पराभवाएवढ्याच भांडवलदारवर्गाला अनर्थकारी ठरलेल्या विजयांचा "उलट सूड घेणाऱ्यांच्या" मुलांचे एकत्रीकरण. पुढील वस्तुस्थितींवरून ह्या तरुणांच्या मनाची घडण स्पष्ट होते. यंदाच्या मे महिन्याच्या आरंभी, जर्मनीतील एस्सेन गावी

> "चौदा वर्षांच्या हाईन्झ ख्रिस्तेन ह्या मुलाने त्याचा तेरा वर्षांचा मित्र फ्रिटझ वाल्केनहोर्स्ट ह्याला ठार मारले. खुन्याने शांतपणे सांगितले की, त्याच्या मित्रासाठी त्याने आधीच थडगे खणून ठेवले होते, मग त्याने त्याला त्या थडग्यात जिवंत लोटून दिले व तो घुसमटून मरेपर्यंत त्याचे डोके वाळूत दाबून ठेवले. वाल्केनहोर्स्टपाशी असलेला हिटलरी हल्ला चढविणाऱ्या सैनिकाचा गणवेष हस्तगत करण्यासाठी खून करण्यास तो प्रवृत्त झाला असे तो म्हणाला."

फॅसिस्टांच्या कवायती पाहिलेल्या कुणालाही समजेल की, आजारी माणसांच्या सर्व भावनावेगांनिशी जगण्याची इच्छा बाळगणाऱ्या आणि त्यांच्या विषारी रक्तामधील कुजक्या क्षोभाला वाट मोकळी करून देण्याचे स्वातंत्र्य

त्यांना लाभवून देईल अशी कोणतीही गोष्ट स्वीकारण्याची तयारी असलेल्या, हाडे वाकलेल्या, रक्तपिती झालेल्या, क्षयी तरुणांच्या त्या कवायती असतात. हजारो फिकट आणि रक्तक्षयी चेहऱ्यांमध्ये निकोप व टवटवीत चेहरे अत्यंत ठळकपणे उठून दिसतात, कारण ते फार थोडे असतात. अर्थात ते चेहरे असतात कामगारवर्गाच्या जाणीवबद्ध वर्गशत्रूंचे अथवा मध्यमवर्गीय साहस-वाद्यांचे, कालच्या सामाजिक-लोकशाहीवाद्यांचे, अथवा मोठे व्यापारी होऊ इच्छिणाऱ्या छोट्या व्यापाऱ्यांचे. जर्मन फॅसिस्ट पुढारी कामगार-किसानांना वंचित ठेवून ह्या छोट्या व्यापाऱ्यांना थोडे इंधन अथवा बटाटे मोफत भेट देतात आणि त्यांची मते विकत घेतात. मुख्य वेटरना स्वतःच्या मालकीची छोटी रेस्तराँ हवी असतात, मोठ्या चोरांना सत्ताधाऱ्यांनी परवानगी दिले-ल्या चोऱ्या करण्याची छोट्या चोरांची इच्छा असते – आणि अशा लोकांमधून फॅसिझम स्वतःचे "सदस्य" निवडतो. फॅसिस्ट कवायत ही भांडवलशाहीच्या सामर्थ्याचे आणि दुर्बलतेचे दर्शन एकाच वेळी घडविणारी कवायत असते.

ह्या इकडे डोळेझाक करायला नको: क्रांतिकारक कामगारवर्गाच्या निर्णायक सामर्थ्याची अद्याप जाणीव न झालेले अनेक कामगार फॅसिस्टांमध्ये आहेत. जागतिक परपुष्ट – भांडवलशाही – अद्याप चांगलाच सामर्थ्यवान आहे, कारण कामगार आणि शेतकरी अजूनही त्याच्या हाती शस्त्रे व खाद्यपदार्थ ठेवीत आहेत, अजूनही स्वतःच्या रक्ता-मांसाने त्याचे पोषण करीत आहेत, ही गोष्ट आपण स्वतःपासून लपवून ठेवायला नको. ह्या वादळी काळामधील ही अत्यंत शोचनीय आणि लाजिरवाणी परिस्थिती आहे. बाजार-पेठेमधील किंमतींची विशिष्ट पातळी कायम रहावी म्हणून अन्नपदार्थांचा नाश करण्यासारख्या गोष्टी बेकार आणि उपाशी लोक संयमाने सहन करतात ही किती आश्चर्यकारक बाब आहे. ज्या काळात बेकारी वाढत आहे, वेतने खाली घसरत आहेत आणि मध्यमवर्गाची क्रयशक्तीसुद्धा घटत आहे, अशा वेळी बेकारांचा आणि भुकेल्यांचा संयम आश्चर्यजनक आहे.

एखाद्याला वाटेल की, ब्रिटिश कामगारवर्गाच्या बेकार बंधूंच्या पुढे उद्धृत केलेल्यासारख्या दुष्ट अपमानांनी ब्रिटिश कामगारवर्गाच्या मानवी प्रतिष्ठेत सखोल व सक्रिय तिटकाऱ्याची खळबळ माजेल:

> "इंग्लंडातील सेरे शहरात कुत्र्यांसाठी पेस्ट्री पक्वान्ने विकणारे एक दुकान प्रथमच उघडण्यात आले आहे. ह्या दुकानात सर्व कुत्र्यां-साठी पेस्ट्री विकण्यात येतात आणि घर नसलेल्या व उपाशी कुत्र्यांना

अन्न आणि निवारा देण्यात येतो. ब्रॉकहर्स्ट येथे काही आठवड्यांपूर्वी निधन पावलेल्या मि. जेम्स पॅटरसन यांनी देणगी दिलेल्या निधी-मधून हे दुकान उघडण्यात आले आहे."

अशा प्रकारच्या लज्जास्पद आणि माणूसघाण्या उधळमाधळीचे अनेक प्रकार इंग्लंडात – "उमरावी वंशाच्या" भूमीत – वारंवार घडत आहेत. फार मोठी शक्यता आहे की, स्वतःचा ऱ्हास अपरिहार्य असल्याची पॅटरस-नांना आंतरिक जाणीव झाल्याचे ते द्योतक आहेत आणि जीवनाचा अखेरचा निरोप घेताना जास्तीत जास्त घाण करून मनातील सूडभावनेला वाट मोकळी करून देण्याच्या पॅटरसनांच्या उमरावी ऊर्मीचे ते निदर्शक आहेत.

पौगंडावस्थेतील मुलांना आणि युवकांना रिवॉल्वरांबरोबरच कालबाह्य राष्ट्रवादी व वंशवादी विचारांनी शस्त्रसज्ज करून आणि सामाजिक माणूस-घाणेपणाची व खून-संहाराची दुष्ट वासना युवकांच्या मनात बिंबवून, क्रांतिकारक कामगारवर्गाविरुद्धच्या लढाईत त्यांना पोलिसांचे हस्तक बनविण्याचे कामच केवळ भांडवलदार करीत आहेत असे नाही, तर त्यांचे विषामध्ये रूपांतर करीत आहेत. मानवी संहाराच्या आधुनिक यांत्रिक शस्त्रास्त्रांनी सुसज्ज अशा कामगारांच्या आणि शेतकऱ्यांच्या सेनेत हे वीष टोचण्यात येईल. भांडवलदारांना चांगली आठवण आहे की, पाशवी बराकी प्रशिक्षणाची शिस्त अंगी बाणवलेल्या कामगारांनी आणि शेतकऱ्यांनी १९१८-२० मध्ये [336] दाखविले होते की, स्वतःच्या वर्गशत्रूची मूर्खपणाने, आत्मघातकीपणाने आणि यांत्रिकपणे ते किती सेवा बजावतील ह्याची एक मर्यादा आहे; आणि त्या मर्यादेपलिकडे – दशलक्षावधी कामगारांनी आणि किसानांनी एकमेकांच्या कत्तली केल्यावर व एकमेकांना अपंग बनविल्यावर – बागनेटे आणि तोफा भांडवलाच्या हितसंबंधांची सेवा करीत नाहीत. "कधीच नसण्यापेक्षा थोडा उशीर झाला तरी चालेल" हे अर्थात खरे, पण ह्या बाबतीत वर्गशत्रूपासून शिकणे उत्तम : कामगाराला आपला प्रामाणिक हात भांडवलदाराविरुद्ध कायद्याने उगारायला अवसर मिळण्यापूर्वीच भांडवलदार कामगाराला नष्ट करतो.

युरोपातील युवकांवर फॅसिझमने घडविलेल्या संहारक आणि आचारभ्रष्ट प्रभावाची शेकडो उदाहरणे साक्ष देत आहेत. ह्या वस्तुस्थितींची गणना करू लागल्यास पोटात ढवळून येते; एवढेच नव्हे तर ज्या वाढत्या उत्साहाने

आणि विपुल प्रमाणात भांडवलदारवर्ग घाण पसरवीत आहे तिला मनात साठवून ठेवण्यास स्मरणशक्ती नकार देत आहे. पण मी निर्देश करीन की, ज्या देशात कामगारवर्ग धीटपणे आणि यशस्वीपणे सत्ता गाजवीत आहे तेथे तरुणांना भ्रष्ट करणारा समलिंगी संभोगाचा दुर्गुण हा कायद्याने शासन घडणारा सामाजिक गुन्हा मानला जातो, तर थोर तत्त्वज्ञांच्या, शास्त्रज्ञांच्या आणि संगीतकारांच्या "सुसंस्कृत" देशात समलिंगी संभोग मुक्तपणे आणि निर्भयपणे करण्यात येतो. उपहासात्मक वाक्प्रचार एव्हाना प्रचलित बनलाय: "समलिंगी संभोग नष्ट करा आणि फॅसिझम अदृश्य होईल." असा निर्देश केला पाहिजे की, जरूरच पडली तर ज्या वंशाचे लोक स्वतःच्या विशुद्धतेची प्रौढी मिरवू शकतील, ज्या लोकांनी मानवजातीला संस्कृतीच्या खऱ्याखुऱ्या थोर प्रभूंची देणगी दिली – त्या सर्वांत थोर, कामगारवर्गाचा अस्सल प्रेषित, कार्ल मार्क्स – त्या ज्यू लोकांना जर्मनीतील फॅसिस्ट भांडवलदारवर्ग हाकून लावीत आहे, तर ब्रिटनमधील फॅसिस्टसुद्धा – जेथे राज्याच्या मूर्धन्स्थानी अनेक ज्यू आहेत व त्या भूमीच्या उमरावमवर्गात ज्यांचा स्वीकार झाला आहे – ज्यूविरोधी लाजिरवाण्या विचारप्रणालीचा प्रचार करू लागले आहेत.

विविध राष्ट्रांचे भांडवलदार आणखी एका जागतिक युद्धाची जोराने तयारी करीत आहेत. कामगारांच्या आणि शेतकऱ्यांच्या श्रमाचे अधिक व्यापकपणे व सोयीस्करपणे शोषण करता यावे म्हणून जगाची फेरविभागणी करण्यास ते उत्सुक आहेत. मोठ्या देशांच्या पोलादी पंजांमध्ये सापडण्याचा धोका छोट्या देशांना परत एकदा निर्माण झाला आहे. स्वतःच्या संस्कृतीचा मुक्तपणे विकास करण्याचा छोट्या देशांचा हक्क गमावला जाण्याची परत धास्ती निर्माण झाली आहे.

भिन्न भाषांच्या आणि वंशांच्या कामगारवर्गामध्ये राष्ट्रीय तेढ, वांशिक मग्रूरता आणि तिरस्कार ह्यांची दुष्ट बीजे साम्राज्यवाद व फॅसिझम पेरीत आहेत. त्यांचे वांशिक द्वेषात रूपांतर घडू शकेल व त्यामुळे कष्टकऱ्यांच्या जगतात त्यांच्या वर्गीय हितसंबंधांच्या ऐक्यजाणीवेच्या विकासात अडथळा येण्याची शक्यता आहे. ती तारक ऐक्यजाणीवच केवळ विचारहीन दुकानदा-रांच्या संरक्षणहीन व दलित गुलामी अवस्थेतून जगातील कामगारांची आणि शेतकऱ्यांची मुक्तता करू शकेल. त्या दुकानदारांमधील राष्ट्रीय व्यापारी व औद्योगिक वैमनस्य सहजरीत्या वांशिक शत्रुत्वात आणि वांशिक युद्धांमध्ये

परिणत होऊ शकेल व एव्हाना तसेच घडू लागले आहे. आज ते ज्यूविरोधाचा प्रचार करीत आहेत आणि एव्हाना अधमपणे त्याची प्रत्यक्ष अंमलबजावणी करीत आहेत. उद्या ते स्लावविरोधी प्रचाराकडे परत वळतील; मॉमसेन, त्रेयचके[337] व इतरांच्या स्लावांबद्दलच्या लज्जास्पद मतांची आठवण करून देतील आणि पोल व चेक लोकांनी जर्मन संस्कृतीला किती गुणी माणसे उपलब्ध करून दिली हे विसरतील. युरोपातील सर्व कारखानदार व दुकानदार एकाच प्रकारच्या वस्तूंचे उत्पादन आणि व्यापार करीत असल्यामुळे जर्मन वंशाची रोमन तसेच आंग्ल-सॅक्सन वंशाविरुद्ध युद्धे घडणे अगदी स्वाभाविक आहे. अर्थात तेथे सख्ये घडतात, पण जर विक्री करणे भाग असेल, तर विश्वासघात का करू नये? उदाहरणार्थ, ब्रिटनचे जपानशी सख्य आहे, पण जपानी लंडनमध्ये रेशमी पायमोजे तीन पेन्स जोडी विकतात. अर्थात ही छोटी बाब आहे, पण पिवळ्या वंशाबद्दल वैर आणि द्वेष वाढायला जपानी "स्वस्त माल" पुरेसे कारण आहे. जपानी साम्राज्यवादी मांचूरियात, चीनमध्ये, जे काही निर्भयपणे करीत आहेत ते युरोपातील साम्राज्यवाद्यांना मोह घालणारे आहे.

वांशिक विचारप्रणाली हे मरणोन्मुख भांडवलशाहीचे शेवटचे "सैद्धांतिक" राखीव पान आहे, पण तिचा दुर्गंधी उच्छ्वास भक्कम मनाच्या लोकांनाही विषबाधा करण्यास समर्थ आहे, कारण निःशस्त्र हिंदूंना, चिन्यांना आणि निग्रोंना नखशिखांत शस्त्रसज्ज युरोपीय गोरे गुलाम करीत असलेले प्रदीर्घ काळ पाहिल्यामुळे एकूण लोक भ्रष्ट बनलेले आहेत.

आपल्या वर्गबंधूंना राक्षसीरीत्या बेधडक लुटताना पाहण्याच्या विश्वासघातकी विषाला प्रतिकार करण्यास फक्त संयुक्त आघाडीत दाखल झालेले क्रांतिकारक कामगारवर्गीय समर्थ आहेत.

मार्क्सवादी-लेनिनवादी विचारप्रणालीमध्ये शिक्षित झालेल्या ह्या कामगारवर्गाने जगाला दाखवून दिले आहे की, त्याच्या बहुराष्ट्रिक भूमीत सर्व टोळ्यांना आणि वंशांना जगण्याचा, श्रम करण्याचा आणि स्वतःच्या संस्कृतीचा विकास घडविण्याचा समान हक्क आहे. ज्यांना पूर्वी स्वतःची लिपी नव्हती अशा अर्धरानटी माणसांसाठी, निरक्षरांसाठी, रशियन कामगाराने ज्ञानाचा रुंद दरवाजा उघडा केला आहे.

सोविएत संघातील लोकांच्या सांस्कृतिक वाढीची वेगवानता सर्व देशांमधील नेक स्त्री-पुरुषांनी मान्य केली आहे. एखाद्याला वाटेल की, ही

वस्तुस्थिती मान्य केल्यानंतर, नेक स्त्री-पुरुष अगदी सोपा, नैतिकदृष्टचा स्वच्छ असा निष्कर्ष त्यापासून काढतील : आत्मनिष्ठरीत्या आणि वस्तुनिष्ठरीत्या, सामाजिक रोगांनी मरणांतिक पछाडलेल्या व हमखास नष्ट होऊ घातलेल्या माध्यमापेक्षा निकोप माध्यमात राहणे खूप उपयुक्त, खूप प्रामाणिकपणाचे आहे. कामगारवर्ग सामाजिक सृजनशीलतेस समर्थ आहे असे मान्य केल्यानंतर, त्याच्या ज्ञानपिपासेला आणि गुणांच्या विकासाला हरप्रकारे उत्तेजन देणे व १७ कोटी लोकसंख्येच्या देशात एव्हाना आपले ऐतिहासिक कार्य सुरू केलेल्या कामगारवर्गीय समूहामध्ये त्याच्या ऐतिहासिक कार्याच्या जाणीवेच्या विकासाला उत्तेजन देणे फार फार उपयुक्त आहे. दुकानदारांच्या संस्कृती-नकारामुळे, मानवांचा संहार करण्याच्या हेतूने आखलेल्या युद्धाच्या तंत्रशास्त्राव्यतिरिक्त सर्व तंत्रशास्त्रांच्या वृद्धीला विरोध करण्याच्या दुकानदारांच्या मोहीमेमुळे, संस्कृतीच्या प्रभूंची, "मानवतावाद्यांची", प्रतिष्ठेची भावना विलक्षण दुखावली असली पाहिजे असे एखाद्याला वाटेल. पण फॅसिझमने अमान्य केलेली पुस्तके जाळल्यामुळे, राष्ट्रवादी आणि वंशवादी विचारप्रणालींमध्ये अनुस्यूत असलेल्या द्वेषाचा पुरस्कार केल्यामुळे, नव्या आणि भयानक युद्धाच्या पूर्वतयारींमुळे, भांडवलदारी संस्कृतीचे प्रभू दुखावल्याचे आढळत नाही. कोटचवधी अत्यंत निकोप व्यक्तींना निरर्थकपणे नष्ट करण्यासाठी, शतकानुशतकांची सांस्कृतिक भांडारे आगीने पुन्हा नष्ट करण्यासाठी, शहरे जमीनदोस्त करण्यासाठी आणि ज्यांनी गिरण्या व कारखाने उभारले, शेते नांगरली, पूल आणि रस्ते बांधले, त्या जनसमूहांच्या खडतर श्रमांमधून निर्माण झालेल्या वस्तू नष्ट करण्यासाठी नव्या युद्धाची पूर्वतयारी चालली आहे. लुटारूंचा पिसाटपणा भाषणबाजीने शमविता येत नाही. वाघ आणि तरसे पेस्ट्री खात नाहीत.

"मानवतावादी" खरोखर मानवजातीवर प्रेम करण्यास समर्थ आहेत असे आढळत नाही, त्याचप्रमाणे आपल्या युगातील सर्वोच्च व शौर्यशाली नाटचाची त्यांना जाणीव नाही अथवा त्या नाटचातील नायक नेमके कोण ह्याचा त्यांना पत्ता नाही. अशी वेळ येत आहे जेव्हा क्रांतिकारक कामगारवर्ग एखाद्या हत्तीप्रमाणे दुकानदारांच्या पिसाट आणि प्रक्षोभक वारूळावर पाय ठेवील व त्याला मातीत गाडून टाकील. हे घडणे अपरिहार्य आहे. विशिष्ट नगण्य अल्पसंख्य सृजनशीलरीत्या जराग्रस्त बनले आहेत व जीवनाबद्दलच्या त्यांना वाटणाऱ्या धास्तीमुळे आणि संपत्तीबद्दल वाटणाऱ्या विकृत व कधीही

बऱ्या न होणाऱ्या लालसेमुळे त्यांना भ्रष्टतेची बाधा होऊन ते ऱ्हासाला लागले आहेत, एवढ्यासाठी मानवजात स्वतःला नष्ट होऊ देणार नाही. ह्या अल्पसंख्यांचा नाश करणे न्यायाची सर्वोच्च कृती ठरेल आणि कामगार-वर्गाने ही कृती करावी अशी इतिहास आज्ञा करीत आहे. ह्या महान कृतीनंतर जगातील लोक सार्वत्रिक सुसंवादाने आणि बांधिलकीने नव्या जीवनाच्या मुक्त आणि शोभिवंत उभारणीच्या कामाला आरंभ करतील.

ही केवळ श्रद्धा आहे का? श्रद्धा आणि ज्ञान खोटेपणा व सत्य ह्यांच्या-एवढेच अपायकारक असण्याचा काळ कामगारवर्गाच्या दृष्टीने उलटून गेला आहे. जेथे कामगारवर्ग सत्ता गाजवितो आणि त्याच्या बलाढ्य हातामधून प्रत्येक गोष्ट निर्माण होते, तेथे ज्ञान व श्रद्धा यांच्यामधील कलहाला वाव नाही. तेथे श्रद्धा म्हणजे माणसाच्या स्वतःच्या तर्कशक्तीच्या ज्ञानाची निर्मिती आहे.

१९३४

# ‘आई’ कादंबरीच्या फ्रेंच आवृत्तीला प्रस्तावना[338]

प्रकाशकहो !

पुस्तकाच्या नव्या फ्रेंच आवृत्तीला मी चार ओळी लिहाव्यात असे माझ्या साथींनी मला सुचविले. हे काम सोपे नाही. स्वतःच्या पुस्तकांमधील उणीवांची उत्तम जाणीव असलेल्या लेखकांपैकी मी एक आहे. ह्या पुस्तकामध्ये उणीवा राहण्याचे कारण म्हणजे त्याचे लेखन जेव्हा मी करीत होतो, तेव्हा एकतंत्री राजवटीविरुद्ध आणि भांडवलदारवर्गाविरुद्ध रशियन कामगारवर्गाची पहिली लढाई अद्याप चालू होती. अमेरिकेत असतानाच घाईघाईने मी ह्या पुस्तकाचे लेखन करीत होतो[339] आणि आवश्यक त्या सामग्रीचा माझ्यापाशी अभाव होता. तो काळ उलटून आता अठ्ठावीस वर्षे झाली. ह्या सर्व वर्षांमध्ये कमगारवर्ग ‘आई’चे वाचन करीत होता आणि कामगारवर्गाच्या क्रांतिकारक वर्गजाणीवेच्या विकासाला कादंबरी उपयुक्त ठरण्यास कदाचित तिच्यामधील उणीवांनी प्रतिबंध केला नाही.[340] आणि अशा वर्गजाणीवेचा विकास इतिहासाच्या कठोर तर्कशास्त्राची मुख्य व अत्यंत महत्त्वाची मागणी असतो. जेव्हा फ्रेंच आणि जागतिक कामगारवर्गाला मरणोन्मुख भांडवलशाहीचे तिरस्करणीय आचके अधिकाधिक स्पष्टपणे दिसू लागले आहेत, अशा काळात पुस्तकाची नवी आवृत्ती प्रकाशात येत आहे; जेव्हा सोशल-डेमोक्रॅट पुढाऱ्यांच्या मदतीने जर्मन भांडवलदारांतर्फे करण्यात आलेल्या दुष्ट गुन्ह्याची सर्व देशांमध्ये पुनरावृत्ती करण्याची धमकी फॅसिझम देत आहे – कामगारवर्गविरोधी निर्दय लढ्यातील भांडवलदारांचा अखेरचा प्रयत्न – अशा काळात पुस्तकाची नवी आवृत्ती प्रकाशित होत आहे; जेव्हा दुसऱ्या इंटरनॅशनलने पुन्हा एकदा दुष्टपणे भांडवलदारांबरोबरचा स्वतःचा “भावनिक” दुवा प्रकट केला आहे आणि कामगारवर्गासमोर स्वतःचा भेकडपणा दाखविला आहे, अशा काळात पुस्तकाची नवी आवृत्ती उजेडात येत आहे; जेव्हा दशलक्षावधी कामगारांच्या आणि शेतकऱ्यांच्या नव्या संहाराची भांडवलदार

तातडीने योजना करीत आहेत, अशा काळात पुस्तकाची नवी आवृत्ती प्रसिद्ध होत आहे.

अलिकडेच ऑस्ट्रिया आणि हॉलंडमध्ये कामगारवर्गाच्या सुरेख लढायांना तोंड फुटले; स्पेनमधील खाण-कामगारांचा शूर संघर्ष चालू आहे. लाल सेना चँग कै-शेकच्या दरोडेखोरांविरुद्ध अथक झुंज देत आहे. कामगारवर्गाचे खूप रक्त सांडत आहे;[311] पण त्याच्या अंशतः पराभवांमधून आणि विजयांमधूनही अधिक स्पष्टपणे सूचित होत आहे की, त्याची प्रचंड वाढ होत आहे, जागतिक लढाईची तो तयारी करीत आहे आणि शत्रूवर अंतिम विजय मिळविण्याचा त्याचा इरादा आहे. कामकरी समूहांच्या आरोग्यवर्धनाच्या ह्या महान आणि गंभीर दिवसांमध्ये, सत्ता आणि हुकूमशाही प्रस्थापित करण्यासाठी कामगारवर्गाने चालविलेल्या लढ्याच्या ह्या दिवसांमध्ये, प्रामाणिक क्रांतिकारक लेखकांनी क्रांतिकारक वर्गजाणीवेच्या विकासकार्यात स्वतःला पूर्ण वाहून घेतले पाहिजे; जागतिक भांडवलदारांविरुद्ध जागतिक कामगारवर्गाची संयुक्त आघाडी उभारण्याच्या कार्याला वाहून घेतले पाहिजे; क्रांतिकारक कामगारवर्गाला नष्ट करण्याचे गुप्त उद्दिष्ट बाळगणाऱ्या युद्धाविरोधी लढण्याच्या कार्याला वाहून घेतले पाहिजे; भांडवलदारांच्या क्षुद्रपणाला, भ्रष्टतेला आणि गुन्हेगारी प्रवृत्तीला कठोरपणे उघडकीस आणण्याच्या कार्याला वाहून घेतले पाहिजे. भांडवलदारवर्ग अत्यंत निर्दयपणे कामगारांचा नाश करीत आहे, तेव्हा भांडवलदारांविरोधीचे कामगारांचे विचार आणि कार्य त्याहून दसपटीने निर्दय असले पाहिजेत.

वाचकांना, हजार वर्षांच्या नैतिक आणि शारीरिक भांडवलदारी गुलामीतून कामगारवर्गाला संपूर्ण मुक्त करू पाहणाऱ्या लढवय्यांना, अत्यंत प्रेमपूर्वक शुभेच्छा मी पाठवीत आहे.

# टीपा

प्रस्तुत संग्रहात समाविष्ट केलेला मजकूर पुढील आवृत्तीनुसार आहे: मा. गोर्की – ३० खंडांमधील संकलित साहित्य. 'खुदोझेस्त्वेन्नाया लितेरातूरा' प्रकाशन, मॉस्को, १९४९-१९५६.

पान – २१

[1] **'आ. चेखोव'** – 'नीझ्नेगरोदस्कीय स्बोर्निक' ('नीझ्नीगोरदचा संग्रह'), 'तवारीश्चेस्त्वा' ('साथी') प्रकाशन, सेंट पीटरबुर्ग, १९०५.

१९०४ मध्ये लेखन. १९१४ साली गोर्कींनी चेखोव यांच्याबद्दलच्या अनेक नव्या आठवणी लिहून काढल्या. १९२३ मध्ये त्यांनी दोन्ही भाग एकत्र केले आणि एकच पुस्तक म्हणून प्रकाशनासाठी तयार केले. किंचित संक्षेप करून स्मृतिचित्रे प्रकाशित झाली आहेत.

पान – २७

[2] ग्रीस आणि तुर्कस्तान यांच्यामधील १८९७ च्या युद्धाचा संदर्भ आहे.

पान – ३७

[3] हा पहिल्या महायुद्धाचा संदर्भ आहे (१९१४-१९१८).

[4] १९०४ मध्ये रशिया व जपान यांच्यात युद्ध पेटले.

पान – ३८

[5] **सुवोरीन अलेक्सेई** (१८३४-१९१२) – रशियन पत्रकार, प्रचारक आणि 'नोवोये व्रेम्या' ('नवा काळ') ह्या प्रतिगामी वृत्तपत्राचे (१८६८ पासून ऑक्टोबर १९१७ पर्यंत प्रकाशित होत राहिले) प्रकाशक.

[6] **लंडन जॅक** (१८७६-१९१६) – अमेरिकन लेखक; त्यांनी आपल्या लेखनात उत्तरेकडील कठोर निसर्गामधील काव्य, धैर्याचा रोमांचवाद यांचा

समृद्धीसाठी सोसण्यात येणाऱ्या कष्टदायी शारीरिक व मानसिक यातनांच्या वर्णनांशी मेळ घातला होता.

पान – ३९

[7] **वासिली बूस्लायेव** – रशियन लोककाव्यांचा नायक (१४-१५ वी शतके).

पान – ४०

[8] **डार्विन चार्ल्स** (१८०९-१८८२) – इंग्लिश प्राणीशास्त्रज्ञ, डार्विनवादाचे संस्थापक; जीवसृष्टीच्या उत्क्रांतीचे मुख्य घटक उघडकीस आणले, माणूस माकडापासून निर्माण झाला असा सिद्धांत मांडला.

पान – ४१

[9] **मोरोझोव साव्वा** (१८६२-१९०५) – रशियन भांडवलदार घराण्यात जन्म. गोर्कींचा स्नेही, मॉस्को आर्ट थिएटरचा आश्रयदाता; क्रांतिकारकांबद्दल सहानुभूती व त्यांना मदत.

पान – ४२

[10] **सूलेरझित्स्की लेओपोल्द** (१८७२-१९१६) – रशियन सार्वजनिक पुढारी आणि नाटयक्षेत्रातील निर्माता; ल्येव तल्स्तोय, आ. चेखोव, मा. गोर्की यांचे निकटवर्ती.

पान – ४५

[11] **'बाल्झाक'** – नियतकालिक 'ला रेव्ह्यू', पॅरिस, १९११, क्र. १४, जुलै १५; रशियन भाषेत – 'मलादाया ग्वार्दिया' ('तरुण रक्षक') नियतकालिक, १९२७, क्र. १, जानेवारी.

[12] **गोन्कूर एदमोन** (१८२२-१८९६) आणि **ज्यूल** (१८३०-१८७०) – फ्रेंच लेखक; बंधू; एदमोन गोन्कूर यांच्या मृत्युपत्रानुसार १८९६ साली गोन्कूर अकादमी स्थापन करण्यात आली व कादंबरीलेखनात असाधारण

कामगिरी बजावणाऱ्या लेखकांना दरसाल तिच्यातर्फे गोन्कूर पारितोषिक देण्यास आरंभ झाला.

[13] **द्यूमाँ अलेक्सान्द्र** (द्यूमाँ-पिता) (१८०३-१८७०)–फ्रेंच लेखक, 'सरदार मोन्ते क्रिस्तो,' 'तीन शिलेदार' ह्या विख्यात ऐतिहासिक कादंबऱ्यांचे लेखक.

[14] **गाबोरिआँ एमिल** (१८३२-१८७३)–फ्रेंच कादंबरीकार, गुप्तहेर लेखनशैलीचे एक संस्थापक, 'लेरुझेची भानगड', 'पॅरिसचे गुलाम' ह्या कादंबऱ्यांचे लेखक.

पान – ४७

[15] **ह्यूगो विक्तर मारी** (१८०२-१८८५)–फ्रेंच लेखक, फ्रेंच रोमांचवाद्यांच्या लोकशाहीवादी आघाडीचे पुढारी. 'पॅरिसचे नोत्र-दाम', 'दीन-दु:खी' इ. कादंबऱ्यांचे लेखक. ह्यूगो ह्यांच्या सृजनशील कार्यातील सामाजिक आशयांचे १९ व्या शतकातील रशियन पुरोगामी लेखकांना फार मोल वाटत होते.

[16] **फ्लॉबेर ग्यूस्ताव** (१८२१-१८८०)–फ्रेंच कादंबरीलेखक, बुद्धिमान शैलीकार. 'मादाम बोव्हरी' आणि 'भावनांचे संगोपन' ह्या कादंबऱ्यांमध्ये त्यांनी भांडवलदारांच्या जीवनपद्धतीचे आणि नैतिक अध:पतनाचे चित्रण केले. बाल्झाकच्या वास्तववादी परंपरा त्यांनी पुढे चालू ठेवल्या आणि जागतिक साहित्यातील वास्तववादाच्या विकासाला मदत केली.

[17] **स्तेन्दाल** (बेइल, हेन्री मारी) (१७८३-१८४२)–फ्रेंच कादंबरीकार; मानसशास्त्रीय विश्लेषणात आणि सामाजिक विसंगतींचे वास्तववादी चित्रण करण्यात कुशल ('लाल आणि काळे', 'पार्मचा रहिवासी' इ.)

[18] **मोपासाँ गी दे** (१८५०-१८९३)–फ्रेंच लेखक; भांडवलदार-विरोधी दृष्टिकोनाबद्दल आणि तीक्ष्ण सामाजिक विश्लेषणाबद्दल त्यांची पुस्तके प्रसिद्ध आहेत ('प्रिय मित्र', 'जीवन', 'पियर आणि जान' इ.)

[19] **डिकन्स चार्ल्स** (१८१२-१८७०)– इंग्लिश कादंबरीकार; प्रत्यक्ष सामाजिक आशयांसह आणि कार्यांसह साहस-कादंबऱ्यांचे लेखन; भांडवला-च्या हानीकारक आशयाचे वास्तववादी चित्रण ('पिकविक क्लबाचे मरणोत्तर दस्तऐवज', 'ऑलीव्हर ट्विस्टची साहसे', 'दोम्बी आणि पुत्र', इ.)

[20] **थॅकरे विल्यम मेकपीस** (१८११-१८६३) – इंग्लिश कादंबरीकार; भांडवलदारी समाजाच्या विशिष्ट सामाजिक दुर्गुणांचे भडक चित्रण; ऐतिहा-सिक कादंबऱ्यांचे लेखक ('दिमाखी दुनिया', 'व्हर्जिनियावाले', इ.).

पान – ४८

[21] **''कामगारवर्गीय लेखकांच्या संग्रहा'ला प्रस्तावना'** – 'स्बोर्निक प्रोलेतार-स्कीख पिसातेलेय' ('कामगारवर्गीय लेखकांचा संग्रह'), 'प्रीबोय' ('भर-तीची लाट') प्रकाशन, पेत्रोग्राद, १९१४. किंचित संक्षिप्त प्रकाशन.

पान – ५४

[22] **'रशियन कला'** – नियतकालिक 'पूत अस्वाबोझ्देनिया' ('मुक्तीचा मार्ग'), १९१७, क्र. १, जुलै १५. लेख संक्षिप्त केला आहे.

[23] **पूष्कीन अलेक्सान्द्र** (१७९९-१८३७)– रशियन लेखक, नव्या रशियन साहित्याचे संस्थापक, रशियन साहित्यिक भाषेचे जनक; १९ व्या शतका-तील रशियन साहित्यामधील अनेक मुख्य समस्यांना सर्वप्रथम वाचा फोडली; त्यांची कविता म्हणजे रशियन आणि जागतिक साहित्यांमधील कलात्मक सुसंवाद व परिपूर्णतेचे सर्वोत्तम उदाहरण ('येवगेनी अनेगिन', 'इस्पिकची राणी', 'बेल्कीनच्या कथा' इ.).

[24] **ग्लीन्का मिखाईल** (१८०४-१८५७)– रशियन संगीतरचनाकार, रशियन अभिजात संगीताचे संस्थापक; रशियन ऑपेराचे आणि स्वरमेळ-वादाचे मूलाधार घालून दिले.

[25] **ब्र्यूल्लोव कार्ल** (१७९९-१८५२) – रशियन चित्रकार आणि रंगारी; रशियन अभिजात कलेत रोमांचवादी आणि जीवनाशी निकट प्रवाह आणला.

[26] **गोगोल निकोलाय** (१८०९-१८५२)–रशियन लेखक; रशियन साहित्यात टीकात्मक वास्तववादाचा विकास घडविण्यात, उपरोधिक शैली घडविण्यात आणि मानवतावादी व लोकशाही तत्त्वांची प्रस्थापना करण्यात भरीव कामगिरी बजावली. ('अंमलदार', 'मृतात्मे', इ.).

[27] **लेर्मोन्तोव मिखाईल** (१८१४-१८४१) – रशियन कवी; त्यांच्या कवितांमध्ये सामाजिक, तत्त्वज्ञानविषयक आणि गहिरे वैयक्तिक उद्देश निकटतेने गुंफलेले आहेत; शौर्यशाली विचार, तीव्र शक्ती आणि वैशिष्ट्य-पूर्ण नादमधुरता असलेले पद्य त्यांनी रशियन काव्यप्रांतात प्रथम आणले ('आत्मा', 'भविष्यवेत्ता', 'बोरोदिनो', 'कवी'); सखोल सामाजिक आणि मानसशास्त्रीय आशयांनी भरलेली 'आपल्या काळाचा नायक' ही त्यांची कादंबरी लेर्मोन्तोव यांच्या वास्तववादाची सर्वोच्च शिखर ठरली आहे.

[28] **तुर्गेनेव इवान** (१८१८-१८८३) – रशियन लेखक; श्रेष्ठ वास्तव-वादी, मानसशास्त्रीय विश्लेषणाचे आणि निसर्गदृश्यांच्या भावमधुर वर्णनांचे कसबी लेखक; रशियन आणि जागतिक साहित्यांच्या विकासात भरीव कामगिरी ('शिकाऱ्याची टिपणे', 'वेधकाळी', 'पिता-पुत्र', इ.).

[29] **क्रामस्कोय इवान** (१८३७-१८८७) – रशियन चित्रकार; लोकशाही वास्तववादी कलेची तत्त्वे स्थापण्याचा प्रयत्न; फिरत्या कला-प्रदर्शनांच्या संघाचे एक संस्थापक.

[30] **रेपिन इल्या** (१८४४-१९३०) – रशियन चित्रकार, वास्तववादी; लोकांची दडपणूक उघडकीला आणली, लोकांचे प्रचंड बळ दाखवले, क्रांति-कारी चळवळ दाखवली, लोकांच्या स्वातंत्र्यप्रेमाचा गौरव केला.

[31] **मूसोर्गस्की मोदेस्त** (१८३९-१८८१)– रशियन संगीतरचनाकार; लोक-संगीत नाटकांचे जनक; लोकांच्या जीवनातील सामाजिक विषयांचा गाण्यांमधून परामर्श घेतला.

[32] **लेस्कोव निकोलाय** (१८३१-१८९५)– रशियन कादंबरीकार; थोर

भाषाप्रभू आणि कसबी निवेदनशैली ('मंत्रमुग्ध भटक्या', 'डावखुरी', 'अडलेला चित्रकार', इ.).

[33] **चैकोवस्की प्योत्र** (१८४०-१८९३)– रशियन संगीतकार; फार मोठा स्वरमेळकार, संगीत नाटककार आणि भावकवी; श्रेष्ठ ऑपेरा, बॅले, स्वरमेळ आणि चेंबर संगीताचे जनक.

[34] **अस्त्रोवस्की अलेक्सान्द्र** (१८२३-१८८६) – रशियन नाटककार; रशियन वास्तववादी रंगभूमीच्या निर्मितीत महत्त्वाची कामगिरी ('मेघ-गर्जना', 'सोप्या मिळकती', 'अरण्य', इ.).

पान – ५५

[35] **कोरोलेन्को व्लादीमिर** (१८५३-१९२१)– रशियन लेखक आणि पत्रकार; लोकशाहीवादी आणि मानवतावादी विचारांनी त्यांच्या कथा व लघुकादंबऱ्या भरलेल्या आहेत ('मकारचे स्वप्न', 'आंधळा वादक', इ.).

[36] "**नरोदनिक**" – नरोदनिचेस्त्वो – उमराव घराण्यात न जन्मलेल्या रशियन बुद्धिजीवींची विचारप्रणाली आणि चळवळ (१८६१-१८९५). शेतकऱ्यांच्या हिताची त्यांनी तरफदारी केली, रशियाच्या भांडवलवादी विकासाला विरोध केला, किसानक्रांतीमार्फत एकतंत्री राजवट उलथून टाकण्याचा प्रयत्न केला.

[37] **पेरेद्विझनिकी** (फिरस्ते) – लोकशाही विचारांनी एकत्र आलेले चित्रकार-वास्तववादी. फिरत्या कला-प्रदर्शन संघाच्या कार्यात (स्थापना १८७०) भाग घेत.

[38] "**कूचकिस्त**" – "मागूचाया कूचका" ("बलाढ्य कंपू") ह्या संघटनेचे सदस्य; रशियन संगीतकारांची कला-संघटना (१८६२ ते १९ व्या शतकाच्या आठव्या दशकाच्या मध्यापर्यंत); ग्लीन्का यांच्या परंपरांचा आधार घेऊन, संगीतामध्ये राष्ट्रीय शैली, लोकवाद, विचारवाद आणि वास्तववाद प्रस्थापित करण्यासाठी त्यांनी लढा दिला.

पान – ५६

[39] **'तल्स्तोय ल्येव'** – वर्तमानपत्र 'झीझ्न ईस्कूस्त्वा' ('कला-जीवन') १९१९, क्र. २४१, सप्टें. १३; क्र. २४२, सप्टें. १४; क्र. २७३, ऑक्टो. २१; क्र. २७४, ऑक्टो. २२; क्र. २७५, ऑक्टो. २३, (उतारे). गोर्की यांच्या 'आठवणी' पुस्तकात पूर्ण स्वरूपात प्रसिद्ध; 'क्नीगा' ('पुस्तक') प्रकाशन, १९२३.

प्रकाशनासाठी हे साहित्य तयार करत असताना गोर्की यांनी व्ला. कोरोलेन्को यांना नोव्हेंबर १९१० मध्ये लिहिलेले पत्र जोडले. यास्नाया पल्यानाहून तल्स्तोय यांचे प्रयाण व नंतरचा त्यांचा मृत्यू, ह्या संदर्भात हे पत्र होते. हे पत्र अपुरे राहिले होते व टपालाने पाठविले नव्हते.

तल्स्तोय यांच्याबद्दलच्या आठवणी प्रथम स्वतंत्र पुस्तकरूपाने प्रसिद्ध होताच, लेखकाच्या शिफारसीनुसार, लेनिन यांनी तात्काळ ते वाचून काढले. लेख संक्षेपरूपाने प्रसिद्ध केला आहे.

पान – ५७

[40] **विंची लेनार्दो दा** (१४५२-१५१९) – इटलीचे चित्रकार, शिल्पकार, वास्तुशिल्पज्ञ, शास्त्रज्ञ आणि अभियंते; कलात्मक भाषेची नवी साधने तयार केली, उच्च पुनरुत्थानाच्या मानवतावादी आदर्शांशी अनुरूप अशी मानवाची प्रतिमा निर्माण केली.

पान – ५८

[41] **क्रापोत्कीन प्योत्र** (१८४२-१९२१) – रशियन क्रांतिकारक, अराजकवादाचे सैद्धांतिक, भूगोलतज्ज्ञ आणि भूगर्भशास्त्रज्ञ.

पान – ५९

[42] **अँडरसन हान्स ख्रिश्चन** (१८०५-१८७५) – डेन्मार्कचे कादंबरीकार आणि कथालेखक; रोमांचवाद आणि वास्तववाद, कल्पनारम्यता आणि विनोद, उपहास आणि उपरोध यांचा मेळ घातलेल्या परीकथांमुळे जगभर प्रसिद्धी लाभली.

[43] **वोवचोक मार्को** .(खरे नांव – मारीया विलीन्स्काया-मार्कोविच, १८३३-१९०७) – युक्रेनी आणि रशियन क्रांतिकारक-लोकशाहीवादी लेखिका.

तिच्या सृजनशील लेखनातून दलित किसानवर्गाबद्दलची अनुकंपा व्यक्त होते ('युक्रेनी लोककथा' इ.).

पान – ६१

[44] **प्रशियाचा फ्रेडरिक** – दुसरा महान फ्रेडरिक (१७१२-१७८६) – प्रशियाचा राजा (१७४०-१७८६). त्याच्या आक्रमक धोरणामुळे प्रशियाचा राज्यविस्तार जवळजवळ दुपटीने वाढला.

[45] **गोएथे योहान वोल्फगांग** (१७४९-१८३२) – जर्मन लेखक; नव्या काळातील जर्मन साहित्याचे संस्थापक, तत्त्वचिंतक आणि निसर्गवादी; त्यांच्या लेखनातून त्या युगाच्या सर्व मुख्य प्रवृत्तींचे आणि विसंगतींचे दर्शन घडते. अंतिम तत्त्वज्ञानविषयक लेखनातून, 'फाऊस्ट' ह्या शोकांतिकेतून, गोएथे ह्यांनी जीवनाचा अर्थ शोधून काढला – कृतिशीलता.

[46] **बालमोन्त कॉन्स्तन्तिन** (१८६७-१९४२) – रशियन कवी-प्रतीकवादी; त्यांच्या कविता व्यक्तिवादाच्या विषयांनी भरलेल्या आहेत, काहीवेळा बढाईखोर (संग्रह 'जळत्या इमारती', 'सूर्यासारखे होऊ').

[47] **फेत अफनासी** (खरे आडनांव – शेन्शीन, १८२०-१८९२) – रशियन कवी; "विशुद्ध कला" संकल्पनेचे सैद्धांतिक कैवारी; स्वतःच्या काव्यव्यवहारात निसर्गचित्रांचे, मानवी मनाच्या अल्पकालीन अवस्थांचे कुशल चित्रण.

पान – ६५

[48] **किटी** – तल्स्तोय यांच्या 'आन्ना करेनिना' कादंबरीची नायिका.

[49] **नताशा रोस्तोवा** – तल्स्तोय यांच्या 'युद्ध आणि शांतता' कादंबरीची नायिका.

[50] **रूस्सो ज्याँ जॅक** (१७१२-१७७८) – फ्रेंच लेखक आणि तत्त्वज्ञ; खाजगी मालमत्ता सामाजिक विषमतेस कारणीभूत आहे असे दाखवून दिले. युरोपीय पुरोगामी सामाजिक विचारावर, तत्त्वज्ञानावर आणि साहित्यावर

प्रभाव पाडला. भावनाप्रधानतावादाचे प्रतिनिधी असलेल्या रूस्सो यांनी आपल्या लेखनाद्वारे ('ज्यूली अथवा नवी एलायझा', 'कबुली-जबाब') १९ व्या शतकातील युरोपीय साहित्यात मानसशास्त्रवाद स्थापण्यास मदत केली.

[51] **येल्पात्येवस्की सेर्गेई** (१८५४-१९३३) – रशियन लेखक, क्रांति-चळवळीत भाग; आत्मचरित्रात्मक 'गतकाळच्या कथा,' आठवणी – '५० वर्षांच्या आठवणी.'

[52] **इब्सेन हेन्रिक** (१८२८-१९०६)– नॉर्वेचे नाटककार आणि कवी; त्यांच्या वास्तववादी लेखनाचा जागतिक नाट्यलेखनावर आणि रंगभूमीवर फार प्रभाव पडला. 'ब्रान्द' आणि 'पेर ग्यून्त' ह्या तत्त्वज्ञानपर-प्रतीकात्मक नाट्यकाव्यांचे स्वरूप भांडवलदारविरोधी आहे.

[53] **रोझानोव वासिली** (१८५६-१९१९)– रशियन लेखक, पत्रकार आणि तत्त्वज्ञ; ख्रिश्चन वैराग्यवादावर टीका करून धार्मिक-अस्तित्ववादी विचारसरणी सादर केली. नि. गोगोल आणि फ्यो. दस्तोयेवस्की यांच्यावरील साहित्यिक निबंधांचे लेखक.

पान – ६७

[54] **तल्स्तोय ल्येव** (१८६९-१९४५)– रशियन साहित्यिक, शिल्पकार, जगविख्यात लेखक ल्येव तल्स्तोय यांचे पुत्र.

[55] **तल्स्ताया सोफीया** (१८४४-१९१९)– ल्येव तल्स्तोय यांची पत्नी.

पान – ७०

[56] **हॉफमान्न एर्न्स्ट तेओदोर अमादेय** (१७७६-१८२२) – जर्मन लेखक, संगीतकार आणि चित्रकार; रोमांचवादी संगीतमय सौंदर्यशास्त्राचे आणि टीकेचे एक संस्थापक. वास्तवतेचा टीकात्मक दृष्टिकोन, जर्मन क्षुद्रप्रवृत्ती आणि सरंजामदारी अधिकारस्वातंत्र्याचा उपरोध, यांच्याशी नाजुक तात्त्विक उपहासाचा त्यांनी आपल्या लेखनात मेळ घातला ('सैतानाची किमया', 'मांजरी मूराच्या नजरेतून दिसणारे जग').

पान – ७२

[57] **प्लेवे व्याचेस्लाव** (१८४६-१९०४)– रशियाचे गृहमंत्री, राजकीय पोलीस खात्याचे मुख्य (१९०२-१९०४). अतिरेकी प्रतिगामी.

पान – ७३

[58] **आंद्रेयेव लेओनिद** (१८७१-१९१९) – रशियन लेखक; आरंभीचे लेखन लोकशाहीवादी आणि वास्तववादी स्वरूपाचे होते; नंतर त्यांच्या ऱ्हासाच्या प्रवृत्ती वाढल्या ('फाशी दिलेल्या सातजणांच्या कथा', 'आमच्या जीवनातील दिवस', 'बहिष्कृत').

पान – ७४

[59] **तेर्तल्लियन क्विंत सेप्तीमीय फ्लोरेन्स** (सुमारे १६० – नंतर २००) ख्रिस्ती धर्मशास्त्रज्ञ आणि लेखक. धर्माचे बळ विचाराशी विसंगत आहे असे मत होते. विशिष्ट गूढ भौतिकवाद तयार केला.

पान – ७५

[60] **तानेयेव सेर्गेइ** (१८५६-१९१५)– रशियन संगीतरचनाकार, पियानो-वादक, संगीत व सार्वजनिक क्षेत्रातील मान्यवर व्यक्ती.

[61] **शॉपेनहॉवर आर्थर** (१७८८-१८६०)– जर्मन तत्त्वज्ञ, असमंजसवादी, स्वेच्छावादाचे प्रतिनिधी; १९ व्या शतकाच्या उत्तरार्धात त्यांच्या निराशा-वादी तत्त्वज्ञानाचा युरोपभर प्रसार झाला.

पान – ७८

[62] **सोलोव्योव येवगेनी** (टोपणनांवे – स्क्रीबा, आंद्रेयेविच) (१८६६-१९०५) – रशियन साहित्य-समीक्षक, पत्रकार.

पान – ८०

[63] **शेस्तोव ल्येव** (खरे नांव – ल्येव श्वार्त्समान) (१८६६-१९३८) – रशियन तत्त्वज्ञ, असमंजसवादी आणि लेखक, अस्तित्ववादाचे प्रतिनिधी; फ्यो. दस्तोयेवस्की आणि फ्री. नीत्शे यांच्या विचारांना उचलून धरले; समंजसवादी तत्त्वज्ञानाशी वादविवाद घातला.

[64] **नीत्शे फ्रीड्रिख** (१८४४-१९००)—जर्मन तत्त्वज्ञ; असमंजसवादाचे आणि स्वेच्छावादाचे प्रतिनिधी, "जीवनविषयक तत्त्वज्ञाना"चे एक संस्थापक. नीत्शे यांच्या "अमानुष" शिकवणीत सामर्थ्यवान माणसाच्या ('सत्तेची इच्छा') व्यक्तिवादी संप्रदायाची "भविष्यकालीन मानवा"च्या रोमांचक आदर्शाशी सांगड घातलेली होती. फॅसिझमच्या सैद्धांतिकांनी त्याच्या शिकवणीमधील प्रतिगामी प्रवृत्तींचा वापर केला.

पान – ८३

[65] **आव्वाकूम** (१६२० किंवा १६२१-१६८२)—रशियन फूटपंथाचे पुढारी आणि सैद्धांतिक; उच्चपदस्थ धर्माधिकारी, लेखक. अधिकृत चर्चविरोधी बोलल्याबद्दल त्यांच्यावर खटला भरण्यात आला आणि हद्दपार करण्यात आले. झारच्या आज्ञेवरून वध करण्यात आला.

पान – ८५

[66] **'इलियड'**—प्राचीन ग्रीक महाकाव्य, होमर यांना त्याचे कर्तेपद देण्यात आले. ट्रोजन युद्धाच्या दंतकथांवर आधारलेले हे महाकाव्य ख्रि. पू. ९-८ व्या शतकांमध्ये अवतरले.

[67] **'बालपण', 'कुमारवय'**—ल्येव तल्स्तोय यांची पुस्तके.

पान – ८९

[68] **लाओ-त्से** (अथवा लाओ-त्सी, ख्रि. पू. ६-५ वी शतके.)—दंतकथांनुसार, प्राचीन चिनी तत्त्वज्ञ; 'लाओ-त्सी' ('दाओ दे त्झिन') ह्या प्रबंध ग्रंथाचे, दाओवादाच्या शास्त्रनियमांच्या ग्रंथाचे लेखक.

[69] **नेक्रासोव निकोलाय** (१८२१-१८७७/७८)—रशियन कवी; क्रांतिकारक लोकशाहीवादी दृष्टिकोनामधून लोकांच्या जीवनाचे वर्णन केले ('हिम-आजोबा, लाल नाक', 'रशियात छान कोण जगतो,' 'रशियन बायका'). लोककथांशी निगडित असलेल्या त्यांच्या लोकशाहीवादी कवितेने रशियन साहित्याच्या विकासात कामगिरी बजावली.

पान – ९०

[70] **उस्पेन्स्की ग्लेब** (१८४३-१९०२) – रशियन लेखक; शहरातील गरीबांच्या दारिद्र्याचे आणि दडपणुकीचे, ग्रामीण प्रदेशातील भांडवलदारी संबंधांच्या विकासाचे वास्तववादी चित्रण ('सर्वनाश'). सृजनशील लेखन लोकशाहीवादी, क्रांतिकारक-नरोदवादी विचारांनी भरलेले आहे.

[71] **कन्फ्यूशिय** (ख्रि. पू. सुमारे ५५१-४७९) – प्राचीन चिनी तत्त्वज्ञ; परंपरागत उमरावशाहीचे कैवारी. 'ल्यून यूई' ('संवाद आणि मते') पुस्तकात त्यांचे मुख्य विचार मांडण्यात आले आहेत.

[72] **फूरयेवादी** – शार्ल फूरये (१७७२-१८३७), ह्या फ्रेंच मनोराज्यवादी समाजवाद्याचे अनुयायी.

[73] **बूताशेविच** – पेत्राशेवस्की-बूताशेविच मिखाईल (१८२१-१८६६) – रशियन क्रांतिकारक, मनोराज्यवादी समाजवादी. रशियात राजकीय व्यवस्थेचे लोकशाहीकरण करावे आणि शेतकऱ्यांना मुक्त करावे, अशा विचारांचा पुरस्कार.

पान – ९१

[74] **'इदिओत'** ('वेडा') – काऊंट मीष्कीन, फ्यो. दस्तोयेवस्की यांच्या ह्याच शीर्षकाच्या कादंबरीचा नायक.

[75] **पदरोस्तक** (पौगंडावस्थी) – बेवारस पौगंड दल्गोरूकी, फ्यो. दस्तोयेवस्कींच्या ह्याच शीर्षकाच्या कादंबरीचा नायक.

[76] **रास्कोल्नीकोव** – फ्यो. दस्तोयेवस्कींच्या 'प्रीस्तुप्लेनिये इ नकाझानिये' ('अपराध आणि शासन') कादंबरीचा नायक.

[77] **त्यूतचेव फ्योदर** (१८०३-१८७३) – रशियन कवी; सखोल मनो-विश्लेषणज्ञ, निसर्गवर्णनात वाकबगार; सामाजिक इतिहास आणि माणसाचे दैव, ह्यांच्यातील शोकांतिक संवेदना त्यांच्या कवितेमधून व्यक्त होते.

[78] **तल्स्ताया अलेक्सान्द्रा** (१८८४-१९७९)– ल्येव तल्स्तोय यांची कन्या.

पान – ९२

[79] **तल्स्तोय सेर्गेइ** (१८६३-१९४७)-- रशियन-सोविएत स्मृतिकार, संगीतकार, ल्येव तल्स्तोय यांचा पुत्र.

[80] **चादायेव प्योत्र** (१७९४-१८५६) – रशियन धार्मिक तत्त्वज्ञ; 'तत्त्वज्ञानपर पत्रे' मधून एकतंत्री राजवट, भूदासपद्धती आणि रशियन ऑर्थोडॉक्स चर्चविषयीचा टीकात्मक दृष्टिकोन व्यक्त केला.

[81] **दान्ते अलिगयेरी** (१२६५-१३२१) – इटलीचे कवी, इटलीच्या साहित्यिक भाषेचे जनक; युरोपीय संस्कृतीवर त्यांच्या सृजनशील लेखनाचा ('दैवी हास्यांतिका', इ.) मोठा परिणाम घडला.

[82] **शेक्सपीयर विल्यम** (१५६४-१६१६) – इंग्रज नाटककार आणि कवी; पुनरुत्थानाच्या अखेरच्या काळातील थोर मानवतावादी; विविधरंगी स्वभावचित्रणे ही मानवी संस्कृतीला त्यांनी दिलेली अमूल्य देणगी.

पान – ९३

[83] «Simplicissimus»– जर्मन व्यंगचित्र नियतकालिक, म्यूनिक येथून १८९६ ते १९४२ पर्यंत प्रकाशित.

पान – ९५

[84] **'वारेन्का ओलेसोवा' 'सव्वीस आणि एकटी'** – मा. गोर्की यांच्या कथा.

[85] **वेल्तमन अलेक्सान्द्र** (१८००-१८७०)– रशियन लेखक; अद्भुत आणि वास्तव, साहसे आणि दैनंदिन जीवन, ह्यांचा कादंबरीलेखनात मेळ घातला.

[86] **मार्लीन्स्की** – बेस्तूझेव अलेक्सान्द्रचे टोपणनांव (१७९७-१८३७) – रशियन लेखक, दिसेंब्रिस्त. रोमांचवादी कविता आणि लघुकादंबऱ्या ('युद्धनौका आशा' इ.).

[87] **स्टर्न लॉरेन्स** (१७१३-१७६८) – इंग्रज लेखक, भावनाप्रधानतावादी साहित्याचे संस्थापक; साहित्यिक विडंबनप्रभू.

पान – ९६

[88] **कोल्त्सोव अलेक्सेइ** (१८०९-१८४२) – रशियन कवी; ग्रामीण जीवन, कामातील आनंद आणि निसर्गसान्निध्यावर कविता.

पान – ९७

[89] **बेर्वी-फ्लेरोवस्की वासिली** (१८२९-१९१८) – रशियन समाजशास्त्रज्ञ, पत्रकार, अर्थतज्ज्ञ; १८६० नंतरच्या काळातील सामाजिक चळवळीत भाग.

पान – ९८

[90] **दॉदे आल्फोन्स** (१८४०-१८९७) – फ्रेंच कादंबरीकार, विनोदी धाटणीची मध्यमवर्गीय घमेंडखोर व्यक्तिरेखा निर्माण केली ('तारास्कोनच्या तार्तारीनची आगळी साहसे.').

[91] **पॉल ॲस्टए** – दॉदे यांच्या 'अजरामर' कादंबरीतील आणि 'जगण्या-साठी लढा' नाटकातील पात्र.

[92] **नॉर्मन** – स्कॅंडिनेव्हियातील दर्यावर्दी; ८ व्या ते १० व्या शतकां-पर्यंत युरोपच्या सागरपट्टीत त्यांनी भरपूर पुंडाई केली.

पान – ९९

[93] **कूवाल्दा** – मा. गोर्की यांच्या 'पूर्वीची माणसे' कथेतील पात्र.

पान – १००

[94] **गिब्बन एडवर्ड** (१७३७-१७९४) – इंग्रज इतिहासकार; 'रोमन साम्राज्याच्या पाडावाचा आणि ऱ्हासाचा इतिहास'चे लेखक – दुसऱ्या शतकाच्या अखेरीपासून १४५३ पर्यंत रोमचा आणि कॉन्स्टॅन्टिनोपलचा इतिहास.

[95] **कोस्तोमारोव निकोलाय** (१८१७-१८८५) – रशियन-युक्रेनी इतिहासकार आणि लेखक. रशिया व युक्रेनच्या सामाजिक-राजकीय आणि आर्थिक इतिहासावर पुस्तके. युक्रेनी लोकसाहित्यावर संशोधन आणि प्रकाशने.

[96] **मॉमसेन (मॉमझेन) तीओदोर** (१८१७-१९०३) – जर्मन इतिहासकार, प्राचीन रोमचा इतिहास आणि रोमन कायदाविषयक असंख्य पुस्तकांचे लेखक.

[97] **लोम्ब्रोझो चेझारे** (१८३५-१९०९) – इटलीचे मानसशास्त्रज्ञ आणि गुन्हेगारतज्ज्ञ; भांडवलदारी गुन्हेगारशास्त्रात आणि गुन्हेगारी कायद्यात मानुष्यकशास्त्रीय पठडीचे संस्थापक.

पान – १०७

[98] **'फेनीमोर कूपरच्या 'पथशोधक' पुस्तकाला प्रस्तावना'** – फेनीमोर कूपर, 'पथशोधक', प्रकाशक – झे. ग्रझेबिन, १९२३.

[99] **कूपर फेनीमोर** (१७८९-१८५१) – अमेरिकन लेखक; उत्तर अमेरिकेच्या वसाहतीकरणातील शौर्यशाली आणि शोकांतिक प्रसंगांविषयीच्या अनेक कादंबऱ्यांचे लेखक ('संस्थापक', 'अखेरचा मोहीकन') आणि दर्यावर्दी साहसांच्या कादंबऱ्यांचे लेखक ('पायलट').

[100] **बेलीन्स्की विस्सारीओन** (१८११-१८४८) – रशियन साहित्य-समीक्षक, पत्रकार, क्रांतिकारक लोकशाहीवादी, भौतिकवादी तत्त्वज्ञ. कलात्मक परिस्थितीच्या ठोस ऐतिहासिक विश्लेषणावर आधारीत वास्तववादी सौंदर्यशास्त्राची आणि साहित्य-समीक्षेची तत्त्वे तयार केली. रशियन सामाजिक विचाराच्या आणि साहित्याच्या विकासावर त्याचा प्रभाव पडला.

पान – ११०

[101] **'नि. लेस्कोव'** – आवृत्तीला प्रस्तावना : नि. लेस्कोव. तीन खंडात संकलित साहित्य, खंड १, प्रकाशन – झे. ग्रझेबिन, १९२३. संक्षिप्त प्रकाशन.

पान – १११

[102] **स्लेपत्सोव वासिली** (१८३६-१८७८) – रशियन लेखक; वास्तववादी कथा आणि चित्रणे. 'कठीण काळ' ही कादंबरी १९ व्या शतकातील सातव्या दशकाच्या मध्यास घडलेल्या प्रतिगामित्वाच्या आणि अरिष्टाच्या काळातील लोकशाहीवादी चळवळीतील राझनोचिनेत्झांच्या दैवाबद्दलची आहे.

पान – ११२

[103] **निकोलाय पहिला** (१७९६-१८५५) – रशियाचा सम्राट (१८२५-१८५५). दिसेंब्रिस्तांचा उठाव त्याने चिरडून टाकला; विचारस्वातंत्र्याच्या कैवाऱ्यांचा क्रूर छळ (पूष्कीन, लेर्मोन्तोव, गेर्त्सेन, शेवचेन्को व इतर).

[104] **चेर्नोशेवस्की निकोलाय** (१८२८-१८८९) – रशियन क्रांतिकारक लोकशाहीवादी, शास्त्रज्ञ, लेखक आणि साहित्य-समीक्षक; वास्तववादाचा सातत्याने पुरस्कार, रशियातील १८६० नंतरच्या क्रांति-चळवळीचे पुढारी; त्यांच्या कादंबऱ्यांनी ('काय केले पाहिजे?', 'उपोद्‌घात') रशियन क्रांतिकारकांच्या अनेक पिढ्या जोपासण्यात महत्त्वाची कामगिरी बजावली.

[105] **पिसारेव द्‌मित्री** (१८४०-१८६८) – रशियन पत्रकार आणि साहित्य-समीक्षक, भौतिकवादी तत्त्वज्ञ आणि मनोराज्यवादी समाजवादी, क्रांतिकारक लोकशाहीवादी. 'रशियन साहित्याच्या बगीचांमधून विहार' ह्या त्यांच्या लेखाचा प्रस्तुत ठिकाणी संदर्भ आहे.

पान – ११५

[106] रशियन कवी प्लेश्चेयेव अलेक्सेइ (१८२५-१८९३) यांच्या 'चल पुढे! भीती आणि शंकेविना...' कवितेमधून.

पान – ११७

[107] **हायने हेन्रिक** (१७९७-१८५६) – जर्मन कवी आणि पत्रकार, श्रेष्ठ भावकवी आणि राजकीय विषयांवरील कवितालेखनात हातखंडा.

पान – ११८

[108] **गोन्चारोव इवान** (१८१२-१८९१) – रशियन लेखक, वास्तववादी

गद्यलेखनप्रभू ; १९ व्या शतकातील ५-७ दशकांमधील रशियन समाजातील महत्त्वाच्या घडामोडींचे त्यांच्या लेखनातून दर्शन ('एक सामान्य कथा', 'अब्लोमोव', 'तुटलेला कडा').

पान – ११९

[109] **हेरोडोटस** (४९० आणि ४८० च्या दरम्यान – ख्रि. पु. सुमारे ४२५) – प्राचीन ग्रीक इतिहासकार, "इतिहासाचे जनक" म्हणून ओळखतात ; आखेमेनीदाच्या, इजिप्तच्या, इ. इतिहासांच्या निबंधांचे लेखक ; सीथियनांच्या जीवनाची आणि चालीरीतींची पद्धतशीर वर्णने सर्वप्रथम दिली.

पान – १२१

[110] **'रोमाँ रोल्लाँ'** – फ्रेंचमध्ये अनुवाद : 'यूरोप' नियतकालिक, पॅरिस, १९२६, क्र. ३८, फेब्रुवारी १५ ; रशियनमध्ये : 'क्रास्नाया नोव' नियतकालिक, १९२७, क्र. ६, जून.

पान – १२२

[111] **रोल्लाँ रोमाँ** (१८६६-१९४४) – फ्रेंच कादंबरीकार, संगीत-समीक्षक, सार्वजनिक नेते ; 'ज्याँ ख्रिस्तोफ' आणि 'सुंदर आत्मा' ह्या महाकाव्यपर कादंबऱ्या ; थोर लोकांची कलात्मक चरित्रे (बीथोवेन, मायकेलएन्जेलो, तल्स्तोय). नोबेल पारितोषिकाचे मानकरी (१९१५).

पान – १२३

[112] **डॉन क्विक्झोट** – स्पेनचे लेखक सेर्वान्तीस मीगेल (१५४७-१६१६) यांच्या याच नांवाच्या कादंबरीचा नायक.

पान – १२५

[113] **'मि. प्रीश्विन'** – 'क्रास्नाया नोव' नियतकालिक, १९२६, क्र. १२, डिसेंबर, संक्षिप्त प्रकाशन.

[114] **प्रीश्विन मिखाइल** (१८७३-१९५४) – रशियन-सोविएत लेखक ; निसर्ग, इतिहास, लोकसाहित्य आणि राष्ट्रीय परंपरा यांचा परामर्श घेणारे तात्त्विक-भावपूर्ण गद्य.

पान – १२६

[115] **अक्साकोव सेर्गेइ** (१७९१-१८५९) – रशियन लेखक; जमीनदारांचे जीवन आणि त्यांच्या चालीरीती यांचे वास्तव चित्रण; रशियन निसर्गकवी.

[116] **सेर्गेयेव-त्सेन्स्की सेर्गेइ** (१८७५-१९५८) – रशियन-सोविएत लेखक; 'रशियाचे स्थित्यंतर' ऐतिहासिक-क्रांतिकारक महाकाव्य.

[117] **शोपेन फ्रेदेरिक** (१८१०-१८४९)–पोलंडचे संगीतरचनाकार आणि पियानोवादक; लोक-परंपरांवर आधारलेल्या त्यांच्या रोमांचवादी सृजनशील कार्याने पोलंडच्या संगीताला जगभर मान्यता लाभली.

[118] **लेवितान इसाक** (१८६०-१९००)–रशियन चित्रकार; "मनः-स्थितीचे निसर्गदृश्य" चे निर्माते; नाजुक कलाकुसरीचे चित्र.

पान – १२७

[119] **न्यूइस्दाल ( न्येइस्दाल ) जेकब** (१६२८ अथवा १६२९-१६८२)–डच चित्रकार, राष्ट्रीय वास्तववादी निसर्गचित्रणावर प्रभुत्व.

[120] **लॉरेन क्लोद** (१६००-१६२८)–फ्रेंच चित्रकार; अभिजात पठडीचे प्रतिनिधी.

[121] **हूम्बोल्त अलेक्सान्द्र** (१७६९-१८५९)–जर्मन निसर्गवादी, भूगोल-शास्त्रज्ञ आणि प्रवासी; उत्क्रांती सिद्धांताचा आणि निसर्गशास्त्रांमधील तुल-नात्मक पद्धतीचा विकास घडवला.

[122] **हेक्केल एर्न्स्ट** (१८३४-१९१९)–जर्मन प्राणीशास्त्रज्ञ-उत्क्रांतीवादी, नैसर्गिक-वैज्ञानिक भौतिकवादाचे प्रतिनिधी.

पान – १३१

[123] **'आनातोल फ्रान्स'** – 'क्रास्नाया नोव' नियतकालिक, १९२७, क्र. ५. आ. फ्रान्स यांच्या निधनानिमित्त (१९२४) प्रस्तुत लेख लिहिण्यात आला होता. गोर्कींच्या लेखांमध्ये आणि पत्रांमध्ये फ्रान्स यांच्या नांवाचा वारंवार उल्लेख आढळतो. फ्रान्स यांच्याविषयीचा गोर्कींचा दृष्टिकोन दशकां-

च्या दरम्यान बदलत गेला व फ्रान्स यांच्या सृजनशील कार्याचे ते अधिकाधिक चाहते बनले.

[124] **प्रोतागोर** (ख्रि. पू. सुमारे ४८० – सुमारे ४१०) – प्राचीन ग्रीक तत्त्वज्ञ, एक अत्यंत प्रमुख वितंडवादी. हेराक्लिटच्या शिकवणीचा आधार घेऊन ज्ञानाच्या आत्मनिष्ठ अवलंबित्वाचा पुरस्कार केला.

[125] **पीरोन** (ख्रि. पू. सुमारे ३६० – सुमारे २७०) – प्राचीन ग्रीक तत्त्वज्ञ, संशयवादाचे संस्थापक. वास्तवाबद्दलची मानवी मते चंचल असतात, म्हणून त्यांच्यापासून दूर रहावे आणि उदासीन रहावे, असे सांगणे होते.

[126] **सॉक्रेटिस** (ख्रि. पू. ४७०/४६९ – ३९९) – प्राचीन ग्रीक तत्त्वज्ञ; मुख्य प्रश्न घालून सत्य मिळविण्याच्या विरोधविकासशास्त्राचे एक संस्थापक; आगामी युगांमध्ये आदर्श पंडित म्हणून मान्यता पावले.

[127] **प्रोक्रूस्ताचा पलंग** – ग्रीक पुराणातील लोखंडी पलंग; वाटमाऱ्या करणारा प्रचंड दरोडेखोर प्रोक्रूस्त वाटसरूंना बळजबरीने पलंगाला बांधायचा आणि त्या पलंगाच्या लांबीशी वाटसरूंची उंची जुळावी, म्हणून त्यानुसार त्यांचे पाय कापायचा अथवा खेचायचा.

पान – १३२

[128] **राब्ले फ्रान्सूआ** (१४९४-१५५३) – फ्रेंच लेखक – मानवतावादी; 'गार्गान्टयूआ आणि पान्ताग्र्यूएल' ही पाच खंडांमधील त्यांची कादंबरी फ्रेंच पुनरुत्थानाचे प्रचंड सांस्कृतिक स्मारक आहे.

[129] **मॉन्तेन मिशेल** (१५३३-१५९२) – फ्रेंच तत्त्वज्ञ-मानवतावादी; धर्मशास्त्र, पोथीनिष्ठा आणि स्कूलमनची निगमनात्मक तत्त्वज्ञानपद्धती ह्यांविरुद्ध रोख असलेल्या त्यांच्या 'अनुभव' पुस्तकात माणूस सर्वांत अधिक मूल्यवान मानलेला आहे.

[130] **वोल्तेर** (१६९४-१७७८) – फ्रेंच लेखक, तत्त्वज्ञ-प्रबोधनकार, केवले-

श्वरवादी ; महान फ्रेंच क्रांतीच्या सैद्धांतिक पूर्वतयारीत आणि जागतिक – त्यात रशियनही समाविष्ट – सामाजिक-राजकीय विचाराच्या विकासात महत्त्वाची कामगिरी.

[131] **स्विफ्ट जोनाथन** (१६६७-१७४५) – इंग्रज लेखक आणि राजकीय मुत्सद्दी ; चर्च, समाजव्यवस्था आणि सत्ताधारी वर्गांचे धोरण, ह्याबाबतच्या उपरोधाच्या त्यांच्या परंपरा जागतिक साहित्यात चिरस्थायी व फलदायी ठरल्या आहेत.

[132] **बॉदलेर शार्ल** (१८२१-१८६७) – फ्रेंच कवी ; फ्रेंच प्रतीकवादाचे अग्रदूत.

[133] **लेनाऊ निकोलाऊस** (१८०२-१८५०) – ऑस्ट्रियाचे कवी ; रोमांच-वादी भावगीते आणि कविता.

[134] **बाल्झाक ओनोरे** (१७९९-१८५०) – फ्रेंच कादंबरीकार ; त्यांच्या 'मानवी हास्यांतिका' मध्ये ९० कादंबऱ्या व कथा सामावल्या आहेत. जागतिक साहित्यात वास्तववादाचा विकास घडवण्यात कामगिरी. त्याच-प्रमाणे पान ४५ वरील टीप वाचा.

[135] **फ्रान्स अनातोल** (१८४४-१९२४) – फ्रेंच कादंबरीकार ; भांडवल-दारी वास्तवतेचा त्यांचा अस्वीकार, ख्रिश्चन माथेफिरूपणाचे अवमूल्यन आणि संन्यस्तवृत्ती त्यांच्या कादंबऱ्यांमधून संशयी उपरोधामार्फत व्यक्त होतात. नोबेल पारितोषिकाचे मानकरी (१९२१).

पान – १३३

[136] **त्रायान** (५३-११७) – रोमन सम्राट (९८-११७). त्याने केलेल्या स्वाऱ्यांच्या परिणामी, रोमन साम्राज्याला कमाल प्रदेश लाभला होता.

पान – १३४

[137] **"द्रेयफूस खटला"** – फ्रेंच जनरल स्टाफमधील द्रेयफूस नामक ज्यू

अंमलदाराविरोधी फ्रेंच प्रतिगामी लष्करी वर्तुळांनी १८९४ साली भरलेला बनावट खटला. आत्यंतिक देशद्रोह आणि जर्मनीसाठी हेरगिरी केल्याच्या खोटया आरोपांवरून त्याला जन्मठेपीची शिक्षा देण्यात आली होती.

[138] **मोपासाँ गी दे** – पान ३०५ वरील टीप पहा.

[139] **बूर्दो लुइ** (१८२४-१९००) – आ. फ्रान्स यांच्या लेखाचा संदर्भ. बूर्दो यांचे «L'histoire et les historiens», पॅरिस, १८८८.

पान – १३५

[140] **आबादोन्ना** – ज्यूदावादी पुराणातील अथांग विवरामधील देवदूत.

पान – १३८

[141] **'कामगारवर्गीय लेखक'** – पक्रोवस्क शहरातील तंत्रविद्यालयाच्या साहित्य-वर्तुळाच्या सदस्यांना पत्र. 'प्रावदा' आणि 'इझ्वेस्तिया' वर्तमानपत्रे, १९२८, क्र. ९३, एप्रिल २१.

प्रस्तुत लेख म्हणजे १३ मार्च १९२८ रोजी पक्रोवस्क तंत्रविद्यालयाच्या साहित्य-वर्तुळाच्या सदस्यांनी पाठवलेल्या पत्राला उत्तर आहे. गोर्की "कामगारवर्गीय साहित्याचे सहप्रवासी" आहेत असे काही टीकाकारांनी म्हटल्यामुळे ही मंडळी गोंधळली होती.

पान – १४२

[142] **राष्ट्रसंघ** – लोकांमध्ये सहकार्य वाढविण्याच्या आणि "शांतता व सुरक्षितता" यांची हमी देण्याच्या उद्देशाने स्थापन केलेली आंतरराष्ट्रीय संघटना (१९१९-१९४६). प्रत्यक्षात, साम्राज्यवादी देशांचे धोरण अंमलात आणण्याचे एक साधन. सोविएत संघ १९३४-१९३९ ह्या काळात राष्ट्रसंघाचा सदस्य होता.

पान – १४३

[143] **'मी लिहायला कसा शिकलो'** – १९२८ साली स्वतंत्र पुस्तिका म्हणून प्रथम प्रकाशित. संक्षिप्त प्रकाशन.

पान – १४५

[144] **मेन्देलेयेव द्मित्री** (१८३४-१९०७) – रशियन रसायनशास्त्रज्ञ, पुरोगामी सार्वजनिक नेते; रासायनिक घटकांचा आवर्ती नियम शोधून काढला.

[145] **लोमोनोसोव मिखाइल** (१७११-१७६५) – जागतिक महत्त्वाचे पहिले रशियन शास्त्रज्ञ आणि निसर्गवादी; आधुनिक रशियन साहित्यिक भाषेचा पाया घालणारे कवी.

[146] स्वीडनचे कादंबरीकार स्त्रिन्दबेर्ग यूहान ऑगस्ट (१८४९-१९१२) यांच्या 'सदसद्विवेकबुद्धीच्या वेदना' ह्या लघु-कादंबरीचा संदर्भ आहे.

पान – १४८

[147] **इल्या मूरोमेत्स** – दंतकथांमधील महान योद्धा; १२ ते १६ व्या शतकांमधील रशियन महाकाव्यांमधील एक मुख्य नायक.

[148] **फाऊस्त** – जर्मन लोक-पुराणांमधील आणि जागतिक साहित्य-कलेतील नायक; ज्ञानपिपासू मानवाचे प्रतीक. गोएथे यांचे 'फाऊस्त' नाटक जगप्रसिद्ध आहे.

[149] **हॅम्लेट** – विल्यम शेक्सपीयरच्या याच शीर्षकाच्या शोकांतिकेचा नायक.

[150] **प्लातोन करातायेव** – ल्येव तल्स्तोय यांच्या 'युद्ध आणि शांतता' कादंबरीचा नायक.

[151] **कारामाझोव** – फ्यो. दस्तोयेवस्कींच्या 'कारामाझोव बंधू' कादंबरीचे नायक.

[152] **स्विद्रीगायलोव** – फ्यो. दस्तोयेवस्कींच्या 'अपराध आणि शासन' कादंबरीचा नायक.

[153] **अब्लोमोव** – इ. गोन्चारोव यांच्या ह्याच शीर्षकाच्या कादंबरीचा नायक.

[154] **ख्लेस्ताकोव** – नि. गोगोल यांच्या 'रेविझोर' ('अंमलदार') ह्या विनोदी नाटकाचा नायक.

[155] **मोल्चालिन** – रशियन लेखक अलेक्सान्द्र ग्रिबायेदोव यांच्या 'अकलेची दु:खे' ह्या विनोदी नाटकाचा नायक.

[156] **तार्त्यूफ** – फ्रेंच नाटककार, नट आणि नाट्यकलेचे सुधारणाकार मोलीयेर यांच्या 'तार्त्यूफ अथवा फसव्या' ह्या विनोदी नाटकाचा नायक.

[157] **अथेल्लो** – विल्यम शेक्सपीयरच्या 'अथेल्लो' (झुंझारराव) ह्या शोकांतिकेचा नायक.

पान – १४९

[158] **बूनिन इवान** (१८७०-१९५३) – रशियन लेखक; त्यांच्या कथांमधून आणि लघु-कादंबऱ्यांमधून जमीनदारांचा ग्रामीण भागांमधील ऱ्हास, खेड्यातील खडतर जीवन यांचे दर्शन घडते. रशियन निसर्गाची काव्यमय वर्णने; रशियातील टीकात्मक वास्तववादाचे एक अखेरचे प्रमुख प्रतिनिधी; नोबेल पारितोषिकाचे मानकरी (१९३३).

पान – १५१

[159] **'जळत्या हृदयाची दंतकथा'** – मा. गोर्की यांच्या 'म्हातारी इझेरगिल' कथेतील दान्कोच्या दंतकथेचा संदर्भ.

पान – १५३

[160] **साल्तीकोव-श्चेद्रिन मिखाइल** (१८२६-१८८९) – फार मोठे रशियन लेखक-उपहासकार; लोकशाहीवादी-प्रबोधनकार; एकतंत्री राजवट आणि भूदासपद्धती यांच्याविरुद्ध सृजनाचा रोख.

[161] हा संदर्भ इन्सारोव ह्याचा आहे – इ. तुर्गेनेव यांच्या 'वेधकाली' कादंबरीचा नायक.

[162] **रूदिन** – इ. तुर्गेनेव यांच्या ह्याच शीर्षकाच्या कादंबरीचा नायक.

पान – १५४

[163] **शिल्लेर योहान फ्रीड्रिक** (१७५९-१८०५) – जर्मन कवी, नाटककार आणि कला-सैद्धांतिक; जर्मन अभिजात साहित्याचे एक संस्थापक. 'दरोडे-खोर' – त्यांचे नाटक.

[164] **'मृतात्मे'** – नि. गोगोल यांची कादंबरी.

[165] **'जिवंत प्रेत'** – ल्येव तल्स्तोय यांचे नाटक.

[166] **'मृत घरे'** – फ्यो. दस्तोयेवस्कींच्या 'मृतांचे घर' कादंबरीचा संदर्भ.

[167] **'तीन मृत्यू'** – ल्येव तल्स्तोय यांची कथा.

[168] **असीपोविच-नवोद्वोर्स्की आंद्रेइ** (१८५३-१८८२) – रशियन लेखक; क्रांतिकारक नरोदनिकांशी संबंधित.

[169] **कूश्चेवस्की इवान** (१८४७-१८७६) – रशियन लेखक; क्रांतिकारक नरोदनिक युवकांच्या घडणीचे दर्शन.

[170] **पोम्यालोवस्की निकोलाय** (१८३५-१८६३) – रशियन लेखक; राझ्नोचिनेत्झ बुद्धिजीवींच्या वास्तववादी व्यक्तिरेखा निर्माण केल्या.

पान – १५५

[171] **हेर्झेन अलेक्सान्द्र** (१८१२-१८७०) – रशियन क्रांतिकारक, लेखक, तत्त्वज्ञ. दिमेंब्रिस्तांच्या प्रभावामुळे क्रांतिकारक मार्ग चोखाळला. रशियातील भूदास पद्धतीवर प्रखर टीका ('दोषी कोण?'); एकतंत्री राजवटीचे रूप उघड केले, क्रांतिकारक प्रचार केला. 'भूतकाळ आणि विचार' हे त्यांचे आत्मचरित्रात्मक पुस्तक रशियन अभिजात साहित्यामधील एक श्रेष्ठ ग्रंथ आहे.

[172] **मिखायलोवस्की निकोलाय** (१८४२-१९०४) – रशियन समाज-शास्त्रज्ञ, पत्रकार, साहित्य-समीक्षक.

[173] **मिनाय, मित्याय** – नि. गोगोल यांच्या 'मृतात्मे' कादंबरीमधील पात्रे.

[174] **पोलीकूष्का** – ल्येव तल्स्तोय यांच्या ह्याच शीर्षकाच्या कथेचा नायक.

[175] **मामिन-सिबिऱ्याक द्मित्री** (१८५२-१९१२) – रशियन लेखक; १९ व्या शतकाच्या उत्तरार्धातील सैबेरियामधील जीवनाचे व चालीरीतींचे त्यांच्या कादंबऱ्यांमधून उत्तम चित्रण ('प्रीवालोवचे दशलक्ष', 'पर्वतामधील घरटे', 'सोने').

[176] **पोद्याचेव सेम्योन** (१८६६-१९३४) – रशियन-सोविएत लेखक. क्रांतिपूर्व रशियातील लोकांच्या भयानक परिस्थितीबद्दल, त्यांच्या वर्ग-जाणीवेच्या वाढीबाबत रेखाचित्रे, कथा व लघु-कादंबऱ्या.

[177] **वोल्नोव इवान** (१८८५-१९३१) – रशियन-सोविएत लेखक. 'माझ्या जीवनातील दिवसांची कहाणी' ही आत्मचरित्रात्मक लघुकादंबरी क्रांतिपूर्व किसानवर्गाच्या नशीबाविषयी आहे.

पान – १६३

[178] **फॅरडे मायकेल** (१७९१-१८६७) – इंग्रज पदार्थवैज्ञानिक; विद्युत-चुंबकीय क्षेत्राच्या सिद्धांताचे निर्माते.

[179] **एडिसन थॉमस आल्वा** (१८४७-१९३१) – अमेरिकन संशोधक आणि उद्योगपती.

[180] **आर्कराइट रिचर्ड** (१७३२-१७९२) – विणण्याच्या यंत्राचे इंग्रज संशोधक; पहिल्या कारखान्यांचे संघटक.

[181] **पालीस्सी बेर्नार** (सुमारे १५१०-१५८९ अथवा १५९०) – फ्रेंच चित्रकार – कुलाल आणि निसर्गवादी.

[182] **मोलीएर** (१६२२-१६७३) – फ्रेंच नाटककार, नट, नाटयकला-सुधारक, विनोदी नाटकांचा नवा प्रकार निर्माण केला; जमीनदारांच्या सामूहिक दूषित पूर्वग्रहांचे, भांडवलदारांच्या संकुचित प्रवृत्तीचे, पाद्रयांच्या लबाडीचे विडंबन केले; जागतिक – रशियन समाविष्ट – नाटयशास्त्राच्या आणि रंगभूमीच्या विकासात फार मोठी कामगिरी.

पान – १६५

[183] **डेव्हिड** – इस्रायली – यहुदी राज्याचा राजा – ख्रि. पू. ११ रे शतक – सुमारे ९५०.

पान – १६६

[184] **झारूबिन पावेल** (१८१६-१८८६) – रशियन पत्रकार, लेखक, स्वयंशिक्षित संशोधक.

पान – १६७

[185] **रीड मायन** (१८१८-१८८३) – इंग्रज लेखक; अमेरिकेतील दलित लोकांच्या संघर्षाच्या व यातनांच्या संदर्भात चित्तथरारक, मानवतावादी साहस-कादंबऱ्या.

[186] **एमार गुस्ताव** (१८१८-१८८३) – फ्रेंच लेखक. साहसी कादंबऱ्या – 'मार्गशोधक,' 'प्रेअरींमधील चांचे,' इ.

पान – १६८

[187] **रूबेन्स पीटर** (१५७७-१६४०) – फ्लेमिश चित्रकार; धार्मिक आणि पौराणिक विषयांवर चित्रे; ऐतिहासिक आणि रूपककथांवरील चित्रे; लोकशाहीवादी भावनेने आणि बलाढ्य निसर्गशक्तींची जाणीव ठेवून निसर्ग-चित्रे व शेतकऱ्यांच्या जीवनातील दृश्ये.

[188] **झोला एमिल** (१८४०-१९०२) – फ्रेंच निसर्गवादी कादंबरीकार 'रूगोन-मक्कारी' ह्या २० खंडांच्या कादंबरीमधून भांडवलदारी समाजातील सामाजिक विसंगतींचे वास्तव चित्रण.

पान – १७०

[189] **कूरोचकिन वासिली** (१८३१-१८७५) – रशियन कवी; तत्कालिन औपरोधिक लेख व विडंबने.

[190] **बेरान्जे प्येर ज्याँ** (१७८०-१८५७) – फ्रेंच कवी; लोकगीताच्या कडव्याला व्यावसायिक कलेच्या शिखरावर नेले. क्रांतिकारक भावना, विनोद आणि आशावादाने भरलेली गीते.

पान – १७१

[191] प्रस्तुत संदर्भ ए. ब्लूमेन्थाल यांच्या 'इतिहासचक्र' लेखाचा आहे. त्याचे प्रकाशन-नियतकालिक 'स्लोवा' (शब्द), १८८१, क्र. १, जानेवारी.

पान – १७३

[192] रशियन कवी नादसोन सेम्योन (१८६२-१८८७) यांच्या 'लाडक्या मित्रा, मला ठाऊक आहे...' कवितेमधून.

[193] नादसोन यांच्या त्याच कवितेमधून.

[194] **लेओनोव लेओनिद** (जन्म १८९९) – रशियन-सोविएत लेखक; सामाजिक आणि तात्त्विक समस्यांची सखोलता, मानसशास्त्रीयवाद, चित्रमय आणि अलंकारिक शैली – ह्या गोष्टींमुळे त्यांच्या गद्याला सोविएत साहित्यात अनन्यसाधारण स्थान प्राप्त झाले आहे ('आक्रमण', 'रशियन अरण्य').

पान – १७६

[195] **मार्लो ख्रिस्तोफर** (१५६४-१५९३) – इंग्रज नाटककार; वैराग्यपूर्ण मध्ययुगीन नीतीमत्तेमधून मुक्तता, देवाशी लढण्याचा आवेश – त्यांच्या

'तैमूरलंग' आणि 'डॉक्टर फाऊस्टचा शोकांतिकात्मक इतिहास' शोकांतिकांची वैशिष्टये.

[196] **म्युस्से पॉल** (१८०४-१८८०)—फ्रेंच लेखक आणि रोमांचवादी कवी (कवितामालिका 'पाय', कादंबरी 'युगपुत्राचे कबुलीजबाब').

पान – १७७

[197] **दे कोस्तेर शार्ल** (१८२७-१८७९)—बेल्जियन लेखक (फ्रेंच भाषेत लेखन); १६ व्या शतकात स्पेनच्या सत्तेविरुद्ध लढा देणाऱ्या फ्लँडर्सविषयीच्या 'उलेनश्पीगेलची दंतकथा' पुस्तकाला जगप्रसिद्धी.

पान – १८४

[198] **'संस्कृती'** – वर्तमानपत्र 'कूल्तूरनीय पाखोद' ('सांस्कृतिक प्रेरणा') कम्युनिस्ट युवक संघाच्या मध्यवर्ती समितीचे एक-दिवसाचे वृत्तपत्र, मॉस्को, १९२८. सप्टें-ऑक्टो.

पान – १८९

[199] **'नवजात साहित्य आणि त्याची कार्ये'** – लेखकाच्या मृत्यूनंतर प्रथम प्रकाशन 'प्रावदा', १९४१, क्र. १६७, जून १८ (उतारे). मजकूर १९२९ सालाचा आहे. संक्षेपाने प्रकाशित.

पान – १९०

[200] **बोकाच्चिओ (बोकाच्चो) ज्योवान्नी** (१३१३-१३७५) – इटलीचे लेखक, आरंभीच्या पुनरुत्थानकाळातील मानवतावादी; मुख्य लेखन – 'डीकॅमेरॉन.'

[201] **राब्ले फ्रान्सूआ** – १२८ टीप पहा.

[202] **लोपे दे वेगा** (वेगा कार्पो लोपे फेलिक्स दे) (१५६२-१६३५) – स्पेनचे नाटककार आणि कवी; पुनरुत्थानाचे श्रेष्ठ प्रतिनिधी. २००० पेक्षा जास्त नाटकांचे, कादंबऱ्यांचे आणि कवितांचे कर्ते ('गव्हाणीतील कुत्रा', 'नृत्यशिक्षक' इ.) ....

[203] **काल्देरोन दे ला बार्का पेद्रो** (१६००-१६८१)–स्पॅनिश बरोकचे नामवंत नाटककार. कारस्थानी विनोदी नाटक ('प्रेमाशी थट्टा करायची नसते').

[204] **बायरन जोर्ज नोएल गोदन** (१७८८-१८२४)–इंग्रज रोमांचवादी कवी.

[205] **शेली पेर्सी बीश** (१७९२-१८२२)–इंग्रज रोमांचवादी कवी; तत्कालीन समाजाचे आणि राज्यव्यवस्थेचे खरे रूप उघड केले ('माबची राणी'), हिंसेच्या आधारे जुलमी सत्तेला पदभ्रष्ट करण्याचा पुरस्कार केला ('इस्लामचा उठाव').

[206] **वाईल्ड ऑस्कर** (१८५४-१९००)–इंग्रज लेखक; त्यांची कविता फ्रेंच प्रतीकवाद्यांशी जवळिक साधते, तर गद्यात आणि नाटकांमध्ये सामाजिक-टीकात्मक प्रवृत्ती.

[207] **शॉ जॉर्ज बर्नार्ड** (१८५६-१९५०)–इंग्रज लेखक; चर्चात्मक नाटकांचे जनक; पोथीनिष्ठा आणि दूषित पूर्वग्रह नष्ट करण्याचे साधन म्हणून विरोधाभास वापरण्यावर त्यांची कला-पद्धती आधारली आहे.

[208] **ओ. हेन्री** (खरे नांव–पोर्टर विल्यम सिडने) (१८६२-१९१०)–अमेरिकन लेखक; रंजक कथानक व अनपेक्षित शेवट असलेल्या विनोदी कथा.

[209] **ल्युइस सिंक्लेअर** (१८८५-१९५१)–अमेरिकन लेखक; त्यांच्या कादंबऱ्यांमध्ये वास्तववादी पूर्णदर्शन–"मध्यवर्ग"; टीका–"डॉलरची संस्कृती"; नोबेल पारितोषिक विजेते (१९३०).

[210] **श्तीन्दे ज्यूलियस** (१८४१-?)–जर्मन लेखक; बूख्‌गोल्त्सच्या भांडवलदारी कुटुंबाच्या जीवनावरील कथामालिका.

[211] **बिस्मार्क ओट्टो** (१८१५-१८९८)–प्रिन्स, जर्मन साम्राज्याचे पहिले राईख-चॅन्सलर (१८७१-१८९०).

पान – १९४

[212] '"**संस्कृतीच्या मालकांनो" तुम्ही कुणाबरोबर आहात ?'** (अमेरिकन वार्ताहरांना उत्तर) – 'प्रावदा' आणि 'इझ्वेस्तिया', १९३२, क्र. ८१, मार्च २२. संक्षिप्त प्रकाशन.

[213] **श्पेंगलेर ओस्वाल्द** (१८८०-१९३६) – जर्मन कल्पनावादी, तत्त्वज्ञ, इतिहासकार, "जीवनविषयक तत्त्वज्ञाना"चे प्रतिनिधी. मुख्य पुस्तक – 'युरोपचा संधिकाल'.

[214] **व्हॅन-लॉन हेन्रिक** (१८८२-१९४४) – अमेरिकन इतिहासकार.

पान – १९६

[215] मजकुरात किंचित बदल करून गोर्की 'कम्युनिस्ट पक्षाचा जाहिरनामा' उद्धृत करीत आहेत.

[216] **मिल्यूकोव पावेल** (१८५९-१९४३) – रशियन मुत्सद्दी, इतिहासकार, पत्रकार. पहिल्या महायुद्धाच्या काळात झारशाहीच्या साम्राज्यवादी धोरणाचे पुरस्कर्ते.

पान – १९८

[217] **वालेरी पॉल** (१८७१-१९४५) – फ्रेंच कवी. त्यांच्या तत्त्वज्ञानविषयक भावगीतांचा मुख्य विषय ज्ञानाच्या आशयाचे आणि निसर्गाच्या निर्मितीचे चिंतन होता. भाषेचा दाटपणा आणि साहचर्याचा धीटपणा ही त्यांची वैशिष्टये.

पान – २०२

[218] **वॉलेस एडगर** (१८७५-१९३२) – इंग्रज लेखक; गुप्तहेर साहित्याचे एक अत्यंत प्रमुख प्रतिनिधी.

पान – २०३

[219] १९३२ च्या जानेवारी-फेब्रुवारीत शांघायवरील जपानी हल्ल्याचा गोर्की संदर्भ देत आहेत.

[220] १९१४ साली जर्मन आक्रमणापायी अतोनात हानी सोसलेल्या [illegible] बेल्जम शहराचा संदर्भ. सर्वांत मोठे विद्यापीठीय ग्रंथालय जाळण्यात आले आणि खुद्द विद्यापीठाचा नाश झाला.

पान – २१०

[221] **टीटस** (३९-८१) – रोमन सम्राट.

पान – २१५

[222] **माल्थस थॉमस रॉबर्ट** (१७६६-१८३४) – इंग्रज अर्थशास्त्रज्ञ; अशास्त्रीय सिद्धांताचे जनक; त्या सिद्धांतानुसार, उदरनिर्वाहाच्या साधनांच्या वाढीपेक्षा लोकसंख्येची वाढ अधिक झपाट्याने होत असते, म्हणून धोरणीपणाने लोकसंख्येतील वाढीला आळा घातला नाही, तर कामकरी लोकांचे दारिद्र्य अटळ आहे.

पान – २१९

[223] **तिसरी इंटरनॅशनल** – कम्युनिस्ट इंटरनॅशनल; विविध देशांच्या कम्युनिस्ट पक्षांची आंतरराष्ट्रीय क्रांतिकारक कामगारवर्गीय संघटना; १९१९ ते १९४३ पर्यंत अस्तित्वात.

पान – २१९

[224] **हॉप्टमान्न गेरहार्ट** (१८६२-१९४६) – जर्मन लेखक; जर्मन निसर्गवादाचे पुढारी; नोबेल पारितोषिक विजेते (१९१२).

[225] **मान्न थॉमस** (१८७५-१९५५) – जर्मन कादंबरीकार; २० व्या शतकातील टीकात्मक वास्तववादाच्या सर्वोत्तम परंपरांनुसार, पश्चिमेतील उदारमतवादी बुद्धिमंतांचे बौद्धिक आणि नैतिक शोध व्यक्त केले; जीवनाच्या भांडवलदारी प्रकारांचा ऱ्हास दाखवला, भांडवलदारी जाणीवेतील आणि संस्कृतीमधील अरिष्टे दाखवली; बायबलमधील कथेवर आधारीत नाट्यचतुष्टय: ('जोसेफ आणि त्याचे भाऊ'); नोबेल पारितोषिक विजेते (१९२९).

पान – २२१

[226] **'नाटके'** – वार्षिक 'सोळावे वर्ष'. पहिले वार्षिक. मॉस्को, १९३३ आणि नियतकालिक 'लितेरातूर्नाया उच्योबा' ('साहित्यिक अभ्यास'), १९३३, क्र. २. संक्षिप्त प्रकाशन.

[227] **'कृती म्हणजे अस्तित्वाचा आरंभ'** – गोएथे, 'फाऊस्ट', भाग १, दृश्य ३.

[228] फेयेरबाखबाबतचा मार्क्स यांचा अकरावा प्रबंध उद्धृत.

[229] **खेम्नीत्सेर इवान** (१७४५-१७८४) – रशियन कवी आणि दंत-कथाकार.

पान – २२४

[230] **फामूसोव, स्कालोझूब, मोल्चालिन, रेपेतीलोव** – ही सर्व पात्रे 'अकलेची दु:खे' ह्या ग्रिबायेदोव यांच्या विनोदी नाटकातील आहेत.

[231] **नगराध्यक्ष** – नि. गोगोल यांच्या 'रेविझोर' ('अंमलदार') नाटकातील पात्र.

[232] **रासप्लूयेव** – रशियन लेखक सूखोवो – कोबीलिन अलेक्सान्द्र (१८१७-१९०३) यांच्या 'क्रेचिन्स्कीचे लग्न' व 'तारेल्कीनचा मृत्यू' ह्या लघु-कादंबऱ्यांमधील पात्र.

पान – २२७

[233] **चर्चिल विन्स्टन** (१८७४-१९६५) – ग्रेट ब्रिटनचे पंतप्रधान १९४०-१९४५ आणि १९५१-१९५५.

पान – २२९

[234] **फालस्टाफ** – वि. शेक्सपीयरच्या 'चौथा हेन्री' व 'विंडसरच्या खोडकर बायका'मधील पात्र.

[235] **मिसअॅन्थ्रोप** – ह्याच शीर्षकाच्या मोलीयरच्या विनोदी नाटकाचा नायक.

पान – २३०

[236] **लॉईड जॉर्ज डेव्हिड** (१८६३-१९४५) – ग्रेट ब्रिटनचे पंतप्रधान १९१६-१९२२.

पान – २३३

[237] नि. नेक्रासोव यांच्या 'साशा' कवितेमधून.

पान – २३४

[238] **'शिक्षणाची फळे'** – ल्येव तल्स्तोय यांचे नाटक.

[239] **बोमार्शे प्येर ऑगस्टिन** (१७३२-१७९९) – फ्रेंच नाटककार; 'सेव्हिलचा न्हावी' आणि 'फिगारोचे लग्न' ह्या विनोदी नाटकांमुळे जगभर प्रसिद्धी.

[240] **क्लेईस्त हेन्रिक** (१७७७-१८११) – जर्मन लेखक; सृजनशील लेखनात असंमजसवादाचा आणि रोमांचवादाचा जीवनातील सत्याशी व सामाजिक उपहासाशी संयोग ('फुटलेला खुजा').

[241] **त्रूबादूर** – ११ व्या शतकापासून १३ व्या शतकाच्या अखेरीपर्यंतचे प्रांतिक कवी-गायक.

[242] **मेयस्तेरझिंगर** – जर्मन कामगारवर्गातील मध्ययुगीन कवी गायक.

[243] **'इवान बोलोत्निकोव'** – बोलोत्निकोव इवान (?-१६०८) – रशियातील १६०६-१६०७ मधील लोकांच्या उठावाचा नेता.

[244] **राझिन स्तेपान** (सुमारे १६३०-१६७१) – रशियातील शेतकऱ्यांच्या युद्धाचा (१६७०-१६७१) पुढारी.

[245] **पहिला रोमानोव** – मिखाइल फ्योदरोविच (१५९६-१६४५) – रशियाचा रोमानोव वंशातील पहिला झार.

[246] **अलेक्सेइ** – अलेक्सेइ मिखायलोविच (१६२९-१६७६) – रशियाचा १६४५ पासून झार.

पान – २३५

[247] **"सात बायारांची सत्ता"** – रशियामधील १६१० ते साधारण १६१२ पर्यंतचे बायार सरकार (७ सदस्यांचे). प्रत्यक्ष सत्ता पोलिश आक्रमकांच्या हाती सोपवली. लोकांच्या स्वयंसेवक सेनेने पदच्युत केले.

पान – २३७

[248] **संदर्भ**, नाटक – 'तळागाळातली माणसे'.

[249] **कोनोवालोव** – मा. गोर्कींच्या ह्याच शीर्षकाच्या कथेचा नायक.

[250] **बूब्नोव, सातीन** – मा. गोर्कींच्या 'तळागाळातली माणसे' नाटकातील पात्रे.

[251] **'न-नायक'** – रशियन लेखक पतापेन्को इग्नाती (१८५६-१९२९) यांच्या कादंबरीचे नांव.

पान – २३८

[252] ल्येव तल्स्तोय यांना उद्देशून.

पान – २४१

[253] **'तरुण लेखकांबरोबर वार्तालाप'** – सर्वप्रथम संपूर्णरीत्या प्रकाशित, 'लितेरातूर्नाया उच्योबा' ('साहित्यिक अभ्यास') नियतकालिक, १९३४, क्र.४, संक्षिप्त प्रकाशन.

पान – २४६

[254] म. गार्कनेस यांना एंगल्सनी पत्रात (एप्रिलच्या आरंभी, १८८८)

लिहिले होते : “भूत, वर्तमान आणि भविष्यातील सर्व झोलांपेक्षा मी बाल्झाकना अधिक ठळक कलाकार–वास्तववादी मानतो, स्वतःच्या ‘मानवी हास्यांतिके’मार्फत फ्रेंच “समाजा”चा अत्यंत विलक्षण वास्तववादी इतिहास आपल्यापुढे ते सादर करतात..., त्यातून जेवढा आर्थिक तपशील मिळाला... सर्व व्यावसायिक इतिहासकारांच्या, अर्थशास्त्रज्ञांच्या व संख्याशास्त्रज्ञांच्या पुस्तकांमधील एकूण गोळाबेरजेतूनही तेवढा मिळाला नाही,... बाल्झाकना स्वतःच्या वर्गीय सहानुभूतींविरुद्ध आणि राजकीय दूषित पूर्वग्रहांविरुद्ध जावे लागले, कारण स्वतःच्या लाडक्या उमरावांचे पतन अपरिहार्य असल्याचे त्यांना **दिसले** होते व त्याहून अधिक लायकीचे नशीब नसलेले लोक म्हणून त्यांचे चित्रण त्यांनी केले आणि त्या काळात केवळ जेथे शक्य होते तेथेच त्यांनी भविष्यातील खरी माणसे **पाहिली**, हा माझ्या मते वास्तववादाचा सर्वांत मोठा विजय होता, बाल्झाक यांचे सर्वांत मोठे वैशिष्ट्य होते” (मार्क्स-एंगल्स, लेख-संग्रह, २ री आवृत्ती, खंड ३६, पाने ६६-६७).

पान – २४७

[255] **हार्टमान एडवर्ड** (१८४२-१९०६)–जर्मन आदर्शवादी तत्त्वज्ञ. पूर्णतया अजाण भावनिक आरंभ–जागतिक इच्छा–अस्तित्वाचा आधार मानला (‘अजाणतेचे तत्त्वज्ञान’).

[256] **लेओपार्दी जाकोमो** (१७९८-१८३७)–इटलीचे रोमांचवादी कवी. देशभक्तीपर कवने, तत्त्वज्ञानपर भावगीते आणि गद्य.

[257] **श्तीर्नेर माक्स** (१८०६-१८५६)–जर्मन तत्त्वज्ञ; सातत्यशील अहंकेंद्रिततेचे अनुयायी. ‘जर्मन विचारप्रणाली’मध्ये मार्क्स आणि एंगलसनी श्तीर्नेर यांच्या अराजकवादावर आणि व्यक्तिवादावर टीका केली होती.

पान – २४८

[258] **हार्डी थॉमस** (१८४०-१९२८)–इंग्रज वास्तववादी कादंबरीलेखक; २० व्या शतकातील एक थोर भावकवी.

[259] **शातोब्रियान फ्रान्सूआ रेने** (१७६८-१८४८)–फ्रेंच रोमांचवादी लेखक; प्रतिगामी उमरावांचे आणि राजनिष्ठांचे प्रवक्ते.

पान – २४९

[260] **चिचिकोव, सबाकेविच, नझ्द्रेव, प्ल्यूश्कीन** – गोगोल यांच्या 'मृतात्मे' कादंबरीतील पात्रे.

पान – २५२

[261] 'नरक', 'प्रायश्चित्तभूमी', 'स्वर्ग' – इटलीचे कवी दान्ते (१२६५-१३२१) यांच्या 'दैवी हास्यांतिके'चे तीन भाग.

पान – २५३

[262] **'सोविएत साहित्य'** – १७ ऑगस्ट १९३४ रोजी सोविएत लेखकांच्या पहिल्या अखिल-संघ काँग्रेसपुढील भाषण. सर्वप्रथम १९३४ मध्ये अनेक आवृत्त्यांमध्ये प्रसिद्ध. संक्षिप्त प्रकाशन.

[263] **स्पेन्सर हर्बर्ट** (१८२०-१९०३) – इंग्रज तत्त्वज्ञ आणि समाजशास्त्रज्ञ; प्रत्यक्षज्ञानवादाचे एक संस्थापक.

पान – २५४

[264] **फ्रेझर जेम्स जॉर्ज** (१८५४-१९४१) – ब्रिटिश शास्त्रज्ञ, धार्मिक इतिहासाचे तज्ज्ञ.

[265] **कान्ट इमॅन्युएल** (१७२४-१८०४) – जर्मन तत्त्वज्ञ, जर्मन अभिजात तत्त्वज्ञानाचे संस्थापक; त्यांच्या तत्त्वज्ञानात आत्मनिष्ठ, कल्पनावादी आणि भौतिकवादी प्रवृत्तींचा संयोग.

[266] **ॲरीस्टॉटल** (ख्रि. पू. ३८४-३२२) प्राचीन ग्रीक तत्त्वज्ञ आणि शास्त्रज्ञ; त्यांच्या काळातील सर्व ज्ञानक्षेत्रांशी संबंधित पुस्तके; कायदेशीर तर्कशास्त्राचे संस्थापक; भौतिकवाद आणि कल्पनावाद यांच्यात डळमळत राहिले.

पान – २५५

[267] **शहाणी वासिलिसा** – रशियन परीकथांमधील पात्र.

पान – २५७

[268] **कालेवी** ('कालेविपोग') – एस्तोनियाचे राष्ट्रीय महाकाव्य.

[269] **प्लेटो** (ख्रि. पू. ४२८ अथवा ४२७– ३४८ अथवा ३४७) – प्राचीन ग्रीक कल्पनावादी तत्त्वज्ञ; त्यांची शिकवण हा वस्तुनिष्ठ कल्पनावादाचा पहिला अभिजात प्रकार आहे.

[270] **बर्कले जॉर्ज** (१६८५-१७५३) – आयरीश तत्त्वज्ञ, आत्मनिष्ठ कल्पनावादाचे प्रतिनिधी, बिशप.

प्रस्तुत संदर्भ 'भौतिकवाद आणि अनुभवजन्य टीका. प्रतिगामी तत्त्वज्ञानासंबंधी टीकात्मक टिपणे' ह्या लेनिन यांच्या पुस्तकाचा आहे.

[271] **बर्गसन हेन्री** (१८५९-१९४१) – फ्रेंच कल्पनावादी तत्त्वज्ञ; अंतःप्रेरणावादाचे आणि जीवनविषयक तत्त्वज्ञानाचे प्रतिनिधी.

पान – २६०

[272] **फूल्टन रॉबर्ट** (१७६५-१८१५) – अमेरिकन अभियंते आणि संशोधक, पहिली चाकाची आगबोट बांधली.

पान – २६१

[273] **मिकूला सेल्यानीनोविच** – योद्धा आणि नांगऱ्या. रशियन महाकाव्यांचा नायक.

[274] **स्व्यातोगोर** – योद्धा, रशियन महाकाव्यांचा नायक.

[275] **भाबडा इवान** – रशियन लोककथांचा नायक.

[276] **पेत्रूश्का** – रशियन कळसूत्री बाहुल्यांच्या खेळातील प्रमुख पात्र.

पान – २६२

[277] **शिलेदारी कादंबरी** – मध्ययुगातील औदार्यवादी साहित्याचा महा-

काव्यात्मक प्रकार; त्याच्या केंद्रस्थानी शिलेदाराची व्यक्तिरेखा असते व कीर्तीसाठी आणि प्रेमासाठी तो शिलेदार पराक्रम गाजवतो.

[278] **थील यूलेनश्पीगेल** – मध्ययुगीन जर्मन व डच दंतकथांचा नायक.

[279] **सिंप्लीत्सीस्सीमूस** – जर्मन लेखक ग्रिम्मेलहाऊझेन हान्स जेकब (सुमारे १६२१-१६७६) यांच्या ह्याच शीर्षकाच्या कादंबरीचा नायक.

[280] **तोर्म्सचा लाझारील्लो** – १५५४ मध्ये प्रकाशित झालेल्या 'तोर्म्सचा लाझारील्लो' ह्या निनांवी स्पॅनिश कादंबरीचा नायक.

[281] **झील ब्लाझ** – फ्रेंच लेखक लेसाज आलेन रेने (१६६८-१७४७) यांच्या 'झील ब्लाझ सान्तील्यानची कहाणी' ह्या कादंबरीचा नायक.

[282] **आर्सेन ल्यूपेन** – फ्रेंच लेखक लेब्लान मॉरीस (१८६४-१९४१) यांच्या साहसी कादंबऱ्यांचा गुप्तहेर नायक.

पान – २६३

[283] **सान्चो पान्झा** – 'डॉन क्विक्झोट' ह्या सेर्वांतिस यांच्या कादंबरीतील पात्र.

[234] **रोकॅम्बोल** – फ्रेंच लेखक पोन्सोन दू तेरायल्या प्येर अलेक्सिस (१८७१-?) यांच्या असंख्य कादंबऱ्यांचा नायक.

पान – २६४

[285] **शेरलॉक होम्स** – इंग्रज लेखक कॉनन डॉयल आर्थर (१८५९-१९३०) यांच्या अनेक कथांचा नायक.

[286] **कूकोल्नीक नेस्तर** (१८०९-१८६८) – रशियन लेखक; प्रतिगामी राजनिष्ठवादी स्वरूपाची नाटके.

[287] **तेर्सितिस** – 'इलियड' मधील एक पात्र.

[288] **अथेन्सचा टायमन** – शेक्सपीयरच्या ह्याच शीर्षकाच्या शोकांतिकेचा नायक.

[289] **शायलॉक** – शेक्सपीयरच्या 'व्हेनिसचा व्यापारी' ह्या सुखांतिकेतील प्रमुख पात्र.

[290] **इवान चौथा (महाभयंकर)** (१५३०-१५८४) – रशियाचा झार.

[291] **कोन्दोत्येरी** – इटलीमधील १४-१६ शतकांच्या दरम्यान भाडोत्री सैनिकांच्या टोळ्यांचे प्रमुख.

पान – २६५

[292] **ओवेन रॉबर्ट** (१७७१-१८५८) – इंग्रज मनोराज्यवादी समाजवादी.

[293] **फोर्ड हेन्री** (१८६३-१९४७) – अमेरिकन कारखानदार, मोटार उद्यमांचे मालक.

[294] **मोर्गन जॉन पीरपोन्त ज्येष्ठ** (१८३७-१९१३) – अमेरिकन अर्थदाते; रेलमार्ग, पोलाद ट्रस्ट आणि बँकांचे मालक.

[295] **मोर थॉमस** (१४७८-१५३५) – इंग्रज तत्त्वज्ञ, मुत्सद्दी आणि लेखक; मनोराज्यवादी समाजवादाचे एक संस्थापक.

[296] **काम्पानेल्ला तोम्माझो** (१५६८-१६३९) – इटलीचे तत्त्वज्ञ, कवी आणि मुत्सद्दी.

[297] **फूरये शार्ल** (१७७२-१८३७) – फ्रेंच मनोराज्यवादी समाजवादी.

[298] **सेंट-सायमन हेन्री** (१७६०-१८२५) – फ्रेंच मनोराज्यवादी समाजवादी.

पान – २६७

[299] **तल्स्तोय फ्योदर** (१७८२-१८४६) – काऊंट, रक्षक अंमलदार, साहसांबद्दल आणि द्वंद्वांबद्दल प्रसिद्ध.

[300] **बाकूनिन मिखाइल** (१८१४-१८७६) – रशियन क्रांतिकारक, अराजकवादाचे सैद्धांतिक.

[301] **फोन्विझिन देनिस** (१७४५-१७९२) – रशियन लेखक, प्रबोधनकार; रशियन सामाजिक हास्यांतिकेचे निर्माते.

[302] **बूल्गारीन फाद्देय** (१७८९-१८५९) – रशियन पत्रकार आणि लेखक; प्रतिगामी वर्तमानपत्राचे आणि नियतकालिकाचे प्रकाशक; खोट्या ऐतिहासिक कादंबऱ्या व साहित्यिकांवरील राजकीय अहवालांचे लेखन.

[303] **मसाल्स्की कॉन्स्तन्तिन** (१८०२-१८६१) – रशियन लेखक.

[304] **झोतोव राफाएल** (१७९५-१८७१) – रशियन लेखक.

[305] **आवेरचेन्को आर्कादी** (१८८१-१९२५) – रशियन विनोदी लेखक.

पान – २६८

[306] **ताबोरीत** – १५ व्या शतकाच्या पूर्वार्धातील बोहेमियामधील सरंजामदारविरोधी क्रांतिकारक.

[307] **'बॅरन म्यूनहाऊझेनची साहसे'** – जर्मन लेखकांच्या पुढील पुस्तकांचा संदर्भ: रास्पे (१७३७-१७९४). 'बॅरन म्यूनहाऊझेनची अचाट साहसे, प्रवास आणि लष्करी पराक्रम' (१७८५); ब्यूर्गेर (१७४७-१७९४) 'बॅरन म्यूनहाऊझेनची साहसे' (१७८६-१७८८); इम्मेरमान (१७९४-१८४०) 'म्यूनहाऊझेन' (१८३८).

[308] **'गार्गान्टचूआ आणि पान्ताग्रूएल'** – राब्ले यांची कादंबरी – 'गार्गान्टचूआ आणि पान्ताग्रूएल'.

पान – २६९

[309] **पीटर श्लेमील** – जर्मन रोमांचवादी लेखक शामिस्सो आदालबेर्त (१७८१-१८३८) यांच्या 'पीटर श्लेमीलची असाधारण कथा' ह्या लघुकादंबरीचा नायक.

पान – २७०

[310] **'भूमिगत टिपणे'** – फ्यो. दस्तोयेवस्कींची कादंबरी.

[311] प्रस्तुत संदर्भ रशियन लेखक आणि राजकारणी साविन्कोव बरीस (टोपणनांव – वि. रोप्शिन, १८७९-१९२५) यांच्या 'जे घडले नाही, ते' ह्या कादंबरीचा.

[312] **सानिन आर्त्सीबाशेव** – रशियन लेखक आर्त्सीबाशेव मिखाइल (१८७८-१९२७) यांच्या ह्याच शीर्षकाच्या कादंबरीचा नायक.

[313] **फिग्नेर वेरा** (१८५२-१९४२) – रशियन क्रांतिकारक चळवळीत भाग, लेखिका.

[314] प्रस्तुत संदर्भ फ्यो. दस्तोयेवस्कींनी ८ जुलै १८८० रोजी मॉस्कोतील पूष्कीन यांच्या पुतळ्याच्या अनावरणप्रसंगी केलेल्या भाषणाचा आहे.

[315] **स्त्रूवे प्योत्र** (१८७०-१९४४) – रशियन अर्थशास्त्रज्ञ, तत्त्वज्ञ, इतिहासकार, प्रचारक आणि "वैध मार्क्सवादा"चे सिद्धांतकार; श्वेत स्थलांतरितांच्या सनदशीर-लोकशाही पक्षाचे एक पुढारी.

[316] **फिख्ते योहान्न** (१७६२-१८१४) – जर्मन तत्त्वज्ञ, जर्मन अभिजात कल्पनावादाचे प्रतिनिधी.

पान – २७१

[317] एक चूक. 'वेखी' हा संग्रह धार्मिक व कल्पनावादी प्रचारकांच्या आणि तत्त्वज्ञांच्या गटाने १९०९ मध्ये प्रसिद्ध केला.

[318] **स्तोलीपिन प्योत्र** (१८६२-१९११)– रशियन प्रतिगामी मुत्सद्दी; गृहमंत्री आणि मंत्रिमंडळाचे अध्यक्ष (१९०६ पासून).

[319] **लेओन्त्येव कॉन्स्तन्तिन** (१८३१-१८९१) – रशियन लेखक, प्रचारक आणि साहित्य-समीक्षक. धर्माचा, राजसत्तेचा, इस्टेट परंपरेचा पुरस्कार; क्रांतीला विरोध.

[320] **तीखोमीरोव ल्येव** (१८५२-१९२३) – रशियन नरोदनिक, प्रचारक; राजसत्तेचा पुरस्कार.

[321] हा संदर्भ १८४८ आणि १८७१ च्या (पॅरिस कम्यून) फ्रेंच क्रांत्यांचा आहे.

[322] **बर्कले जॉर्ज** – २७० टीप पहा.

[323] **लीबनीत्झ गॉटफ्रीड विल्हेल्म** (१६४६-१७१६) – जर्मन कल्पनावादी तत्त्वज्ञ, गणितज्ज्ञ, पदार्थवैज्ञानिक आणि भाषाशास्त्रज्ञ.

[324] **देकार्त रेने** (१५९६-१६५०)– फ्रेंच तत्त्वज्ञ, गणिततज्ज्ञ, पदार्थवैज्ञानिक आणि शरीरशास्त्रज्ञ.

[325] **हेगेल जॉर्ज विल्हेल्म फ्रीड्रिख** (१७७०-१८३१)– जर्मन तत्त्वज्ञ; वस्तुनिष्ठ कल्पनावादाच्या आधारावर विरोधविकासाचा पद्धतशीर सिद्धांत निर्माण केला.

पान – २७२

[326] **सोलोगूब फ्योदर** (तेतेरनीकोव फ्योदर यांचे टोपणनांव) (१८६३-१९२७)– रशियन लेखक. ऱ्हासाच्या धारणा लेखनात ठळकपणे.

[327] **साल्तीचिखा** – साल्तीकोवा दार्या (१७३०-१८०१) हिचे टोपणनांव; ह्या रशियन जमिनदारीणीने १०० पेक्षा जास्त भूदासांचा क्रूर छळ केला.

[328] **इस्माइलोव ल्येव** (१७६३-१८३६)–रशियन सेनापती, कुप्रसिद्ध जुलूमशहा आणि क्रूर जमिनदार.

[329] **करोबोचका, पेतूख, मानीलोव, सोबाकेविच, नोझ्द्रोव**–गोगोल यांच्या 'मृतात्मे' मधील व्यक्तिरेखा.

पान–२८३

[330] **एबेर्त फ्रीड्रिख** (१८७१-१९२५)–जर्मनीचे प्रेसिडेंट (१९१९-१९२५), सामाजिक-लोकशाही पक्षाच्या उजव्या गटाचे पुढारी.

[331] **नोस्के गूस्ताव** (१८६८-१९४६)–जर्मन सामाजिक-लोकशाही उजव्या गटाचे; १९१९-१९२० मध्ये संरक्षणमंत्री.

पान–२९१

[332] **'कामगारवर्गीय मानवतावाद'**–'प्रावदा' आणि 'इझ्वेस्तिया', १९३४, मे २३. संक्षिप्त.

पान–२९२

[333] **ल्यूथर मार्टिन** (१४८३-१५४६)–जर्मन सुधारणेचे पुढारी; पाप-मुक्ततेला विरोध.

[334] **काल्विन ज्याँ** (१५०९-१५६४)–फ्रेंच प्रोटेस्टंट सुधारक; आत्यंतिक धार्मिक असहिष्णुता.

पान–२९३

[335] प्रस्तुत संदर्भ १९०५-१९०७ च्या पहिल्या रशियन क्रांतीचा.

पान–२९६

[336] रशियातील यादवी युद्धाचा संदर्भ.

पान–२९८

[337] **त्रेयचके हेन्रिख** (१८३४-१८९६)–जर्मन राष्ट्रवादी इतिहासकार.

पान – ३०१

[338] **''आई' कादंबरीच्या फ्रेंच आवृत्तीला प्रस्तावना'** – लेखकाच्या मृत्यूनंतर प्रथम प्रकाशित. संग्रह 'अ. मा. गोर्की यांचा दफ्तरखाना', खंड ३, मॉस्को, १९५१.

[339] गोर्की यांनी 'आई' कादंबरी १९०६ साली अमेरिकेत लिहिली. अटक चुकविण्यासाठी ते तेथे गेले होते.

[340] व्ला. लेनिन यांनी ह्या कादंबरीचे तिच्या क्रांतिकारक-शैक्षणिक गुणांसाठी खूप कौतुक केले: "हे पुस्तक अत्यावश्यक आहे, अनेक कामगार वर्गजाणीवेचा अभाव असताना, उत्स्फूर्तपणे क्रांति-चळवळीत सामील झाले आणि आता ते 'आई' वाचतील तेव्हा त्यांना स्वतःला खूप फायदा होईल." (गोर्की मा., लेख-संग्रह, खंड १७, १९५२, पान ७).

पान – ३०२

[341] १९३४ मधील चिनी लाल सेनेच्या चँग कै-शेकच्या फौजांविरुद्धच्या यशस्वी लष्करी कारवायांचा संदर्भ.

माननीय वाचक !

प्रस्तुत पुस्तकाबाबतची आपली मते आणि सूचना जाणून घेण्यास आम्हाला आनंद वाटेल.

रशियन आणि सोविएत साहित्याचे तुमच्या मातृभाषेतील अनुवाद आमच्या लोकांच्या संस्कृतीची व जीवनाची सखोल ओळख करून घेण्यास आपल्याला मदत करतील अशी आशा आहे. आमचा पत्ता: 'रादुगा' प्रकाशन, १७ झूबोवस्की बुलवार, मॉस्को, ११०२१, सोविएत संघ.

१९८३ साली ‘रादुगा’ प्रकाशनमध्ये पुढील पुस्तके प्रकाशित करण्यात आली आहेत.

इ. तुर्गेनेव ‘तीन प्रेमकथा’
ल्ये. तल्स्तोय ‘शापित संगीत’
म. गोर्की ‘आई’

गोर्की मा. 'आई'. कादंबरी – नवीन आवृत्ती.

जागतिक साहित्याच्या संपूर्ण इतिहासात एकाही ललितकृतीला ह्या पुस्तकाएवढी वाचकांची एवढी प्रचंड संख्या लाभली नाही आणि लोकांच्या जीवनात ह्या पुस्तकाएवढी वाचकांची एवढी प्रचंड संख्या लाभली नाही आणि लोकांच्या जीवनात ह्या पुस्तकाएवढे दुसऱ्या कोणत्याही पुस्तकाने जबरदस्त परिणाम घडवून आणले नाहीत. जगातील १२७ भाषांमधून ह्या पुस्तकाच्या दशलक्षावधी प्रती प्रसिद्ध झाल्या आहेत. १९०५ साली ह्या पुस्तकाला हस्तलिखिताच्या स्वरूपातच लेनिननी वाचले होते तेव्हा ते 'आई' कादंबरीविषयी म्हणाले होते: "हे पुस्तक आवश्यक आहे. अनेक कामगारांनी क्रांतिचळवळीत अजाणता, उत्स्फूर्तपणे भाग घेतला होता, पण आता ते 'आई' वाचतील तेव्हा त्यांचा फार मोठा लाभ होईल..." कादंबरी वास्तव ऐतिहासिक घटनांवर आधारलेली आहे. पुस्तकातील व्यक्तिरेखा – पावेल व्लासोव आणि नीलोवना – गोर्कींच्या चांगल्या परिचयाच्या असलेल्या कामगार प्योत्र झालोमोव आणि त्यांची आई आन्ना किरील्लोवना यांच्यावर आधारलेल्या आहेत.

तल्स्तोय ल्ये. **'शापित संगीत'**. कथासंग्रह

ह्या संग्रहात तल्स्तोय यांच्या सहा सर्वोत्तम कथांचा समावेश आहे: 'दोन शिलेदार' (१८५६), 'सुखी कौटुंबिक जीवन' (१८५९), 'एका घोड्याची कहाणी' (१८८५), 'शापित संगीत' (१८८९), 'इवान इल्यिचचा मृत्यू' (१८८६) आणि 'बॉलनृत्यानंतर' (१९०३).

सोविएत लेखक लेओनिद लेओनोव यांची 'तल्स्तोय यांच्याबद्दल चार शब्द' ही प्रस्तावना प्रस्तुत संग्रहात समाविष्ट केले आहेत.

तुर्गेनेव इ. **'तीन प्रेमकथा'**. कथासंग्रह

रशियन साहित्यसृष्टीत व जागतिक साहित्यक्षेत्रात इवान तुर्गेनेव (१८१८-१८८३) याचे स्थान मनोविश्लेषणाचे प्रतिभावान अभ्यासक व रशियन निसर्गसौंदर्याचे शाहीर म्हणून अनन्यसाधारण आहे.

प्रस्तुत कथासंग्रहात इवान तुर्गेनेव यांच्या 'आस्या', 'पहिले प्रेम' आणि 'वसंतामधील जलधारा' या कथांचा समावेश करण्यात आला आहे. अचूक मनोविश्लेषण, काव्यात्मकता व जीवनाचा खोलवर अनुभव यांच्या आधारे लेखक आपल्या पहिल्या प्रेमाला वाचा फोडतो. पहिले प्रेम माणसाला उदात्त, उत्कट आणि निर्मळ बनविते, असे लेखकाला म्हणायचे आहे.